मुलांच्या आंतरिक आत्मिक विश्वाचा, विशेषतः त्यांच्या विचार-विश्वाचा अभ्यास हे शिक्षकाचे एक सर्वात महत्त्वाचे कार्य आहे.

वासिली सुखोम्लिन्स्की

वासिली सुखोम्लिन्स्की

# माझे विश्व मुलांचे



प्रगती प्रकाशन
मॉस्को




लोकवाङ्मय गृह प्रा. लि.
मुंबई

# अनुक्रमणिका

## बालपणाची वर्षे

# प्रकाशकांचे दोन शब्द

वासिली अलेक्सांद्रोविच सुखोम्लिन्स्की (१९१८-१९७०) यानी आपल्या अल्पायुष्याची पस्तीस वर्षे बालविकासाच्या आणि बालशिक्षणाच्या कार्याला वाहून घेतली. मोठ्या शहरांपासून खूप दूर असलेल्या पावलिश या उक्रेनियन खेड्यातील एका विद्यालयाचे ते एकोणतीस वर्षे संचालक होते.

शिक्षणक्षेत्रातील त्यांच्या कार्याबद्दल त्याना समाजसत्तावादी श्रमवीर आणि उक्रेनियन सोविएत प्रजासत्ताकाचे गुणवंत शिक्षक हे किताब प्रदान करण्यात आले आणि सोविएत अध्यापनशास्त्र प्रबोधिनीचे समकक्ष सभासद म्हणून त्यांची निवड करण्यात आली.

शिक्षणतज्ज्ञ म्हणून वासिली सुखोम्लिन्स्की यानी केलेल्या कार्याचा मूळ गाभा काय होता?

संगोपन आणि शिक्षण ही एकच शैक्षणिक प्रक्रिया असावी असा प्रगतीशील शिक्षणतज्ज्ञांचा दीर्घ काळ प्रयत्न चालला होता. सुखोम्लिन्स्की यांच्या शैक्षणिक कार्यात हे स्वप्न साकार झालेले दिसते. प्रत्येक शालेय बालकाकडे एक व्यक्ती म्हणून पहाणे हा त्यांच्या शिक्षणपद्धतीचा गाभा होता आणि ज्याला मुलांचा योग्य विकास करावयाचा आहे आणि त्याना शिकवावयाचे आहे अशा प्रत्येक व्यक्तीच्या दृष्टीने ती एक अत्यंत आवश्यक बाब आहे.

हुशार विद्यार्थी आणि सुमारे विद्यार्थी अशी मुलांची गटवारी न करता कोणत्याही निकोप मुलाला कोणत्याही साध्या सार्वजनिक शाळेत आधुनिक माध्यमिक शिक्षण मिळू शकते हे वासिली सुखोम्लिन्स्की यानी आपल्या सिद्धांताद्वारे आणि व्यवहाराद्वारे दाखवून दिले. हा काही नवीन शोध नव्हता. परंतु राष्ट्रीय शैक्षणिक कार्यक्रमाशी मेळ राखून मुलाला ज्ञानाची दालने खुली करणे शिक्षकाला शक्य व्हावे अशी एक सयुक्तिक पद्धत त्यानी शोधून काढली. मुलामध्ये ज्ञानार्जनाची ओढ जागृत करणे, त्याच्यामध्ये

स्वयंशिक्षणाची आणि स्वयंशिस्तीची अभिरुची निर्माण करणे ही सुखोम्लिन्स्की यांच्या दृष्टीने मुख्य गोष्ट होती.

इतर शिक्षकांबरोबर व पालकांबरोबर सल्लाविचारांची देवघेव करून, गतकाळातील महान शिक्षणतज्ज्ञांच्या मतांशी आणि लोकसंचित ज्ञानाशी आपले विचार ताडून पाहून सुखोम्लिन्स्कीनी आपल्या प्रत्येक विद्यार्थ्याचा सूक्ष्म अभ्यास केला.

मुलाना शिकवावयाचे असल्यास प्रथम मुलांबद्दल तुम्हाला प्रेम वाटले पाहिजे, जिव्हाळा वाटला पाहिजे. तरच श्रमात जो आनंद सामावला आहे त्या आनंदाची, मैत्रीची आणि मानवतेची मुलाना ओळख पटण्यास तुम्ही त्याना साहाय्यभूत होऊ शकाल. शिक्षकाने प्रत्येक मुलाच्या काळजापर्यंत जाऊन पोहोचले पाहिजे; तरच आपल्या कुटुंबियांवर, आपल्या शाळेवर, आपल्या कामावर व ज्ञानावर, आणि आपल्या मायभूमीवर प्रेम करण्यास तो मुलाना शिकवू शकेल. मुलाच्या काळजापर्यंत जाऊन पोहोचणे — नेमकी हीच पद्धत वापरली सुखोम्लिन्स्की यांच्या शैक्षणिक कार्याची आधारशिला होती.

आपल्या विद्यार्थ्यांमध्ये वसत असलेले सर्वोत्तम गुण प्रकाशात आणणे — त्यांच्या स्वाभाविक मगदुरांचा विकास घडवून आणणे, त्यांच्या नैतिक गुणाना आकार देणे, कम्युनिस्ट ध्येयाना वाहून घेतलेल्या प्रामाणिक लोकांची पिढी निर्माण करणे हे सोविएत शिक्षकाचे उद्दिष्ट असले पाहिजे अशी त्यांची धारणा होती.

सद्विचार, सत्य, भावविश्व आणि विचारविश्व यांचे शिक्षण ही सुखोम्लिन्स्कींची शिक्षणपद्धती आहे. त्यातून आकारास येते ती माणूस आणि नागरिक म्हणून व्यक्तीची घडण.

आपल्या जीवनात सुखोम्लिन्स्कीनी जे निरीक्षण केले आणि जे विचारमंथन केले त्यासंबंधी आपल्या अखेरच्या वीस वर्षांत त्यानी टिपणे तयार केली. आपल्या अनेक पुस्तकांसाठी व लेखांसाठी त्यानी या टिपणांचा उपयोग केला. 'माझे विश्व मुलांचे', 'नागरिकाचा जन्म', 'पावलिशची माध्यमिक शाळा', आणि 'सामूहिकाचे ज्ञानसामर्थ्य' ही त्यांपैकी काही सर्वात प्रसिद्ध पुस्तके होत. या लोकोत्तर शिक्षणतज्ज्ञाच्या संपन्न अनुभवांचे सारच त्यांत एकवटले आहे. आपले साहित्य ही "मकारेन्कोंची निर्मिती" आहे असे सुखोम्लिन्स्की म्हणत असत. सोविएत शिक्षणतज्ज्ञ अन्तोन सेम्योनोविच

मकारेन्को (१८८८-१९३९) यांचे शैक्षणिक अनुभव आणि जीवन त्याना अतिशय मोलाचे वाटत असे.

माणसाच्या व्यक्तीरूपाबद्दल प्रगाढ आदर आणि विश्वास हे मकारेन्कोंच्या पद्धतीचे मूळ होते. १९२० चे दशक हा सोविएत प्रजासत्ताकाच्या दृष्टीने अत्यंत बिकट असा काळ होता. त्यावेळी अनेक मुले आपल्या आईवडिलाना, कुटुंबाना आणि घरादाराना मुकली होती. त्या काळात मुलांच्या एका श्रम-गुरुकुलाचे मकारेन्को हे प्रमुख होते. या परित्यक्त मुलांचे दुःख निवारण करण्यासाठी त्याना मायेची ऊब देणे, आपलेपणा देणे आणि त्यांच्याभोवती नवीन कौटुंबिक वातावरण निर्माण करणे आवश्यक होते. मकारेन्कोंच्या छत्राखाली असलेल्या मुलांच्या दृष्टीने हे सामूहिक म्हणजे अगदी याच प्रकारचे कुटुंब बनले. या मुलाना पुनर्शिक्षण देण्याच्या दृष्टीने, त्यांच्या खोलवर रुजलेल्या संवयी नाहीशा करण्याच्या दृष्टीने एका नव्या दृष्टिकोनाची अत्यंत तातडीने गरज होती आणि या दृष्टिकोनाची मकारेन्को यानी अत्यंत तेजस्वी घडण केली. परंतु मकारेन्कोंच्या पद्धतीत सुखोम्लिन्स्की याना ज्या मुख्य वस्तूचे दर्शन झाले ती वस्तू म्हणजे "सातत्याने घुमणारा मानवतेचा अक्षय नाद", "सर्वोत्कृष्ट मानवी आशाआकांक्षांचे विलोभनीय सौंदर्य."

शिक्षक आणि मूल यांच्यामध्ये मकारेन्कोनी जे नाते स्थापित केले आणि सदिच्छेचे जे वातावरण निर्माण केले अगदी तेच नाते व तेच वातावरण सुखोम्लिन्स्कीना पावलिशच्या शाळेत साधावयाचे होते. नागरिक म्हणून जगाकडे पहाण्याची दृष्टी, आपल्या देशाची व लोकांची सेवा बजावताना व्यक्तिसौंदर्याचा जो आविष्कार घडतो त्या सौंदर्याचे आकलन यांची या दोन शिक्षकानी शिक्षणाशी सांगड घातली. तरुण पिढीला सुष्ट काय आणि दुष्ट काय याचाच केवळ बोध करून देण्यापेक्षा जगावे कसे हे तिला शिकविणे जास्त महत्त्वाचे आहे असे त्याना वाटत होते—हे शिकविणे म्हणजे सामाजिक दुष्टता व अन्याय कधीही सहन करता कामा नये याचीच तिला शिकवण देणे होय.

वासिली सुखोम्लिन्स्की यांचा शैक्षणिक वारसा पुढील गोष्टीवर केंद्रित झाला आहे: कोणतीही पद्धत इतर पद्धतींशी संबंध न ठेवता अलगपणे वापरल्यास त्यातून एकतर करणात्मक नाहीतर अकरणात्मक परिणाम निष्पन्न होऊ शकतात; सुसंवादीपणे सुसंघटित केलेली पद्धतींची एक समग्र व्यवस्था ही महत्त्वाची आहे हे मकारेन्को यांच्या तत्त्वांचे सार आहे. आपली शैक्षणिक पद्धत निवडताना सुखोम्लिन्स्कीनी या तत्त्वांचा अंगिकार केला.

सामूहिक शिक्षणाचा सिद्धांत सर्वप्रथम मकारेन्कोंच्या नावाशी निगडित आहे. वासिली सुखोम्लिन्स्की यांच्या शैक्षणिक कार्याने त्याला पुष्टी दिली. मुलाना सामूहिकाच्या बाहेर वाढविणे आणि शिक्षण देणे आधुनिक जगात अशक्य कोटीतले आहे; कारण इतर लोकांबरोबर संवाद साधण्यातला आनंद मुलाना केवळ अशाच शिक्षणाद्वारे शिकावयास मिळतो आणि स्वतः-मधील क्षमता ओळखण्याची संधी त्याना प्राप्त होते.

आजच्या काळात झालेला शिक्षणशास्त्राचा विकास, शाळांमध्ये झालेली सुधारणा यांमुळे सर्व प्रगतीशील शिक्षणतज्ज्ञानी जे शोध लावले आहेत, त्यानी जे साध्य केले आहे आणि जो वारसा निर्माण केला आहे त्यांकडे अधिक लक्ष देणे अपरिहार्यतया आवश्यक बनले आहे. सुखोम्लिन्स्कींच्या कार्यातून ज्या उत्कृष्ट फलश्रुती प्राप्त झाल्या आहेत त्यांवरून हेच दिसून येते की, त्यांच्या सर्व शैक्षणिक साहित्यकृती एकाच अधिष्ठानावर उभ्या आहेत आणि उच्च नीतिमत्तेच्या व नागरी कर्तव्याच्या भावनेने उगवत्या पिढीची घडण करण्याच्या उद्दिष्टाच्या दिशेनेच त्यांचा प्रवास चालू आहे.

* * *

वासिली सुखोम्लिन्स्कीना अल्पवयात मृत्यू आला. वयाच्या बावन्नाव्या वर्षी त्यांचा झालेला मृत्यू म्हणजे युद्धाचा एक बळी होता.

फॅसिस्ट जर्मनीविरुद्ध जेव्हा महान देशाभिमानी युद्ध पेटले (१९४१-४५) तेव्हा सुखोम्लिन्स्की तेवीस वर्षांचे होते. त्यावेळी नुकतेच ते पोल्तावा अध्यापन प्रशिक्षण संस्थेतून बाहेर पडले होते. तेथून त्यानी सैन्यात नाव दाखल केले. त्यांची पत्नी वेरा नाझीव्याप्त पावलिशमध्येच राहिली. तेथे ती गनिमी लढवय्याना मदत करीत होती. अशाच एका कामगिरीवर नि-घाली असताना ती गेस्टॅपोच्या हाती पडली. फॅसिस्ट तुरुंगात असतानाच ती बाळंत होऊन तिला मुलगा झाला. गनिमी पथकांच्या पुढाऱ्यांची तिने नावे सांगावीत म्हणून फॅसिस्टानी या शूर महिलेचा अनन्वित छळ केला; पण तिने तोंडातून ब्र उच्चारला नाही. त्यानी तिच्या तान्ह्या मुलाला तिच्या डोळ्यादेखत ठार केले. स्वतः वेराला फाशी देण्यात आले... तेव्हा सुखो-म्लिन्स्की मॉस्कोच्या वेशीवर आक्रमकांशी लढत होते. तेथे ते जबर जखमी झाले आणि रणांगणावरून त्याना उचलून नेण्यात आले. तेव्हापासून तोफ-गोळ्यांचे प्राणघातक तुकडे त्यांच्या छातीत रुतून बसले होते आणि आपल्या

प्रिय व्यक्तींच्या मृत्यूमुळे एक तीव्र वेदना त्यांच्या हृदयात सतत दाटून राहिली होती.

अशीच वर्षे निघून गेली. देशाच्या युद्धाच्या जखमा बुजत आल्या. युद्धाविषयी ज्याना केवळ इतिहासाच्या पुस्तकांवरूनच माहिती होती अशा नव्या पिढ्या जन्माला आल्या. त्यावेळी पावलिश शाळेच्या मुलाना ही कल्पनाही नव्हती की जो माणूस त्याना शिकवीत होता, शेतांवर व रानांमध्ये घेऊन जात होता त्या माणसाच्या छातीत युद्धाच्या जखमा अजून जिवंत धगधगत होत्या.

औषधेही त्यांच्या बाबतीत निष्प्रभ ठरली. आपले पद सांभाळीत असतानाच शालेय वर्षाच्या सुरुवातीला त्याना मृत्यू आला. मुलांच्या नव्या पिढीसाठी त्यानी आपल्या शाळेचे दरवाजे उघडले; पण ते अखेरचेच.

२ सप्टेंबर १९७० ला त्यांची जीवनज्योत मालवली. अगदी अखेरच्या दिवसापर्यंत ते मुलांसाठीच जगले.

सुखोम्लिन्स्कींच्या शैक्षणिक वारशाकडे, शिक्षणतज्ज्ञ म्हणून त्यांच्या अनुभवाकडे केवळ सोविएत संघराज्यातीलच नव्हे तर साऱ्या जगातील शिक्षकांचे व पालकांचे अधिकाधिक लक्ष वेधले जात आहे.

# प्रास्ताविक

माझ्या वाचकानो आणि सहकाऱ्यानो – शिक्षकानो, शिक्षणतज्ज्ञानो आणि शाळा-संचालकानो :

हे पुस्तक म्हणजे एका शाळेत केलेल्या अनेक वर्षांच्या कामाची फलश्रुती आहे – विचार, काळजी, चिंता आणि व्यग्रता यांची ही फलश्रुती आहे.

खेडेगावातल्या एका शाळेत तेहेतीस वर्षे अखंडपणे मी काम करीत होतो. या कामातून मला फार मोठ्या आनंदाचा लाभ झाला. माझे सारे जीवन मी मुलाना वाहून घेतले आहे. म्हणूनच, पुष्कळ विचार केल्यानंतर, या पुस्तकाला 'माझे विश्व मुलांचे' हे नाव द्यावे असे मी ठरविले. मला वाटते तसा मला अधिकार पोहोचतो. शाळांमधून आज जे काम करीत आहेत आणि आमच्यानंतर जे काम करणार आहेत त्या सर्व शिक्षणतज्ज्ञाना जीवनातल्या एका प्रदीर्घ काळासंबंधी, साधारण दशकाच्या काळासंबंधी मला काही सांगावयाचे आहे: हे दशक म्हणजे आपण शिक्षक अनेक वेळा ज्याला व्रात्य कार्टं म्हणून संबोधितो ते लहान मूल प्रथम शाळेत पदार्पण करते त्या दिवसापासून तरुण-तरुणीना माध्यमिक शाळेचा अभ्यासक्रम पुरा केल्याचे संचालकाकडून प्रमाणपत्र मिळते आणि त्यांच्या स्वतंत्र श्रमिक जीवनाला प्रारंभ होतो त्या उदात्त क्षणापर्यंतचा हा काळ होय. व्यक्तीच्या दृष्टीने त्या विशिष्ट व्यक्तीची घडण होण्याचा हा काळ असतो; पण शिक्षकाच्या दृष्टीने त्याच्या जीवनाचा एक प्रचंड भाग तो व्यापून रहातो. माझ्या जीवनातली कोणती गोष्ट मी मुख्य मानतो? विचारासाठी एक क्षणही न दवडता मी त्याचे उत्तर देतो: **मुलांविषयी मला वाटणारे प्रेम.**

प्रिय वाचक, माझ्या कार्यातील काही गोष्टींशी कदाचित तुम्ही सहमत होणार नाही. कदाचित त्यातील काही गोष्टी तुम्हाला विचित्र किंवा विस्मयजनक वाटतील. तेव्हा बालकांची, किशोरवयीन मुलामुलींची किंवा युवक-युवतींची पिढी वाढविण्यासाठी उपलब्ध असलेले एक सार्वत्रिक साधन

म्हणून या पुस्तकाकडे तुम्ही पाहू नका अशी मी तुम्हाला आधीच जाणीव देत आहे. शिक्षणाच्या परिभाषेत सांगावयाचे झाल्यास बहि:शाल शैक्षणिक कार्य (किंवा त्या संज्ञेच्या मर्यादित अर्थाने मुलांच्या विकासाचे कार्य) हा या पुस्तकाचा विषय आहे. शास्त्राची मूलतत्त्वे शिकण्याच्या प्रक्रियेची पाठ्यसामुग्री किंवा सारे बारीकसारीक उपदेशपर तपशील देण्याचा माझा इरादा नाही. कोमल मानवी संबंधांच्या भाषेत सांगावयाचे झाल्यास हे पुस्तक शिक्षणतज्ज्ञाच्या हृदयाला अर्पण करण्यात आले आहे. मुलाच्या भोवती जे जग पसरलेले असते त्या जगात मुलाला कसे घेऊन जावयाचे, ज्ञान मिळविण्यास त्याला कशी मदत करावयाची आणि त्याचे बौद्धिक श्रम अधिक सुगम कसे करावयाचे, त्याच्या अंत:करणात उदात्त भावना आणि संवेदना कशा जागृत करावयाच्या आणि रुजवायच्या, मानवी प्रतिष्ठेची भावना, मानवाच्या सत्प्रवृत्तीबद्दलचा विश्वास त्याच्या अंगी कसा बाणवावयाचा, सोविएत मायभूमीबद्दलचे प्रेम त्याच्या मनात कसे फुलवावयाचे, मुलाच्या चौकस बुद्धिमत्तेच्या प्रांगणात आणि संवेदनाशील अंत:करणात कम्युनिझमच्या उदात्त ध्येयांविषयीच्या निष्ठेचे पहिले बीजांकूर कसे वाढवावयाचे हे सांगण्याचा मी प्रयत्न केला आहे.

तुम्ही हाती धरलेले हे पुस्तक प्राथमिक इयत्तांतील शैक्षणिक कार्याला वाहिलेले आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे ते शैशवकालीन जगताला वाहिलेले आहे. आणि हे शैशव, हे बालविश्व एक खास प्रकारचे विश्व आहे. सुष्ट आणि दुष्ट, सचोटी आणि अप्रामाणिकपणा, आणि मानवी प्रतिष्ठा यांविषयी मुलांच्या स्वत:च्या अशा कल्पना असतात. सौंदर्याबाबतचे त्यांचे स्वत:चे निकष असतात, इतकेच नव्हे तर कालमापनाचीही त्यांची स्वत:ची पद्धत असते: बालपणी दिवस हा वर्षासारखा वाटतो आणि वर्ष अनाद्यन्त वाटते. **बालपण** म्हणजे परीकथेतील एक किल्ला असतो. या किल्ल्यात प्रवेश मिळविण्यासाठी काही प्रमाणात स्वत:च मूल बनणे आवश्यक आहे असे मला नेहमीच वाटत आले आहे. असे केले तरच आपल्या परीकथेतील विश्वात घुसलेले तुम्ही कोणी उपरे प्राणी आहात किंवा त्यांच्या जगावर पहारा ठेवणारे रखवालदार आहात आणि तेथे ज्या काही घडामोडी चालल्लेल्या असतात त्यांमध्ये तुम्हाला काहीही रस नाही असे मुलाना वाटणार नाही.

या पुस्तकाच्या आशयासंबंधी आणि अनुभवस्वरूपाविषयी मला आणखी एक सूचना द्यावीशी वाटते. प्रथमत: प्राथमिक शाळा म्हणजे एका शिक्षकाचे

सृजनशील श्रम. म्हणूनच शिक्षक-सामूहिकाच्या व पालक-सामूहिकाच्या कार्या-चा उल्लेख करण्याचे मी बुद्धिपुरस्सरच टाळले आहे. ते सर्व समाविष्ट केले असते तर प्रस्तुत पुस्तकाचा पसारा प्रचंड वाढला असता.

पुस्तक जर बालपणासंबंधी असेल तर मुले ज्या कुटुंबांतून येतात त्या कुटुंबांचा, पालकांचा उल्लेख टाळणे हे सुतराम अशक्य असते. कौटुंबिक वातावरणाचे संपूर्ण, सत्य चित्रण मी दिले नसते तर माझी संपूर्ण शिक्षण-कार्यपद्धती मनाचा गोंधळ उडविणारी ठरली असती. नादेझ्दा क्रूप्स्काया, अन्तोन मकारेन्को आणि इतर लोकोत्तर शिक्षणतज्ज्ञांचा शिक्षणाच्या प्रचंड सामर्थ्यावर ठाम विश्वास होता. मीही त्याला अपवाद नाही.

# आनंद विद्यालय

## शाळा-संचालक

दहा वर्षे शिक्षक म्हणून काम केल्यानंतर पावलिशच्या माध्यमिक शाळेचा शाळा-संचालक म्हणून माझी नेमणूक झाली. या दहा वर्षांत माझी जी शैक्षणिक मते आकाराला आली होती त्याना येथे अंतिम स्वरूप मिळाले. येथे माझी मते प्रत्यक्षात उतरलेली मला पहावयाची होती.

ही मते प्रत्यक्षात उतरविण्याचा मी जसजसा अधिकाधिक प्रयत्न करीत होतो तसतशी एक गोष्ट अधिकाधिक स्पष्ट होत गेली आणि ती ही की, नेतृत्व हा सुद्धा एक शैक्षणिक उपक्रम आहे. आपले स्वतःचे उदाहरण घालून देऊन विद्यालयव्यापी पायावर वैचारिक व संघटनात्मक प्रश्न सोडविणे हाच तो उपक्रम होय. संचालक हा स्वतः एक उत्तम शिक्षक आहे आणि मुलांच्या शिक्षणकार्यात तो स्वतः सहभागी होत आहे असे शिक्षकाना दिसले तर शिक्षण-सामूहिकाचा संघटक म्हणून संचालकाचा प्रभाव फार मोठ्या प्रमाणात वाढू शकतो.

शिक्षक व विद्यार्थी यांच्यामधील सातत्यशील संपर्क यामध्येच प्रथमतः शिक्षणाचे मर्म सामावले आहे. महान रशियन शिक्षणतज्ज्ञ के. डी. उशिन्स्की (१८२४-१८७०)* यानी शाळा-संचालकाला मुख्य शिक्षक म्हणून संबोधिले आहे. पण मुख्य शिक्षक म्हणून तो आपली भूमिका कशी पार पाडतो?

शिक्षकांच्या मार्फत मुलांचे शिक्षण घडवून आणणे, शिक्षकाना शिक्षणाचे शास्त्र व कला शिकविणे हे तर महत्त्वाचे आहेच; पण शाळेच्या कारभाराच्या बहुमुखी प्रक्रियेची ही फक्त एक बाजू झाली. इतराना शिक्षणाच्या

---

*'प्रगती प्रकाशन'ने इंग्रजी भाषेत के. डी. उशिन्स्की यांचे 'निवडक साहित्य' व 'शिक्षणाचा एक विषय—माणूस. शैक्षणिक मानववंशशास्त्राचा अनुभव' प्रसिद्ध केले आहे.—सं.

कलेचे फक्त धडे देणे, पण मुलांशी प्रत्यक्ष संपर्क न साधणे एवढ्यापुरतेच मुख्य शिक्षकाने आपले कार्य मर्यादित ठेवले तर शिक्षणतज्ज्ञ म्हणून त्याची भूमिका निकामी ठरते.

मुलांच्या ज्या आवडी असतात, छंद असतात किंवा त्यांच्या ज्या आशाआकांक्षा असतात त्यांची जर माझ्याजवळ उणीव असेल तर मुलांच्या हृदयाची कवाडे मला बंद रहातील याची संचालक म्हणून पहिल्या काही आठवड्यांतच मी जे काम केले त्यावरूनच माझी खात्री पटली. मुलांच्या अंतर्विश्वात प्रवेश करण्याची क्षमता हा शिक्षक-शिक्षणतज्ज्ञाच्या अंगी असावा लागणारा सर्वात महत्त्वाचा गुण आहे. मुलांवर काही ना काही प्रकारचा प्रत्यक्ष शैक्षणिक प्रभाव असल्याशिवाय संचालक म्हणून या गुणाला मी पारखा होईन असे मला कळून चुकले. मला वर्गशिक्षकांचा हेवा वाटत असे; कारण ते नेहमीच मुलांच्या सहवासात असत. वर्गशिक्षकाला विद्यार्थ्यांबरोबर अगदी मनमोकळेपणाने बोलता येते, त्यांच्याबरोबर तो रानावनांत, नद्या-नाल्यांवर किंवा शेतांत काम करायला जाऊ शकतो. मग सहलीना जाण्याचे दिवस उजाडतात. तेथे विद्यार्थी पेज तयार करतात, मासे शिजवतात किंवा लुकलुकत्या ताऱ्यांकडे पहात मोकळ्या मैदानावर आपल्या राहुट्या ठोकतात. अशा दिवसांची मुले अगदी अधीरतेने वाट पहात असतात. संचालक या विश्वाच्या परीघरेषेवर उभा असतो. त्याची तेथे भूमिका असते फक्त संघटकाची, सल्ला देण्याची, उणीवांची नोंद घेण्याची व त्या दुरुस्त करण्याची, चांगले असेल त्याला प्रोत्साहन देण्याची, अनिष्ट असेल त्याला आळा घालण्याची. अर्थात, व्यवस्थापनासाठी या सर्व गोष्टी आवश्यकच असतात; पण माझ्या बाबतीत तेवढे पुरेसे नव्हते.

शैक्षणिक कार्यात सक्रिय भाग घेणारे अनेक उत्कृष्ट शाळा-संचालक मला ठाऊक आहेत. शैक्षणिक कार्यक्षेत्रातील ती खरीखुरी धुरंधर माणसे आहेत. त्यांचे पाठ म्हणजे शिक्षकाना घालून दिलेला कित्ता ठरतो. बालवीर आणि कम्सोमोल संघटनांच्या कार्यात ते सक्रिय भाग घेतात. शिक्षकाना, वर्ग-प्रमुखाना आणि बालवीर नेत्याना देण्यासारखे असे त्यांच्याकडे काहीतरी आहे. पण प्राथमिक शाळा-सामूहिकाच्या जीवनात संचालक या नात्याने प्रत्यक्ष व विस्तृत सहभाग घेऊनच संचालकाला सर्वोच्च कौशल्य संपादन करता येईल अशी माझी धारणा झाली आणि वर्षागणिक माझे हे मत अधिकच दृढ बनले आहे. मला मुलांच्या सहवासात रहावयाचे होते, त्यांच्या सुखदुःखात सहभागी व्हावयाचे होते, त्यांच्याबरोबर निकटत्वाची भावना अनुभवावया-

ची होती. या भावनेसारखी शिक्षकाला आनंद देणारी दुसरी कोणतीही भावना नसेल. मधून मधून या ना त्या बाल-सामूहिकाच्या जीवनात सामील होण्याचा मी प्रयत्न करू लागलो. त्यांच्याबरोबर मी काम करावयास गेलो, त्यांच्या छावणी-सफरीना गेलो, सहलीना गेलो आणि त्या अनन्य, अद्वितीय आनंदाचे सर्जन करण्यास मदत केली. खरोखरच अशा आनंदाशिवाय सर्वांगीण शिक्षणाची कल्पना करणेही अशक्य आहे.

पण या संबंधांत एक प्रकारची कृत्रिमता असल्याचे मुलाना व मला – आम्हा दोघानाही जाणवले. शैक्षणिक परिस्थितीतील अस्वाभाविकपणामुळे मी गोंधळून गेलो. माझा मुलांबरोबरचा सहवास फक्त काही घटकेपुरताच होता याचा मुलाना विसर पडू शकत नव्हता. शिक्षक जेथे समान उपक्रमां-मधील दीर्घकालीन मित्र, सहकारी आणि साथी असतो, तेथेच खरीखुरी एकत्रपणाची भावना निर्माण होते. या एकत्रपणाच्या भावनेतून जो आनंद मिळतो केवळ त्या आनंदासाठीच नव्हे तर आपल्या सहकाऱ्याना शिक्षणाची कला व शास्त्र शिकविण्यासाठी आपल्याला अशा प्रकारच्या एकत्रपणाची जरूरी आहे असे मला वाटले. मुलांबरोबर होणारा प्रत्यक्ष दैनंदिन व्यवहार हे विचारांचे, शैक्षणिक शोधांचे, सुखदु:खांचे आणि भ्रमनिरासांचे उगमस्थान आहे. त्याशिवाय आमच्या कार्यक्षेत्रात सृजनशीलता अशक्यप्राय आहे. मुख्य शिक्षक हा छोट्या मुलांच्या सामूहिकाचा नेता असला पाहिजे, या मुलांचा तो मित्र व साथी असला पाहिजे या निष्कर्षाप्रत मी येऊन पोहोचलो. पावलिशला येण्यापूर्वी मी जे शैक्षणिक निष्कर्ष काढले होते त्यांवर माझे हे ठाम मत आधारले होते.

खरी शाळा म्हणजे जेथे केवळ मुलाना ज्ञान व विविध कौशल्ये प्राप्त होतात अशी जागा नव्हे हे मी माझ्या अध्यापनकाळाच्या पहिल्या काही वर्षांतच मनाही ठरविले होते. अभ्यास महत्त्वाचा आहेच; पण मुलांच्या जीवनातली तीच एकमेव गोष्ट नाही. ज्याला आपण शैक्षणिक-संगोपन प्रक्रिया म्हणत आलो आहोत त्या प्रक्रियेची जितकी मी अधिक बारकाईने छाननी केली तितकी माझी अधिक खात्री पटत गेली की, जेथे शिक्षक आणि विद्यार्थी अनेकविध आवडीनी आणि छंदानी एकत्र बांधले गेले आहेत अशा बाल-सामूहिकाचे अनेकांगी आत्मिक जीवन म्हणजे खरी शाळा होय. मेजा-च्या एका बाजूला शिक्षक व दुसऱ्या बाजूला विद्यार्थी अशा अवस्थेत ज्या माणसाची आपल्या विद्यार्थ्यांशी केवळ वर्गातच फक्त पाठाच्या वेळी भेट होते अशा माणसाला मुलाचे मन समजणे शक्यच नाही. आणि ज्या माण-

साला मुलांची ओळख नाही, मुलांचे विचार, भावना, आणि आशाआकांक्षा ज्या कोणाच्या आवाक्याबाहेर रहातात तो माणूस शिक्षक बनूच शकत नाही. शिक्षकाचे मेज हे कधी कधी एखाद्या दगडी भिंतीसारखे भासते. या भिंती-आडून शिक्षक आपल्या "शत्रू"वर — विद्यार्थ्यांवर — "हल्ले" करीत असतो. पण अनेक वेळा या मेजाची अवस्था वेढ्यात पडलेल्या किल्ल्यासारखी बनते; अखेरीस या "शत्रू"पुढे त्याला शरणागती देणे भाग पडते आणि त्यात बंदिस्त झालेल्या "सेनापती"ला आपल्या हाताच्या जणू कोणी मुसक्या बांधल्या आहेत असे भासू लागते.

ज्याना आपला विषय चांगला ठाऊक आहे अशा शिक्षकांच्या बाबतीतही विद्यादानाचे क्षेत्र हे कधी कधी घनघोर धुमश्चक्रीचे क्षेत्र ठरते. याचे साधे कारण असे आहे की शिक्षक व विद्यार्थी याना जोडणाऱ्या भावनिक धाग्यांचा तेथे लवलेशही नसतो; म्हणूनच मुलाच्या मनाला अनेकदा दुखापत होते. परस्पर अविश्वास आणि संशय हे, काही शाळांत आढळते त्याप्रमाणे, शिक्षक व विद्यार्थी यांच्यामधील निकृष्ट किंवा अशक्यप्राय संबंधांचे मुख्य कारण आहे. मुलाच्या भावनांशी शिक्षकाचे नातेच जुळत नाही. मुलांच्या सुख-दु:खांचा तो अनुभव घेऊ शकत नाही, मुलाच्या जागी तो स्वत:ला कल्पू शकत नाही.

स्वत: मुलाच्या आत्मिक विश्वाच्या पातळीपर्यंत खाली न येता त्या विश्वापर्यंत पोहोचण्याच्या आवश्यकतेचे असामान्य पोलिश शिक्षणतज्ज्ञ यानुश कोर्चाक (१८७८-१९४२) यानी त्यांच्या एक पत्रात आपल्याला स्मरण करून दिले आहे. ही एक अत्यंत सूक्ष्म अशी कल्पना आहे, आणि त्यातील मूळ मुद्दा आपणा शिक्षणतज्ज्ञाना पूर्णपणे उमजला पाहिजे. मूल जगाचे निरीक्षण करीत असते; आपल्या सभोवतालच्या वस्तुस्थितीबद्दल आपली भावनिक व नैतिक प्रतिक्रिया व्यक्त करीत असते. त्याचे उगाच स्तोम न माजविता किंवा मुलाला कसलीही अफाट गुणवैशिष्ट्ये न चिकटविता त्यातील सर्व त्या ठळक सुस्पष्टतेसहित, संवेदनक्षमतेसहित व निकटत्वासहित मुलाचे हे निरीक्षण व ही प्रतिक्रिया खऱ्याखुऱ्या शिक्षणतज्ज्ञाने आत्मसात केली पाहिजे. मन आणि अंत:करण या दोन्हीच्या साहाय्याने मूल हे निरीक्षण करीत असते. जगाविषयीच्या मुलाच्या या स्वत:च्या निरीक्षणाचे अत्यंत नाजूक आकलन व ससंवेदन हाच स्वत:ला मुलाच्या आत्मिक जगाच्या पातळीवर नेण्याबद्दल यानुश कोर्चाक यानी केलेल्या आवाहनाचा अर्थ घेतला पाहिजे.

माझी अशी ठाम खात्री पटली आहे की, काही विशिष्ट गुण अंगी

असल्याशिवाय माणसाला खराखुरा शिक्षणतज्ज्ञ बनताच येणार नाही; आणि त्यातील सर्वात पहिला गुण म्हणजे मुलाच्या आत्मिक जगात शिरकाव करून घेण्याची क्षमता. आपणही एके काळी मूल होतो हे जो माणूस कधीही विसरत नाही तोच माणूस खरा शिक्षक बनू शकतो. अनेक शिक्षकांचे (मुले, विशेषतः मोठी मुले या शिक्षकाना तात्या पंतोजी म्हणतात) दुर्दैव असे की, विद्यार्थी हा प्रथमतः ज्ञानाच्या, सृजनशीलतेच्या आणि मानवी संबंधांच्या विश्वात पदार्पण करण्याच्या तयारीत असलेला एक हाडामासाचा जिवंत माणूस असतो हे ते विसरतात.

शिक्षणामध्ये परस्परापासून अलग राहून प्रपंच चालविणारे असे सुटे धागे नसतात. विद्यार्थ्यांच्या दृष्टीने जगाचे ज्ञान मिळविण्याच्या प्रक्रियेत पाठाना महत्त्वाचे स्थान असते. मुले जगाचे ज्ञान कसे मिळवितात आणि कोणत्या प्रकारची मते त्यांच्या मनात तयार होतात यावर मुलांच्या आत्मिक जीवनाची संपूर्ण घडण अवलंबून असते. तथापि, केवळ ज्ञान आत्मसात केले म्हणजे जगाचे ज्ञान झाले असे होत नाही. अनेक शिक्षकांचे दुर्दैव असे की, चांगला अभ्यास करणारे विद्यार्थी आणि बाकीचे विद्यार्थी अशी विद्यार्थ्यांची दोन सदरात वर्गवारी करून श्रेणी आणि गुणांच्या पायावर ते मुलाच्या आत्मिक विश्वाचे मोजमाप व मूल्यांकन करीत असतात.

विविधतापूर्ण धाग्यानी गुंफलेल्या मानवी मनोजीवनाचे एकांगी आकलन करून शिक्षक जर स्वतःची शोचनीय अवस्था करून घेत असेल तर जो संचालक "सर्वसाधारण सूचना" देण्याचे, परवानगी देण्याचे किंवा नाकारण्याचे कर्तव्य बजावून केवळ शिक्षकांच्या कामाचे नियंत्रण करीत असतो त्या संचालकालाही तेच विधान लागू होणार नाही काय? त्याची अवस्था तर अधिकच खेदजनक ठरते. अशी भूमिका मला बंदिस्त वाटली. विद्यार्थ्यांवर नजर टाकण्यासाठी मी कधी गेलो आणि ते विद्यार्थी व त्यांचे शिक्षक कोणत्यातरी गोष्टीत उत्कंठेने, उत्सुकतेने रंगून गेलेले मी पाहिले की माझ्या मनाला कसलीतरी ओढ लागून रहायची. अशा वेळी एखादा माणूस अगदी निकट गेला तरी त्याची त्याना दखलही नसते. आपल्या शिक्षकाबरोबर मुले समृद्ध आत्मिक जीवनाचा आनंद घेत असतात. त्यांची स्वतःची गुपिते असतात. तेव्हा अशा वरील प्रकारच्या शाळा-संचालकांची आपल्याला मुतराम गरज नाही. १९१७ च्या महान ऑक्टोबर समाजसत्तावादी क्रांतीपूर्वी संचालक हा अनिवार्यतया शिक्षकांवर नेमण्यात आलेला एक तपासनीस होता; तो एक प्रशासक होता आणि शालेय कार्यक्रमाची शिक्षणतज्ज्ञाकडून

योग्य रीतीने अमलबजावणी होत आहे की नाही यावर नजर ठेवणे हे त्याचे काम होते. तो जे काही बोलेल ते रास्तच समजले जात असे आणि त्याच्या हातून चूक घडणे असंभवनीय मानण्यात येत असे. त्यावेळच्या रशियन शाळां-तून निर्माण झालेल्या नेतृत्वाचे हे स्वरूप आणि पद्धत आता कालविसंगत बनली आहे.

अत्यंत बिकट अशा शैक्षणिक कार्यात प्रगतीशील शैक्षणिक कल्पना ज्यात ग्रथित झाल्या आहेत असा सर्वोत्कृष्ट अनुभव शिक्षकांच्या बाबतीत निर्माण करणे, त्याचे संवर्धन करणे आणि तो बळकट करणे यात विद्यमान शाळेतील नेतृत्वाचा गाभा सामावला आहे. आणि जो माणूस अशा अनु-भवाची निर्मिती करतो, ज्याचे काम इतर शिक्षणतज्ज्ञाना घालून दिलेला कित्ता ठरतो असाच माणूस शाळेचा संचालक बनला पाहिजे. हा माणूस स्वतःच उत्तम शिक्षणतज्ज्ञ असतो आणि अशा संचालकाशिवाय आजच्या शाळेची कल्पनाही करता येणार नाही. शिक्षण म्हणजे प्रथमतः माणूस कसे बनावयाचे याची शिकवण. मुलाची ओळख झाल्याशिवाय, त्याच्या मानसिक विकासाची, विचारांची, आवडीनिवडींची, छंदांची, मगदुरांची, सहजप्रेरणां-ची आणि त्याच्या मनोकलांची ओळख झाल्याशिवाय शिक्षणाला अर्थ नाही. रुग्णालयाच्या मुख्य डॉक्टरचे स्वतःचे रुग्ण असल्याशिवाय तो जसा खरा डॉक्टर म्हणून वावरू शकत नाही त्याचप्रमाणे स्वतःचे विद्यार्थी असल्या-शिवाय शाळा-संचालक इतर शिक्षकाना नेतृत्व देऊ शकणार नाही. त्याचे **स्वतःचे** विद्यार्थी याचा अर्थ असा की, मूल ज्या दिवशी शाळेत प्रवेश करते त्या दिवसापासून त्याला प्रमाणपत्र मिळते त्या दिवसापर्यंत त्याच्या परिपक्व-तेच्या दिशेने होणाऱ्या वाटचालीमध्ये तो त्याच्याच बरोबर पावले टाकतो; त्याच्या मानसिक, नैतिक, सौंदर्यशास्त्रीय, भावनिक आणि शारीरिक विकासामध्ये संचालकाला अत्यंत निकटत्वाने आस्था वाटत असते. संचालकाला त्याच्या आवडीनिवडींमध्ये समरस होता आले पाहिजे आणि स्वतःच्या आत्मिक समृद्धतेची त्याला मुलाबरोबर देवाणघेवाण करता आली पाहिजे.

शाळेमधील केंद्रवर्ती व्यक्ती कोणती? शैक्षणिक प्रक्रियेच्या कोणत्या क्षेत्रात संचालकाने इतर शिक्षकाना कित्ता घालून दिला पाहिजे? प्राथमिक बाल-सामूहिकाचा – वर्ग-सामूहिकाचा – नेता ही शाळेतील केंद्रवर्ती व्यक्ती असते. तो एकाच वेळी शिक्षक असतो, मुलांचा मित्र असतो आणि त्यांच्या विविधांगी आत्मिक जीवनाचा तो संचालक असतो. शिक्षणाला जर फुलाची उपमा दिली तर अभ्यास ही व्यापक अर्थाने त्या फुलाची फक्त एक पाकळी

आहे. फुलाला सौंदर्य प्राप्त करून देणाऱ्या अनेक पाकळयांमध्ये जशी मुख्य पाकळी नसते त्याचप्रमाणे शिक्षणामध्ये अमुक महत्त्वाचे आणि तमुक बिन-महत्त्वाचे अशी विभागणी नसते. शिक्षणामध्ये पाठ, विविध बहि:शाल आवडीनिवडींचा विकास आणि सामूहिकामधील विद्यार्थ्यांचे परस्पर संबंध या सर्व गोष्टींना महत्त्व असते.

शाळा संचालक म्हणून सहा वर्षे काम केल्यानंतर मी एका वर्ग-सामूहिकाचा शिक्षक-सूत्रधार बनलो. संचालक व विद्यार्थी यांच्यामध्ये थेट आत्मिक संपर्क साधण्याचा हाच एकमेव मार्ग नाही हे मला नमूद करावेसे वाटते; पण माझ्या विशिष्ट परिस्थितीत ही पद्धत मला सर्वांत फलदायक वाटली. नैसर्गिक परिस्थितीत सुरू करण्यात आलेला एक अत्यंत विस्तृत प्रयोग याच नात्याने बाल-सामूहिकाच्या या प्रत्यक्ष जबाबदारीकडे मी पाहिले.

या काळात मी नेमके काय केले याची चर्चा करण्यापूर्वी एका महत्त्वाच्या परिस्थितीच्या वैशिष्टयांचा मला थोडाफार ऊहापोह करावयाचा आहे. व्यावहारिक कार्याचा आशय आणि उद्दिष्ट या परिस्थितीत एक प्रकारे प्रतीत होते. शालेयपूर्व व प्राथमिक शाळेची वर्षे व्यक्तिमत्व-घडणीत अनन्य महत्त्वाची भूमिका बजावतात. महान रशियन लेखक आणि शिक्षणतज्ज्ञ लेव तोलस्तोय (१८२८-१९१०) यांचे असे मत होते की, आपल्या विचारांच्या दृष्टीने, भावनांच्या दृष्टीने, इच्छाशक्तीच्या दृष्टीने आणि स्वभावाच्या दृष्टीने आपल्या जन्मापासून वयाचा पाचव्या वर्षापर्यंत मूल जेवढे काही संपादन करते तेवढे आपल्या बाकीच्या आयुष्यात कधीच संपादन करीत नाही. सोविएत शिक्षणतज्ज्ञ मकारेन्कोनी त्याचाच पुनरुच्चार केला आहे: माणसाची घडण वयाच्या पाचव्या वर्षापूर्वी होते.

असामान्य नैतिक सौंदर्याची देणगी लाभलेले यानुश कोर्चाक यानी 'मी जेव्हा पुन्हा लहान बनतो' या आपल्या पुस्तकात म्हटले आहे: फळयाकडे पाहून मुलाला अधिक ज्ञान प्राप्त होते की खिडकीबाहेर पाहून हे कोणालाही सांगता येणार नाही. अशा प्रसंगी त्याच्या दृष्टीने अधिक उपयुक्त, अधिक महत्त्वाचे काय असते? फळयामध्ये कोंबलेले तर्कशास्त्रीय जग की खिडकीच्या तावदानाबाहेर विहरणारे जग? आपण माणसाचा आत्मा जखडून ठेवता कामा नये, तर प्रत्येक मुलाच्या नैसर्गिक विकासाच्या नियमांकडे, त्याच्या वैशिष्टयांकडे, आशाआकांक्षाकडे आणि गरजांकडे लक्ष दिले पाहिजे.

रांगी वेष्टनामधल्या पोलिश भाषेतल्या या छोटया पुस्तकातील शब्दांचे मला आयुष्यात कधीही विस्मरण पडलेले नाही. युद्धानंतर लवकरच लेखका-

च्या शौर्यशाली कृतीबद्दल मी जेव्हा ऐकले तेव्हा साऱ्या आयुष्यभर त्यांचे शब्द आज्ञा म्हणून मी शिरसावंद्य मानले. वॉर्साच्या एका घेटोतील एका बालअनाथगृहाचे ते संचालक होते. ट्रेबलिंकाच्या भट्टयांमध्ये या दुर्दैवी मुलाना जाळून ठार करण्याचा हिटलरच्या लोकानी हुकूम सोडला. तुम्हाला जगायचे असेल तर मुलांशिवाय नाहीतर मुलांच्याच नशिबाचे तुम्हाला वाटेकरी व्हावे लागेल असे कोर्चाकना जेव्हा सांगण्यात आले तेव्हा क्षणाचाही विचार न करता त्यानी मृत्यूचा स्वीकार केला. गेस्टॅपोनी त्याना सांगितले, "तुम्ही चांगले डॉक्टर आहात; भट्टयांमध्ये जळून मरण्याची तुम्हाला काही आवश्यकता नाही." "माझ्या सदसद्विवेकबुद्धीविरुद्ध मी जाणार नाही", कोर्चाकनी उत्तर दिले. मुलाना शांत करीत, पुढे उभ्या ठाकलेल्या मृत्यूच्या भीषणतेवर फुंकर घालण्याचा प्रयत्न करीत आपल्या मुलांबरोबरच ते मृत्यूला सामोरे गेले. यानुश कोर्चाक यांचे जीवन आणि त्यांचे स्तिमितकारक प्रचंड नैतिक सामर्थ्य व शुचिता मला नेहमीच स्फूर्तीदायक वाटत आली आहे. मुलाना खरेखुरे शिक्षण द्यावयाचे असल्यास त्याना आपण आपले हृदय अर्पण केले पाहिजे हे मी त्यांच्यापासून शिकलो.

उशिन्स्कीनी लिहिले आहे: एखाद्या व्यक्तीच्या आपण सदैव संगतीत असतो. त्या व्यक्तीबद्दल आपल्याला प्रेम वाटत असले तरी त्याची आपल्याला जाणीव असतेच असे नाही. पण एखादी दुर्घटना घडते आणि आपल्या भावना किती तीव्र आहेत याचा आपल्याला प्रत्यय येतो. समजा एखादा माणूस आपल्या मायभूमीपासून कधीच फार काळ दूर गेलेला नसेल तर आपल्या मायभूमीवर आपले किती प्रगाढ प्रेम आहे याची जाणीव न होताही तो सारा जन्म काढू शकतो. फार काळ मी मुलाना पाहिले नाही, त्यांच्या सुखदु:खांच्या संवेदना अनुभवल्या नाहीत तर मला प्रत्येक वेळी या शब्दांची आठवण होते. शिक्षकाला मुलांबद्दल वाटणारे प्रेम हे उत्तम शिक्षकाचे एक लक्षण आहे याची प्रतिवर्षी मला अधिकाधिक खात्री पटत चालली आहे. आणि स्तानिस्लावस्की (१८६३-१९३८)* यांच्या शब्दात सांगावयाचे झाल्यास "हुकूमेहुकूम भावना निर्माण करणे अशक्य" असेल तर शिक्षक-शिक्षणतज्ज्ञामध्ये अशा भावनांचे अंकुर फुलविणे हाच संचालकाच्या उत्तम शिकवणुकीचा खरा गाभा आहे.

---

*के. एस्. स्तानिस्लावस्की – सोविएत नाट्यशास्त्र सैद्धांतिक, शिक्षणतज्ज्ञ, नाट्य-दिग्दर्शक व अभिनेते.

शिक्षक आणि विद्यार्थी यांच्यामधील सतत संपर्काशिवाय, त्यांच्या परस्पर विचारविश्वात, भावविश्वात आणि अनुभवविश्वात प्रवेश केल्याशिवाय शिक्षणाच्या चैतन्यमय संस्कृतीचा गाभा म्हणून भावनिक संस्कृतीचा विचारच करता येणार नाही. एकत्रित, स्नेहपूर्ण सामूहिकामध्ये शिक्षक हा फक्त शिक्षक नसतो तर मित्र व साथी असतो. अशा सामूहिकामधील मुलांबरोबरचे विविधांगी भावनिक संबंध हा भावनिक प्रकटीकरणाचा एक मुख्य स्रोत आहे. शिक्षकाची विद्यार्थ्यांशी भेट फक्त वर्गातच होत असेल आणि तेथेच फक्त त्याचा प्रभाव जाणवत असेल तर भावनिक निकटत्वाचा विचार करणे हे अशक्यप्राय आहे.

अर्थात वर्गातील फळयामध्ये गुंतलेल्या जगाची आणि खिडकीबाहेरच्या जगाची तुलना मुळीच करता कामा नये. शिवाय आवश्यक असलेला पाठ्यविषय हा माणसाच्या आत्म्यावर बलात्कार करीत असतो आणि फळा मुलाना गुलाम बनवीत असतो तर खिडकीबाहेरचे जग म्हणजे खरे स्वातंत्र्य या कल्पनेला आपण थारा देता कामा नये.

पावलिशला येण्यापूर्वी मी जी वर्षे व्यतीत केली होती त्या काळात माझी पुन:पुन्हा खात्री पटली होती की, प्राथमिक शाळा-शिक्षक हा मुलाच्या आयुष्यात फार मोठी भूमिका बजावीत असतो. मुलाला तो त्याच्या एखाद्या कुटुंबियासारखा, त्याच्या आईसारखा वाटला पाहिजे. छोटया शाळकरी मुलाची शिक्षकावरील श्रद्धा, शिक्षक आणि विद्यार्थी यांच्यामधील परस्पर विश्वास, शिक्षकामध्ये विद्यार्थ्याला दिसणारा मानवतेचा आदर्श या गोष्टी प्राथमिक आहेत, आणि शिक्षणाचे हे अत्यंत गुंतागुंतीचे व सुजाण नियम शिक्षकाला जेव्हा प्रतीत होतात तेव्हा तो खराखुरा आत्मिक गुरू बनू शकतो. शिक्षकाची मानवता, आईवडिलांची मायेची मिठी आणि त्यांचा करारीपणा व करडेपणा यांचा ज्या प्रेमात मिलाफ झाला आहे अशा प्रकारचे मुलांविषयी वाटणारे प्रगाढ प्रेम हा शिक्षकाचा एक सर्वात मौल्यवान गुण आहे.

बालपण ही फक्त भावी जीवनाची पूर्वतयारी नसून माणसाच्या आयुष्यातील तो एक अत्यंत महत्त्वाचा काळ असतो. बालपण हे अस्सल, स्वच्छनितळ, खरेखुरे, ज्याचे कधीही पुनरावर्तन होत नाही असे जीवन असते. त्यावेळी काय घडले, या काळात मुलाची वाटचाल कोणी घडविली, त्याच्या सभोवतालच्या जगातील कोणत्या गोष्टींनी त्याच्या हृदयात आणि मनात शिरकाव केला यावरून पुढे त्या मुलातून कोणत्या प्रकारचा माणूस घडेल

हे मोठ्या प्रमाणात निश्चित होते. स्वभावाची, विचार-प्रक्रियांची आणि भाषेची घडण ही शालेयपूर्व व प्राथमिक वर्षांत होते. ही गोष्ट अगदी शक्य आहे की, पाठ्यपुस्तकांच्या व पाठांच्या द्वारे मुलाच्या हृदयात आणि मनात जे जे काही प्रविष्ट होते ते केवळ पाठ्यपुस्तकांच्या जोडीने अस्तित्वात असलेल्या सभोवतालच्या जगामुळेच. आपल्या जन्मापासून ते पुस्तक हातात घेऊन वाचायला शिकेपर्यंत मुलाने याच सभोवतालच्या जगात आपली बिकट पावले टाकलेली असतात.

मायभूमीबद्दलचे असीम प्रेम आणि तिचे सौख्य, तिची थोरवी आणि तिचे सामर्थ्य यांचे प्राणपणाने रक्षण करण्यासाठी जिवाची कुरवंडी करण्याची तयारी आणि आपल्या देशाच्या शत्रूच्या बाबतीत कठोर व अविचल खंबीरपणा ही कम्युनिस्ट नीतिमत्तेच्या बुडाशी असलेली नैतिक मूल्ये आहेत. ही नैतिक मूल्ये काया-वाचा-मनेकरून शिकण्याचे प्रदीर्घ कार्य बालपणात सुरू होते.

तेहेतीस वर्षांच्या काळात सर्व वयाच्या मुलांच्या तसेच प्रौढांच्या शब्दसंग्रहाचा मी अभ्यास केला. एकूण चित्र मोठे स्तिमितकारक होते. एका साध्या सामुदायिक शेतकऱ्याच्या कुटुंबातील* सात वर्षाच्या मुलाला (त्याचे आई-वडील माध्यमिक शिक्षण घेतलेले आहेत व त्यांच्या घरात सुमारे ३०० ते ४०० पुस्तके आहेत) त्याच्या मूळ भाषेतील सुमारे ३००० ते ३५०० शब्दांच्या भावनिक छटा समजू शकतात व जाणवू शकतात आणि तो जेव्हा शाळेत प्रवेश करतो तेव्हा तो १५०० शब्द प्रत्यक्ष वापरू शकतो. माध्यमिक शिक्षण घेतलेल्या ४५ ते ५० वर्षे वयाच्या कामगारांना व सामुदायिक शेतकऱ्यांना ५००० ते ५५०० शब्दांच्या सूक्ष्म छटा समजू शकतात व जाणवू शकतात आणि ते २००० ते २५०० हून अधिक शब्द प्रत्यक्ष वापरू शकतात. या एकाच वस्तुस्थितीवरून माणसाच्या आयुष्यात शैशवातील वर्षे जी भूमिका बजावतात त्या भूमिकेची ठळक साक्ष पटते.

शालेयपूर्व आणि प्राथमिक वर्षे मोठ्या प्रमाणावर माणसाचे भावी आयुष्य निर्धारित करतात हे मत कितीही दृढ असले तरी त्यावरून माणसाच्या

---

*सामुदायिक शेतकरी (कलखोझनिक) हा सामुदायिक शेताचा (कलखोझचा) सभासद असतो. सामुदायिक शेत म्हणजे सोविएत संघराज्यातील मोठ्या प्रमाणावरील सार्वजनिक शेती उद्योगावर एकत्र काम करणाऱ्या शेतकऱ्यांचा ऐच्छिक संघ.

पुढील आयुष्यात पुनर्शिक्षणाची शक्यता नाकारली जात नाही. सोविएत शिक्षणतज्ज्ञ अन्तोन मकारेन्को यांच्या अनुभवातून पुनर्शिक्षणाचे सामर्थ्य अत्यंत तेजस्वीपणे निदर्शनास आले आहे. परंतु बालवर्षांचेच अनन्य महत्त्व त्यानी मान्य केले आहे. अगदी लहानपणात केलेल्या चुका दुरुस्त करणे हे शिक्षणाचे खरे कार्य नसून प्रथमतः त्या चुका घडू नयेत याची काळजी घेणे व त्यान्वये पुनर्शिक्षणाची आवश्यकता नाहीशी करणे हे शिक्षणाचे खरे कार्य आहे.

मुलांच्या डोक्यात जेवढे काही कोंबता येईल तेवढे कोंबण्याचे साधन म्हणजे शिक्षण या दृष्टीने शिक्षक जेव्हा शिक्षणाकडे पहातो तेव्हा मुलांच्या नैसर्गिक जीवनाचा कधीकधी कसा विपर्यास केला जातो याची शाळा-संचालक म्हणून काम करीत असताना मी अत्यंत कटुतेने नोंद घेतली आहे.

केवळ तासांच्या वेळीच नव्हे तर दिन-पालन गटांतही* मुलाचे नैसर्गिक जीवन कसे लुळेपांगळे केले जाते हे पाहिले की मनाला यातना झाल्याशिवाय रहात नाहीत. दुर्दैवाने, अशा काही शाळा आहेत की जेथे पाच किंवा सहा पाठांनंतर मुलाना आणखी चार-पाच तास शाळेत रहावे लागते आणि खेळाऐवजी, आराम करण्याऐवजी किंवा बाहेर जाऊन मोकळ्या हवेत फिरण्याऐवजी मुले अभ्यासातच गुंतून रहातात. मुले शाळेत जो वेळ घालवितात त्या वेळाचे रूपांतर एका अखंड, कंटाळवाण्या पाठात केले जाते. हा प्रकार बंद करण्यात आला पाहिजे. दिन-पालन गट हा शिक्षणाचा अत्यंत बहुमोल असा प्रकार आहे. शिक्षक आणि मूल यांच्यामधील सातत्यशील आत्मिक संपर्काशिवाय उच्चतर भावनापरिपोषक शिक्षणाचा विचारच करता येत नाही; आणि नेमकी दिन-पालन गट पद्धतीतच अशा संपर्काला अनुकूल अशी परिस्थिती अस्तित्वात असते. परंतु दुर्दैवाने अनेक उत्कृष्ट कल्पनाना उरफाटे स्वरूप दिले गेले आहे: बहुतेक वेळा घंटेच्या प्रत्येक टोल्याच्या साथीने त्याच जुन्या बाकांवर त्याच जुन्या पाठांचा दिन-पालन गटाला आणखी रतीब पाजला जातो. कोणत्याही मुलाची ताकद खच्ची करायला तेवढे पुरेसे असते.

हे असे का घडते?

---

* दिन-पालन गट — कामावरून परत जाताना पालक घरी नेईपर्यंत शाळा सुटल्यानंतर मागे रहाणाऱ्या खालच्या वर्गातील विद्यार्थ्यांचे गट. तेथे त्याना जेवण मिळते, ते आपला गृहपाठ करतात व खेळ खेळतात.

त्याचे कारण असे आहे की मुलाना मैदानात नेण्याऐवजी, उद्यानात नेण्याऐवजी किंवा रानात फेरफटक्यासाठी नेण्याऐवजी त्यांचे तास घेत बसणे अधिक सोपे असते.

सर्वोत्कृष्ट दिन-पालन कार्यक्रम असलेल्या शाळांच्या विधायक अनुभवांचे शैक्षणिक साहित्यात सांगोपांग चित्रण करण्यात आले आहे. इतरत्र या अनुभवाने अजून मूळ धरलेले नाही ही खरोखरच कीव करण्यासारखी गोष्ट आहे. आणि शिक्षणातील एकूण कमजोरी हे त्याचे मुख्य कारण आहे.

आपण अशा काळात रहात आहोत की ज्या काळात शास्त्रीय ज्ञानावरील प्रभुत्वाशिवाय श्रम, प्राथमिक मानवी संबंध किंवा नागरिक म्हणून आपल्या कर्तव्याची पूर्तता अशक्यप्राय ठरेल. विद्यार्जन हा काही एखादा सहजसाध्य, आल्हादक खेळ नाही की ज्याच्यामुळे केवळ आनंदाचेच, आल्हादाचेच तुषार अंगावर उडतील. आणि नागरिकांच्या तरुण पिढ्यांचे जीवनही पुष्पशय्यांकित असणार नाही. आपल्या मातापित्यानी, पितामहानी, प्रपितामहानी ज्या अडचणी पार पाडल्या तेवढ्याच जटिल अडचणी पार पाडण्यास तयार असलेले, उच्च दर्जाचे शिक्षण घेतलेले, चिवट व दीर्घोद्योगी, श्रमप्रेमी लोक आपण निर्माण केले पाहिजेत. १९७० ते १९९० च्या दशकांतील तरुणाच्या ज्ञानाची पातळी त्यापूर्वीच्या दशकांतील तरुणाच्या मानाने अतुलनीयरित्या वरच्या श्रेणीची असेल. ज्ञानप्रभुत्वाचे क्षेत्र जसजसे अधिकाधिक विस्तृत बनत जाईल तसतसे जलद वाढीच्या, विकासाच्या आणि व्यक्तिमत्व-घडणीच्या त्या विशिष्ट काळातील—शैशवकाळातील मानवी देहाचे स्वरूप आपल्याला अधिकाधिक लक्षात घ्यावे लागेल. माणूस हा नेहमीच निसर्गाचा पुत्र होता आणि तो सदैव तसाच राहील; आणि हे नाते जडायला कोणतीही कारणे असोत त्या कारणांचा त्याच्या आत्मिक संस्कृतीच्या सुसमृद्धतेशी जोड घालण्यासाठी उपयोग करण्यात आला पाहिजे. मुलाच्या सभोवताली पसरलेले जग ही प्रथमतः विविध घटनांच्या अमर्याद संपदेने आणि अक्षय सौंदर्याने भरलेली निसर्गसृष्टी असते. मुलाच्या बुद्धिमत्तेचा निरंतर झरा हा या निसर्गात सामावलेला असतो. पण त्याच्याच जोडीला लोकांच्या सामाजिक संबंधांशी तसेच श्रमाशी निगडित असलेल्या परिसर-घटकांची भूमिकाही प्रतिवर्षी वाढत असते.

निकटच्या वस्तुस्थितींसंबंधीची ज्ञानग्रहण-प्रक्रिया म्हणजेच विचारांची भावनिक प्रेरणा. शालेयपूर्व किंवा प्राथमिक शाळेतील मुलाच्या दृष्टीने ही प्रेरणा फार महत्त्वाची भूमिका बजावीत असते. ज्या सत्यात सभोवतालच्या

जगातील उदाहरणांचे व घटनांचे सर्वसाधारणीकरण केले जाते ते सत्य सुस्पष्ट प्रतिमांच्या द्वारे मुलांच्या भावनांवर ठसले तरच त्या सत्यावर त्यांचा व्यक्तिगत विश्वास बसतो. आपल्या भोवतालच्या जगातील पहिली शास्त्रीय सत्ये मुलाने शोधून काढणे, नैसर्गिक घटनांमधील सौंदर्य आणि त्यांची अनंतानंत जटिलता हे विचारांचे प्रेरणास्थान असणे, सामाजिक संबंधांच्या व श्रमाच्या विश्वात मुलाने क्रमाक्रमाने प्रवेश करणे हे निर्णायक महत्त्वाचे आहे.

पावलिशच्या शाळेतील माझ्या कामाच्या अगदी प्रारंभापासून माझे मन लहान मुलांकडे, विशेषत: पहिल्या वर्गातील मुलांकडे ओढले गेले होते. विद्यार्जनाच्या पहिल्या दिवसांत उत्कंठेने थरारत्या मनाने मुले शाळेत प्रवेश करीत. त्यांची विश्वासपूर्ण नजर शिक्षकांवर खिळून राहिलेली असे. मुलांची ही बालसुलभ सहजस्फूर्तता, जगाचे त्याना घडणारे आनंददायक दर्शन, त्याना लागणारा हा आनंददायक शोध जतन करून ठेवावा असे सर्वच शिक्षकाना प्रामाणिकपणे वाटत असते; मुलाना अभ्यासातून स्फूर्ती लाभावी, त्यात त्याना गोडी लागावी असे त्याना वाटत असते. आणि तरीही काही महिन्यांतच, इतकेच कशाला काही आठवड्यातच मुलांच्या डोळ्यातली ती चमक नाहीशी होते. असे का घडावे? काही मुलाना अभ्यास म्हणजे छळ-वणूक का वाटावी?

प्रथम म्हणजे बहुधा त्याचे कारण हे असते की, प्रत्येक मुलाच्या आत्मिक विश्वाची शिक्षकाला फारशी ओळख नसते. त्याचे आणखीही एक कारण असे की शाळेच्या चार भिंतीआडचे जीवन अभ्यासापुरतेच मर्यादित ठेवले जाते. घंटेच्या टोल्यांवर चालणारे ते जीवन असते. जणू काही सर्व मुलांचा एकच स्तर बनवायचा असतो, सर्व मुलाना एकाच मोजमापात बसवायचे असते. तेथे प्रत्येकाच्या वैयक्तिक जगाच्या समृद्धतेला वावच दिला जात नाही. अर्थात, मुलांच्या आवडीनिवडींचा, त्यांच्या विविधतापूर्ण आत्मिक जीवनाचा विकास कसा करावयाचा याविषयी शिक्षकाना मी सल्ला देत असे. पण सल्ला पुरेसा नसतो. महत्त्वाची आहे ती शिक्षणविषयक कल्पना. मुले व शिक्षक यांच्या आंतरसंबंधांत या कल्पनेचा गाभा प्रकट होतो आणि शाळेतच उभारण्यात आलेल्या एखाद्या उत्तुंग इमारतीप्रमाणे शिक्षक-सामूहिकाच्या नजरेसमोर जेव्हा तो उभा रहातो तेव्हा त्याची स्पष्टता अधिकच ठळकपणे दिसून येते. म्हणूनच वर्ग-सामूहिकापासून मी

माझ्या शैक्षणिक कार्याला सुरुवात केली. हे कार्य दहा वर्षांचा काळ व्यापणार होते.

पुढे ज्याची चर्चा करण्यात येणार आहे ते वर्ग-सामायिकाचे जीवन कोणतेही कुंपण घालून शाळा-सामायिकापासून अलग करण्यात आलेले नाही. अनेक बाबतीत एकूण शाळेच्या चौकटीतच शालेय कार्याच्या प्रकारांचा व पद्धतींचा मी ऊहापोह करणार आहे. पण वर्ग-सामायिकाचे अधिक स्पष्टपणे दर्शन घडविण्यासाठीच केवळ मी त्याचा आश्रय घेणार आहे. कारण वर्गांतर्गत शैक्षणिक कार्याचा आशय हीच नेमकी सर्व शालांतर्गत शैक्षणिक कार्याची मुख्य अट असते.

## पहिले वर्ष – मुलांच्या जीवनाचा अभ्यास

१९५१ च्या शरदऋतूत, शाळा सुरू होण्यापूर्वी तीन आठवडे, पहिल्या वर्गातील मुलांबरोबरच, ज्यांची शाळा एक वर्षानंतर सुरू होणार होती अशा सहा वर्षे वयाच्या मुला-मुलींचीही नावे नोंदविण्यात आली. पुढील दहा वर्षे मला या मुलांबरोबर काम करावयाचे होते.

सर्व पालकाना व मुलाना मी जेव्हा एकत्र जमविले आणि अधिकृतरित्या वर्ग सुरू होण्यापूर्वी एक वर्ष पालकानी आपली मुले शाळेत पाठवावीत अशी मी जेव्हा सूचना केली तेव्हा पालकांमध्ये दुमत झाले. काही पालकाना माझा विचार पसंत पडला. तेथे वर्षभर चालणारे बालोद्यान नसल्यामुळे (त्या काळात ग्रामबालोद्यान फक्त उन्हाळयात चालत असे) मुलाना शाळेत पाठविल्यास कुटुंबाला त्यामुळे मदतच होईल असे त्याना वाटले. इतराना अशी भीती वाटली की अपरिपक्व वयात अभ्यासाला सुरुवात झाल्यास मुलांच्या आरोग्यावर त्याचा अनिष्ट परिणाम होईल. "नंतर सगळा वेळ त्याना शाळेतच घालवायचाय की," ल्यूबाची आई म्हणाली: "खरं बालपण त्याना शाळा सुरू होण्यापूर्वीच उपभोगता येतं" मुलाची शाळा सुरू होताच त्याच्या संपूर्ण जीवनौघात पडणारा जबरदस्त खंड किती हानिकारक असतो, आपल्या नैसगिक शक्तीच्या विकासाला त्याला पुरेसा वाव देणे किती महत्त्वाचे आहे याविषयीच्या माझ्या विचाराना या शब्दांमुळे पुन्हा एकदा चालना मिळाली. मी त्याना सांगितले की, अभ्यास सुरू होण्यापूर्वी एक वर्षभर शाळेत येणे याचा अर्थ त्याना वर्गात बसून रहावे लागणे असा नव्हे.

प्रत्येक मुलाची नीट ओळख व्हावी, त्याच्या निरीक्षणाच्या, विचारांच्या व बौद्धिक व्यापाराच्या व्यक्तिगत वैशिष्टयांचा अभ्यास करता यावा म्हणून मुलांचा रीतसर अभ्यास सुरू होण्यापूर्वीचे हे एक वर्ष मला हवे होते. आपले ज्ञान मुलांपर्यंत पोहोचविण्यापूर्वी त्याना विचार करण्यास, निरीक्षण करण्यास व अवलोकन करण्यास शिकविले पाहिजे. प्रत्येक मुलाच्या प्रकृतीचाही आपल्याला संपूर्ण परिचय असला पाहिजे. त्याशिवाय मुलाना नित्यनियमित परिस्थितीत शिकविणे अशक्यप्राय आहे.

बौद्धिक संगोपन आणि ज्ञानसंपादन या एकच गोष्टी नाहीत. सूर्यप्रकाशा-शिवाय पाने जशी हिरवी बनू शकत नाहीत त्याचप्रमाणे शिक्षणाशिवाय बौद्धिक संगोपनही अशक्य आहे ही गोष्ट खरी असली तरी पाने आणि सूर्य ही जशी एकच नव्हेत त्याचप्रमाणे मनोशिक्षण आणि शिक्षण या एकच गोष्टी नव्हेत.

शिक्षणतज्ज्ञाचा संबंध एका जिवंत विचारवस्तूशी असतो. शैशवकाळात या विचारवस्तूची निरीक्षणशक्ती व ज्ञानग्रहणशक्ती ही प्रमाणात मुलाच्या आरोग्यावर अवलंबून असते. हे अवलंबित्व समजावून घेणे हे फार नाजुक व कठीण काम आहे. मुलांच्या आंतरिक आत्मिक जगाचा, विशेषतः त्यांच्या विचारांचा अभ्यास हे शिक्षकाचे एक सर्वात महत्त्वाचे आणि मेहनतपूर्ण असे कार्य आहे.

## माझ्या विद्यार्थ्यांचे पालक

मुलांची नीट ओळख होण्यासाठी त्यांच्या कुटुंबाची वडिलांची, आईची, भावांची, बहिणींची, आजोबांची आणि आजींची — माहिती असणे आवश्यक आहे. आमच्या शाळेच्या पंचक्रोशीत सहा वर्षे वयाची ३१ मुले होती — १६ मुलगे आणि १५ मुली. आपली मुले आनंद विद्यालयात पाठवायला सर्व पालक तयार झाले. शालेयपूर्व विद्यार्थ्यांच्या आमच्या या गटाला लवकरच त्यांच्या आईवडिलानीच आनंद विद्यालय या नावाने संबोधायला सुरुवात केली होती. ३१ मुलांपैकी ११ मुलाना वडील नव्हते आणि दोन मुले आपल्या आईवडिलाना पारखी झाली होती. या मुलांची — वित्या आणि साशाची — कहाणी अतिशय हृदयद्रावक आहे. महान देशाभिमानी युद्धात (१९४१-१९४५) वित्याचे वडील गनिमी पथकात लढत होते. फॅसिस्टानी

त्यांच्या पत्नीच्या देखत त्यांचा क्रूर छळ करून त्याना ठार मारले. वित्याच्या आईला ते दुःख सहन झाले नाही आणि ती वेडी बनली. या शोकजनक घटनेनंतर सहा महिन्यानी या मुलाचा जन्म झाला. मुलाला जन्म देऊन त्याची आई मरण पावली आणि या अर्भकाला महत्प्रयासाने वाचवण्यात आले. साशाच्या वडिलाना रणांगणावर मृत्यू आला आणि फॅसिस्ट आक्रमकाना खेड्यातून हुसकावून लावीत असताना लढता लढता त्याची आई ठार झाली.

आनंद विद्यालयाला सुरुवात होण्यापूर्वी शेवटच्या काही आठवड्यात माझा प्रत्येक कुटुंबाशी परिचय झाला. काही कुटुंबांतील पालकांमध्ये व मुलांमध्ये, आई आणि वडील यांच्यामध्ये स्नेहाचे वातावरण नव्हते या घटनेने मी अस्वस्थ झालो. मुलाच्या आनंदी जीवनाच्या दृष्टीने परस्पर आदर ही अत्यंत आवश्यक गोष्ट आहे. काहींच्या बाबतीत त्याचाच अभाव होता.

माझ्यासमोर आता उभा आहे तो काळयाभोर डोळयाचा, ऑलिव्ह वर्णाचा आणि आखूड पसरट नाकाचा कोल्या. त्याची नजर अत्यंत सावध आहे. मी त्याच्याकडे पाहून स्मित केले आणि त्याच्या कपाळाला रागाच्या अधिकच आठ्या पडल्या. या क्षणी माझ्या मनात विचार आला तो त्याच्या विपरित कौटुंबिक परिस्थितीचा. महान देशाभिमानी युद्धापूर्वी कोल्याचे वडील तुरुंगात हूते. त्यावेळी ते कुटुंब दोन्बास प्रदेशात रहात होते. फॅसिस्टानी तो प्रदेश व्यापल्यानंतर त्याचे वडील तुरुंगातून बाहेर पडले आणि ते कुटुंब आमच्या या खेड्यात रहायला आले. पैसा कमावण्यासाठी त्याचे आईवडील लोकांच्या दारुण परिस्थितीचा फायदा घेत. फॅसिस्ट हस्तकानी चोरलेला माल लपवून ठेवून ते त्यावर फायदा काढीत. त्या बिकट वर्षांत कोल्याची आई सामुदायिक शेताच्या कुक्कुटपालनगृहातील कोंबड्या चोरी. खाण्यासाठी कावळयांची शिकार करावयास तिने कोल्याला व त्याच्या भावाला शिकविले. मुले कावळयांची शिकार करीत आणि त्यांचे मांस भाजून कोंबडीचे मांस म्हणून त्यांची आई ते बाजारात विकी... मी त्या मुलाकडे पाहिले. त्याच्या चेहऱ्यावर स्मित उमटावे असे मला वाटत होते. पण त्याच्या डोळयात मला दिसला तो अबोलपणा आणि भीती. खरंच कोल्या, ज्या लोकांसमवेत तू वाढलास त्या लोकांबद्दल वाटणाऱ्या द्वेषाच्या व तिटकाऱ्याच्या विलक्षण वातावरणातून बाहेर पडण्यासाठी तुझ्या हृदयात मी स्निग्ध, मानवी भावना फुलवू शकेन का? त्याच्या आईच्या डोळयातील शून्य, निर्विकार भाव मी पाहिले आणि मी बेचैन झालो.

या पुस्तकात या तपशिलांचा उल्लेख करण्यापूर्वी मी दीर्घ काळ विचार केला; दहा वेळा मी तो भाग खोडला आणि पुन्हा जोडला. "मुलाच्या दृष्टीने नैतिक सचोटीचे आदर्श म्हणून आईवडिलांचे वागणे नव्हते" अशा सर्वसाधारण वैशिष्ट्यवर्णनापुरते मी अर्थातच स्वतःला मर्यादित ठेवू शकलो असतो... पण ते वरपांगी हात फिरवण्यासारखे झाले असते. आपल्या भोवती पसरलेल्या तिरस्करणीय गोष्टींसंबंधी आपण डोळयावर झापड घेऊन बसता कामा नये. एखादी दगडी भिंत उभारलीत म्हणून शाळेचे त्या गोष्टींपासून संरक्षण होऊ शकणार नाही. या अनिष्टतेशी झगडण्यासाठी व तिच्यावर मात करण्यासाठी, जुन्या जगातून चालत आलेली घाण तरुणांच्या मनःप्रांगणातून निपटून काढण्यासाठी आपण शौर्याने वस्तुस्थितीला समोर गेले पाहिजे.

हा दुहेरी डोक्याचा, आकाशी निळ्या डोळयांचा, हाडकुळा तोल्या. आपल्या आईचा हात धरून तो उभा होता. त्याची नजर जमिनीला खिळली होती. चटकन तो नजर वर करायचा आणि पुन्हा खाली वळवायचा. कार्पाथियन्समध्ये त्याच्या वडिलाना वीरमरण आले होते. त्यांची अनेक मरणोत्तर पदके त्याच्या आईला मिळाली. तोल्याला आपल्या बाबांबद्दल अतिशय अभिमान वाटतो. पण त्याच्या आईबद्दल खेड्यात फारशी चांगली बोलवा नाही. ती स्वैर, उच्छृंखल जीवन जगते. तोल्याची देखभाल करायला त्याच्या स्वतःशिवाय दुसरे कोणीच नाही... या सहा वर्षांच्या मुलाच्या हृदयाचा चोळामोळा होऊ नये म्हणून काय करता येईल? त्याच्या आईचे डोके ताळयावर आणण्यासाठी आणि तिने आपल्या मुलाची काळजी वाहिली पाहिजे याची तिला जाणीव करून देण्यासाठी कोणती पावले उचलली पाहिजेत?

महान देशाभिमानी युद्धामुळे फार मोठे व्रण मागे राहिले होते, फार मोठ्या जखमा झाल्या होत्या आणि त्या अजून बुजावयाच्या होत्या. १९४५ साली जन्मलेली मुले माझ्यासमोर उभी होती; अनेकांचा जन्म १९४४ साली झाला होता. काहींच्या बाबतीत त्यांच्या जन्मापूर्वीच त्यांचे वडील निवर्तले होते. उदाहरणार्थ, युराचे वडील युद्ध संपण्यापूर्वी चेकोस्लोवाक भूमीवर दोन दिवस आधी मारले गेले होते. त्याची आई त्याचे नको तेवढे लाड करते, त्याचा प्रत्येक हट्ट पुरविण्याचा प्रयत्न करते. त्याचे आजोबा त्यांच्यापाशीच रहातात आणि या मुलासाठी काय वाटेल ते करायला ते तयार असतात. या कुटुंबाविषयी मला जे काही आढळून आले त्यावरून

एक गोष्ट स्पष्ट होती ती ही की सहा वर्षांचे हे मूल पक्के पुंड व हुड बनू शकेल. आईचे आंधळे प्रेम हे उपेक्षेइतकेच धोकादायक असते.

पेत्रिक आपल्या आईबरोबर व आजोबांबरोबर आला होता. या छोटया मुलाच्या आईच्या खडतर जीवनाविषयी मी पुष्कळ ऐकले होते. तिचा पहिला नवरा युद्धापूर्वीच तिला सोडून गेला. तिने दुसरे लग्न केले; पण हे लग्नही दुर्दैवी ठरले. पुढे असे समजले की पेत्रिकच्या वडिलांचे आधीच लग्न झाले होते आणि त्यांचे कुटुंब सैबेरियात कुठेतरी होते. तेव्हा युद्धानंतर तेही पेत्रिकच्या आईला सोडून गेले. पेत्रिकला अभिमान वाटावा म्हणून त्याच्या वडिलाना रणांगणावर मरण आले असे आपल्या मुलाला सांगायचा तिने निर्णय घेतला. तेव्हा आपल्या वडिलांच्या काल्पनिक पराक्रमी कृत्यांची कहाणी तो इतर मुलाना सांगू लागला; पण त्याच्यावर कोणी विश्वास ठेवीना. ती म्हणाली की तुझे वडील थापाडे आहेत. पेत्रिक रडत रडत आपल्या आईकडे गेला. पण एक गोष्ट स्पष्ट होती. निर्दय लोकांकडून त्याच्या हृदयात कटुतेचे आणि अविश्वासाचे बीज रोवले गेले होते. भलाईवर या मुलाचा विश्वास बसावा या दृष्टीने काय करता येण्याजोगे होते?

कोस्त्याला सात वर्षे पूर्ण झाली होती, पण अजून तो शाळेत जाऊ लागला नव्हता. त्याचे वडील, सावत्र आई आणि आजोबा त्याला शाळेत घेऊन आले होते. युद्धाच्या शोकजनक घटनांची या पोरालाही झळ पोहोचली होती. फॅसिस्ट आक्रमकांपासून खेडयाची मुक्तता होऊन अनेक आठवडे लोटले होते. कोस्त्याची आई त्यावेळी गरोदर होती. केव्हाही ती बाळंत होईल अशी अवस्था होती. तिला काहीतरी धातूच्या वस्तू मिळाल्या आणि आपल्या सात वर्षांच्या मुलाला तिने त्या खेळायला दिल्या. त्या वस्तूंमध्ये सुरुंगाचा एक फ्यूज होता. त्या फ्यूजचा स्फोट झाला आणि तिचा मुलगा त्या स्फोटात मारला गेला. आईने स्वतःला गळफास लावून घेतला. पण तेवढयात काही माणसे धावत आली आणि त्यानी तिच्या भोवतीचा फास काढला. तिची मरणांतिक तडफड सुरू होती आणि त्यातच कोस्त्याचा जन्म झाला. तो मुलगा कसा वाचला हा एक चमत्कारच आहे. त्यांच्या एका शेजारणीने आपल्या अर्भकाबरोबरच कोस्त्यालाही छातीशी घेऊन दूध पाजले. त्याचे वडील आघाडीवरून परत आले. मुलावर त्यानी प्रेमाचा वर्षाव केला, त्यानी त्याची खूप काळजी वाहिली, त्याला मायेचे संरक्षण दिले. त्याची सावत्र आई फार चांगली स्त्री होती. तिचे व त्याच्या आजोबांचेही त्याच्यावर प्रेम होते. पण कोस्त्या पाच वर्षांचा असताना आणखी एक दुर्दैव ओढ-

वले. भाजीच्या मळयात त्याला एक धातूची चकचकीत वस्तू मिळाली. ती वस्तू घेऊन त्याने ती कशावरतरी आपटायला सुरुवात केली. तिचा स्फोट झाला आणि कोस्त्याला रक्तबंबाळ अवस्थेत रुग्णालयात नेण्यात आले. कोस्त्या अपंग बनला. डाव्या हाताशिवाय आणि डाव्या डोळयाशिवाय त्याला आता जन्म काढावा लागणार होता. दारूच्या भुकटीचेही गर्द निळे कण त्याच्या चेहऱ्यावर कायमचे व्रण उमटवून गेले होते...

खरंच, तुझ्या जीवनात आनंद फुलावा म्हणून तुझ्यासाठी केवढं केलं पाहिजे, कोस्त्या, हृदयाची केवढी ऊब, मायेचा किती दाट स्पर्श तुला दिला पाहिजे! तुझ्या वडिलांच्या, तुझ्या प्रेमळ सावत्र आईच्या, तुझ्या आजोबांच्या प्रेमाला सुज्ञतेची आणि करडेपणाची जोड मिळेल अशा रीतीने त्यांच्याशी कसे हितगुज करता येईल? तुला अभ्यासात कशी गती मिळविता येईल? तुझी माणसं म्हणतात की तुला वारंवार डोकेदुखीचा त्रास होतो. तुझा अभ्यास अधिक सुगम कसा करता येईल, तुझे आरोग्य कसे सुधारता येईल, तुझी उदास वृत्ती कशी घालविता येईल? तुझे वडील म्हणतात की कधी कधी तू एकटाच दूर कुठेतरी जातोस आणि रडतोस. तुझ्याच वयाच्या इतर मुलांच्या खेळात तुला गोडी वाटत नाही...

राखी डोळयाचा, खिन्न, अंतर्मुख मनाचा स्लावा त्याच्या आईशेजारी बसला आहे. ती आता पन्नाशीला आली आहे. एकाकी स्त्रीचे खडतर जीवन तिच्या वाट्याला आले आहे. तरुण वयात सुखाची अनेक स्वप्ने तिने पाहिली होती. पण ती सुंदर नव्हती; त्यामुळे तिच्याशी लग्न करायला कोणी तयार नव्हते. तिचे तारुण्य असेच संपून गेले; वैयक्तिक सुख तिला लाभलेच नाही. त्यानंतर, युद्ध संपल्यावर एक माणूस युद्धावरून परत घरी आला. त्याच्या अंगभर जखमांचे व्रण होते. तिच्यासारखाच तो एकटा होता. तो तिच्या प्रेमात पडला आणि त्यांचे लग्न झाले. पण तिचे हे सुख अल्पकाळच टिकले. लवकरच तिचा नवरा मरण पावला. त्या स्त्रीने आपले सारे प्रेम मुलावर केंद्रित केले; पण तिने त्याला योग्य प्रकारे वाढविले नाही. लोक म्हणतात की स्लावाला माणसे आवडत नाहीत. दिवसदिवस तो घरातच बसून रहातो आणि तुम्ही त्याला विचारलेत तर नजर रोखून तो तुमच्याकडे पहायला सुरुवात करतो. आता सुद्धा मी त्याच्या नजरेला नजर दिली तेव्हा त्याची नजर एकदम बोचरी आणि सावध बनली.

माझ्या भावी विद्यार्थ्यांची मला जसजशी ओळख झाली तसतशी मला अधिकाधिक खात्री पटत चालली की, आपल्या कुटुंबात जे बालपणाला

वंचित झाले आहेत त्याना त्यांचे बालपण परत मिळवून देणे हे माझ्यासमोरचे एक मुख्य काम आहे.

शाळेतल्या तीन वर्षांच्या काळात अशी अनेक मुले मला ठाऊक झाली होती. जीवनाने हेच दाखवून दिले आहे की, न्याय व चांगुलपणा यांवरील मुलाच्या विश्वासाला गेलेला तडा आपण पुन्हा सांधू शकलो नाही तर आपण खरोखरच माणूस आहोत असे त्याला कधीही वाटणार नाही. व्यक्तिगत परिपूर्णतेची भावना त्याला कधीही स्पर्श करणार नाही. कडवटपणाने भारलेला असा तो किशोर बनेल. त्याच्या दृष्टीने जीवनात पवित्र असे काही उरणार नाही. त्याच्या शिक्षकाचे शब्द त्याच्या हृदयापर्यंत जाऊन पोहोचणारच नाहीत.

शिक्षकाला जे एकूण परिश्रम घ्यावे लागतात त्यांमध्ये मुलाच्या मनाला झालेल्या जखमा बुजविण्यासाठी घ्यावे लागणारे परिश्रम अधिक बिकट स्वरूपाचे असतात. हे सर्वात नाजूक, सर्वात कष्टप्रद कार्य ही, अनिवार्यपणे, आपल्या विद्यार्थ्याने माणूस बनण्याची कला शिकविण्याच्या बाबतीतील शिक्षकाची मुख्य कसोटी आहे. ही कला शिकविणे याचा अर्थ मूल ज्या पद्धतीने सुष्ट काय व दुष्ट काय हे ओळखते ती पद्धत उमजणे व तिचा स्पर्श जाणवणे इतकाच नाही तर दुष्टतेपासून मुलाच्या संवेदनाक्षम अंतःकरणाचे संरक्षण करणे हाही त्याचा अर्थ आहे.

मुलांच्या त्या गर्द पिंगट आणि विभिन्न नील छटा असलेल्या डोळयांत पहाताना त्यांच्या हृदयात ऊब निर्माण करण्याइतका पुरेसा चांगुलपणा आणि सहृदयता माझ्याकडे आहे की नाही असा मला संभ्रम पडला. "मुलाच्या दृष्टीने कल्पना आणि व्यक्ती यांचे नाते अविभाज्य असते. परक्या माणसाच्या किंवा तिरस्करणीय माणसाच्या शब्दांपेक्षा आपल्या अत्यंत प्रिय शिक्षकाच्या तोंडून उमटलेले शब्द मुले अगदी निराळया पद्धतीने ग्रहण करतात"* हे नादेझ्दा क्रुप्स्काया यांचे शब्द मला आठवले. मला शिकवावयाचे होते ते शब्द आणि वैयक्तिक उदाहरणाच्या द्वारे. माझ्या शब्दांतून आणि कृतींतून मुलाना चांगुलपणाचे, सौंदर्याचे आणि सत्याचे दर्शन घडणे आवश्यक होते. माझ्या प्रत्येक शब्दातून आत्मीयता, आपुलकी आणि सहृदयता यांचा आविष्कार होणे आवश्यक होते.

---

*एन्. के. क्रुप्स्काया, 'शिक्षक', मॉस्को, रशियन फेडरेशन अध्यापनशास्त्र प्रबोधिनी, पृ. १४३-१४४ (रशियन भाषेत प्रकाशन).

गाल्याला तिचे वडील घेऊन आले होते. गाल्याच्या आणि तिच्या लहानग्या बहिणीच्या वाट्याला खूप मोठे दुःख आले होते. त्यांची आई वारली होती. एका वर्षांनंतर त्यांच्या वडिलानी पुनर्विवाह केला आणि एक परकी स्त्री त्यांच्या घरात आली. ती प्रेमळ होती, प्रामाणिक होती आणि तिच्याकडे सहानुभूतीचा ओलावाही होता. त्या चिमुकल्या मुलींचे प्रेम जिंकण्याचा तिने प्रयत्न केला. त्यांच्या भावनाना ती अतिशय जपत असे. आपल्याबद्दल त्याना हळू हळू ओढ निर्माण होईल अशी तिला आशा वाटत होती. आठवडा गेला, महिना गेला पण गाल्या आणि तिची छोटी बहीण वाल्या आपल्या सावत्र आईशी बोलायलाही तयार नव्हत्या. जणू तिची त्याना दखलच नव्हती. ती स्त्री अश्रू ढाळी, आपल्या नवऱ्याचा व आप्तेष्टांचा सल्ला विचारी— मी काय करू? घर सोडून जाण्याचाही विचार तिच्या मनात आला. पण तिचे मूल तिच्या पोटात वाढत होते. मुलाच्या आगमनामुळे त्या मुलीना आनंद होईल अशी तिला आशा वाटत होती; पण तिची आशा फोल ठरली. त्या मुली, विशेषतः गाल्या, आपल्या लहानग्या भावाकडे ढुंकूनही पहात नसे. गाल्याच्या स्वाभिमानी मनाला कसा स्पर्श करता येईल? वास्तविक तिचे वडील माझ्याकडे आले होते आणि त्यानी आपलं मन माझ्यापुढे रितं केलं होतं. अशा परिस्थितीत मी त्या आई-वडिलाना काय सल्ला द्यायला हवा होता? मी त्याना सांगितले की गाल्याची नीट ओळख झाल्यानंतरच मी त्याना सल्ला देऊ शकेन.

गुबगुबीत शरीराची, राखी डोळ्याची हसतमुख लारिसा तिच्या आईशेजारी बसली होती. तिच्या हातात क्रिसॅन्थिममचं फूल होतं. मला टाऊक होतं की तिच्या आईचं हृदय पोळून निघालेलं आहे. तिचा नवरा तिला सोडून गेला होता आणि त्या छोट्या मुलीला आपले वडील आठवत नव्हते. "डॅडी येणार आहेत परत", तिने तिच्या मुलीला सांगितले होते. पुढे त्या स्त्रीने एका भल्या माणसाशी लग्न केले आणि हेच तुझे खरे वडील अशी त्या लहानग्या मुलीची समजूत घालण्यात तिने यश मिळविले. लारिसा त्या माणसावर खूप प्रेम करी, पण निष्काळजीपणाने चुकून एखादा शब्द तोंडातून बाहेर पडेल आणि खरी गोष्ट उघडकीस येईल या भीतीच्या छायेखाली तिची आई वावरत असे. ती छोटी मुलगी अगदी आनंदात होती पण निष्ठुर शब्दांच्या घावांपासून तिच्या मनाचे जागरूकपणे संरक्षण करणे आवश्यक होते. तिच्या सुस्वभावी पालकांच्या मदतीने ही गोष्ट साध्य करता येईल का? ते तिचे सख्खे वडील नव्हते... पण प्रत्येक मुलाचे सख्खे वडील

या मुलीच्या सावत्र वडिलांइतकेच चांगले असतील का? या माणसाचा मला जसजसा अधिक चांगला परिचय झाला तसतशी माझी खात्री पटत गेली की जो माणूस मुलाला वाढवतो, त्याचे संगोपन करतो तोच मुलाचा खरा पिता असतो. अनेक वेळा मी या परिवाराच्या घरी जात असे; आणि विशेषतः एका गोष्टीमुळे मी अचंबित झालो. या मुलीच्या सावत्र वडिलांच्या नजरेत जो प्रेमळपणा, सद्भाव आणि सहानुभाव होता अगदी तेच भाव त्या मुलीच्या नजरेतही होते. सौंदर्याच्या दर्शनाने वडिलांच्या मनात जे चैतन्य आणि जो विस्मयभाव स्फुरायचा अगदी तोच भाव त्या मुलीच्या नजरेतूनही प्रतीत व्हावयाचा. इतकेच नव्हे तर तिचे हावभाव, आश्चर्य व्यक्त करणारी तिच्या चेहऱ्यावरची हालचाल, तिची सावधचित्तता, तिचा करारीपणा—सारे काही तिने या माणसापासून उचलले होते.

फेद्या—त्यालाही वडील नव्हते. एके काळी तुझ्या आईचे वर्तन फारसे चांगले नव्हते असे कुत्सित शेरे त्याच्या कानावर आले होते. त्याचे बाल-सुलभ मन गोंधळून गेले: त्याच्या वडिलाना रणांगणावर मृत्यू आला असे त्याची आईच म्हणते. असे असताना आपल्या आईविषयीच्या अशा गोष्टी खऱ्या कशा असू शकतील? फेद्याच्या आईला युद्धाच्या आधी फार पूर्वीपासून मी ओळखत होतो. युद्धकाळात त्याच्या आईच्या जीवनाला फार दुःखद वळण मिळाले. हे क्लेशकारक प्रश्न त्याला त्रस्त करू शकणार नाहीत अशा रीतीने मानवी संबंधांच्या गुंतागुंतीच्या जगाची या मुलाला कशी ओळख करून देता येईल?

छोट्या मुलांच्या बाबतीत ज्ञानविश्वाची सुरुवात व्यक्तीविषयीच्या ज्ञाना-पासून होते ही गोष्ट आपण शिक्षणतज्ज्ञ अनेक वेळा विसरत असतो. मुलाचे वडील त्याच्या आईशी ज्या स्वरात बोलतात त्या स्वरावरून, वडिलांच्या चेहऱ्यावर व्यक्त होणाऱ्या भावावरून व त्यांच्या हावभावावरून मुलाला सुष्ट व दुष्ट काय याचा बोध होतो. मला अशी एक मुलगी ठाऊक आहे की तिचे वडील खिन्न, उदास व अबोल होऊन कामावरून घरी परतत असत आणि त्यांचे मन उल्हसित करण्यासाठी तिची आई हरतऱ्हेने प्रयत्न करीत असे. अशा वेळी ती मुलगी बागेच्या एका दूरच्या कोपऱ्यात जाऊन मूकपणे रडत बसे. वडिलांविषयीचा राग आणि आईविषयीची अनुकंपा तिच्या मनात उफाळून येत असे...

मुलाच्या ज्ञानक्षेत्राच्या कक्षेत प्रवेश करणारी मानवी संबंधांची ही अगदी पहिली, वरवरची अंगे आहेत. पण आपल्या आईवडिलांपैकी कोणीतरी

निष्काळजीपणे काढलेल्या उद्गारावरून मुलाला जेव्हा कळते की आपल्या आईवडिलांचे एकमेकावर प्रेम नाही आणि तो नसता तर त्यानी घटस्फोट घेतला असता तेव्हा त्या मुलाच्या अंतःकरणात केवढी उलथापालथ होत असेल !

निना व साशा या जुळ्या बहिणी होत्या. त्यांचे वडील त्याना शाळेत घेऊन आले होते. त्या कुटुंबात पुष्कळ मुले होती ( निना व साशा यांच्या व्यतिरिक्त आणखी चार ). त्या कुटुंबाला त्यांच्या स्वतःच्या अडचणी होत्या. त्या मुलांची आई कित्येक वर्षे अंथरुणाला खिळून होती. मोठ्या मुली घर संभाळीत असत. वडिलांसमोर अनेक अडचणी उभ्या होत्या. निनाला व साशाला कामाची समज आली होती. त्यांच्या घरातले आनंदाचे झरे आटून गेले होते. एका मुलाच्या हातातील हिरवा रबराचा चेंडू पाहून मुलींचे डोळे आनंदाने चमकले. पण लगेच त्या आनंदावर दुःखाची अशी काही दाट छाया पसरली की माझे मन त्यांच्यासाठी कळवळले. या मुलाना बालपणाचा उज्ज्वल निर्मळ आनंद कसा देता येईल ? मी ते करू शकेन का ? त्यांच्या वडिलानी मला आधीच सांगितले होते की घरी मदत करावी लागत असल्या-मुळे तासापेक्षा अधिक वेळ त्या शाळेला येऊ शकणार नाहीत.

एका उंच गर्द पियर वृक्षाच्या छायेत आम्ही गवतावर बसलो होतो. शिक्षण कसे असावे याविषयी मी पालकाना सांगत होतो. मुलांच्या देखत सांगण्यासारखे जेवढे होते तेवढे मी सांगितले. प्रत्येक कुटुंबासमोर उभ्या असलेल्या अडीअडचणी, क्लेश, यातना मी विसरू शकत नव्हतो. प्रत्येक माणसाच्या जीवनात काही ना काहीतरी अडचणी असतातच. पण त्या साऱ्या जगासमोर उघड्या करून दाखविणे, इतरांच्या देखत त्याला सल्ला देणे म्हणजे त्याचे मन चव्हाट्यावर मांडणे होय, जे अत्यंत खाजगी आहे त्याचे साऱ्या जगाला प्रदर्शन घडविणे होय. मला या सर्व गोष्टी ठाऊक असणे आवश्यक होते. पण सर्व पालकांसमोर त्या बोलून दाखविणे हे चुकीचे ठरले असते. पालकांच्या मनाच्या अगदी अंतर्गाभ्यात शिरणे आवश्यकच बनले तर खाजगी संभाषणातूनच ते साधले पाहिजे आणि अशा वेळीही प्रत्येक शब्द हजार वेळा तोलूनमापून मगच उच्चारला पाहिजे. ज्या आई-वडिलांविषयी मी बोलत आहे त्यांची घायाळ मने, विपदावस्था, अपराध, क्लेश, चिंता-विवंचना आणि अपेष्टा इतक्या व्यक्तिगत आहेत की मी त्यांचे सर्वसाधारणीकरण करू शकत नाही ( माझ्या विद्यार्थ्यांचे बहुसंख्य पालक चांगली माणसे होती ). लोकांमधील भल्याबुऱ्याच्या जटिल गुंफणीचे मला

जेव्हा दर्शन घडले तेव्हा कोणतेही पालक आपल्या मुलासमोर हेतुपुरस्सर वाईट कित्ता ठेवणार नाहीत याचा मला प्रत्यय आला.

कदाचित वाचकाना असे दिसेल की मी फक्त दु:खाचे व विपदावस्थेचेच अतीव दर्शन घडविले आहे. मी मुलांच्या एकाच सामूहिकाविषयी बोलत आहे. पण या सर्व युद्धाच्या जखमा आहेत हे आपण विसरता कामा नये. युद्धानंतरची पहिली वर्षे आता पुष्कळच मागे पडली आहेत. त्या काळात ज्यांच्या मनाला जबर जखमा झाल्या त्या जखमा आता बुजल्या आहेत. ज्यानी १९४४-४५ च्या विजय सलामीच्या प्रकाशात आपली पहिली अक्षरे गिरविली ते आता मोठे झाले आहेत आणि स्वत:च आई-वडील बनले आहेत. ज्यानी युद्धानंतरच्या पहिल्या वर्षांत शाळेला सुरुवात केली त्यांची मुले आता केव्हाच शाळेला जाऊ लागली आहेत आणि काही मुलानी किशोरावस्थेतही पदार्पण केले आहे. आजच्या तरुण कुटुंबांचे जीवन सुखाच्या प्रकाशात उजळून निघायला हवे असे वाटणे साहजिक आहे. पण जीवनाची तऱ्हा वेगळी असते. आजही विकलता आहे, दु:ख आहे, शोकान्तिका आहेत... मग त्या पूर्वीच्या काळाविषयी तर बोलायलाच नको. पण मला सांगायला आनंद वाटतो की त्या काळातील आईवडीलही चांगले, लोक म्हणतात त्याप्रमाणे, शांततेचे व सदिच्छेचे कौटुंबिक जीवन जगले आणि आपल्या मुलानाही त्यानी उत्तमप्रकारे वाढविले.

सात वर्षे वयाच्या दणकट वान्याच्या वडिलांचेच उदाहरण घ्या. ते एक कष्टाळू कामगार, एक शेतीतज्ज्ञ होते. धरतीवर त्यांचे अलोट प्रेम होते आणि इतर लोकांच्या भल्यासाठी ते झटत असत. आपल्या बागेत दर वर्षी ते सफरचंदाची डझनावारी रोपे आणि द्राक्षाच्या वेली तयार करीत व त्या इतर लोकाना देत. त्यांची पत्नी रेशीम-पैदास उद्योगधंद्यात विभाग-पुढारी म्हणून काम करीत असे. आपल्या व्यवसायात ती अतिशय पारंगत होती. प्रेमळ, जबाबदार व मायाळू अशी ती स्त्री होती आणि मुलांची काळजी घेणारी आई होती. १९३३-३४ च्या बिकट काळात तिने चार पोरक्या मुलाना आपल्या कुटुंबात आश्रय दिला आणि त्याना उपासमारीतून वाचविले. आपलीच मुले म्हणून तिने त्या मुलाना वाढविले आणि ती मुलेही तिला "आई" म्हणूनच हाक मारतात.

सुंदर काळ्याभोर शेपटयांच्या छोटया ल्यूस्याचे वडील एक अत्यंत प्रामाणिक व सरळमार्गी गृहस्थ होते. समाजासाठी झटणारे असे काही लोक असतात. त्यांपैकी बहुसंख्य लोक असे असतात की त्यांच्या हातून फार मोठी

कृत्ये घडतात असे नाही. आपल्या बांधवांबरोबरच्या संबंधांतच त्यांचे आत्मिक सौंदर्य सामावलेले असते. तू जबाबदारीने आणि सहानुभूतीने वागले पाहिजेस असे ल्यूस्याच्या वडिलानी तिला कधी सांगितले असेल असे मला वाटत नाही. आपल्या स्वतःच्या वर्तनातून आणि आपल्या पत्नीबरोबर त्यांची जी वागणूक होती त्या वागणुकीतून त्यानी आपल्या मुलाना सहानुभावाचे व मानवतेचे धडे दिले होते. ल्यूस्याच्या आईचे हृदय कमजोर होते. ती सामुदायिक शेताच्या बीटच्या मळ्यात काम करीत होती आणि घरातल्या कामाची सर्व जबाबदारी वडिलानी आपल्या अंगावर घेतली होती.

कात्याच्या वडिलानी व आईने आपल्या फळबागेचे मुलांसाठी एका असाधारण क्लबामध्ये रूपांतर केले होते. त्यांची चार मुले व शेजारची मुले वसंताच्या सुरुवातीपासून शरदऋतू उलगेपर्यंत तेथे आराम करीत असत, खेळ खेळत असत, आणि तुषारस्नानाची मौज चाखीत असत. कात्याच्या वडिलानी मुलांसाठी एक क्रीडांगणही तयार केले होते. बागेतली मधुर फळे तोडण्याची आणि वेचण्याची मुलाना पूर्ण मुभा होती.

गडद निळ्या डोळ्यांच्या आणि अंतर्मुख नजरेच्या छोटचा सान्याचे आईवडील अत्यंत प्रेमळ व ममताळू होते. दर उन्हाळ्यात शहरात रहाणाऱ्या तीन छोटचा मुली, तिच्या चुलत बहिणी, त्यांच्याकडे रहायला येत असत. त्या केव्हा एकदा येतात असे सान्याला होऊन जायचे. तळ्याच्या काठाशीच तिच्या वडिलानी त्याना पोहण्यासाठी म्हणून एक छोटी जागा तयार केली होती. मुलाना जीवनातली गोडी आणखी चाखता यावी म्हणून त्यानी त्यांच्यासाठी एक मोटरबोटही बांधून दिली.

लिदा एका सद्‌गुणी कुटुंबातून आली होती. आगगाडीचे डबे बनविणाऱ्या एका फॅक्टरीत तिचे वडील कामाला होते. ते एक संगीतकार आणि गायक होते. त्यांच्या मुलीना ते गायला आणि व्हायोलिन वाजवायला शिकवीत असत. खुल्या जागेत त्यानी खेळीमेळीचा एक संगीतसंचही तयार केला होता. जवळ जवळ वीस मुले तेथे संगीत ऐकण्यासाठी आणि लोकगीते शिकण्यासाठी जमत.

पावेलचे कुटुंब अगदी स्नेहशील होते. त्याची आई चार-साडेचारवर्षे अंथरुणाला खिळून होती. तिची जागा त्याच्या वडिलानी घेतली होती; ते फॅक्टरीत काम करीत आणि घरचेही सर्व काम संभाळत.

ऑलिव्ह वर्णाच्या, काळ्याभोर डोळ्याच्या सिऱ्योझ्याच्या कुटुंबात चार माणसे होती आणि सर्वांमध्येच एक आत्मीयतेचे नाते होते. प्रत्येक सुटीच्या

दिवशी सर्व कुटुंब रानात जात असे. तेथे, एका मैदानात त्यानी चार लिंबाची झाडे लावली होती. घरी आई, वडील, आजोबा आणि आजी यांच्या नावाने त्यानी प्रत्येकी एक एक सफरचंदाचे झाड लावले होते. त्या कुटुंबातील मुले आपल्या आईवर, वडिलांवर, आजोबांवर आणि आजीवर इतके अपार प्रेम करतात हे पाहून मला बिलकुल आश्चर्य वाटले नाही. कदाचित त्यांच्या आईवडिलांकडून त्याना जी माया मिळाली होती तीच माया शतगुणित होऊन सुदृढ, विशुद्ध प्रेमाच्या स्वरूपात मुलांकडून त्याना परत मिळत होती.

ल्यूबाची आई, वडील, आजी, मोठी बहीण व छोटा भाऊ तिला शाळेत घेऊन आले होते. ल्यूबाला पाच बहीण-भाऊ होते, दोन आज्या होत्या आणि एक आजोबा होते. त्या कुटुंबातील लोकांमध्ये परस्पर विश्वास आणि आदर होता आणि वडीलधाऱ्या माणसांचे आज्ञापालन करण्याची एक वृत्ती त्या कुटुंबात स्वभावतःच भिनलेली होती. त्या कुटुंबातील मोठी माणसे मुलांचा किती आदर करतात आणि त्यांच्या भावनाना किती जपतात या-विषयी मी पुष्कळ ऐकले होते.

लोकजीवनातले उत्कृष्ट परिपाठ दान्कोच्या कुटुंबात आढळून येत होते. त्या कुटुंबात सहा, आठ व नऊ वर्षांची तीन मुले होती. आपले आईवडील कामावर गेले असताना ती मुले घर संभाळीत. ती दुपारचे व संध्याकाळचे जेवण तयार करीत, गाईचे दूध काढीत आणि भाजीच्या मळ्याची काळजी घेत. उन्हाळ्यामध्ये त्यांचे आईवडील संध्याकाळी जेव्हा कामावरून परत येत तेव्हा त्यांच्या स्नानाचे पाणी तयार असे, स्वच्छ अंगपुसणी घडया घालून ठेवलेली असत आणि ताज्या फुलानी सजवलेल्या टेबलावर गरम जेवण वाढून ठेवलेले असे. कामाविषयीची आदरभावना त्या कुटुंबाच्या रोमरोमी भिनली होती. धसमुसळेपणा न करता शांतपणे काम करणे हा तिथला संप्रदायच होता असे म्हणावयालाही हरकत नाही.

वाल्याचे वडील क्रेमेन्चुगच्या एका अभियांत्रिकी कारखान्यात काम करीत होते आणि तिची आई सामुदायिक शेतावर कामाला होती. त्या कुटुंबातील सर्व माणसे—पालक आणि सर्वच्या सर्व तीनही मुले—अभ्यासात रंगलेली होती. या घरात वसत असलेली विद्यार्जनाची वृत्ती पाहून शिक्षकाना कौतुक वाटले आणि आम्हा सर्वांनाच आनंद झाला. त्यांच्या घरातल्या एका वृद्ध बाईकडे पाहून ती तिची आई असावी असेच प्रत्येकाला वाटले होते. वाल्याने आनंद विद्यालयात प्रवेश केला तेव्हा आम्हाला कळले की तिचे

त्या कुटुंबाशी कोणत्याही प्रकारे नाते नव्हते. तिला नात्यागोत्यातले असे कुणीच नव्हते. तिचे दोन मुलगे युद्धात मारले गेले होते आणि वाल्याच्या कुटुंबाने तिला आपल्या कुटुंबात सामावून घेतले. मुलांच्या दृष्टीने ती त्यांच्या कुटुंबापैकीच एक होती. इतकेच काय पण तिचे आपल्याशी रक्ताचे नाते नाही हे वाल्याला ठाऊकही नव्हते.

राखी डोळयाच्या छोटया ल्यूदाचे आईवडील खोलखोझमध्ये काम करीत होते. त्यानी आपल्या मुलाना शेतकामाचा आदर करावयास शिकविले होते. आत्मप्रतिष्ठेची भावना त्या कुटुंबाच्या रोमरोमी भिनली होती. "इतरांसाठी आपण जे जे करतो ते सुंदर असले पाहिजे" अशी वडिलांची मुलाना शिकवण होती. उन्हाळयात मोठी मुले वडिलांबरोबर शेतात काम करीत. महिन्यातून अनेक वेळा ल्यूदा आणि तिची आई तेथे जात असत. या छोटया सफरी म्हणजे त्या चिमुकल्या मुलीला आनंदाच्या सोहळयाप्रमाणे वाटत असत.

तान्याचे आईवडील सामुदायिक शेताच्या पशुपैदास केंद्रावर काम करीत असत. तान्या आणि तिची बहीण उन्हाळयात अनेक वेळा तेथे जात. त्यातून त्याना कामाची आवड निर्माण झाली. शेताच्या एका कोपऱ्यात त्यांचे वडील एक छोटेसे कुंपण तयार करीत आणि तेथे एखादे कोकरू ठेवीत. आमच्या शिक्षकानी से दृश्य कितीतरी वेळा पाहिले होते. तान्या आणि तिची मोठी बहीण या पाडसांची चांगली काळजी घेत. तो त्यांचा आवडता खेळ होता आणि आपले आईवडीलही या खेळात रममाण होत असल्याचे पाहून त्यानाही त्या खेळाचे आकर्षण निर्माण झाले.

शूरा हा काळयाभोर डोळयांचा, स्निग्ध व शोधक नजरेचा मुलगा होता. त्याचे वडील रेल्वेमार्गावर काम करीत असत आणि आठवडयातून एकदाच ते घरी येत. त्यांचे आगमन हा शूराला आणि त्याच्या भावाला व बहिणीला मोठा आनंदाचा क्षण वाटत असे. त्यांच्या वाटेकडे ते अगदी डोळे लावून बसलेले असत; कारण येताना ते काहीतरी अप्रूप भेटवस्तू घेऊन येत असत. लाकडातून कौशल्यपूर्णरीतीने कोरून काढलेल्या पशुपक्ष्यांच्या किंवा माणसांच्या किंवा अद्‌भुत प्राण्यांच्या आकृत्या अशा त्या वस्तू असत. प्रत्येक मुलासाठी ते अलग अलग वस्तू आणीत. वडिलानी सांगितलेल्या गोष्टीही मुलाना खूप आवडत. चांगले लोक धुंडाळण्याकडे त्यांच्या वडिलांचा नेहमी कल असे आणि या भल्या लोकांच्या गोष्टींमुळे त्या मुलांपुढे बाह्य जगाचे दर्शन घडविणारी कवाडे खुली होत.

वलोद्याचे वडील पूलबांधणीकामगार होते आणि त्याची आई सामुदायिक शेतावर काम करीत असे. तो त्यांचा पहिलाच मुलगा होता आणि त्याचे तरुण आईवडील त्याला प्रेमात न्हाऊन काढीत. पण त्यांच्या प्रेमात सुज्ञता कमी होती. त्यानी त्याला अनेक सटरफटर वस्तू आणून दिल्या होत्या आणि त्याच्या सर्व लहरी ते शक्य तितक्या त्वरेने पुऱ्या करीत. वलोद्या आपल्या आईजवळ बसला होता आणि त्याच्या हातात दोन रबरी चेंडू होते. आपल्या आईला त्याला काही सांगावयाचे होते, पण तिचे त्याकडे लक्ष नव्हते. वलोद्याने ताबडतोब ओठ काढले आणि त्याच्या डोळयात आसवे दाटली.

वाऱ्या ही नितळ कांतीची, काळया डोळयांची, कुरळया केसांची आणि नाजूक देठासारख्या बारीक चणीची मुलगी होती. तिची आई एका लोण्याच्या कारखान्यात साफसफाई करणारी स्त्री होती. तिचे वडील युद्धात जबर जखमी झाले होते आणि त्यांचे कुटुंब त्यांची काळजी वहात होते. पण त्यांची प्रकृती पुष्कळ ढासळली होती. आपल्या आईवर फार ताण पडत असल्याचे त्यांच्या तीन मुलीना जाणवले आणि तिचे जीवन अधिक सुकर करण्यासाठी त्या धडपडू लागल्या. त्यांच्या आईला मिळणारे वेतन साधारणच होते आणि आपल्या कौटुंबिक खर्चाला हातभार लावण्यासाठी ती संध्याकाळी सदऱ्यांवर आणि टॉवेलांवर कशिदाकाम करीत असे. वाऱ्याच्या मोठ्या बहिणीनेही कशिदाकाम करायला सुरुवात केली होती आणि वाऱ्याही आता ते काम शिकू लागली होती.

मूल हे आईवडिलांच्या नैतिक जीवनाचा आरसा असते. प्रत्येक कुटुंबात चांगले काय आहे आणि वाईट काय आहे याचा मी विचार केला. सहृदयता आणि इतरांसाठी काहीतरी चांगले करण्याची इच्छा हे चांगल्या आईवडिलांचे अत्यंत मौल्यवान असे नैतिक गुण आहेत आणि मुले ते उचलल्याशिवाय रहात नाहीत. ज्या कुटुंबांत आईवडील आपल्या जीवनाचा काही भाग दुसऱ्यासाठी खर्च करतात, इतर लोकांच्या सुखदुःखात समरस होतात त्या कुटुंबांतील मुले सद्‌गुणी, सहानुभूतीशील व सहृदय निपजतात. सर्वात अनिष्ट गोष्ट कोणती असेल तर ती काही पालकांचा अहंभाव आणि आत्मकेंद्रितता. कधी कधी त्याला आपल्या मुलांविषयीच्या आंधळया, अविचारी प्रेमाचे स्वरूप येते. वलोद्याच्या पालकांच्या बाबतीत तेच घडले. आईवडिलानी आपले सारे जीवन मुलांभोवतीच केंद्रित केले, आपल्या भोवती

इतर माणसे आहेत हे ते विसरले तर या अवाजवी प्रेमाचे पर्यवसान कधीतरी दुःखात झाल्याशिवाय रहाणार नाही.

आनंद विद्यालयासंबंधीच्या माझ्या कल्पना पालकांसमोर मांडीत असताना या सर्व गोष्टींचा मी विचार केला. या संभाषणाची वाट अवघड होती. कुटुंबांमध्ये अस्तित्वात असलेल्या सर्व चांगल्या व वाईट गोष्टी मला विचारात घ्याव्या लागल्या होत्या. आनंद विद्यालयात मला सचोटी, सत्यशीलता व परस्पर विश्वास यांची परंपरा निर्माण करावयाची होती. या परंपरेविषयी बोलत असताना कोल्याच्या कुटुंबाविषयीच्या विचाराने मी अस्वस्थ झालो. या कुटुंबाचे जीवन कोणत्या गंभीर समस्यानी उध्वस्त झाले आहे हे मला ठाऊक होते; पण इतर पालकांसमोर मी त्याची वाच्यता करू शकत नव्हतो. त्यामुळे कोल्याच्या आईच्या मनात शाळेविषयी आकस निर्माण झाला असता आणि ती पुन्हा परत आली नसती. त्यासाठी दुसरे काहीतरी करणे आवश्यक होते; मी त्याचा खूप विचार केला होता, पण मला अजून त्यावर अचूक उत्तर सापडले नव्हते.

पालकांसमोर मी मुलाच्या भावी वाढीसंबंधीचे चित्र उभे केले. आज त्यांची सहा वर्षे वयाची मुले त्यानी शाळेत आणली होती; पण बारा वर्षांनंतर हीच मुले प्रौढ होतील, भावी माता-पिता बनतील. पुढे याच मुलांचे रूपांतर आपल्या मायभूमीवर व श्रमिक जनतेवर प्रेम करणाऱ्या, प्रामाणिक, सत्यशील, मेहनती, प्रेमळ, सहृदय, सहानुभूतीशील, दुष्प्रवृत्तीची आणि अन्यायाची चीड असलेल्या, धैर्यशाली, चिवटपणाने अडचणी पार पाडणाऱ्या, विनम्र, नैतिक सौंदर्याने परिप्लुत, निकोप आणि शारीरिक ताकद व सुदृढता कमावलेल्या गौरवशाली देशभक्तांत व्हावे म्हणून शाळा प्रयत्नांची पराकाष्ठा करील. ही मुले स्पष्ट विचारशक्ती, उदात्त मन, कसबी हात आणि उच्च भावविचार असलेली माणसे बनली पाहिजेत. मूल हा कुटुंबाचा आरसा आहे. पाण्याच्या थेंबात सूर्याचे किरण जसे प्रतिबिंबित होतात तशीच आईवडिलांची नैतिक शुचिता मुलामध्ये प्रतिबिंबित होते. मुलाला सुखाचा व आनंदाचा लाभ करून देणे — विविधांगी सुखाचा व आनंदाचा लाभ करून देणे, ज्यायोगे मुलाला आपल्या कुवतींची ओळख होईल, ज्यायोगे ते श्रमावर प्रेम करायला शिकेल, आपल्या भोवतालच्या जगातील सौंदर्याचा आनंद चाखण्यासाठी व इतरांसाठी सौंदर्याची निर्मिती करण्यासाठी पात्र होण्याच्या दृष्टीने सृजनशीलतेने काम करावयास शिकेल, इतर लोकांवर प्रेम करावयास, स्वतः इतर लोकांच्या प्रेमास पात्र होण्यास आणि खराखुरा मानव

बनण्यास ते शिकेल अशा रीतीने त्याला सुखाचा व आनंदाचा लाभ करून देणे हे शाळेचे व पालकांचे कर्तव्य आहे. केवळ पालकांचे व शिक्षकांचे सामायिक श्रमच मुलाना महान सुखाचा व आनंदाचा लाभ करून देऊ शकतील. मुले व पालक घरोघर गेले; पण जाताना मी त्याना आठवण करून दिली: "उद्या, एकतीस ऑगस्टला, आमचे आनंद विद्यालय अस्तित्वात येईल."*

ह्या दिवस माझ्या जीवनात कोणते क्षण घेऊन येईल? आज जाताना मुले आपल्या आईचा हात धरून गेली, पण उद्या ती एकटीच येणार होती. प्रत्येकाच्या जीवनातला आनंद निरनिराळा असतो. प्रत्येकाच्या जीवनात रवितेजांकित प्रभात फुलते आणि अनंत जीवन त्याच्यासमोर पसरलेले असते. शाळेने या चिमुकल्या जीवांचा आनंद छिनावून घेता कामा नये याच विचारात माझे मन व्यग्र झाले होते. उलट नव्या नव्या आनंदाची दालने मुलांसमोर खुली होतील, विद्यार्जनाला कंटाळवाण्या अभ्यासाचे रूप येणार नाही अशा रीतीने शालेय विश्वात त्याना पुढे घेऊन गेले पाहिजे असे विचार माझ्या मनात येत होते. पण त्याचबरोबर शाळा म्हणजे वरवर मनोरंजक वाटणारा पण आतून पोकळ असलेला अखंड खेळ बनता कामा नये हेही तेवढेच खरे. दिवसागणिक मुलांची विचारशक्ती, त्यांचे भावविश्व आणि मनोबल समृद्ध बनले पाहिजे यात शंका नाही.

## खुल्या हवेतील शाळा

हुरहुरत्या, उत्कंठित, उत्तेजित मनाने मी मुलांची वाट पहात होतो. सकाळी आठ वाजता त्यांच्यापैकी एकोणतीस मुले आली. साशा आली नाही (तिच्या आईला बहुतेक बरे नसावे) आणि वलोद्याही गैरहजर होता. बहुधा तो झोपला असावा आणि त्याच्या आईला त्याला उठवायचे नसावे.

जवळ जवळ सर्व मुले सणासुदीचे कपडे घालून आली होती आणि त्यांच्या पायात नवीन बूट होते. मला ती चिंतेची बाब वाटली; कारण अनादि काळापासून खेड्यातील मुले अनवाणीच चालत आली होती आणि

---

*सोविएत संघराज्यात शालेय वर्ष १ सप्टेंबरला सुरू होते.

सर्दीप्रतिबंधक असा तो एक सर्वोत्कृष्ट शारीरिक व्यायाम आहे. धूळ, पहाटेचा दंव आणि उन्हाने तापलेली जमीन यांपासून मुलांच्या पायाचे संरक्षण करण्याचा पालक का प्रयत्न करतात? त्यांचा हेतू चांगला असेल पण त्याचे परिणाम वाईट होतात. वर्षागणिक अधिकाधिक ग्रामीण मुलाना शीतज्वराची, टॉन्सिलिटिसची आणि डांग्या खोकल्याची बाधा होत आहे. मुलाना अशा रीतीने वाढविले पाहिजे की त्याना ना उन्हाचे ना थंडीचे भय वाटले पाहिजे.

"चला मुलानो, आपण शाळेत जाऊ या!" मी त्या छोटया मुलाना म्हटले आणि माझा मोहरा मी बागेकडे वळविला. मुले गोंधळून माझ्याकडे पाहू लागली.

"होय बाळानो, आपण शाळेतच जात आहोत. आपली शाळा भरणार आहे ती खुल्या हवेत, हिरव्यागार हिरवळीवर, पियर वृक्षांच्या छायेखाली, द्राक्षवेलींच्या कुंजांत, हिरव्या मैदानांत. तुमचे बूट काढा. पूर्वी जसे तुम्ही अनवाणी चालत होता तसेच आपण अनवाणी चालू या." मुलानी आनंदाने किलबिलाट केला. तापलेल्या हवेत बूट घालण्याची त्याना संवय नव्हती आणि त्या बुटांत त्याना बेचैन वाटत होते. "आणि उद्या बूट घालून येऊ नका. आपल्या शाळेच्या दृष्टीने तेच उत्तम!" मी त्याना सांगितले.

आम्ही द्राक्षवेलींच्या कुंजात शिरलो. वृक्षानी झाकलेल्या एका शांत कोपऱ्यात द्राक्षांचे दाट वेल वाढले होते. धातूच्या चौकटींवर चढलेल्या त्या वेलींमुळे तेथे एक सुंदर हिरवी कुटी तयार झाली होती; आणि तेथील जमीन मऊशार गवताने आच्छादिलेली होती. तेथे अगदी निःस्तब्ध शांतता होती आणि त्या हिरव्या विरल प्रकाशातून सर्व जगच जणू काही हिरवेगार अमल्यासारखे भासत होते. आम्ही गवतावर आसन ठोकले.

"आपली शाळा येथे सुरू होणार आहे. निळे आकाश, ते उद्यान, ते खेडे, तो सूर्य आपण येथे बसूनच पहाणार आहोत."

निसर्गसौंदर्याच्या त्या मोहक दर्शनाने मुले मुग्ध बनली होती. वेलींच्या पानांतून पिकलेली, पोवळया रंगाची द्राक्षे लटकत होती. मुलाना ती द्राक्षे चाखायची इच्छा होती. होय मुलानो, आपण ती नक्कीच चाखणार आहोत; पण प्रथम आपण त्यांच्या सौंदर्याचा आस्वाद घेतला पाहिजे. मुलानी आपल्या भोवताली नजर फेकली. उद्यान जणू काही हिरव्यागार दाट धुक्याच्या आवरणात गुरफटले आहे असे वाटत होते, पाण्यात एखादे आटपाट नगर बसावे तसे ते भासत होते. पृथ्वीचा पृष्ठभाग—शेते, मैदाने, रस्ते—जणू

काही पाचूच्या विरल धुक्यात थरथरत होती आणि चमचमत्या झाडांवर सूर्यप्रकाशाचे तेजोकण पसरले होते.

"सूर्य ठिणग्यांची उधळण करीत आहे," कात्या हळूच म्हणाली.

मनावर मोहिनी घालणाऱ्या त्या जगावरची मुलांची नजर ढळत नव्हती. तेव्हा मी त्याना सूर्याविषयी एक गोष्ट सांगायला सुरुवात केली.

"होय मुलानो, कात्याने फार सुंदर वर्णन केले आहे. सूर्य ठिणग्यांची उधळण करीत आहे. तो खूप खूप उंच आकाशात रहातो. त्याच्याकडे दोन धिप्पाड लोहार आहेत आणि सोन्याची एक ऐरण आहे. पहाटेपूर्वी अग्नि-ज्वालेसारख्या लखलखणाऱ्या दाढचा असलेले ते लोहार सूर्याकडे जातात आणि सूर्य त्याना रुपेरी धाग्याच्या दोन लडचा देतो. लोहार लोखंडी हातोडे घेतात, ते रुपेरी धागे सोनेरी ऐरणीवर ठेवतात आणि त्यांच्यावर घण घालू लागतात. सूर्यासाठी ते एक रुपेरी माळ तयार करीत असतात आणि त्या घणांतून रुपेरी ठिणग्या उडू लागतात, त्यांचे कण बनतात आणि ते साऱ्या जगावर पसरतात. ठिणग्या पृथ्वीवरही पडतात आणि त्याच तुम्हाला येथे दिसतात. संध्याकाळी थकले-भागलेले ते लोहार सूर्याकडे जातात आणि त्याला ती माळ देतात. सूर्य ती माळ आपल्या सोनेरी केसांच्या जटांत खोवतो आणि आपल्या जादूच्या बागेत विश्रांतीला जातो."

मी गोष्ट सांगत होतो आणि त्याच वेळी चित्रेही काढीत होतो. शुभ्र कागदावर अद्भुत प्रतिमा उमटत होत्या—ऐरणीवर वाकलेले ते दोन धिप्पाड लोहार आणि लोखंडी घणांतून उडणाऱ्या रुपेरी ठिणग्या.

त्या जादूमय विश्वाने मंत्रमुग्ध होऊन मुले गोष्ट ऐकीत होती. त्या गोष्टीची त्यांच्या मनावर इतकी मोहिनी पडली होती की त्या मोहिनीचा भंग होईल या भीतीने तेथील शांततेचा भंग करायलाही कोणी तयार नव्हते. मग त्यानी एकेक प्रश्न विचारायला सुरुवात केली: लोहार रात्री काय करतात? दर दिवशी सूर्यासाठी ते नवीन माळ का बनवितात? रुपेरी ठिणग्या दर दिवशी पृथ्वीवर पडतात. नंतर त्या कुठे अदृश्य होतात?

"सर्व काही सांगेन मी तुम्हाला—पण नंतर. पुष्कळ वेळ आहे आप-ल्याकडे. तुम्हाला द्राक्षं चाखायची आहेत ना? चला तर!" द्राक्षाची टोपली भरेपर्यंत अगदी अधीर होऊन मुले थांबली होती. मी प्रत्येकाला दोन दोन घोस दिले. एक तुम्हाला खायला, आणि एक तुमच्या आईसाठी; म्हणजे तिलाही चाखायला मिळतील द्राक्षे, मी त्याना सांगितले. त्यानी द्राक्षे कागदात गुंडाळली. त्यावेळचा त्यांचा संयम पाहून मी खरोखरच

चकित झालो. तरीही मुले द्राक्षे खरोखरच घरी घेऊन जातील की नाही, का वाटेतच ती स्वाहा करतील असा मला प्रश्न पडला. तोल्या आणि कोल्या ही द्राक्षे आपल्या आईपर्यंत पोहोचवतील ना? निनाला मी पुष्कळ घोस दिले — एक तिच्या आजारी आईसाठी आणि काही तिच्या बहिणींसाठी आणि आजीसाठी. वाऱ्याने आपल्या वडिलांसाठी तीन घोस घेतले. मुले चांगली धट्टाकट्टी झाली की ती स्वतःच आपापले द्राक्षकुंज तयार करतील असा एक विचार माझ्या मनात येऊन गेला... या शरदात वाऱ्याच्या अंगणात डझनावरी द्राक्षाची रोपे लावली पाहिजेत. वर्षानंतर त्याना फळे धरतील आणि तिच्या वडिलाना ते फार चांगले औषध ठरेल...

आम्ही त्या यक्षभूमीच्या हिरव्या विरल पटलातून बाहेर आलो आणि मी मुलाना सांगितले: "उद्या संध्याकाळी सहा वाजता या. विसरू नका!"

मुलाना जाण्याची इच्छा नव्हती; पण आपली शुभ्र पुडकी छातीशी कवटाळून ती घरोघर पांगली. कोणती मुले द्राक्षे घरी घेऊन जातील हे जाणून घ्यायला मी किती उत्सुक होतो! पण मी अर्थातच त्याना विचारणार नव्हतो. त्यानी स्वतःहूनच सांगितले तर किती बहार होईल!

खुल्या जागेतील शाळेचा पहिला दिवस अशा रीतीने संपला... या रात्री मला सूर्याच्या रुपेरी ठिणग्यांचे स्वप्न पडत होते. दुसऱ्या दिवशी सकाळी मी लवकरच उठलो आणि यानंतर काय करावयाचे असा माझाच मला प्रश्न पडला. त्या दिवशी मुलाना काय सांगावयाचे किंवा त्याना कोठे घेऊन जावयाचे याची मी कोणतीच तपशीलवार योजना तयार केली नव्हती. आपल्या भोवतालच्या जगाचा मूल बारकाईने शोध घेत असते: हाच त्याचा स्वभावधर्म असतो आणि मुलाला तसेच वाढू दिले पाहिजे: याच कल्पनेची प्रेरणा मला लाभली होती आणि याच कल्पनेतून आमच्या शाळेचे जीवन विकसित झाले. चैतन्यपूर्ण रंगानी नटलेले, निर्मळ आणि कंपनयुक्त स्वरानी निनादणारे चेतोहर विश्व परीकथांतून आणि खेळांतून, व्यक्तिगत सृजनशील कार्यातून, सौंदर्याविष्कारातून त्यांच्यासमोर खुले झाले पाहिजे आणि त्यातूनच इतरांच्या चांगल्यासाठी झटण्यासाठी त्यांची मने प्रेरित झाली पाहिजेत. परीकथा, अद्‌भुत कल्पनाविलास, खेळ, अद्वितीय सृजनशीलता हा मुलाच्या अंतःकरणापर्यंत पोहोचण्याचा खात्रीलायक मार्ग आहे. आपले प्रत्येक पाऊल हे **विचारांच्या आणि शब्दांच्या उगमस्थानांकडे करण्यात येणाऱ्या प्रवासाचे,** निसर्गाच्या अद्‌भुतरम्य सौंदर्याकडे करण्यात येणाऱ्या प्रवासाचे एक अंक ठरेल अशा रीतीने, प्रतिदिन काहीतरी नवनव्या

गोष्टींचा साक्षात्कार घडविणाऱ्या भोवतालच्या जगात मला मुलाना घेऊन जावयाचे होते. ज्ञानाच्या दिशेने टाकलेले प्रत्येक पाऊल हे मनाची उदात्तता वाढविणारे आणि इच्छाशक्तीची घडण करणारे पाऊल ठरेल अशा रीतीने माझ्या सर्व विद्यार्थ्यांची चिंतनशील आणि शोधक वृत्तीची माणसे म्हणून वाढ झाली पाहिजे ही माझी प्रतिज्ञा होती.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळच्या सुमारास मुले शाळेला आली. सप्टेंबरच्या त्या शांत दिवसाची तप्तता आता निवली होती. आम्ही खेडे सोडले आणि एका उंच टेकाडावर बसलो. सूर्यकिरणात चमकणारी कुरणे, उंच सरळ पॉप्लर वृक्ष आणि दूर क्षितिजावर दिसणारी टेकाडे यांचे अत्यंत विलोभनीय दृश्य आमच्यासमोर पसरले होते. आम्ही विचारांच्या व शब्दांच्या उगमस्थानांपर्यंत आलो होतो. परीकथा आणि अद्भुत कल्पनाविलास ही या उगमस्थानांची दारे खुली करणारी किल्ली आहे; आणि मग शब्दांचा ओघ फोफावत बाहेर पडतो. आदल्या दिवशी कात्या काय म्हणाली होती आठवते ना? "सूर्य ठिणग्यांची उधळण करीत आहे!" पुढच्या काही घटनांचा मी येथे थोडा उल्लेख करतो. बारा वर्षांनंतर शाळेच्या शेवटच्या वर्षात असताना आपल्या जन्मभूमीविषयी कात्याने एक निबंध लिहिला, आणि आपल्या निसर्गप्रेमाचे वर्णन करताना तिने याच प्रतिमेचा पुन्हा उपयोग केला होता. परीकथेतील प्रतिमा मुलांच्या मनावर किती खोल ठसा उमटवितात त्याचे हे उदाहरण आहे. भोवतालच्या जगात अद्भुत कल्पनाविलासांची कारंजी फुलविताना, या अद्भुतकथा निर्माण करताना मुलाना केवळ सौंदर्याचाच शोध लागतो असे नव्हे तर सत्याचाही शोध लागतो याची मला सहस्रदा खात्री पटली आहे. परीकथांशिवाय, कल्पनाविलासांशिवाय मूल जिवंत राहू शकत नाही. परीकथांशिवाय सभोवतालचे जग हे अगदी निखळ सुंदर चित्र असू शकेल, पण ते फलकावर काढलेले चित्र असते. परीकथांमुळे ते जिवंत बनते.

अलंकारिक भाषेत बोलावयाचे झाल्यास परीकथेला मुलांच्या विचारांची व भाषेची ज्योत अधिक प्रज्वलित करणाऱ्या ताज्या वाऱ्याची उपमा देता येईल. मुलाना फक्त परीकथा ऐकायलाच आवडत नाही तर आपल्या कल्पनेतून परीकथा निर्माण करायलाही आवडते. द्राक्षकुंजाच्या हिरव्या आवरणातून बाहेरचे जग दाखवीत असताना मुलाना गोष्ट सांगण्याचा विचार माझ्या मनात होता; पण निश्चित कोणती गोष्ट हे मला ठाऊक नव्हते. "सूर्य ठिणग्यांची उधळण करीत आहे..." या कात्याच्या शब्दांतून माझ्या

कल्पनाभरारीला चालना मिळाली. मुले किती सत्यपूर्ण, रेखीव, कलात्मक, बोलक्या प्रतिमा उभ्या करतात–किती स्पष्ट! भाषेचा केवढा विविधरंगी विलास असतो त्यांत!

पुस्तक उघडून प्रत्येक अक्षर लावीत आपला पहिला शब्द वाचायला लागण्यापूर्वी सर्वात अद्भुतरम्य ग्रंथाची, निसर्गग्रंथाची, पाने मुलानी वाचायला शिकावीत असा मी प्रयत्न केला.

निसर्गात अत्यंत संवेदनाक्षम, अत्यंत नाजूक, अत्यंत अद्भुत असे जे काही वास करीत आहे त्याच्याशी–मुलाच्या मनाशी–आपण शिक्षक व्यवहार करीत आहोत ही गोष्ट, येथे, निसर्गाच्या सान्निध्यात बसलो असताना, मला विशेष स्पष्टतेने जाणवली. मुलाच्या मनाचा विचार करताना थरथरणाऱ्या दंवमौक्तिकानी न्हाऊन निघालेले नाजूक गुलाबपुष्प आपण आपल्या कल्पनेसमोर आणले पाहिजे. या दंवबिंदूना धक्का न लावता ते फूल वेचण्यासाठी केवढ्या दक्षतेची आणि केवढ्या संवेदनक्षमतेची आवश्यकता आहे! प्रत्येक मिनिटाला आपण अगदी तीच काळजी वाहिली पाहिजे; कारण निसर्गामध्ये जे सर्वात नाजुक व सर्वात संवेदनाक्षम आहे त्याला–वाढ होत असलेल्या मुलाच्या विचारवस्तूला–आपण स्पर्श करीत असतो.

मूल प्रतिमांच्या द्वारे विचार करते. उदाहरणार्थ, जलबिंदूच्या प्रवासाविषयी शिक्षक गोष्ट सांगत असताना मुलाच्या मनःचक्षूसमोर उभ्या रहातात त्या प्रभातीच्या धुक्याच्या रुपेरी लाटा, गहिरे काळे ढग, मेघांचा गडगडाट आणि वासंतिक जलधारा. या चित्रातील प्रतिमा जितक्या अधिक रेखीव व स्पष्ट तितका निसर्गनियमांचा अधिक खोल अर्थ मुलाच्या मनावर प्रतिबिंबित होतो. मुलाच्या मेंदूतील नाजूक, संवेदनाक्षम मज्जातंतू पेशीना अजून बळकटी आलेली नसते; त्यांचा विकास करणे, त्याना अधिक मजबूत करणे आवश्यक असते.

मूल विचार करते... याचा अर्थ मज्जापटलातील मज्जातंतू पेशींचा एक विशिष्ट गट भोवतालच्या जगातील प्रतिमा (चित्रे, उदाहरणे, घटना, शब्द) ग्रहण करतो आणि त्यातून निर्माण झालेले संदेश या अत्यंत नाजूक मज्जातंतू पेशींतून प्रवास करू लागतात. मज्जातंतू पेशींतर्फे या माहितीवर प्रक्रिया केली जाते, म्हणजेच तिची पद्धतशीर मांडणी करणे, संकलन करणे, तुलना करणे आणि वर्गीकरण करणे या क्रिया केल्या जातात. सर्व नव्या माहितीवर अशाच प्रकारे पुनःपुन्हा प्रक्रिया घडविली जाते. नवनव्या प्रतिमा

आणि मिळालेल्या माहितीवर घडविण्यात येणारी प्रक्रिया यांच्याबरोबर संधान राखण्यासाठी मज्जातंतू ताकदीचे विलक्षण अल्पावधीत प्रतिमांच्या बोधन-क्रियेपासून त्यांच्यावर घडविण्यात येणाऱ्या प्रक्रियेत स्थित्यंतर घडते.

मज्जातंतू पेशींच्या ताकदीच्या या विस्मयकारक जलद गतीने घडणाऱ्या स्थित्यंतरालाच आपण विचार म्हणतो, म्हणजेच **मूल विचार करते** असे आपण म्हणतो. मुलाच्या मज्जापेशी इतक्या संवेदनाक्षम असतात, बोधन-वस्तूंबाबत घडणारी त्यांची प्रतिक्रिया इतकी नाजूक असते की, बोधनवस्तू आणि त्यांचे अर्थविशदीकरण याना जेव्हा दृक्, श्राव्य किंवा स्पर्शनिविष्ट प्रतिमांचे रूप येते तेव्हाच त्यांचे कार्य सुरळीत चालते. विचारात होणारे स्थित्यंतर हा विचारक्रियेचा गाभा आहे; ज्या विषयाची चर्चा चालू असेल ती विषयवस्तू ज्या उदाहरणामार्फत किंवा शाब्दिक चित्रामार्फत मूल प्रत्यक्ष "पाहू शकते, ऐकू शकते किंवा स्पर्शाने जाणू शकते" (मुलाना परीकथा इतक्या का आवडतात त्याचे कारण हेच आहे) असे अत्यंत वास्तव व सुस्पष्ट उदाहरण किंवा अत्यंत सुस्पष्ट शाब्दिक चित्र मुलासमोर जेव्हा उभे रहाते तेव्हाच हे स्थित्यंतर शक्य बनते.

अत्यंत स्पष्ट प्रतिमा (विशेषतः निसर्ग) हीच विचारांची उगमस्थाने आहेत. मुलाच्या मेंदूचे स्वरूप असे असते की अगदी याच उगमस्थानांशी मुलाचे शिक्षण घडवून आणावे लागते; याच योगे सुस्पष्ट प्रतिमांपासून त्या प्रतिमांत अंतर्भूत असलेल्या माहितीच्या प्रक्रियेत मुलाचे विचार स्थित्यंतरित होऊ शकतील. निसर्गापासून मुलाना अलग केले, अगदी पहिल्या दिवसापासून मुलाना फक्त शब्दच ऐकायला मिळाले तर त्यांच्या मज्जापेशीना अत्यंत जलद शीण येईल आणि शिक्षकानी त्याना नेमून दिलेले काम ती करू शकणार नाहीत. त्यांच्या मज्जापेशींचा विकास केला पाहिजे, त्याना बळकटी आणली पाहिजे आणि त्याच्या शक्तीचा संचय केला पाहिजे. म्हणूनच प्राथमिक वर्गातील शिक्षकाना अनेक वेळा एक दृश्य पहायला मिळते. मूल अगदी शांतपणे बसलेले असते, तुमच्या डोळ्याकडे पहात तुमचे बोलणे ते अगदी ध्यानपूर्वक ऐकत असल्याचे दिसते, पण त्यातला एकही शब्द त्याला कळत नसतो; कारण शिक्षक फक्त बोल बोल बोलत असतो. नियम, प्रश्न, उदाहरणे यांविषयी मूल जे ऐकत असते ते सारे अमूर्त आणि स्थूल असते— तेथे जिवंत प्रतिमा नसतात आणि मुलाचा मेंदू थकून जातो. येथेच सर्व अडचणीना सुरुवात होते. निसर्गाच्या सान्निध्यात मुलांच्या विचार-क्रियेचा विकास केला पाहिजे आणि ती क्रिया अधिक बळकट बनविली

पाहिजे — मुलांच्या शरीराच्या विकासाच्या नैसर्गिक नियमांची ती गरज आहे. म्हणूनच निसर्गाच्या अंतरंगात घडवून आणलेला प्रत्येक प्रवास हा विचारक्रियेतील एक पाठ असतो, मनाच्या विकासातील एक पाठ असतो.

त्या टेकाडावर आम्ही बसलो होतो. आमच्या भोवताली नाकतोड्यांचे वृंदगान सुरू होते. हवेत स्टेप गवताचा परिमल दरवळला होता. आम्ही अगदी निःस्तब्ध बसलो होतो. मुलाना तुम्ही खूप काहीतरी सांगितले पाहिजे असे नव्हे; तुम्ही त्याना व्याख्यानांत बुचकळून काढले पाहिजे असे नव्हे. शब्द म्हणजे केवळ काही मनोरंजन नव्हे. शाब्दिक तृप्तता ही एक सर्वात अपायकारक तृप्तता असते. मुलाला गरज असते ती केवळ शिक्षकाचे शब्द ऐकण्याची नव्हे तर मुग्धतेचीही. अशा वेळी आपण पाहिलेल्या व ऐक-लेल्या गोष्टींचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करीत मूल विचार करीत असते. वर्गामध्ये किती बोलायचे यावर शिक्षकाने मर्यादा घालणे हे महत्त्वाचे आहे. मुलांचे रूपांतर आपण निष्क्रियतेने शब्द ग्रहण करणाऱ्या माणसांत करता कामा नये. चित्रमय किंवा शाब्दिक प्रतिमांचा बोध करून घेण्यासाठी पुष्कळ अवधी आणि बौद्धिक ताकद आवश्यक असते. मुलाला विचार करू देणे हा शिक्षकाचा एक अत्यंत सूक्ष्म गुण असतो. आणि निसर्गाच्या सान्निध्यात मुलाला ऐकण्याची, परिसराच्या अवलोकनाची आणि स्पर्शजाणिवेची संधी उपलब्ध करून दिली पाहिजे...

नाकतोड्यांचे वृंदगान आम्ही ऐकत होतो. या अनिर्वचनीय संगीताने मुले अगदी भारावून गेल्याचे पाहून मला आनंद झाला. शेतांवरून येणाऱ्या सुगंधाने आणि चेतोहर नादस्वरानी शिगोशिग भरलेली ही शांत संध्याकाळ मुलांच्या स्मृतिपटलावर कायमची कोरली जावी असे मला वाटले. एक दिवस नाकतोड्यांवर ती परीकथा रचतील.

पण सूर्यास्तावर मुलांच्या विचारपूर्ण नजरा किती अनिमिषतेने खिळून राहिल्या होत्या! सूर्य आता क्षितिजाखाली गेला होता आणि आकाशावर मुलायम रंगांचा व रंगच्छटांचा शिडकावा पडला होता.

"तो पहा! सूर्य विश्रांतीसाठी गेला," लारिसा म्हणाली. तिची चर्या खिन्न बनली होती.

"लोहारानी सूर्याला त्याची रूपेरी माळ आणून दिली... त्याने कालची माळ कुठे ठेवली असावी?" लिदाने विचारले.

कालचीच गोष्ट मी पुढे सुरू करीन या अपेक्षेने मुलानी माझ्याकडे

पाहिले ; पण कोणती प्रतिमा वापरावी हे मी ठरविले नव्हते. फेद्याने मला मदत केली.

"माळ आकाशावर पसरून ठेवली आहे", तो हळूच म्हणाला.

सर्वचजण एकदम स्तब्ध झाले—फेद्या आता पुढे काय सांगतो हे ऐकायला आम्ही सर्वच उत्सुक झालो होतो. कालच्याच गोष्टीची वास्तविक ती पुढची सुरुवात होती आणि फेद्याच्या मनात त्या गोष्टीने आणखी आकार घेतला होता हे उघड होते. पण, कदाचित लाजेने असेल, तो गप्प बसला. मी त्याला मदत केली :

"होय, माळ आकाशावर पसरून ठेवली आहे. एक दिवसानंतर सूर्याच्या धगधगत्या शिखांवर ती तापल्यामुळे ती मेणासारखी मऊ बनली आहे. सूर्याने आपल्या धगधगत्या हाताने तिला स्पर्श केला आहे आणि त्याने सुवर्णाचा ओघ सायंसमयीच्या आकाशावर ओतला आहे. विश्रांतीला जाण्यापूर्वी सूर्यापासून निघणारे शेवटचे किरण म्हणजे या ओघातून निघालेला प्रकाश आहे—तो पहा, तिथे तोच प्रकाश दिसत आहे—गुलाबी रंगाचा तो खेळ करीत आहे ; आता तो मंद मंद होत आहे आणि हळू हळू काळवंडायला लागला आहे. सूर्य दूर दूर जात आहे. तो पहा! आता लवकरच तो आकाशातल्या आपल्या जादूच्या बागेत जाईल आणि तारे लुकलुकायला सुरुवात होतील..."

"तारे म्हणजे काय? ते का लुकलुकतात? ते कोठून येतात? दिवसा आपल्याला ते का दिसत नाहीत?" मुलानी विचारले. पण आपण मुलाना प्रतिमांच्या राशीखाली गुदमरवून टाकता कामा नये. एका दिवसापुरते ते पुरेसे होते आणि मुलांचे लक्ष मी दुसरीकडे वळविले.

"स्टेपचा तो प्रदेश पाहिलात? खोऱ्यावर, कुरणावर, सखल भागांवर आता कसा अंधार दाटून येत आहे. ती टेकाडे पाहिलीत? किती मुलायम दिसतात ती! संध्याकाळच्या विरल धुक्यात कशी तरंगत जाताना दिसतात! ती टेकाडे आता भुरकट दिसू लागली आहेत. त्यांच्या अंगाखांद्यावर नजर टाका—काय दिसते तुम्हाला तिथे?"

"रान... झुडपे... गाईंचा एक कळप... आपल्या मेंढ्या घेऊन उभा असलेला मेंढपाळ. शेतात रात्र घालविण्यासाठी लोक तयारी करीत आहेत. त्यानी शेकोटी पेटविली आहे ; पण आम्हाला ती दिसू शकत नाही ; आम्हाला फक्त धूर दिसत आहे..." काळवंडून चाललेल्या टेकड्यांकडे पहाताना मुलांच्या अद्भुत कल्पनाविश्वात निर्माण झालेल्या या गोष्टी होत्या.

आता घरी जायची वेळ झाली असे मी मुलाना सांगितले; पण त्यांची जायची इच्छा नव्हती. आणखी काही मिनिटं आपण थांबू या ना असे ती म्हणाली. जगावर जेव्हा गूढतेचे आवरण पडलेले असते अशा सायंकाळच्या वेळी मुलांचे अद्‌भुत कल्पनाविश्व चौखूर धावू लागते. संधिप्रकाश आणि रात्रीचा अंधार खूप दूरवरच्या दऱ्यांतून आणि रानांतून नदीप्रमाणे वहात येतात एवढेच मी म्हटले आणि मुलांच्या कल्पनाविश्वात अंधार आणि संधिप्रकाश या अद्‌भुत प्राण्यांच्या प्रतिमा आधीच तयार झाल्या. वाऱ्याने या प्राण्यांविषयीची कथाही सांगितली: खूप दूरवरच्या अरण्याच्या पलिकडे एका लांबच्या गुहेत अंधार आणि संधिप्रकाश हे प्राणी रहातात. दिवसा ते या तळ नसलेल्या काळयाकभिन्न विवरात शिरतात. स्वप्ने पहाता पहाता ते तेथे झोपी जातात आणि उसासे टाकतात (ते उसासे का टाकतात हे फक्त कथाकारालाच ठाऊक...). पण सूर्याने आपल्या जादूच्या बागेत प्रवेश करताच ते आपल्या या गुप्त जागेतून बाहेर पडतात. त्यांच्या पायाची चाहूल लागू नये म्हणून त्यांच्या अजस्र पंज्यांवर मऊ लोकर गुंडाळलेली असते. संधिप्रकाश आणि अंधार हे फार कनवाळू, शांत, प्रेमळ प्राणी असून ते कोणालाच इजा करीत नाहीत.

अंधार आणि संधिप्रकाश त्याना जोजवून कसे झोपवितात यांविषयीही कथा रचण्याची मुलांची तयारी होती. पण त्या दिवसापुरते तेवढे पुरेसे होते. आम्ही घरी जायला निघालो तेव्हा दुसऱ्या दिवशी संध्याकाळीही आम्ही येऊ का असे मुलानी विचारले. "किती सहज सुचतात गोष्टी या वेळी" असे वाऱ्याचे म्हणणे.

मुले इतक्या उत्सुकतेने गोष्टी का ऐकतात? ज्यावेळी प्रत्यक्ष वातावरणच कल्पनाशक्तीच्या भरारीला विलक्षण हातभार लावणारे ठरते अशा संधि-प्रकाशाची वेळ मुलाना का आवडते? गोष्टींमुळे कोणत्याही मुलाचे भाषा-सामर्थ्य का वाढते आणि त्याच्या विचारप्रक्रियेला बळकटी का येते! कारण गोष्टींतील प्रतिमांभोवती भावनात्मकतेचे एक रंगपटल निर्माण होत असते ही गोष्ट स्पष्ट आहे. गोष्टीतील शब्द मुलाच्या कल्पनेत वास करून रहा-तात. अद्‌भुततेत रंगविलेले शब्द ऐकताच किंवा उच्चारताच मुलाचे श्वास रोखले जातात. मुलानी गोष्टी केवळ ऐकल्याच पाहिजेत असे नव्हे तर आपल्या कल्पनेच्या द्वारे गोष्टी रचल्याही पाहिजेत. जेथे हे घडत नाही अशा शाळेची किंवा विद्यार्जनाची मी कल्पनाच करू शकत नाही.

आनंद विद्यालयाच्या पहिल्या दोन महिन्यांत मुलानी रचलेल्या काही

गोष्टी आणि परीकथा मी पुढे देत आहे. मुलांचे विचार, त्यांच्या भावना, त्यांच्या इच्छा आणि त्यांची नजर यांचे विश्व त्यांत प्रतिबिंबित झाले आहे.

### चिमुकला ससा (शूरा)

आईने मला रेशमाचा एक चिमुकला ससा दिला. नव वर्षदिना-पूर्वीची ही गोष्ट आहे. क्रिसमस झाडाच्या एका फांदीला मी तो टांगून ठेवला. सर्वजण झोपी गेले. झाडावर प्रकाशाचा एक छोटा, छोटा ठिपका लुकलुकत होता. मी पाहू लागलो. एवढ्यात सशाने त्याच्या छोट्या फांदीवरून खाली उडी मारली आणि तो झाडाभोवती धावू लागला. त्याने झाडाला फेऱ्यावर फेऱ्या मारल्या आणि टुणकन उडी मारून तो पुन्हा फांदीवर जाऊन बसला.

### सूर्यफूल (कात्या)

सूर्य वर आला. चिमणे पक्षी जागे झाले आणि आकाशात चंडोल पक्षी भरारी मारू लागला. शेवटी सूर्यफूलही जागे झाले. ते उठले आणि आपल्या पाकळ्यांवरचे दंव त्याने झटकले. ते सूर्याकडे वळले आणि म्हणाले: "हल्लो, रविराज. तुमची मी खूप वाट पहात होतो. तुमच्या उबेशिवाय माझ्या सोनेरी पाकळ्या किती मलूल झाल्या आहेत पहा ना! पण आता त्या पुन्हा ताज्यातवान्या झाल्या आहेत आणि त्या खूप आनंदात आहेत. मी अगदी तुमच्यासारखाच वाटोळ्या आकाराचा आणि सोनेरी कांतीचा आहे, नाही का रविराज!"

### त्यानी शेत कसे नांगरले? (युरा)

कापणीमळणी यंत्रानी गव्हाची कापणी केल्यानंतर साळू आपल्या विवराच्या बाहेर आली आणि तिने पाहिले तर तेथे गहूही नव्हता आणि पिकांच्या पेरांची सळसळही नव्हती. ती शेतातल्या खुंटांवर दगडा-सारखी गडबडा लोळली. तेवढ्यात एक प्रचंड राक्षस तिच्या दिशेने सरपटत येऊन लागला–धातूचा बागुर्डा. तो प्रचंड आवाज करीत होता आणि गर्जना करीत होता. त्याच्या मागच्या बाजूला नांगराचे

फाळ होते. त्याच्या पाठीमागे नांगरलेली फक्त काळी जमीन दिसत होती. साळू आपल्या विवरात बसली आणि स्तिमित नजरेने आजूबाजूला पाहू लागली. ती विचारात पडली: "हा अजस्र बागुर्डा त्यानी आणला तरी कुठून?" पण खरं म्हटलं तर तो ट्रॅक्टर होता.

## लेनिनची दोन चित्रे (वान्या)

माझी मोठी बहीण ओल्या ऑक्टोबर बालसंघात सामील झाली. तिच्याकडे एक छोटा लाल तारा आहे. आणि त्या छोट्या ताऱ्यावर लेनिनचे एक छोटे चित्र आहे. आता आमच्याकडे लेनिनची दोन चित्रे झाली आहेत. एक आहे भिंतीवर आणि एक आहे ओल्याच्या ताऱ्यावर. लेनिन कामगारांच्या सुखासाठी झगडले. पपा म्हणाले लेनिन अतिशय उत्तम विद्यार्थी होते. मी सुद्धा उत्तम अभ्यास करणार आहे. मी तरुण लेनिनवादी होईन.

## ओक वृक्षाचे फळ (झीना)

वारा वहात होता आणि ओक वृक्षाचे एक फळ झाडावरून खाली पडले. ते पिवळे आणि चकचकीत होते. तांब्यातूनच तयार केल्यासारखे ते वाटत होते. ते खाली पडले आणि विचार करू लागले: "त्या फांद्यांवर किती छान वाटत होते; पण आता मी जमिनीवर पडलो आहे. आणि इथून मला नदीही दिसत नाही की रानही दिसत नाही." त्याला खूप वाईट वाटले. ते ओक वृक्षाला म्हणाले: "ओक वृक्षा, मला तुझ्या फांद्यांवर घे ना!" पण ओक वृक्षाने उत्तर दिले: "मूर्ख फळा, बघ, मी सुद्धा जमिनीतूनच वर आलो. तुझी मुळे अधिक वेगाने खोलवर रोव आणि मोठा हो. मग तू एक बलवान ओक वृक्ष बनशील."

निसर्गात जे काही घडते त्याने मुलांचे चित्त फक्त थगारून जाते असे नव्हे. पृथ्वीवर शांतता असावी असेही त्याना वाटते. युद्ध पेटविण्याचा विचार करणाऱ्या या जगात काही शक्ती आहेत हे त्याना ठाऊक आहे. लोहभुजंगाची अद्‌भुत प्रतिमा योजून या काळयाकुट्ट शक्तींचे वर्णन करणारी ही पुढील गोष्ट पहा:

**लोहभुजंगाचा आम्ही कसा पाडाव केला** ( सिऱ्योझा )

दूर, दूर, सागराच्या पल्याड एका दलदलीत तो रहात असे. आमच्या लोकांचा तो द्वेष करी. त्याने अणु बॉम्ब बनविले. त्याने पुष्कळ, पुष्कळ अणु बॉम्ब बनविले, ते आपल्या पंखात ठेवले आणि तो वर उडाला. त्याला ते बॉम्ब सूर्यावर टाकावयाचे होते. आम्ही काळोखात मरावे म्हणून सूर्याचा प्रकाश विझवून टाकण्याचा त्याचा विचार होता. लोहभुजंगाशी लढण्यासाठी मी पाकोळयाना पाठविले. पाकोळयानी सूर्यप्रकाशाची एक एक ठिणगी आपल्या चोचीत पकडली आणि त्यानी भुजंगाला गाठले. त्यानी त्याच्या पंखांवर आगीचा वर्षाव केला. लोहभुजंग जलदलीत पडला आणि आपल्या बॉम्बसहित जळून गेला. पण सूर्य अजून बागडत आहे. आणि पाकोळया प्रमुदित होऊन आनंदाने गात आहेत.

मुलाची जगाकडे पहाण्याची एक असाधारण दृष्टी या गोष्टीत प्रतीत झाली आहे. पक्ष्यांच्या व प्राण्यांच्या सहभागाशिवाय सुष्ट-दुष्ट शक्तींतला झगडा मूल कल्पूच शकत नाही. चिमुकले प्रेमळ ससे आणि पाकोळया म्हणजे मुलाच्या कल्पनाशक्तीतून उगम पावलेल्या नुसत्याच कल्पित वस्तू नव्हेत — सत्प्रवृत्तीचे ते साक्षात मूर्तरूप आहे.

भोवतालच्या जगातून मुलाना प्रत्येक दिवशी काहीतरी नवा शोध लागत होता. प्रत्येक शोधातून एक गोष्ट साकार होत होती आणि त्या गोष्टीची निर्माती स्वतः मुलेच होती. आपल्या जन्मभूमीच्या सौंदर्याची भावाभूती घेण्यास परीकथांतील प्रतिमांची मुलाना मदत झाली होती. गोष्टीं-मुळे, अद्भुतकथांमुळे आणि सृजनशीलतेमुळे आपल्या घराचे सौंदर्य त्यांच्या मनात प्रतीत होत होते — स्वतःच्या मायभूमीविषयी वाटणाऱ्या प्रेमाचे ते उगमस्थान आहे. आपल्या मायभूमीच्या भव्यतेविषयीचे आणि महानतेविष-यीचे आकलन हळू हळू आकार घेत असते आणि त्याची उगमस्थाने सौंद-र्यातच असतात. लहान मुलांच्या शिक्षणाशी निगडित असलेल्या तरुण शिक्षकाना मला एक सल्ला द्यावयाचा आहे : या महान, बलशाली भूमी-विषयी — सोविएत संघाविषयी — तुमच्याकडून जेव्हा पहिले शब्द सांगितले जातील त्या क्षणासाठी मुलाची अत्यंत विचारपूर्वक, काळजीपूर्वक तयारी करा. हे शब्द अत्यंत स्फूर्तिदायक असले पाहिजेत, उदात्त भावनांच्या उत्तुं-

गतेचा त्याना स्पर्श झाला असला पाहिजे. (त्याला विद्वत्ताप्रचुर शब्दांचा भपकेबाज वर्षाव असे कोणाला म्हणावयाचे असल्यास खुशाल म्हणू द्या — तुमचे मन विशुद्ध आणि उच्च भावनानी परिप्लुत असेल तर त्या गोष्टीची तुम्ही बिलकुल फिकीर करू नका.) या शब्दांमुळे मुलांचे रक्त अधिक तेजाने उसळावे म्हणून ते शब्द रंगरूपस्पर्शाने जिवंत वाटले पाहिजेत, ते अगदी काळजीपूर्वक रुजवले गेले पाहिजेत आणि त्यांची पेरणी मुलांच्या ज्ञानक्षेत्रातील सौंदर्याच्या बीजानी केली पाहिजे.

मुलाला सौंदर्य जाणवू द्या आणि त्या सौंदर्याने त्याला मंत्रमुग्ध होऊ द्या. ज्या प्रतिमेत त्याची मायभूमी मूर्त झाली असेल त्या प्रतिमेचे त्याच्या हृदयात आणि स्मृतीत सदैव जतन होऊ द्या. सौंदर्य हा मानवतेचा, सौहार्द-पूर्ण भावभावनांचा आणि आत्मीय संबंधांचा आत्मा आहे. तोल्या, स्लावा, कोल्या, वित्या आणि साशाच्या हृदयाचे काठिण्य विरत असल्याचे मी जेव्हा पाहिले तेव्हा मला आनंद झाला. सौंदर्याच्या दर्शनाने मुद्रेवर झळकणारे स्मित, अंतर्यामी उद्भवणारी स्फूर्तीभावना आणि विस्मयभावना हाच मुलाच्या मनाचा प्रवास घडविणारा मार्ग म्हणून माझ्या नजरेसमोर उभा राहिला.

आनंद विद्यालयाच्या कार्याला कडक नियमांचा अडथळा नव्हता. मुलानी बाहेर किती वेळ घालवावा यावर तासामिनिटांचे बंधन नव्हते. मुलाना या शाळेचा कंटाळा येऊ नये, "चला, घरी जायची वेळ झाली" हे शब्द शिक्षकाकडून केव्हा उच्चारले जाताहेत त्या क्षणाच्या कंटाळवाण्या प्रतीक्षेने मुलांची मने ग्रासू नयेत ही सर्वात महत्त्वाची गोष्ट होती. आम्ही जे करीत होतो त्यात मुलाना अतिशय तीव्र स्वारस्य निर्माण झालेले असतानाच मी आमच्या शाळेचे काम संपविण्याचा प्रयत्न करीत असे. उद्याकडे त्यांचे उत्सुकतेने डोळे लागू द्या; येता दिवस नव्या आनंदाची क्षितिजे फुलवीत उजाडू द्या. सूर्याने पृथ्वीवर उधळलेल्या रूपेरी ठिणग्यानी त्यांची रात्रीची स्वप्ने उजळू द्या. एक दिवस खुल्या हवेतील शाळा एक किंवा दीड तास चाले, दुसऱ्या दिवशी चार तास चाले. त्या त्या दिवशी मुलाना मी किती आनंद देऊ शकतो यावर ते अवलंबून असे. मुलाला फक्त आनंद जाणवता कामा नये, सामूहिकाच्या जीवनात आपल्या सृजनशीलतेचा अंश ओतून प्रत्येक मुलाने तो निर्माण करणे हेही अत्यंत महत्त्वाचे होते.

त्या वर्षी शरत्काल सरत आला तरी हवेत ऊबदारपणा होता. हवा अजून कोरडी होती आणि ऑक्टोबरच्या मध्यापर्यंत झाडाची पानेही पिवळी पडली नव्हती. वेळोवेळी होणाऱ्या मेघगर्जनेमुळे जणू काही ग्रीष्माचेच पुन-

रागमन होत असल्यासारखे वाटत होते. सकाळी गवतावर दंवाचे थेंब ओथंबत होते. ही परिस्थिती माझ्या कामाच्या दृष्टीने अनुकूल ठरली. आम्ही अनेक वेळा **आमच्या नित्याच्या** टेकाडावर जात होतो आणि ढगांच्या दुनियेतून "प्रवास करीत होतो". या क्षणांचा मुलांच्या मनावर अविस्मरणीय ठसा उमटून राहिला. त्या शुभ्र, कापसासारख्या मऊदाट ढगांतून त्यांच्यासमोर नवलपूर्ण शोधांचे एक विश्व उभे रहात होते. ढगांच्या त्या झपाट्याने पालटणाऱ्या चित्रविचित्र आकारांत मुलाना कधी प्राण्यांची रूपे दिसत होती तर कधी परीकथेतील एखादा विक्राळ राक्षस त्यांच्यासमोर उभा रहात होता. पक्ष्यांचे अति वेगवान पंख लाभलेली मुलांची अद्‌भुतरम्य कल्पनाशक्ती मेघांच्याही पलिकडच्या विश्वात, निळया सागरावर आणि अरण्यात, खूप दूरवरच्या अज्ञात प्रदेशांत विहार करू लागली. आणि या विहारात मुलांच्या व्यक्तिगत विश्वाची कवाडे सताड खुली झाली. तो बघा, एक चित्रविचित्र ढग आकाशातून तरंगत चालला आहे.

"काय दिसत आहे मुलानो तुम्हाला त्या ढगात?"

"गवताची टोपी घातलेला एक म्हातारा मेंढपाळ आपल्या काठीवर वाकून उभा आहे," वाऱ्या म्हणाली. "तो बघा, त्याच्या बाजूला मेंढयांचा कळप आहे. गोल शिंगांचा एक मोठ्ठा मेंढा त्याच्यासमोर उभा आहे आणि त्याच्या पाठीमागे मेंढया आहेत... त्या मेंढपाळाजवळ एक थैली आहे आणि त्या थैलीतून काहीतरी बाहेर डोकावत आहे."

"ह्यँ, तो काही म्हातारा माणूस नाही काही," पावलोने टोला हाणला. "तो बर्फाचा माणूस आहे— आपण हिवाळयात बनवतो तसा. बघा, त्याच्या हातात एक झाडू आहे. आणि त्याच्या डोक्यावर दिसते ती काही गवताची टोपी नाही; ती बालदी आहे, बालदी."

"तो म्हातारा मेंढपाळही नाही आणि बर्फाचा माणूसही नाही. ती गवताची गंजी आहे" युरा म्हणाला. "आणि त्या गंजीच्या बाजूला लांब दांड्याचे खुरपे घेतलेले दोन मेंढपाळ आहेत. ती बघा, खाली एक गाडी उभी आहे आणि ते मेंढपाळ आपल्या खुरण्यानी ते गवत गाडीत उडवीत आहेत. आणि तो काही मेंढा नाही, ती गाडी आहे. आणि छोटी दिसतात ती शिंगेही नाहीत, ती कमान आहे..."

"तो एक खूप खूप मोठ्ठा ससा आहे. मी पाहिला होता तसा ससा माझ्या स्वप्नात. आणि मला तर गाडी कुठेच दिसत नाही; ती सशाची शेपटी आहे."

प्रत्येकाने काही ना काहीतरी कल्पना लढवावी असे मला वाटत होते. पण काही कारणामुळे कोल्या, स्लावा, तोल्या आणि मिशा अगदी गप्प होते. कोल्याच्या चर्येवरील ते तुच्छतेचे भाव पाहून माझ्या काळजाला घरे पडली. मुलांचे खेळ आपल्या प्रतिष्ठेला कमीपणा आणणारे आहेत असे मानणाऱ्या प्रौढांच्या नजरेत जे भाव असतात तसेच भाव त्या नजरेत होते. परंतु त्याच वेळी सौंदर्याच्या दर्शनाने कोल्याच्या नजरेत उमटलेली आनंदाची चमक मी यापूर्वीच हेरली होती... त्या काळी मी त्यासंबंधी फारसा विचार केला नव्हता ; पण मला जी भावना जाणवली त्यावरून मी याच निष्कर्षाला आलो होतो की, मूल आनंदाने वेडावून गेल्याशिवाय, त्याच्या नजरेत आनंदाचे खरेखुरे भाव फुलल्याशिवाय, बालसुलभ चेष्टामस्करीत ते ओढले गेल्याशिवाय त्याच्यावर माझा शैक्षणिक प्रभाव पडला आहे असे म्हणण्याचा मला काही अधिकार नाही. मुले ही मुलेच असली पाहिजेत... गोष्ट ऐकताना सुष्ट आणि दुष्ट यांमधील झगड्याचा त्याने अनुभव घेतला नाही, नजरेत कौतुकाची आनंदमिश्रित चमक फुलण्याऐवजी त्या जागी अलिप्ततेचे, निर्विकारतेचे भाव उमटले तर त्याचा अर्थ हाच होतो की मुलाचे हृदय दुभंगलेले आहे आणि ते तडे भरून काढण्यासाठी अपार कष्ट घ्यावे लागतील.

चित्रविचित्र आकाराचा एक ढग क्षितिजावर उमटला. उंच तटानी आणि टेहळणी मनोऱ्यानी वेष्टिलेल्या एखाद्या अतिसुंदर राजवाड्यासारखा तो दिसत होता. राजवाड्याच्या आकाररेषेत अस्पष्ट राहिलेल्या जागा कल्पनेतून भरून निघू लागल्या. जगाच्या अगदी दुसऱ्या टोकाला असलेली जादूची नगरी, दुष्ट बाबा यागा आणि एका सुंदर रमणीला वाचविणारा वीरपुरुष यांची गोष्ट सांगायला युराने आधीच सुरुवात केली होती. वित्या-च्या कल्पनेतून एक दुसरीच परीकथा अवतरली. खूप दूरवर कुठेतरी, आपल्या देशाच्या सरहद्दीपलिकडे, पर्वतांमध्ये एक भयंकर प्राणी रहात होता आणि तो युद्धाच्या योजना आखीत होता. त्या चिमुरड्या मुलाच्या अद्भुत कल्पनाशक्तीला पंख फुटले. जेथे काळ्याकुट्ट शक्ती वास करीत होत्या त्या गुहेच्या शिखरावर जादूच्या गालिच्यावर बसून त्याने एका क्षणात झेप घेतली. दुष्ट शक्तींचा नाश करून पृथ्वीवर शांतता बळकट करावी हाच त्याचा मानस होता.

त्यानंतर मी खूप दूरवरच्या उष्णकटिबंधीय प्रदेशांविषयी बोललो. तेथील न संपणारा उन्हाळा, चमत्कृतीपूर्ण तारकापुंज, निळाभोर महासागर, उंचच्या उंच तालवृक्ष यांविषयी मी त्याना सांगितले. येथे अद्भुत कल्पनाविश्व आणि

वास्तव यांची गुंफण झाली होती आणि दूरवरच्या जगाचे दर्शन घडविणाऱ्या एका छोटया खिडकीची फट मी उघडली होती. प्रदेश आणि तेथील लोक, समुद्र आणि महासागर, वनस्पती आणि प्राणीजगताची समृद्धता, तेथील निसर्गामध्ये घडणाऱ्या घटना यांविषयी मी बोलत होतो.

मग जेथे काही लोक दुसऱ्या लोकाना गुलाम करतात अशा जगाविषयी मी बोलू लागलो. कष्टकऱ्यांच्या, विशेषतः मुलांच्या दुःखदैन्याचे स्पष्ट चित्र मुलांसमोर उभे राहिले आणि जगामध्ये सुष्ट व दुष्ट यांमध्ये एक क्रूर झगडा चालू आहे हा भयचकित करणारा विचार आणि आपल्या देशाचे लोक माणसाच्या सुखासाठी, प्रतिष्ठेसाठी व स्वातंत्र्यासाठी झगडत आहेत ही जाणीव त्यांच्या मनात जागृत झाली. माणसाची माणसाकडून होणाऱ्या पिळवणुकीबद्दल मुलांच्या मनात तिटकारा निर्माण व्हावा, पिळवणुकीपासून मुक्त असलेला जगातला पहिला देश म्हणून आपला देश त्याना अपरिमित प्रिय वाटावा म्हणून अगदी लहान वयापासून माझ्या विद्यार्थ्यांच्या मनात सामाजिक दुष्टतेबद्दल मी चीड निर्माण करण्याचा प्रयत्न केला. दुष्टता ही काहीतरी अमूर्त गोष्ट नसून ती वास्तव आहे, सर्व प्रामाणिक लोकांचे शत्रुत्व करणारी अशी ती गोष्ट आहे ही कल्पना मुलांच्या मनात रुजविणे हे एक अत्यंत महत्त्वाचे शैक्षणिक कार्य आहे. जेथे संपत्तीवर भांडवलदारांच्या एका छोटया गटाचे नियंत्रण आहे आणि जेथे कष्टकऱ्याना जेमतेम आपला उदरनिर्वाह चालविता येतो अशा देशांविषयी मी मुलाना सांगितले. पण "साम्राज्यवाद" या शब्दाचा अधिक सखोल अर्थ मुलाना अमूर्त रूपात समजावून देण्याची मी घाई केली नाही. वेळ आली की ती त्यावर विचार करतील. सुस्पष्ट कल्पना आणि त्या भोवतालच्या भावच्छटा त्या विशिष्ट वयातच निर्णित होतात.

मुलाच्या सर्वांगपरिपूर्ण मानसिक विकासाच्या दृष्टीने, त्याच्या समृद्ध आंतरिक जीवनाच्या दृष्टीने, मुलांच्या सुखदुःखात सहभागी होणाऱ्या शिक्षकाकडून त्याना सांगण्यात येणाऱ्या गोष्टी ही एक अत्यावश्यक अट आहे. ज्या वातावरणात मुलांच्या अद्‌भुत कल्पनाविलासात्मक प्रतिमा जन्म घेतात अशा वातावरणात मुले गोष्टी ऐकतात व त्यातच त्या गोष्टींचे शैक्षणिक महत्त्व सामावले आहे—कधी आकाशात पहिले तारे लुकलुकू लागतात अशा सायंकाळच्या शांत वेळी, कधी शेकोटीभोवती एखाद्या रानात, कधी बाहेर शरदातल्या पाऊसधारा सुरू असताना किंवा थंड वारे आपले खिन्न, उदास गीत गात असताना बदामी कोळशाच्या मंद धगीच्या प्रकाशाभोवती एखाद्या

ऊबदार झोपडीत. गोष्टी अत्यंत स्पष्ट, चित्ररेखीव आणि आटोपशीर असल्या पाहिजेत. मुलांच्या मनावर माहितीचे ढीग रचना कामा नयेत किंवा त्यांच्या मनावर उमटविण्यात येणाऱ्या कल्पनांच्या भाराखाली त्याना गुदमरवून टाकता कामा नये; नाहीतर गोष्टींविषयीची त्यांची संवेदनक्षमता पूर्णतया बधिर होईल आणि त्यांच्या मनात कोणत्याही गोष्टीबद्दल स्वारस्य निर्माण करणे अशक्यप्राय बनेल.

मुलांच्या भावनांवर, कल्पनाशक्तीवर आणि अद्भुतरम्य कल्पनाविलासावर शिक्षकानी आपला प्रभाव पाडावा असा माझा त्याना सल्ला आहे. अमर्याद जगाचे दर्शन घडविणारी खिडकी **हळू हळू** उघडा. एकाच वेळी ती सताड उघडू नका–खिडकीचे अजस्र दरवाज्यात रूपांतर करू नका. आपला हेतू कितीही चांगला असला तरी त्यामुळे मुलाचे गोष्टीवरील लक्ष आपल्या बाजूने घरंगळत जाणाऱ्या एखाद्या चेंडूप्रमाणे बाजूला जाईल... एकाच वेळी अनेक गोष्टीनी मुलाना घेरून टाकल्यास मुलांचा मेंदू भिरभिरू लागेल आणि आशयतःच अपरिचित असलेल्या या गोष्टी म्हणजे पोकळ ध्वनिसंकेत ठरतील.

मुलांसाठी सभोवतालच्या जगाची खिडकी कशी उघडावी हे खुल्या हवेतील शाळेने मला शिकविले आणि सर्व शिक्षकाना ही कल्पना स्पष्ट करून सांगण्याचा मी प्रयत्न केला. मुलाला ज्ञानाच्या जलप्रलयात बुडवू नका, आपल्याला जे काही ठाऊक आहे ते सर्व मुलाना सांगण्याचा प्रयत्न करू नका असा मी त्याना सल्ला दिला–मुलांचे औत्सुक्य आणि जिज्ञासा ज्ञानाच्या हिमप्रपाताखाली गाडली जाण्याची शक्यता आहे. सभोवतालच्या जगातील एक किंवा दोन गोष्टी मुलांसमोर उलगडून दाखविण्यास तुम्ही समर्थ असले पाहिजे; त्यान्वये जीवनाचा एक छडा इंद्रधनुष्याच्या संपूर्ण सप्तरंगामध्ये त्यांच्यासमोर विलसायला सुरुवात होईल. काही गोष्टी अध्याहृत ठेवा; म्हणजे मुलाला जे सापडले आहे त्याकडे पुनःपुन्हा वळण्याची इच्छा त्याच्या मनात निर्माण होईल.

मानवी विचाराच्या सिद्धी अमर्याद आहेत. उदाहरणार्थ आपण अगणित पुस्तके लिहिली आहेत. त्यांपैकी एकाच पुस्तकाचे सौंदर्य, सुज्ञता आणि सघनता मुलाना उलगडूनन दाखवा; पण ती अशारीतीने उलगडून दाखवा की मुलाना कायमची वाचनाची गोडी लागेल आणि ग्रंथसागरात स्वतंत्रपणे अवगाहन करण्यास ती सिद्ध होतील. आपल्या भोवतालच्या जगातील आपल्या स्वतःच्या डोळ्यानी पाहिलेल्या प्रसंगांसंबंधी आणि घटनांसंबंधी मुलानी

सांगितलेल्या स्पष्ट, छोटचा, भावभरित गोष्टींना मी **जिवंत जागत्या शब्दाच्या उगमस्थानांकडील "प्रवास"** असे नाव दिले होते; या "प्रवासां"-संबंधीचे माझे विचार मी शिक्षकाना सांगितले. प्राथमिक वर्गातील शिक्षकानी माझे उदाहरण गिरविले आणि त्यानीही अशाच प्रकारच्या "**प्रवासा**"**ना** सुरुवात केली. वर्गाची दारे खुली करण्यात आली आणि मोकळ्या वाऱ्याच्या झुळुका अंगावर घेत मुलानी हिरवळीवर जाऊन बसायला सुरुवात केली. विशेषतः पहिल्या व दुसऱ्या इयत्तांचे वाचनाचे आणि अंकगणिताचे वर्ग अधिकाधिक वेळा मोकळ्या हवेत भरू लागले. खुल्या हवेतील पाठ म्हणजे पाठाना, पुस्तकाना किंवा शास्त्राला दिलेला नकार नव्हता. गोष्ट अगदी उलट होती—त्यामुळे पाठ अधिक समृद्ध बनले आणि पुस्तकाना व शास्त्राला सजीवता प्राप्त झाली.

पाठ संपल्यानंतर प्राथमिक वर्गाचे सर्व शिक्षक शिक्षकांच्या खोलीत एकत्र जमत आणि आपल्या भोवतालच्या जगाचे ज्ञान संपादन करण्याचे आणि निसर्गाच्या व समाजाच्या मूलतत्त्वांवर प्रभुत्व मिळविण्याचे मुलांचे कार्य हा एक व्यर्थ कंटाळवाणा खटाटोप न ठरता मुले हे ज्ञान कसे संपादन करू शकतील व हे प्रभुत्व कसे मिळवू शकतील या संबंधीच्या परस्पर सूचनांची देवाणघेवाण करीत. या सामुदायिक सृजनशील कार्याच्या अनुषंगाने एका नव्या कल्पनेचा उदय झाला: मुलाना कृषिश्रमांची आणि तांत्रिक व्यवसायांची ओळख करून द्यावयाची आणि हळू हळू उत्कृष्ट कामगारांशी त्यांचा परिचय करून द्यावयाचा. जित्याजागत्या शब्दांच्या उगमस्थानांकडील आपल्या विद्यार्थ्यांच्या "प्रवासां"ची स्वप्ने पहात असताना प्राथमिक वर्गांच्या शिक्षकानी, माझ्या सूचनेवरून, चार ऋतूंपैकी प्रत्येक ऋतूत विचाराच्या आणि भाषेच्या विकासाच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त ठरतील अशा नैसर्गिक घटनांचे व संबंधांचे एक ऋतुचक्र तयार केले.

## स्वप्नांचा सांदीकोपरा

खेड्याच्या पलिकडे, आमच्या शाळेपासून काही अंतरावरच एक मोठी घळ होती. तेथे झाडाझुडपांची पुष्कळ दाटी झाली होती. मुलांच्या दृष्टीने झाडाझुडपानी माजलेले ते एक घनदाट अरण्य होते आणि त्यात अनेक रहस्ये आणि अथांगता भरून राहिली होती. एके दिवशी घळीच्या एक अंगाला

मला गुहेचे एक प्रवेशद्वार आढळले. गुहेचा अंतर्भाग चांगला प्रशस्त होता आणि गुहेच्या भिंती मजबूत व कोरड्या होत्या. हा अगदी अचानक लागलेला शोध होता. बस्! मी ठरविले हा आमचा स्वप्नांचा सांदीकोपरा! मी मुलाना प्रथम गुहेत घेऊन गेलो तेव्हा त्याना झालेला आनंद केवळ अवर्णनीय होता. त्यानी खूप गोंगाट मांडला, गाणी म्हटली, एकमेकांच्या अंगावर आरोळ्या ठोकल्या आणि ती लपंडावही खेळली. त्याच दिवशी आम्ही सारी जमीन सुक्या गवतानी आच्छादून टाकली.

सुरुवातीला आम्ही त्या गुप्त सांदीकोपऱ्याचा फक्त आनंद लुटला, घरच्यासारखे स्थिरस्थावर झालो, सर्व काही छान, नीटनेटके सजवले आणि तेथे आरामात बसता येईल अशी सोय केली. भिंतीवर आम्ही छोटी छोटी चित्रे लावली, प्रवेशद्वार थोडे रुंद केले आणि तेथे एक टेबलही बनवले. मधून मधून गुहेत ऊबदारपणा यावा म्हणून एक छोटा चुलाणा तयार करण्यासही मुले आनंदाने तयार झाली.

चुलाण्यासाठी आम्ही एक जागा खोदून काढली आणि नळकांड्यासाठीही जागा तयार केली. साचलेली माती आम्ही बाहेर नेऊन टाकली आणि चिकणमाती आणि विटा घेऊन आलो. ते काम सोपे नव्हते, पण आमचे ते स्वप्न होते—गुहेसाठी चुलाणा तयार करणे. दोन आठवड्यात आम्ही चुलाणा बांधून काढला. प्रत्येकजण कामाला लागला होता; कोल्या, स्लावा आणि तोल्यालाही बाजूला रहाणे अशक्य झाले. आमचे सामूहिक जे जे करीत होते त्या सर्वांपासून ही मुले अलिप्त रहात होती आणि त्याचीच मला फार चिंता लागून राहिली होती. पण आता अधिकाधिक वेळा मला त्यांच्या डोळ्यात प्रकाशाची चमक दिसू लागली होती आणि उत्साहाची ही ज्योत दीर्घ काळपर्यंत तशीच तेवत होती. या उद्‌बोधक घटनेने साशा, ल्यूदा आणि वाल्यासारख्या कातर, लाजाळू आणि बावऱ्या वृत्तीच्या मुलानाही स्फूर्ती दिली. सामूहिकाची भावनात्मक मनोवस्था, आनंदाची आणि चैत-न्याची मनोवस्था ही मुलाना एकत्र करणारी, सामूहिक जे काही करीत आहे त्यात अगदी अलिप्त वृत्तीच्या मुलांच्या मनातही रस निर्माण करणारी एक महान आंतरिक शक्ती आहे याबद्दल माझी त्यामुळे अधिकाधिक खात्री पटत गेली.

शेवटी आम्ही चुलाणा पेटवला. सुक्या काटक्या मोठ्या मजेत धगधगू लागल्या. साऱ्या धरतीवर सायंकाळच्या छाया पसरू लागल्या होत्या; पण आमची ती लपण्याची छोटीशी जागा प्रकाशमान आणि ऊबदार होती.

घळीच्या उतारावरची झाडे आणि झुडपे आम्हाला तेथून दिसत होती आणि त्या रहस्यमय गर्द झाडाझुडपांतून परीकथेतील प्रतिमानी आमच्याभोवती फेर धरला. जणू काही त्या म्हणत होत्या, "आमच्याबद्दल एखादी गोष्ट सांगा ना!" झाडे आणि झुडपे संधिप्रकाशाच्या अर्ध-पारदर्शक विरल धुक्यात लपेटली होती; प्रथम ती निळसर वाटत होती; मग ती फिक्कट कोनफळी बनली. त्या विरल धुक्यात झाडाना अनपेक्षित आकार मिळू लागले.

मुलांच्या अद्भुतरम्य कल्पनाविलासाला अशा क्षणी अधीर पंख फुटतात आणि त्यातून गोष्टी आकार घेतात.

"घळीच्या उतारावर दाटलेली ती झाडे कशासारखी दिसतात?" असे मी विचारले खरे; पण तो प्रश्न फारसा मुलाना उद्देशून नव्हता; माझेच विचार जाणून घेण्याच्या दृष्टीने मी तो विचारला होता. कड्यावरून अत्यंत वेगाने उडी घेतलेल्या आणि आता लाव्हाच्या काळ्या कातळातून किंवा पाचूमधून कोरून काढलेल्या प्रतिमांत रूपांतर झालेल्या हिरव्या धबधब्या-सारखी ती झाडे मला वाटली. मला तेथे जे दिसले तेच मुलाना दिसेल काय हे जाणून घेण्यास मी उत्सुक होतो; कारण सायंकाळची वेळ ही मुळे कसा विचार करतात याचे निरीक्षण करण्याचीही वेळ असते.

मी पाहिले तेव्हा एका मुलाचे विचार अत्यंत स्वरपणे व वेगाने दौडत होते आणि त्यातून नव्या नव्या प्रतिमा निर्माण होत होत्या. दुसऱ्या एखाद्या मुलाचे विचार विशाल, खोल, सामर्थ्यशाली नदीसारखे होते. ती नदी संथ वहात होती, पण जेथे ती अधिक खोल होती तेथे ती रहस्यमय बनली होती. त्या नदीला प्रवाह होता की नाही ही गोष्ट स्पष्ट नव्हती; पण ती सामर्थ्यशाली आणि अदम्य होती. इतर मुलांच्या विचारांच्या वेगवान, हलक्या प्रवाहाना वळण देता येणे शक्य होते; पण या नदीला इतक्या सहजतेने वळण देणे किंवा तिला अडवून धरणे अशक्य होते; कारण ताबडतोब तिने बाहेर पडण्याचा मार्ग शोधून काढला असता. शूराला झाडां-च्या शेंड्यांत गाईंचा कळप दिसला. पण "त्या चरतात कुठे? तेथे गवत कुठे आहे?" असे सिऱ्योझाने विचारताच शूराचा विचार बदलला. नाही, त्या गाई नाहीत; रात्रीला विश्रांतीसाठी पृथ्वीवर उतरून आलेले ते ढग आहेत. युराच्या विचारानीही भरारी घेतली आणि तितक्याच त्वरेने त्याने आपलेही मत बदलले. पण मिशा आणि निना एकचित्त होऊन मुग्धपणे त्या झाडांकडे पहात होते. त्याना तेथे काय दिसत असेल? मुलांच्या कल्पनाशक्तीत उद्भवलेल्या अनेक प्रतिमांचा ओघ आमच्या बाजूने वहात

निघून गेला होता; पण मिशा आणि निना स्तब्ध होते, आणि स्लावाही. त्यांच्या डोक्यात काहीच विचार आला नसेल का? नाही, ते अशक्य वाटत होते. त्या सर्व मुलांत मिशा हा अगदी शांत मुलगा होता. घरी जायची वेळ झाली होती. इतक्यात मिशा म्हणाला, "आपल्या शिंगानी कातळाशी टक्कर देणारा तो संतप्त बैल आहे. तो त्या कातळाला हरवू शकत नाही, म्हणून तो थांबला आहे. बघा, बघा, आता बघा तो किती जोर करीत आहे, तो कडा उलथून टाकीत आहे..."

आणि एकाएकी आमच्या भोवती घिरट्या घालणाऱ्या सर्व प्रतिमा पार उडून गेल्या. त्या झाडांच्या राशीचे बैलाच्या नसानसात भरलेल्या क्रोधाशी खरोखरच आश्चर्यकारक साम्य असल्याचे आम्हाला दिसले. मुले घाईगर्दीने बोलू लागली: तो बघा, घळीच्या तळाशी बैलाने आपले पाय कसे घट्ट रोवले आहेत. त्याची मान पहा कशी वाकली आहे–त्याचे स्नायू कदाचित थरथरत असतील, आणि त्याची शिंगे पहा कशी जमिनीत रोवली आहेत...

मिशाने विचार कसा केला तो पहा! त्या क्षणाला, आलेच्या डोक्या-भोवती सुस्पष्ट सजीव प्रतिमा तरंगत असताना मिशाच्या विचार-प्रवाहाने आपली स्वतःची दिशा घेतली होती. त्याने आपल्या सहबंधूंचे शब्द अत्यंत लक्षपूर्वक ऐकले होते, पण कोणत्याही प्रतिमेने त्याला आकर्षित करून घेतले नव्हते. त्याचा कल्पनाविलास सर्वात सुस्पष्ट होता आणि त्याचे खुद्द या मातीशी नाते होते. त्या मुलाने असे काहीतरी पाहिले असावे की त्याच्या मनावर त्याचा ठसा उमटला असावा आणि तेच त्याने आपल्या नजरेत पकडले. आणि तरीही अशा अबोल, मंदगती मुलांची तासांच्या वेळी फार दारुण अवस्था होते. मुलाने प्रश्नाचे उत्तर तावडतोब द्यावे असे शिक्षकाला वाटत असते. मूल कसे विचार करते याला त्याच्या दृष्टीने महत्त्व नसते–शिक्ष-काला गुण द्यावयाचे असतात, म्हणून त्याला तात्काळ, तेथल्या तेथे उत्तर हवे असते. या संथ पण शक्तिमान नदीचा वेग वाढविणे अशक्यप्राय आहे हे त्या शिक्षकाच्या डोक्यातही येत नाही. त्या नदीला तिच्या प्रकृतिधर्मा-नुसार वाहू द्या. तिचे पाणी इष्टस्थळी जाऊन पोहोचल्याशिवाय रहाणार नाही; पण घाई करू नका. कृपा करून हताश होऊ नका; वाईट गुणांच्या भूर्ज फोकाने या शक्तिशाली नदीला झोडपू नका–असल्या कोणत्याही गोष्टीं-चा उपयोग होणार नाही.

...प्राणिविश्वातील विविध जातींशी तुलना करता जन्मापासून पूर्ण वाढीपर्यंतच्या मानवी शरीराच्या विकासाला लागणारा कालावधी हा सर्वात

मोठा असतो या वस्तुस्थितीचा प्रत्येक शिक्षकाने विचार केला पाहिजे. वीस किंवा त्याहून अधिक वर्षेपर्यंत मानवी शरीराची वाढ होत असते, त्याचा विकास होत असतो आणि ते मजबूत बनत असते. मानवी शरीराच्या विकासाला लागणारा कालावधी इतका प्रदीर्घ का हे निसर्गाचे एक मोठे गूढ आहे. जणू काही मज्जातंतू संस्थेच्या — मज्जापटलाच्या विकासासाठी, बळकटीसाठी आणि ज्ञानसंस्कारासाठी हा अवधी आवश्यक असावा. माणूस माणूस बनतो नेमक्या याच कारणासाठी तो **मज्जातंतूसंस्थेची विस्तारित शैशवावस्था, मेंदूची बाल्यावस्था** अनुभवीत असतो.

शरीरात कोटचवधी पेशी घेऊन मूल जन्माला येते; भोवतालच्या परिसराला या पेशी त्वरित प्रतिसाद देतात आणि काही विशिष्ट परिस्थितीत बौद्धिक कार्ये पार पडण्यास समर्थ बनतात. पेशी हा जाणिवेचा/ भौतिक पाया आहे. जन्मापासून पूर्ण वाढीपर्यंत, आणि पूर्ण वाढीपासून वार्धक्यापर्यंत मूल एकही नवी मज्जापेशी निर्माण करीत नाही. शैशवकाळात क्रियाशील-रित्या कार्य करण्यासाठी मेंदूला दररोज व्यायाम दिला पाहिजे आणि जिवंत निरीक्षण, अवलोकन आणि चिंतन हाच या व्यायामाचा पाया आहे.

भोवतालच्या जगातील कार्यकारणसंबंधाच्या अंतर्गर्भ्यापर्यंत शिरकाव करण्यास शिकण्यापूर्वी माणसाला बालपणात बौद्धिक व्यायामाचा एक विशिष्ट कालखंड आवश्यक असतो. प्रत्यक्ष नजरेला दिसणाऱ्या घटना आणि प्रसंग म्हणजेच हा बौद्धिक व्यायाम होय. मूल प्रथम एक जिवंत प्रतिमा पहाते आणि आपल्या संकल्पनांच्या परिकक्षेत ती प्रतिमा आत्मसात करून नंतर त्या प्रतिमेची ते कल्पना करते. एखादी जिवंत घटना पहाणे आणि आपल्या कल्पनेत तिची प्रतिमा निर्माण करणे या मनोव्यापारांच्या दोन पायऱ्यांत कोणताही अंतर्विरोध नाही. गोष्टीमधील ज्या अद्‌भुतरम्य प्रतिमा मूल पहाते आणि ज्यांचा ते विचार करते त्या वास्तवाइतक्याच ठसठशीत आणि स्पष्ट असतात. अद्‌भुतरम्य प्रतिमांची निर्मिती ही विचारांच्या सळसळत्या अंकुराना लाभणारी सर्वात उदात्त भूमी आहे.

बालपणीच्या काळात विचारप्रक्रिया ही भोवतालच्या जगातील जिवंत, सुस्पष्ट आणि चित्ररेखीव उदाहरणांशी शक्य तेवढ्या घनिष्टरित्या निगडित असली पाहिजे. सुरुवातीला कार्यकारणसंबंधांचा मुलाला घोर लावू नका. त्याला नुसत्या वस्तू बारकाईने न्याहाळू द्या आणि त्यातून काहीतरी नवे शोधून काढू द्या. संध्यासमयीच्या विरल धुक्यात लपेटलेल्या झाडांच्या राशीत छोटचा मिशाला क्रुद्ध बैलाची मूर्ती दिसली. हा केवळ अद्‌भुत कल्पना-

विलासाचा खेळ नाही; त्यात विचारक्रियेतील कलात्मक आणि काव्यात्मक अंशाचेही दर्शन घडते. दुसऱ्या मुलाला त्या झाडांत दुसरेच काहीतरी दिसले — दृष्टीच्या, कल्पनेच्या आणि विचारांच्या क्षेत्रात ज्या प्रतिमेने प्रवेश केला त्या प्रतिमेत त्याने आपली व्यक्तिगत अशी काहीतरी भर घातली. प्रत्येक मूल नुसतेच पहात नसते; ते चित्र काढीत असते, निर्मिती करीत असते आणि शब्द-स्वर रचनाही करीत असते. जगाचे मुलाला घडणारे दर्शन ही एक अनन्य अशी कलात्मक निर्मिती आहे. मुलाने एकाच वेळी पाहिलेल्या आणि निर्माण केलेल्या प्रतिमेला सुस्पष्ट अशा भावनात्मक छटा असतात. भोवतालच्या जगातील प्रतिमा पहाताना मुले आनंदाने बेहोष होतात आणि आपल्या कल्पनाशक्तीतून त्या प्रतिमांत ती आपली स्वतःची अशी काहीतरी भर घालतात. बोधनप्रक्रियेची भावनात्मक संपृक्तता मुलांच्या निर्मितीक्षमतेला आंतरिक पुरवठा करीत असते. भावनात्मक चैतन्याशिवाय मुलाच्या मज्जा-पेशींची वाढ ही अशक्यप्राय होय याबद्दल माझी ठाम खात्री पटली आहे. मुलाच्या मेंदूत चालणाऱ्या शारीरिक प्रक्रिया या भावनांशीच संबंधित असतात. ताण, उत्साह आणि कुतूहलाच्या क्षणी मज्जापटलातील पेशीना होणारा खाद्यपुरवठा वाढतो. या काळात मज्जापेशी प्रचंड शक्ती खर्च करतात; पण दुसऱ्या बाजूला शरीराकडूनही त्याना बरेच मिळत असते. अनेक वर्षे प्राथमिक वर्गातील विद्यार्थ्यांच्या बौद्धिक श्रमाचे अवलोकन केल्यानंतर मी अशा निष्कर्षाला आलो की, उत्कट भावनिक उत्साहाच्या काळात मुलाचे विचार विशेष सुस्पष्ट बनतात आणि स्मृतीकरणही अधिक तीव्रतेने घडते.

मुलांच्या अध्यापन प्रक्रियेवर या अवलोकनामुळे नवीन प्रकाश पडत आहे. प्राथमिक वर्गातील विद्यार्थ्यांचे विचार हे भावना व अनुभवापासून अविभाज्य असतात. अध्यापन प्रक्रियेतील, विशेषतः भोवतालच्या जगा-विषयीच्या बोधनप्रक्रियेतील भावनात्मक संपृक्तता ही मुलाच्या विचारप्रक्रियेच्या विकासाच्या नियमातून निर्माण झालेली गरज आहे.

...नवल म्हणजे ऊबदार शारदीय दिवस सुरू झाले होते. आम्ही एकाच जागी बसत नव्हतो. शेताशेतांतून आणि रायारायांतून आम्ही हिंडत होतो. केव्हातरी आम्ही स्वप्नांच्या सांदीकोपऱ्याला भेट देत होतो. खेड्या-पासून दोन किलोमीटरवर मुलाना एक छोटी टेकडी आढळली. खेड्याच्या हिरव्यागार मळ्यांचे, दूरवरच्या शेतांचे, दफनभूमीच्या गर्द निळ्या टेकांडांचे आणि लागवड केलेल्या अरण्यांचे तेथून अतिशय सुंदर दृश्य दिसत होते. हवा आश्चर्यजनकरित्या स्वच्छ आणि पारदर्शक होती. जमिनीवर कोळ्यांची

रुपेरी जाळी तरंगत होती. आकाशात वरचेवर पक्ष्यांचे थवे दिसू लागले होते. आमच्या टेकडीपासून जवळच एक वनराई पसरली होती आणि तिच्या कडेने रासबेरींची झुडपे दाटली होती. बेरी फळांचे लाल चमकदार मोती आम्हाला खूप आवडले होते. बेरींच्या फांद्याफांद्यांवर कोळयांची रुपेरी जाळी लोंबकळत होती. प्रत्येक छोटया झुडपाचा आकार आम्ही मनात साठवून ठेवीत होतो; खेड्याच्या कडेला असलेल्या मळयांचे व पॉम्लर वृक्षांच्या रांगाचे आम्ही बारकाईने निरीक्षण करीत होतो. प्रत्येक दिवशी मुलाना काही ना काही तरी नवीन शोध लागत होते. बघता बघता त्यांच्या अगदी नजरेसमोर हिरवी वनराई किरमिजी रंगात न्हाऊन निघत होती; पाना-पानांवर नवलपूर्ण आणि समृद्ध अशा विविधरंगी वसनांचा साज चढत होता. या शोधांमुळे मुलांच्या मनात आनंदाची कारंजी फुलली.

जिवंत शब्दाची आणि सृजनशील विचारक्रियेची उगमस्थाने इतकी समृद्ध आणि अक्षयप्रवाही होती की प्रत्येक तासाला आम्ही फक्त एक शोध लावू शकलो असतो तर हे शोध लावण्याचे काम आम्हाला वर्षानुवर्षे पुरले असते. आमच्यासमोर बेरींच्या लाल चमकदार झुबक्यांमध्ये एका बेरीपासून दुसऱ्या बेरीपर्यंत पसरलेली कोळयांची रुपेरी जाळी दिसत होती आणि सकाळच्या दंवबिंदूनी ती थरथरत होती. ते बिंदू पिवळया रंगाचे होते. आम्ही मुग्ध होऊन त्या झुडपांपाशी उभे होतो आणि आम्हाला एक विस्मयजनक गोष्ट दिसली: ते बिंदू जणू जिवंत असल्यासारखे जाळयांच्या टोकाकडून मध्यापर्यंत सरकत येत होते आणि जाळयाना तेथे एक झोल येत होता. ते बिंदू एकमेकांत मिसळून जात होते, परंतु त्यांचा आकार वाढत नव्हता; आणि नंतर ते जमिनीवर पडत होते. आम्ही आमच्या अवलोकनात अगदी दंग होऊन गेलो होतो; आम्हाला असे दिसले की ते दंवबिंदू बघता बघता विरून जात होते. आमच्या नजरेसमोर त्यांचा आकार कमी कमी होत होता आणि नंतर ते पूर्णतया अंतर्धान पावत होते.

"सूर्य चिमुकले दंवबिंदू प्राशन करीत आहे," लारिसा कुजबुजली. तिच्या कल्पनाशक्तीतून निर्माण झालेल्या प्रतिमेने मुलांचे लक्ष वेधून घेतले आणि एका नव्या गोष्टीने जन्म घेतला. येथे, बेरी झुडपांच्या शेजारी, जिवंत शब्दाच्या उगमस्थानाशेजारी, मुलांच्या समोर एक नवा, सुंदर झरा खळखळू लागला, कदाचित ती योगायोगाची गोष्ट असेल, पण आज ना उद्या ती घडणारच होती: लारिसाच्या असे लक्षात आले की "रोसिन्की' (दंवबिंदू), "पौतिन्की" (कोळयांची जाळी) आणि "बूसिन्की" (मोती)

या शब्दांच्या अंत्याक्षरांचा उच्चार एकच आहे. या विलक्षण योगायोगाने मुलांची मने उजळून गेली. आपल्या वडील भावाबहिणींकडून त्यानी पुस्तकांतल्या कविता यापूर्वी ऐकल्या होत्या यात शंका नाही; पण येथे जिवंत शब्दातून, भोवताली पसरलेल्या जगातून, कवितेने जन्म घेतला होता:

रात्र दाटता भंवती पडती "रोसिन्की" (दंवबिंदू)
दंवात भिजती छान रुपेरी "पौतिन्की" (कोळयांची जाळी)

लारिसा म्हणाली आणि तिचे डोळे आनंदाने चमकू लागले. सर्वजण अगदी स्तब्ध होते; पण त्या शब्दांच्या सामर्थ्याने निर्माण झालेल्या स्तिमित भावप्रक्षोभातून प्रत्येक मुलाचे विचार अग्निबाणासारखे वर उसळलेले मला दिसत होते.

"आणिक झाली कंपित पिवळी "बूसिन्की" (मोती)", युराने तो धागा पुढे नेला.

तुम्ही जेव्हा अस्तित्वाच्या उद्‌गमांशी निकटत्व साधता, जेव्हा शब्द म्हणजे केवळ वस्तुनामे उरत नाहीत तर तो फुलांचा परिमल असतो, मातीचा सुगंध असतो, तुमच्या जन्मगावच्या स्टेप प्रदेशाचे आणि अरण्यांचे ते संगीत असते, तुमच्या व्यक्तिगत भावना आणि अनुभव असतात त्यावेळी जे काही घडते त्याचेच हे प्रत्यंतर आहे.

शिक्षणाच्या नियमांनुसार मुलानी कविता पुढे चालू करावी असे मी सुचवायला हवे होते; पण हे नियम माझ्या डोक्यातून पार उडून गेले. मुलांच्या सृजनशीलतेच्या प्रवाहात मीही वहात गेलो आणि माझ्या तोंडातून शब्द बाहेर पडले:

प्राशन केली रविराजाने "रोसिन्की"
आणि क्षाळिली छान रुपेरी "पौतिन्की"
हसू लागली लाल किरमिजी "बूसिन्की"...

आम्ही जोरात ओरडलो आणि ती कविता पुनःपुन्हा म्हणत झुडपाभोवती फेर धरला. आमच्या भोवतालच्या जगात स्फूर्तीच्या या उद्रेकाचा उगम होता. या उद्रेकाची कहाणी शक्य तितक्या लवकर मला इतर शिक्षकाना सांगावयाची होती. विचारक्रियेतील पहिला पाठ वर्गात नव्हे, फळ्यासमोर नव्हे तर निसर्गाच्या सान्निध्यात दिला पाहिजे असा मला त्याना सल्ला द्यावयाचा होता. खराखुरा विचार हा नेहमीच थरथरत्या भावनेने

परिप्लुत असतो; मुलाला शब्दाचा सुगंध केवळ जाणवला तरी त्याच्या हृदयाला स्फूर्तीचा स्पर्श होईल. शेते तुडवा, उद्यानात जा, विचाराच्या उगमस्रोतातून जलप्राशन करा, आणि हे जिवंत पाणी तुमच्या विद्यार्थ्यांतून सुज्ञ संशोधक, चौकस, जिज्ञासू लोक आणि कवी निर्माण करील. काव्यात्मक, भावनात्मक-सौंदर्यात्मक उद्रेकांशिवाय मुलाचे बौद्धिक सामर्थ्य पूर्णतया विकसित करणे अशक्यप्राय आहे याची मला एकदा नाही हजारदा खात्री पटली आहे. मुलाच्या विचारांचे स्वरूपच असे आहे की काव्यात्मक निर्मितीक्षमता ही त्याची गरज बनते. सूर्य आणि फूल जैवसंबंधाने परस्परांशी जितके निगडित आहेत तितकेच सौंदर्य आणि जिवंत विचार परस्परांशी निगडित आहेत. सौंदर्यदर्शनाने काव्यात्मक निर्मितीक्षमतेला सुरुवात होते. निसर्गसौंदर्यामुळे बोधनप्रक्रियेला धार चढते, निर्मितीक्षम विचाराना जागृती येते आणि शब्दाला व्यक्तिगत अनुभवाची जोड मिळते. बालपणाच्या काळात आपल्या मायबोलीतले इतके शब्द माणूस कसे आत्मसात करतो? कारण याच काळात सभोवतालच्या जगातल्या सौंदर्याचे पहिले शोध लागतात; कारण याच काळात प्रत्येक शब्दातील कल्पनाच केवळ दृश्यमान होते असे नाही तर सौंदर्याच्या नाजूक छटाही दृग्गोचर होतात.

## निसर्ग – सुदृढ आरोग्याची गंगोत्री

नापास होणाऱ्या किंवा मागे पडणाऱ्या विद्यार्थ्यांपैकी ८५ टक्के विद्यार्थ्यांच्या बाबतीत अनारोग्य, काही ना काही प्रकारचे प्रकृतीअस्वास्थ्य किंवा आजारपण ही कारणे असतात हे आपण अनुभवातून शिकलो आहोत. अशा प्रकारचे आजारपण बहुधा लक्षात येत नाही; पण पालक, डॉक्टर आणि शिक्षक यांच्या संयुक्त प्रयत्नाने ते बरे करता येणे शक्य असते. हृदय-रक्ताभिसरणक्रिया, श्वसनक्रिया, पचनक्रिया यांसंबंधीची आतल्या आत दडलेली किरकोळ दुखणी आणि विकास हे अनेक वेळा आजारपण म्हणून वाटत नाही; नेहमीच्या सुरळीत प्रकृतिमानातली ती एक तफावत असल्यासारखे वाटते आणि मुलांचे नाचणे-बागडणे, उल्हास-आनंद यांच्या आवरणाखाली त्या गोष्टी झाकूनही जाऊ शकतात. मुलाची शिक्षणातील तथाकथित मंदगती ही मज्जापटलातील पेशींच्या कार्यातील कोणत्यातरी शारीरिक बदलांशी किंवा व्यत्ययाशी संबंधित नसून एखाद्या सर्वसाधारण किरकोळ

दुखण्याची ती परिणती असते हे अनेक वर्षांच्या अवलोकनानंतर आढळून आले आहे. आणि हे किरकोळ दुखणे स्वत: त्या मुलाच्याही कधी लक्षात येत नाही. काही मुलांची चर्या सतत आजारी असलेल्या माणसासारखी फिक्कट, विवर्ण दिसते. त्याना भूकही नीट लागत नाही. भूक सुधारण्यासाठी थोडे जरी प्रयत्न केले तरी त्याची ताबडतोब प्रतिक्रिया येते ; साऱ्या शरीरभर डाग उमटतात. अत्यंत बारकाईने केलेल्या तपासणीतूनही काही निष्पन्न होत नाही : सर्व काही ठाकठीक असल्याचे दिसते. अनेकांच्या बाबतीत असा अनुभव येतो की तासन्तास घरातल्या घरात बसून राहिल्यामुळे जीवनसंवर्धक रासायनिक व शारीरिक प्रक्रियेत आलेल्या काही स्वरूपाच्या व्यत्ययाचा यात संबंध आहे. अशा वेळी, मूल आपली एकाग्रताशक्ती आणि बौद्धिक श्रम करण्याची क्षमता गमावून बसते. शरीराच्या जलद वाढीच्या काळात आणि पौगंडावस्थेच्या काळात अशा प्रकारच्या व्याधींनी पीडित झालेल्या मुलांची संख्या वाढते.

अशा मुलांच्या बाबतीत कामाच्या व खेळाच्या दिनचर्येतील बदल हाच एक आमूलाग्र उपाय आहे. हा उपाय म्हणजे : मोकळ्या हवेत अधिक वेळ घालविणे, खिडकी उघडी टाकून झोपणे, लवकर निजणे आणि लवकर उठणे आणि उत्तम आहार.

काही मुले प्रकृतीने सुदृढ वाटतात, परंतु अधिक बारकाईने तपासणी केल्यास आतल्या आत त्याना काही आजार असावा याची त्यांच्या कामावरून साक्ष पटते. शिक्षक जेव्हा तासाचे प्रत्येक मिनिट आत्यंतिक बौद्धिक श्रमाच्या वेठीला बांधण्याचा प्रयत्न करतात तेव्हा मुलांमध्ये आतल्या आत दडलेले हे आजार व किरकोळ व्याधी विशेषत्वाने प्रत्ययास येतात. "एकही मिनिट न दवडण्याच्या या प्रयत्नांचा" काही मुलांवर त्यांच्या ताकदीपलिकडे ताण पडतो. अत्यंत सुदृढ प्रकृतीच्या मुलांच्या दृष्टीनेही हा "झपाट्याचा" वेग हानिकारक असतो यात संदेह नाही. आत्यंतिक मानसिक ताणामुळे मुलांचे डोळे सुस्तावतात, त्यांच्या चेहऱ्यावरचे भाव मंदावतात आणि त्यांच्या हालचाली निर्जीव बनतात. या क्षणी मूल कोणत्याही कामाला योग्य नसते ; त्याला फक्त आवश्यकता असते ती ताज्या, मोकळ्या हवेची. पण शिक्षकाने त्याला कह्यात ठेवलेले असते आणि तो अधिकाधिक वेगाने गाडी हाणीत असतो.

आनंद विद्यालय सुरू झाल्यानंतरच्या पहिल्या आठवड्यात मी मुलांच्या आरोग्याकडे विशेष बारकाईने लक्ष दिले. ती सर्व मुले ग्रामीण भागात

वाढली होती, निसर्गाच्या कुशीत वाढली होती, तरीही त्यांच्यापैकी काही मुले फिक्कट किंवा दुबळी होती. आणि वलोद्या, कात्या आणि सान्या तर, म्हणतात त्याप्रमाणे, हाडांचे सापळे होते. ते अतिशय कृश होते, अशक्त होते. बहुतेक सर्व मुलाना घरी चांगला आहार मिळत होता; काही मुलांच्या बाबतीत अशक्तपणाचे कारण हे होते की ती ऊष्णतागृहातल्या झाडांसारखी रहात होती—वाऱ्याचा किंचितसाही झोत त्याना लागू नये म्हणून त्यांची आई त्याना जपत होती. आनंद विद्यालयात आल्यानंतर पहिले काही दिवस ही मुले लवकर थकून जात. त्याना एक किलोमीटरही चालवत नसे. त्याना नीट भूक लागत नाही अशी त्यांच्या आयांची तक्रार असे.

मुलांचे थंडीवाऱ्यापासून तुम्ही जेवढे संरक्षण करायचा प्रयत्न कराल तेवढी ती अशक्त होतील असे मी त्यांच्या पालकाना पटवून दिले. माझ्या आग्रहाखातर उन्हाच्या दिवसांत मुलाना अनवाणी शाळेत येऊ देण्यास ते कबूल झाले—मुले त्यामुळे खूप आनंदली. एके दिवशी उन्हाळयातल्या सरीने आम्हाला शेतात गाठले. रस्त्यात साचलेली पाण्याची डबकी तुडवीत मुले घरी गेली. मुले आजारी पडतील अशी पालकाना भीती वाटत होती; पण कोणीही आजारी पडले नाही. मुलाना कपडयांत गुदमरवून टाकू नका, "काही घडलेच तर" जादा स्वेटर आणि जॅकिटे बाजूला काढून ठेवा असे मी पालकाना मोठया कष्टाने पटवून दिले. शरद ऋतूत, वसंत ऋतूत आणि उन्हाळयाच्या दिवसांत मुलानी सर्व वेळ बाहेरच असले पाहिजे असा आमचा नियम होता. आनंद विद्यालयाचे पहिले तीन-चार आठवडे मुले दिवसाला दोन किंवा तीन किलोमीटर चालत असत; दुसऱ्या महिन्याला चार ते पाच आणि तिसऱ्या महिन्याला सहा किलोमीटर चालत असत. आणि हे सर्व फिरणे शेतांतून किंवा कुरणांतून, रायांमध्ये आणि रानांमध्ये होत असे. दिवसाला किती अंतर चालून झाले हे कोणाच्या लक्षात येत नसे कारण अमुकच किलोमीटर चालावयाचे असे निश्चित लक्ष्य मुलानी ठरविले नव्हते. त्यांच्या हालचाली, त्यांचे फिरणे हे अन्य उद्दिष्टांसाठी वापरण्यात येणारे साधन होते. मुलाला निरनिराळया ठिकाणी जायला आवडते कारण आपण जगाचा शोध लावीत आहोत असे त्याला वाटत असते. मुले थकूनभागून घरी जात, पण ती अगदी आनंदात व खुषीत असत. शिणल्याशिवाय उत्तम आरोग्य ही अशक्य गोष्ट आहे. खूप मेहनत केल्यानंतर मूल जेव्हा विश्रांती घेते तेव्हा आपल्या जीवनदायी स्रोतांनिशी उत्तम आरोग्याचा ओघ मुलाच्या शरीरातून वाहू लागते.

ताज्या आणि मोकळ्या हवेत अनेक किलोमीटर चालल्यानंतर मुले घरी परतत. त्यांच्या पालकांच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे त्यावेळी ती "अस्वलासारखी भुकेने वखवखलेली" असत. आम्ही जंगलात गेलो तेव्हा मुलाना मी पाव, कांदे, मीठ, पाणी आणि काही कच्चे बटाटे बरोबर घेऊन यावयास सांगितले. प्रथम पालक जरा साशंक होते. मुले घरी पौष्टिक पदार्थ खाण्यास नकार देत होती. त्यामुळे हे असले पदार्थ मुले खातील की नाही याबद्दल त्याना शंका होती. परंतु अरण्यामध्ये हाच पाव, कांदे आणि बटाटे मुलाना सर्वात चवदार अन्न वाटले. मुलांची भूक एवढी वाढली की घरी त्यांच्यासमोर करण्यात येणारा सुपाचा किंवा बोर्शचा कटवा ती आनंदाने फस्त करू लागली. अगदी महिन्याभरातच सर्वात फिक्कट असलेल्या मुलांच्या गालावरही लाली चढली आणि मुले किती छान जेवतात हे पाहून त्यांच्या आयांच्या कौतुकाला पारावार उरला नाही. आता अमुकच हवे, तमुकच नको अशी मुलांची कुरकुर राहिली नाही. तुम्ही बशीत काहीही वाढा मुले ते खात होती.

शरीराला सतत हालचाल असणे ही शारीरिक व्यायामाची एक महत्त्वाची अट आहे. मुलाना धावायला आणि खेळायला आवडते. आम्ही मुलांसाठी एक क्रीडांगण बनविले. मोकळ्या मैदानातील खेळाना आणि मनोरंजनाला जे जे आवश्यक असते ते ते सर्व तेथे होते. परंतु मला अधिक काहीतरी हवे होते. मला एक फिरते चक्र बनवायचे होते. मला त्यांचे चैतन्यपूर्ण खेळ अद्भुतरम्य कल्पनाविलासानी पुष्ट झालेल्या परीकथांशी निगडित करावयाचे होते. कुबडा घोडा, हत्ती, भुरा लांडगा, लबाड कोल्हा यांच्या फिरत्या चक्राच्या लाकडी वर्तुळावर उभ्या असलेल्या आकृत्या माझ्या मनःचक्षूंसमोर केव्हाच तरळू लागल्या होत्या. त्या छोटचा कुबडचा घोडचावर किंवा भुऱ्या लांडग्यावर मुले नुसतीच बसणार नव्हती तर त्याचा चित्तथरारक अनुभवही घेणार होती. हे केवळ एक स्वप्न होते; पण माझा ठाम विश्वास होता की सहा महिन्यांच्या किंवा वर्षाच्या काळात ही गोष्ट साध्य होऊ शकेल. फिरत्या चक्रासाठी मी सामानसुमान आणि त्याला लागणारी मांडणी गोळा केली. मुलाना अधिक काळ बाहेर रहाता येईल आणि त्याना ताजी हवा मिळेल या दृष्टीने हिवाळ्यात मुलांची कशी तयारी करावयाची याचा मी विचार करत होतो.

छोटचा शाळकरी मुलांच्या शारीरिक वाढीचे मी अनेक वर्षे जे निरीक्षण केले त्यातून माझी खात्री झाली आहे की, पौष्टिक, सकस आहार ही एक

महत्त्वाची बाब आहे. शरीर बळकट करण्यासाठी, आजाराना प्रतिबंध घालण्यासाठी आणि जीवनसंवर्धक रासायनिक व शारीरिक प्रक्रियेसाठी आवश्यक असलेली द्रव्ये मुलाना पुरेशा प्रमाणात मिळत नव्हती. मध हा पदार्थ फक्त आठ कुटुंबांकडे होता आणि लाक्षणिक अर्थाने मध हा बशीत ओतलेला सूर्यप्रकाश आहे. वाढत्या वयाच्या मुलांसाठी मध ही एक आवश्यक गोष्ट आहे हे मी पालकाना पटवून दिले. सप्टेंबरच्या अखेरीपर्यंत तेरा पालकानी मधाची पोळी विकत घेतली. वसंतऋतूपर्यंत तेवीस कुटुंबानी मधु-मक्षिकापालन सुरू केले.

शरदऋतूत रासबेरी, प्लम बेरी आणि जीवनसत्त्वानी समृद्ध असलेल्या इतर फळांपासून मोरंबा बनविण्याचा मी माताना सल्ला दिला. भरपूर फळझाडे, विशेषत: सफरचंदाची झाडे लावण्याविषयी मी पालकांशी बोललो. हिवाळाभर पुरतील इतकी ताजी फळे मिळण्यासाठी पुरेशा झाडांची आवश्यकता होती आणि ग्रामीण भागात ती सोय करणे अतिशय सोपे असते—फक्त त्यासाठी थोडी मेहनत घ्यावी लागते इतकेच.

गहू, राय, बार्ली, बकव्हीट आणि कुरणातील गवत या वनस्पतीद्रव्यानी संपृक्त अशी ताजी हवा म्हणजे उत्तम आरोग्य. ज्याच्यापासून पाव बन-वितात त्या धान्याच्या सुगंधाने परिप्लुत अशी ताजी हवा श्वासोच्छ्वासावाटे फुफ्फुसात भरून घेण्यासाठी मी मुलाना अनेक वेळा शेतांवर आणि कुरणांत घेऊन जात असे. मुलांच्या शयनगृहाच्या खिडकीखाली पुष्कळशी सुक्या फळांची झाडे लावावीत असा मी पालकाना सल्ला दिला. त्यामुळे अनेक रोगट सूक्ष्म जंतूंचा नाश करणारी वनस्पतीद्रव्ये हवेत पसरतात. सुक्या फळांचा वास अपायकारक कीटकाना सहन होत नाही. जेथे सुकी फळे आहेत तेथे माशा व डास नसतात. उन्हाळयात आवारामध्ये जलधारांची सोय करावी असेही मी प्रत्येक कुटुंबाला आग्रहाने सांगितले.

अनेक मुलांची दृष्टी अधू का असते याचे मला अनेक वर्षे कोडे पडले होते. तिसऱ्या इयत्तेतील अनेक मुले चष्मा का लावतात? अनेक लहान मुलांचे निरीक्षण केल्यानंतर मी या निष्कर्षाला आलो की वाचनामुळे डोळयावर पडणारा ताण हे त्याचे कारण नसते तर जीवनसत्त्वांची कमतरता असलेला आहार आणि अपुरा शारीरिक व्यायाम हे त्याचे कारण असते; त्यामुळे मुले सर्दीला अधिक बळी पडतात. बालपणातल्या अनेक आजारांचा दृष्टीवर हानिकारक परिणाम होतो. सकस अन्न, झोप आणि शारीरिक व्यायाम यांमुळे मुलाचे आजारापासून रक्षण होते आणि सभोवतालच्या जगात त्याला सुखाचा आणि आनंदाचा लाभ होतो.

मुलांच्या अनेक वर्षांच्या निरीक्षणातून मला एक धक्कादायक गोष्ट आढळून आली : वसंतऋतूत, मार्चच्या प्रारंभापासून, मुलांची प्रकृती दुबळी बनू लागते. मूल थकून गेल्यासारखे वाटते; सर्दीला प्रतिकार करण्याची त्याच्या शरीरातली शक्ती क्षीण होते आणि त्याची काम करण्याची ताकद रोडावते. वासंतिक महिन्यांत दृष्टीची अधुता विशेष लक्षात येते.

डॉक्टरांचे आणि मानसशास्त्रज्ञांचे याबाबतचे स्पष्टीकरण असे की, शरीराच्या विविध यंत्रणेतील क्रियाप्रतिक्रियेच्या लयीत होणाऱ्या आत्यंतिक बदलांमुळे हे असे घडते. त्याचे कारण म्हणजे सौर किरणोत्सर्गात एकदम घट झाल्यामुळे आणि मज्जातंतूसंस्थेला थकवा आणणाऱ्या दीर्घकालीन बौद्धिक चलनवलनामुळे हिंवाळयाच्या अखेरीला शरीराचा जीवनसत्त्वांचा पुरवठा संपुष्टात येतो.

या घटकांमुळे निर्माण होणारा परिणाम कसा कमी करावा याचा मी विचार केला. विशेषतः वासंतिक महिन्यांत मुलाना जीवनसत्त्वयुक्त फळांचा आणि भाज्यांचा पुरवठा करण्याकडे पालक अधिकाधिक लक्ष देऊ लागले. हिंवाळयात आणि वसंतात स्वच्छ, लखलखीत ऊन पडले असता तो दिवस मोकळया हवेत फिरण्यासाठी कारणी लावण्याचा आम्ही प्रयत्न केला. मुलांच्या बुद्धीवर पडणारा ताण वासंतिक महिन्यांत कमी व्हावा हाच माझा विचार होता. विचारक्रियेमध्ये विविधता घडवून आणल्यास हे साध्य होऊ शकते. विचारप्रक्रिया वर्गाच्या चार भिंतींआड घडण्याऐवजी मोकळया हवेत घडावी आणि शारीरिक हालचीलींशी तिचा संबंध असावा असे मला वाटत होते. हळूहळू वासंतिक महिन्यांचा तो एक नियमच बनला.

युद्धानंतरच्या पहिल्या काही वर्षांत अनेक मुलांमध्ये मनोवैफल्याची प्रवृत्ती निर्माण झाली होती. माझ्या काही विद्यार्थ्यांना, विशेषतः तोल्या, कोल्या, स्लावा आणि फेद्याला मधून मधून औदासिन्याचे झटके येत आणि जीवनापासून त्यांची एक प्रकारे फारकत झाल्यासारखी वाटे. त्यांच्या कातरपणाची, विचलित मनाची आणि काळजाला यातना देणाऱ्या बुजरेपणाची परिणती मनोवैफल्यात होऊ नये म्हणून त्यावर मात करण्याचा मी प्रयत्न केला. सामूहिकाच्या जीवनातून मुलाना आनंद कसा मिळू शकेल यासंबंधी मी अनेक वेळा सल्लामसलत करीत असे आणि प्राथमिक वर्गातील आम्ही शिक्षक अशा निष्कर्षाप्रत पोहोचलो की, आपल्या कुटुंबातील ज्या दुर्घटना, दुःखे आणि संघर्ष मूल पहात असते त्यापासून त्यांचे निवारण करणे हे विशेष महत्त्वाचे आहे. मुलाचे हळवे मन अनवधानतेने अधिक दुखावले

जाऊ नये म्हणून प्रत्येक मुलाच्या अंतर्मनातील चलनवलन, शाळेत येताना त्याने स्वत:बरोबर आणलेल्या आंतरिक समस्या **शोधून काढण्याचा** शिक्षक प्रयत्न करीत असत. मुलाच्या आंतरिक जीवनातील ज्या गोष्टींकडे खास लक्ष देण्याची आवश्यकता निर्माण होत होती त्या गोष्टींची आम्ही आमच्या बैठकींमध्ये चर्चा करीत असू. या बैठकीना आम्ही "मानसशास्त्रीय परि-संवाद" असे नाव दिले होते. मुलांची दु:खे नाहीशी करणे हे शाळा-सामू-हिकाचे काम होते.

जी मुले दु:खानुभवात आधीच पोळून निघाली होती त्यांच्याकडे खास लक्ष देणे आवश्यक होते. कोल्या, साशा, तोल्या, पेत्रिक आणि स्लावा यांच्या भावनांवर पडलेल्या ताणाला तर सीमा नव्हती. त्यांच्यापैकी कोणा-च्याही मनाला स्पर्श करताना आम्हाला अतिशय जपून वागावे लागत होते; कारण कोणत्याही क्षणाला त्यांच्या भावनांचा "स्फोट" झाला असता. काही दिवस तर असे असत की त्याना काहीही विचारणे शक्य नसे. ज्या पद्धती वापरून तुम्ही इतरांवर प्रभाव पाडता आणि त्याना परिणामकार-करित्या शिक्षण देता त्या पद्धती या मुलांच्या बाबतीत संपूर्णतया गैर लागू होत्या. **"वैद्यकीय अध्यापनशास्त्रा"ची** संकल्पना कुठेतरी माझ्या आढळात आली; मानसिक अस्वास्थ्याचा ज्या मुलांच्या वर्तनावर ठसा उमटला आहे अशा मुलाना कसे शिक्षण द्यावयाचे याचे सार त्या संकल्पनेत जवळ जवळ नेमकेपणाने व्यक्त झाले आहे. वैद्यकीय अध्यापनशास्त्राची मुख्य तत्त्वे अशी आहेत: (१) मुलाच्या अधू, रुग्ण मनाच्या बाबतीत घाईने पावले उचलू नका; (२) शालेय वातावरणाने मुलाच्या मनात आनंदी भाव फुलवून त्याचे चित्त उदास विचारांपासून आणि अनुभवांपासून इतरत्र वेधण्याचा शक्य त्या हरएक प्रकारे प्रयत्न करा; (३) कोणत्याही परिस्थितीत मुलाला असे जाणवू देऊ नका की तुम्ही त्याला रुग्णाईत समजता.

आमच्या शाळेत असा एक मुलगा होता की ज्याची भावनाप्रक्षोभाकडे प्रवृत्ती होती. त्याचे नाव वलोद्या. आपला मुलगा काहीतरी असाधारण आहे असे त्याचे आईवडील मानीत. या गोष्टीने मी अस्वस्थ झालो. त्यांचा केव्हा ना केव्हा तरी भ्रमनिरास होणे अपरिहार्य होते; आणि तसे झाले की तो मुलगा आपल्या आईवडिलांचा आणि एकूण सर्वच वडीलधाऱ्या मंडळींचा द्वेष करू लागेल अशी मला भीती होती. विनम्रतेने कसे वागावे आणि इतर लोकांचा आदर कसा करावा याचे शिक्षण देणे हाच माझ्या मते अशा मुलाना बरे करण्याचा मुख्य उपाय आहे. आपल्या निकट असलेला

प्रत्येकजण माणूस आहे ही भावना वलोद्याच्या मनात जागृत करण्याचा मी प्रयत्न केला.

मंद, उदास विचारांच्या मुलाना वैद्यकीय अध्यापनशास्त्रात खास स्थान आहे. हृदयाचे किंवा आतड्याचे विकार जितक्या विचारपूर्वकतेने आणि संयमाने आपण बरे करतो तितक्याच विचारपूर्वकतेने आणि संयमाने मज्जापटलातील पेशींची बधिरता आणि जडता आपण बरी केली पाहिजे. पण ती बरी करण्यासाठी सहस्रपट अधिक दक्षतेची आणि शैक्षणिक कौशल्याची, प्रत्येक मुलाच्या व्यक्तिगत वैशिष्ट्याचे सखोल ज्ञान असण्याची गरज आहे.

## प्रत्येक मूल – एक कलावंत

आनंद विद्यालयाचा अभ्यास सुरू झाल्यानंतर एका आठवड्यानेच मी मुलाना सांगितले: "उद्या कागदाचे पॅड आणि पेन्सिल घेऊन या. आपण चित्रे काढणार आहोत." दुसऱ्या दिवशी शाळेच्या शेतघराच्या हिरवळीवर आम्ही मोकळेपणाने बसलो. "तुमच्या अवतीभोवती पहा आणि तुम्हाला जे सर्वात सुंदर वाटेल, तुम्हाला जे सर्वात आवडेल त्याचे चित्र काढा," मी मुलाना सूचना केली.

आमच्या समोर शालदीय सूर्यप्रकाशात उजळून निघालेले शाळेचे उद्यान आणि प्रायोगिक केंद्र दिसत होते. मुलांचा किलबिलाट सुरू झाला. एकाला लाल-पिवळा डोंगर आवडला. दुसऱ्याला जमिनीपर्यंत वाकलेली सूर्यफुलांची बोंडे आवडली; तिसऱ्याला, कबूतरांचा खुराडा आवडला; आणि चौथ्याला द्राक्षांचे घोस आवडले. शूराला आकाशातून तरंगत जाणारे हलके, कापसासारखे मऊ ढग आवडले. सिऱ्योझाला तळ्याच्या आरशासारख्या स्वच्छ पाण्यावरील हंसपक्षी आवडले. दान्कोला माशाचे चित्र काढावयाचे होते – एक दिवस आपण आणि आपले काका मासे पकडायला कसे गेलो होतो याचे त्याने अगदी उत्साहभरित वर्णन केले. त्याना एकही मासा मिळाला नव्हता, पण तरीही मासे कसे "खेळतात" हे त्यानी पाहिले होते.

"आणि मला सूर्याचे चित्र काढायचे आहे," तीना म्हणाली.

मुले अगदी उत्साहाने चित्रे काढीत होती. चित्रकला कशी शिकवावी याबद्दल मी पुष्कळ वाचले होते, पण आता माझ्यासमोर हाडामांसाची मुले होती. मुलांची चित्रे, चित्रे काढण्याची ही क्रिया म्हणजे मुलांच्या आंतरिक

जीवनाचाच एक भाग आहे असे मला दिसले. सभोवतालच्या जगात जे काही दिसते ते मुले केवळ कागदावर उतरवीत नाहीत; ती या सौंदर्याचे निर्माते म्हणून या जगात राहतात, ते सौंदर्य उपभोगीत असतात. वान्या मधाचे पोळे आणि त्याच्या शेजारचे झाड काढण्यात गर्क झाला होता. त्या झाडावर खूप मोठी फुले होती आणि एका फुलावर प्रत्यक्ष पोळ्याएवढी मोठी मधमाशी होती. श्रमाने वान्याचे गाल लाल झाले होते आणि स्फूर्ती-च्या स्फुल्लिंगानी त्याची नजर तेजाळली होती. कोणत्याही शिक्षकाचे मन अतीव आनंदाने भरून यावे असाच हा क्षण असतो.

मुलांची सृजनशीलता हे त्यांच्या आंतरिक जीवनाचे, आत्माविष्काराचे आणि आत्मप्रतिपादनाचे एक सखोल, अद्वितीय असे क्षेत्र असते आणि त्यात प्रत्येक मुलाची व्यक्तिगत कल्पकता सुस्पष्टरीतीने प्रकट झालेली असते. सार्व-त्रिकरित्या लागू होणाऱ्या कोणत्याही निकषाच्या जोरावर या कल्पकतेचे वर्गीकरण करता येणे शक्य नाही.

आपल्याला काय आवडले हे कोल्याने सांगितले नव्हते; पण त्याने जे काही काढले होते ते पाहून माझे चित्त अतिशय थरारून उठले. अनेक फांद्या असलेले आणि गोल फळानी भरलेले एक झाड त्या लहानग्या मुला-च्या चित्रवहीत उतरले होते. याचा अर्थ ते सफरचंदाचे झाड होते. झाडा-च्या माथ्यावर उंच जागी चंद्र होता आणि झाडाभोवती त्या चंद्राच्या प्रकाशवलयात छोटचा छोटचा चांदण्यांची रास पडली होती. या मनोवेधक चित्राच्या आधारे त्या मुलाच्या अंतर्गाभ्यातील विचार आणि भावना जाणून घेण्याची मला किती इच्छा होती! कारण आम्ही जगाचे निरीक्षण करीत असताना त्या क्षणी त्या मुलाच्या डोळयात तळपणारी स्फूर्तीची केवढी तेजस्वी ठिणगी मी पाहिली होती!

"सफरचंदाच्या झाडाच्या वर असलेल्या या छोटचा चांदण्या कसल्या आहेत?" मी कोल्याला विचारले.

"त्या काही चांदण्या नाहीत," कोल्या म्हणाला. "चंद्रावरून बागेत पडणाऱ्या त्या रुपेरी ठिणग्या आहेत. चंद्रावरसुद्धा धिप्पाड लोहार असतील नाही का?"

"आहेत तर!" मी म्हटले. सायंकाळच्या शांत वेळी त्या मुलाचे मन उचंबळून टाकणाऱ्या विचारतरंगानी मी स्तिमित झालो. याचा अर्थ रात्री त्याने आकाश पाहिले होते, चंद्राच्या तेजाने तो मोहित झाला होता आणि

सफरचंदाच्या झाडांभोवतीचे कंप पावणारे मंद प्रकाशवलय त्याच्या नजरेने टिपले होते.

"पण हे अजस्र लोहार रात्री कोणत्या प्रकारचे धागे घडवितात?" विचारात गर्क होत कोल्याने विचारले. परंतु मला असे जाणवले की, हा प्रश्न फारसा त्याने आपल्या शिक्षकाला उद्देशून विचारला नव्हता तर रात्रीचे आकाश, चंद्राचा मंद प्रकाश, चांदण्यांचा फेर याविषयींच्या त्याच्या स्मृतीला उद्देशून विचारला होता. त्याच्या सृजनशील स्फूर्तीत व्यत्यय आणला जाईल अशी मला भीती वाटली. एक शोध लागल्याच्या आनंदात माझे हृदय धडधडू लागले: सृजनशीलतेच्या स्पर्शाने मुलाच्या मनाच्या अंतर्गाभ्यातले कोपरे खुले होतात; याच कोपऱ्यांत प्रेमळ भावनांची उगमस्थाने सुषुप्तावस्थेत असतात. आपल्या भोवतालच्या जगातील सौंदर्याची अनुभूती घेण्यास मुलाला मदत करताना शिक्षक नकळत या कोपऱ्याना स्पर्श करीत असतो.

लारिसाचे उदाहरण गिरवून मी अजस्र लोहारांचे चित्र काढू लागलो. मला असे वाटले की मी चित्र तसे चांगले काढले आहे. लोहार अगदी खरेखुरे लोहार दिसत होते. ऐरणही अगदी हुबेहूब सामुदायिक शेताच्या लोहारशाळेतील ऐरणींसारखी दिसत होती. मी एक प्रौढ माणूस आहे हे मी विसरलो आणि आनंदाने मी अगदी हरखून गेलो. माझे लोहार लारिसाच्या लोहारांपेक्षा स्वाभाविकच चांगले वठले असतील. पण मुलानी माझ्या चित्राची फारशी दखल घेतली नाही; उलट आंतरिक उत्सुकतेने ती लारिसाभोवती गोळा झाली. "कमाल आहे, तिने एवढे काढले आहे तरी काय?" मी स्वतःशीच म्हटले. मुलांच्या घोळक्यातून मी डोकावून पाहिले: लारिसाच्या चित्रात खास असे काही दिसले नाही; मग माझ्या चित्राकडे संपूर्णतया पाठ फिरवून ती सर्व मुले लारिसाच्या चित्राचे का कौतुक करीत होती? त्या चित्राचे मी जेवढे बारकाईने निरीक्षण केले तेवढ्या स्पष्टतेने एक गोष्ट माझ्या ध्यानात आली की लहान मुलांची जगाकडे पहाण्याची त्यांची स्वतःची एक दृष्टी असते, कलाविष्काराची त्यांची स्वतःची एक भाषा असते आणि तुम्ही कितीही आटापिटा केलात तरी त्या भाषेचे अनुकरण करणे तुम्हाला कधीही जमणार नाही. माझ्या अजस्र लोहारानी साध्या टोप्या आणि मलवस्त्रे परिधान केली होती. त्यांच्या दाढ्या लांब होत्या आणि पायात बूट होते. परंतु लारिसाच्या लोहारांच्या कापसासारख्या मऊ भुरभुरीत केसांभोवती तेजोकणांचे वलय होते आणि त्या बलदंड लोहारांच्या दाढ्या या नुसत्या दाढ्या नव्हत्या तर टोकदार अग्निज्वालांचे ते गोल

कडे होते. त्यांचे अजस्र घण हे त्यांच्या डोक्यापेक्षाही जवळ जवळ दुप्पट आकाराचे होते... त्या बालकाच्या दृष्टीने तो सत्याचा अपलाप नव्हता तर सुस्पष्ट असे ते स्वतःसिद्ध आणि स्वयंबद्ध सत्य होते – अद्‌भुत सामर्थ्याचे आणि अपार कौशल्याचे दर्शन घडविणारे सत्य, शक्तिशाली माणूस आणि अग्नीचे तेज यांच्या परीकथात्मक संमीलनाचे सत्य. मुलांच्या अद्‌भुतरम्य कल्पनाविलासाच्या विलोभनीय भाषेचा प्रौढांच्या भाषेशी आपण मेळ घालण्याचा प्रयत्न करता कामा नये. मुलाना त्यांच्या स्वतःच्याच भाषेत एकमेकांशी बोलू द्या. प्रमाण, दृक्‌परिमाण आणि तोल यांचे नियम मुलाना जरूर शिकवा – ते उत्तमच, पण त्याच वेळी मुलांच्या कल्पनाविलासालाही अवसर ठेवा असा मी प्राथमिक वर्गातल्या शिक्षकाना सल्ला देत असे; परीकथांतून जगाचे चित्र रेखाटण्याची मुलाची क्षमता भग्न करू नका...

आपण काय चित्र काढले आहे हे सांगण्याची प्रत्येक मुलाला उत्सुकता होती. या कथांमध्ये सुस्पष्ट प्रतिमा आणि उपमा-उत्प्रेक्षा रत्नमाणिकांसारख्या झळाळत होत्या. मुलांच्या भाषेचा विकास करण्यास चित्रकला मदतभूत ठरली होती.

शेतांवर आणि रानामध्ये आम्ही जेव्हा जेव्हा फिरायला जात होतो तेव्हा जवळ जवळ प्रत्येक वेळी आम्ही कागद आणि पेन्सिल घेऊन जात असू. मोठ्या विद्यार्थ्यांनी छोट्या विद्यार्थ्यांसाठी खिशात मावतील अशा चित्रवह्या करून दिल्या होत्या. आमची शाळा सुरू होऊन काही महिने लोटल्यानंतर वसंतऋतून मी एक मोठी कोरी चित्रवही तयार केली. भोवतालच्या परिसरातील आपल्या आवडत्या कोपऱ्यात बसून आपल्या मनाप्रमाणे प्रत्येक मूल त्यात चित्र काढीत असे. त्या चित्रवहीत मी छोट्या छोट्या गोष्टीही लिहिल्या. ही चित्रवही म्हणजे आमच्या सामूहिकाच्या जीवनातील आणि आत्मिक विकासातील एक संपूर्ण अध्याय होता.

## प्राणीमात्राविषयीची वत्सलभावना आणि सौंदर्य

भोवतालच्या जगातील 'प्राणीमात्राविषयी आणि सौंदर्याविषयी काही मुलांत वसत असलेली बेपर्वाई पाहून माझे मन अस्वस्थ होत असे. मुलांच्या काही कृतीनी मी बेचैन होत होतो. प्रथमदर्शनी अगम्य अशा बालिश

क्रौर्याचे ते आविष्कार वाटत. आम्ही कुरणातून हिंडत होतो आणि गवतावर फुलपाखरे, रंगीत माशा आणि चिमणे कीटक उडत होते. युराने एक बागर्डा पकडला, आपल्या खिशातून काचेचा एक तुकडा काढला आणि तो बागुर्डा आतून "कसा दिसतो हे पाहाण्यासाठी" त्या किडयाचे त्याने दोन तुकडे केले. शाळेच्या शेतआवाराच्या एक घनदाट कोपऱ्यात अनेक वर्षे कित्येक पाकोळयानी आपले घर केले होते. आम्ही नुकतेच तेथे येऊन पोहोचलो होतो आणि पाकोळयांच्या घरट्याविषयी मी दोन शब्द उच्चारतो न उच्चारतो तोच शूराने एक दगड पाकोळयांच्या घरट्यांकडे भिरकावला. शाळेच्या आवारात वाढलेल्या सुंदर कॅनालिली फुलांची सर्व मुले काळजी घेत असत; पण ल्यूस्या त्या फुलांच्या वाफ्यात शिरली आणि तिने फुले खुडून टाकली. आनंद विद्यालयाच्या प्रारंभीच्या दिवसांतल्या या गोष्टी आहेत. एक गोष्ट मला प्रामुख्याने जाणवली की, सौंदर्याविषयी मुलांच्या मनात वसत असलेले कौतुक आणि सौंदर्याच्या भवितव्याविषयी त्याना वाटत असलेली बेपर्वाई यांची कुठेतरी सांगड बसली आहे. माझ्या विद्यार्थ्यांची भेट होण्यापूर्वी कितीतरी काळ आधी माझी अशी खात्री पटली होती की, जे जे सुंदर आहे त्याविषयी वाटणारे कौतुक म्हणजे दुसरे तिसरे काही नसून सदिच्छेचे, सद्भावनेचे पहिले अंकुर आहेत आणि त्यांची अत्यंत काळजीपूर्वक जोपासना केली पाहिजे. कोल्या आणि तोल्याने जे केले त्यामुळे मी विशेषच अस्वस्थ झालो. चिमण्यांची घरटी उध्वस्त करण्याचा कोल्याला भयंकर नाद होता. लोक म्हणत की उध्वस्त झालेल्या घरट्यातून खाली पडलेली चिमण्यांची पिले तो लोणी-कारखान्याच्या सांडपाण्याच्या नळात सोडी. ती पिले पुष्कळ वेळ चीं चीं करीत आणि तो आवाज ऐकण्यासाठी कोल्या नळाला कान लावून बसे. कोल्या तर अशांतग्रस्त कुटुंबातून आला होता. पण हे क्रौर्य केवळ कोल्यातच आढळून येत होते असे नव्हे तर नेहमीच्या सरळ वातावरणात रहाणाऱ्या मुलांमध्येही ते आढळून येत होते. सौंदर्य आणि प्राणीमात्र यांविषयीच्या दुष्टतेच्या आणि बेपर्वाईच्या या "क्षुल्लक" आविष्कारांचे अंतिम पर्यवसान हृदयशून्यतेत होते. पण सर्वात भयावह गोष्ट ही होती की हे "क्षुल्लक" आविष्कार काहीतरी दोषार्ह आहेत, दोषास्पद आहेत याचे मुलाना भान नव्हते.

उज्ज्वल आणि ऋजू भावना मुलांच्या मनात कशा फुलविता येतील? सहृदयता आणि प्राणीमात्राकडे व सौंदर्याकडे विचारपूर्वक ध्यान देण्याची वृत्ती त्यांच्या अंतःकरणात कशी जोपासता येईल? एकदा शेतांमधून असेच फिरत

असता गवतामध्ये एक चंडोल पक्षी आम्हाला आढळला. त्याचे पंख तुटले होते. तो पक्षी इथून तिथे तिथून इथे तुटक्या पंखानी धडपडत होता. पण त्याला उडता येत नव्हते. मुलानी त्या चंडोलाला पकडले. त्याच्या मोत्या-सारख्या सुंदर गोल डोळ्यांतील भ्यालेली नजर निळ्या आकाशाकडे लागली होती आणि त्या मुलांच्या हातातील त्या छोटया जीवाची छाती धडधडत होती. कोल्याने त्याला आपल्या हातात दाबले आणि ते पाखरू आर्त चीत्कार करू लागले. मुलेही हसायला लागली. "आपल्या साथीदारानी शेतात एकटयालाच मागे टाकलेल्या या पक्ष्याविषयी एकालाही कशी कणव येत नाही?" माझ्या मनात विचार आला आणि मी मुलांकडे पाहू लागलो. लीदा, तान्या, दान्को, सिऱ्योझा आणि नीनाच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले होते.

"त्या गरीब बिचाऱ्या पक्ष्याचा तू का छळ करतो आहेस?" लीदा कळवळून कोल्याला म्हणाली.

"तुला काय करायचंय?" कोल्या म्हणाला. "तूच घे आणि संभाळ त्याला," असे म्हणून कोल्याने तो पक्षी लीदाच्या अंगावर भिरकावला.

"मला त्याची दया येते. संभाळीन मी त्याला," लीदा म्हणाली आणि ती त्या चंडोलाला थोपटू लागली.

रानाच्या कडेला आम्ही उभे होतो. मी मुलाना सांगितले की शरदऋतूत स्थलांतर करणारे पक्षी खूप खूप अंतर कापून दूरदूरच्या ठिकाणी जातात. पंख तुटलेले किंवा शिकारी पक्ष्यांच्या तावडीतून स्वतःला सोडवून घेताना जायबंदी झालेले काही पक्षी रित्या शेतांत एकटेच मागे उरले आहेत... आणि त्यांच्यासमोर पसरला आहे तो हिमवादळानी घोघावणारा आणि हिमपाताने उग्र भासणारा रौद्र हिंवाळा. या चंडोलाच्या नशिबात काय लिहिले आहे? ते गरीब बिचारे पाखरू बर्फात गोठून मरून जाईल. पण वसंतामध्ये आणि उन्हाळ्यात हाच चंडोल किती सुंदर गात असतो. त्याच्या मनमोहक स्वरानी सारा स्टेप प्रदेश भरून जातो. चंडोल म्हणजे सूर्याचा पुत्र. परीकथांत म्हटले आहे की "या पक्ष्याचा जन्म सूर्याच्या ज्वालेतून झाला." म्हणूनच लोकानी त्याला नाव दिले आहे "अग्निकाक". आणि थंडीने जेव्हा बोटे बधिर होतात आणि गोठवणाऱ्या वाऱ्याने जेव्हा तुमची दमछाक होते तेव्हा शरीराची काय परवड होते तुम्हा सर्वानाच ठाऊक आहे. तुम्ही धावतपळत घरी जाता आणि चुलाण्याची ऊब घेत बसता...

पण हे बिचारे पाखरू कुठे जाईल? त्याला कोण आसरा देईल? ते बर्फाचा गोळा होऊन पडेल.

"पण या गरीब बिचाऱ्या चंडोलाला आम्ही मरू देणार नाही," वाऱ्या म्हणाली. "आम्ही त्याला ऊबदार कोपऱ्यात ठेवू, त्याच्यासाठी छोटे घरटे तयार करू; मग वसंतऋतूपर्यंत राहील तो तेथे..."

त्या चंडोल पक्ष्यासाठी छोटेसे घर कसे तयार करावयाचे यावर मुलांचा वाद सुरू झाला. हिवाळ्यासाठी त्या पक्ष्याला घरी न्यायला प्रत्येकजण उत्सुक झाला होता. फक्त कोल्या, तोल्या आणि काही इतर मुले गप्प होती.

"घरी कशाला न्यायचं त्या चंडोलाला, मुलानो? आपण शाळेतच त्याच्यासाठी छोटेसे ऊबदार घरटे तयार करू या की. आपण त्याला चारा-पाणी देऊ आणि बरं व्हायला मदत करू. मग वसंत ऋतू आला की आपण त्याला सोडून देऊ."

मुलांच्या खोलीत एक पिंजरा होता. आम्ही चंडोल पक्ष्याला शाळेत घेऊन गेलो आणि त्याला त्या पिंजऱ्यात ठेवले. रोज सकाळी त्या मुलांपैकी एखादे मूल चंडोल पक्ष्याची काळजी घेण्यासाठी येत असे. येताना ती मुले त्याच्यासाठी खाद्यही घेऊन येत.

त्यानंतर काही दिवसानी कात्या एक सुतार पक्षी घेऊन आली. तिच्या वडिलाना तो रानात सापडला होता. कदाचित एखाद्या श्वापदाने त्याला पकडले असावे आणि काहीतरी चमत्कार घडून तो वाचला असावा. त्या सुतार पक्ष्याचे पंख निर्जीवपणे लोंबकळत होते आणि त्याच्या पाठीवर रक्ताचे डाग होते. चंडोल पक्ष्याच्या पिंजऱ्यातच आम्ही त्याला ठेवले. त्या सुतार पक्ष्याला काय खायला द्यावे हे कोणालाच ठाऊक नव्हते—कदाचित झाडातले कीटक? आणि ते कुठे शोधायचे? झाडाच्या सालीखाली तर नाही?

"मला ठाऊक आहे," कोल्या तोऱ्यात म्हणाला. "तो फक्त झाडातले कीटक आणि माश्याच खात नाही. विलो झाडाच्या कळ्या आणि गवताचे बीही त्याला आवडते. मी स्वतः पाहिले आहे..." कोल्याला आणखी काहीतरी सांगावयाचे होते पण तो चाचरला. कदाचित त्याने सुतार पक्ष्यांची शिकार केली असावी.

"सुतार पक्षी काय खातो हे तुला ठाऊक आहे तर; मग तूच का आणून देत नाहीस त्याच्यासाठी खाद्य? किती केविलवाणा दिसतोय बघ तो!"

तेव्हा कोल्या रोज सुतार पक्ष्यासाठी त्याचे खाद्य आणू लागला. प्राणी-मात्राविषयी अजून त्याच्या मनात कणव, करुणा असे काही नव्हते. पण त्याच्या वर्गबंधूंकडून त्याचे जे कौतुक होत होते त्याचाच त्याला आनंद होत होता आणि केवळ तो आनंद मिळविण्यासाठी तो ही गोष्ट करत होता. कोल्या कोणत्या प्रकारचा मुलगा होता पहा—पक्ष्यांचे खाद्य त्याला ठाऊक होते. पण त्याच्या ऋजू भावनांच्या जागृतीची सुरुवात स्वाभिमानापासून होऊ द्या; त्यात काहीच गैर नाही. सत्कृत्ये ही संवय बनू द्या; त्यातून सद्विचार जागृत होतील.

तुम्हाला कोणत्या प्रकारचा माणूस बनणे आवडेल या प्रश्नाला मुलानी दिलेली शेकडो उत्तरे मला आठवतात—बलवान, शूर, धाडसी, बुद्धिमान, अष्टपैलू, निर्भीड. पण "सहृदय" हे उत्तर कधीच कोणी दिले नव्हते. धाडसीपणा आणि शौर्य अशा गुणांच्या बरोबरीनेच सहृदयतेला का स्थान नसावे? आपल्या स्वतःच्याच सहृदय वर्तनामुळे मुलाना कधीकधी स्वतःलाच बावचळल्यासारखे का वाटते? तरीही माणसाना परस्परांविषयी वाटणारी खरीखुरी आत्मीयता, खरेखुरे आत्मिक सौंदर्य सहृदयतेशिवाय अशक्यप्राय आहे. मुले ही मुलींपेक्षा कमी सहृदय का असतात याचाही मी विचार केला. कदाचित तसे नुसते भासत असावे? नाही, ती गोष्ट खरी आहे. मुली अधिक सहृदय, अधिक सहानुभूतीशील, अधिक कोमल स्वभावाच्या असतात; कदाचित अगदी लहान वयापासून मातृवात्सल्याची एक सहज-प्रवृत्ती अजाणता त्यांच्या मनात वास करीत असते. नव्या जीवनाची जन्म-दात्री होण्यापूर्वी कितीतरी आधी तिच्या हृदयात प्राणीमात्राविषयीच्या आस्थेची भावना दृढ झालेली असते. सृजनशीलता, जीवनाचे आणि सौंदर्याचे निग्रही प्रतिपादन हे सहृदयतेचे मूळ आहे, तिचे ते उगमस्थान आहे. सहृदयता आणि सौंदर्य यांचे नाते अविभाज्य आहे.

एके दिवशी सकाळी फेद्याने एक ऑरिओल पक्षी शाळेत आणला. मुलाना त्या दिवशी सुटी वाटली. पशुकेंद्राजवळच्या एका झुडुपात फेद्याला तो आढळला होता. काही कारणामुळे त्या पक्ष्याला उडता येत नव्हते. त्या पक्ष्याचे पंख अतिशय सुंदर आणि विविधरंगी होते आणि मुलांची त्या सुंदर पंखांवरची नजर ढळत नव्हती. सकाळी आम्ही "पक्षी-रुग्णालया"त जमलो (आमच्या खोलीच्या त्या कोपऱ्याला मुलानीच हे नाव दिले होते) आणि दुसऱ्या दिवशी पुन्हा जमण्यासाठी आम्ही तेथून पांगलो. कोस्त्याने एक छोटी चिमणी आणली. रस्त्याच्या कडेला ती पडली होती. ती चिमणी

अतिशय कमजोर आणि क्षीण झाली होती. धान्याचे दाणे किंवा पावाचे तुकडेही खायला तिच्यात बळ नव्हते. ती कशालाच चोच लावीत नव्हती. त्या लहानग्या पाखराचे आजारपण पाहून फेद्याला फार वाईट वाटले. ती चिमणी मेली तेव्हा आम्हा सर्वांनाच दुःख झाले. कोस्त्या तर रडला. त्या छोटया मुलींनाही रडू फुटले. कोल्या खिन्न, उदास बनला आणि नुसताच अबोल होऊन बसून राहिला.

"मुलाच्या तेजोगर्भ लोकशाहीला श्रेष्ठ-कनिष्ठ श्रेणी आणि अधिकार-परंपरा ठाऊक नाही. घामाने निथळणाऱ्या शेतमजुराविषयीचे किंवा भुकेने कळवळणाऱ्या आपल्याच वयाच्या मुलाविषयीचे दुःख जाणवण्यापूर्वी कितीतरी आधी मुलाच्या मनाला ज्या वेदना जाणवतात त्या बालकथांतील गरीब बिचाऱ्या दीनवाण्या घोड्याला सोसावे लागणारे दारुण भोग पाहून किंवा मान तोडून टाकलेल्या कोंबडीच्या पिलाला पाहून कुत्रे आणि पक्षी त्याला अगदी जवळचे वाटतात; फुलपाखरांशी आणि फुलांशी त्याचे अगदी बरोबरीचे नाते जोडले गेलेले असते. पत्थरांमध्ये आणि शिंपल्यांमध्ये त्याला आपल्या भावाचे नाते दिसते. ऐश्वर्याच्या दिमाखाने फुगून गेलेल्या माणसाचा गर्विष्ठपणा त्याला परका आहे; कारण मन फक्त माणसानाच असते हे मुलाच्या कधी ध्यानीमनीही नसते."* हे यानुश कोर्चाक यांचे शब्द मला आठवले. हे सर्व खरे आहे; पण **सहृदय मूल** आकाशातून अवतरत नाही. त्याच्यावर शिक्षणाचे संस्कार घडवावे लागतात.

एकदा घळीमधून फिरत असता मुलाना एक ससा सापडला. त्याचा पाय तुटला होता. मुलानी त्या सशाला आपल्या खोलीत आणले आणि त्याला एका नव्या पिंजऱ्यात ठेवले. आणि अशा रीतीने तेथे आणखी एक रुग्णालय तयार झाले – पशु-रुग्णालय. त्यानंतर आठवड्याने लारिसाने मांजराचे एक पिलू आणले. ते थंडीने कुडकुडत होते आणि अगदी क्षीण झाले होते. त्यानी ते सशाच्याच पिंजऱ्यात ठेवले. मुलांच्या मागे आता पुष्कळच उद्योग लागला होता. सशासाठी ती गाजरे आणीत होती आणि मांजराच्या पिलासाठी दूध. एके दिवशी सकाळी मांजराचे ते पिलू आणि ससा अंगाची जुडी करून एकमेकांच्या कुशीत झोपलेले मुलाना आढळले. त्यावेळी मुलांच्या चेहऱ्यावर जे कौतुकाचे आणि आनंदाचे भाव पसरले त्यांचे वर्णन करणे

---

*यानुश कोर्चाक, 'शिक्षणावरील निवडक लेख', मॉस्को, प्रोस्वेश्चेनिये प्रकाशन, १९६६, पृ. २७१ (रशियनमध्ये).

खरोखरच कटीण आहे. मुले अगदी हळू आवाजात बोलत होती; कारण आपल्या आवाजाने त्याना जाग येईल अशी मुलाना भीती वाटत होती...

हिंवाळ्यात कित्येक निळे टिटमाऊस पक्षी "पक्षीरुग्णालयात" दिसू लागले. हिंवाळ्यात जे पक्षी मागे रहात त्यांच्यासाठी तयार करण्यात आलेल्या खाद्यघराशेजारी मुलाना हे टिटमाऊस पक्षी आढळले होते आणि तेथून मुलानी त्याना उचलून आणले होते... आणखी एका गोष्टीने मला आनंद झाला होता: कित्येक मुलानी आपापल्या घरी स्वतःची "पक्षी-रुग्णालये" आणि पशु-दालने बनविली होती. आणि आमच्या खोलीत छोटचा छोटचा माशांसाठी आम्ही जेव्हा एक मत्स्यालय तयार केले तेव्हा आपल्या घरीही मत्स्यालय तयार करू या म्हणून मुले पालकांच्या मागे लागली. मत्स्यालय कसे तयार करावयाचे हे पहाण्यासाठी कित्येक पालक शाळेत आले. मत्स्यालयासाठी वनस्पती आणि मासे मिळविणे हे एक कठीण काम होते, आणि माशांचे खाद्य मिळविणे हे त्याहून अवघड होते. पण मुलानी सारखे मागे लागून लागून या सर्व अडचणींवर मात केली; तोपर्यंत त्यानी ना आपल्या पालकाना ना मला उसंत लाभू दिली. स्लावाची आणि तीनाची आई शाळेत तक्रार घेऊन आल्या की त्यांच्या मुलानी त्यांचा अगदी पिच्छा पुरवला आहे; ती त्याना काही स्वस्थ बसू द्यायला तयार नाहीत. कारण इतर काही मुलांकडे सोनेरी मासे होते आणि या मुलांकडे ते नव्हते. वरच्या वर्गातल्या विद्यार्थ्यांची त्यासाठी आम्हाला मदत घ्यावी लागली. त्या काळात शाळेची यंत्रशाळा नव्हती. पण मत्स्यालयांच्या बांधणीकामामुळे विद्यार्थ्यांसाठी पहिली यंत्रशाळा तयार करणे आम्हाला भाग पडले.

मत्स्यालयाच्या छोटचा दिव्याच्या मंद प्रकाशात सोनेरी माशांचे ते सुंदर दृश्य पहात आम्ही संध्याकाळी बसत असू. ते क्षण मी कधीच विसरणार नाही. महासागराची खोली, समुद्राच्या रहिवाश्यांचे ते अनन्यसाधारण जीवन यांविषयी मी मुलाना सांगत असे. शाळेचा अभ्यासक्रम संपवून माझ्या विद्यार्थ्यांना आता पुष्कळ वर्षे झाली आहेत. ती आता प्रौढ माणसे बनली आहेत. पण संध्याकाळचे ते क्षण आयुष्यभर त्यांच्या स्मरणात राहिले आहेत. काही दिवसांपूर्वीच कोल्याने मला सांगितले:

"तो छोटा दिवा अनेक वेळा माझ्या स्वप्नात येतो. त्याचा प्रकाश हे ज्ञानाचे पहिले उगमस्थान होते. समुद्राच्या रहस्यमय तळांची, त्या अलौकिक मत्स्यजीवनाची अधिक माहिती मिळविण्याची माझी फार इच्छा होती..."

२४ वर्षांच्या एका तरुणाला इतक्या जिव्हाळ्याने जर त्या माशांचे

स्मरण राहिले असेल तर त्याचा अर्थ हाच की हंसण्यावारी नेण्याइतकी ती क्षुल्लक गोष्ट नव्हती. सहृदयतेच्या प्रांगणाकडे जाणारा तो एक प्रवेशमार्ग होता. अत्यंत निर्विवाद व उदासीन हृदयांतही ज्या क्षणी भोवतालच्या जगातील सौंदर्याच्या दर्शनाने सहृदयतेची, कोमलतेची आणि अनुकंपेची भावना प्रादुर्भूत होते त्या क्षणाची मी अगदी श्वास रोखून वाट पहात होतो. त्या वर्षाची गोठवणारी पहिली शारदीय दहीवरवृष्टी मी कधीही विसरणार नाही. आम्ही बागेत गेलो. तेथे गुलाबाचे एक झाड होते. त्या झाडावर एक सुंदर गुलाबाचे फूल फुलत होते आणि त्याच्या नाजूक पाकळयांवर दंवाचे थेंब पडले होते. रात्रीच्या भयानक थंडीत ते कसे काय टिकून राहिले हा एक मोठा चमत्कारच होता. त्याच्याकडे पहात असता आमच्या मनात खिन्नता साचली. थंडीमुळे लवकरच हे सौंदर्य नष्ट होणार होते. कोल्याने टाकलेला एक कटाक्ष मी माझ्या नजरेने टिपला आणि प्रथमच एक विषण्णतेची आणि भयाची भावना मला त्याच्या नजरेत दिसली—अगदी निव्वळ बालसुलभ अशी ती भावना होती. नंतर आम्ही आमच्या ऊष्णतागृहात गेलो. तेथे अनेक कुंडया होत्या आणि त्या कुंडयांत आमच्या भागात अगदी विरळ सापडणारी ऱ्होडेनड्रॉन व निवडुंग यांसारखी काही फुलझाडे होती. गर्द लाल फुलांपैकी एक फूल नुकतेच उमलले होते—एक निवडुंग बहरत होता. कितीतरी वेळ आम्ही त्या फुलांचे सौंदर्य निरखीत होतो.

प्राणीमात्राविषयीच्या आणि जे जे सुंदर आहे त्याविषयीच्या वत्सलभावनेने मुलांच्या जीवनात हळू हळू प्रवेश केला. १९५१ च्या शरदाच्या अखेरीला आम्ही रानात गेलो. झाडाची पाने आता पूर्ण गळून गेली होती. तेथून आम्ही लिंडनचे एक छोटे झाड उकरून आणले आणि शाळेच्या शेतमळयात लावले. ते छोटे झाड आमचे मित्र बनले. आपल्या चिंतेचा व काळजीचा भावस्पर्श अनुभवणाऱ्या एखाद्या जिवंत प्राण्याविषयी आपण जशी स्वप्ने पहातो आणि त्याच्याविषयी जशा गोष्टी रचतो तशीच त्या झाडाविषयी आम्ही स्वप्ने पहात होतो आणि गोष्टी रचीत होतो. ऊबदार जलधारा आल्या की मुलाना खूप आनंद होत असे, कारण आमच्या या छोटया मित्राला आर्द्रतेची आवश्यकता होती. गोठलेल्या दहीवराने जमीन आच्छादिली गेली आणि शेतांवरून सुईसारखे बोचणारे वारे वाहू लागले की आम्ही चिंताग्रस्त होत होतो; कारण आमचा मित्र थंडीने गोठणार तर नाहीना अशी आम्हाला भीती वाटत होती. मुले मग बर्फ गोळा करीत असत आणि त्या छोटया लिंडन झाडाच्या खोडाभोवती त्याचा ढीग रचून

ठेवीत असत. मुली वेळूचे देठ आणीत आणि त्यानी त्या झाडाचे खोड लपेटीत. वसंताचे आगमन होताच अनेक वेळा आम्ही आमच्या मित्राला भेटायला जात असू आणि त्याला कधी कळया येताहेत याची आम्ही उत्तेजित मनाने आणि उत्कंठेने प्रतीक्षा करीत असू. झाडावर पहिली हिरवी पाने फुटताच मुलानी तर आनंदाने नुसता जल्लोष केला : याचा अर्थ झाड जिवंत होते. उन्हाळ्यात आमच्या या लिंडन झाडाला आम्ही नित्यनियमाने पाणी घालीत असू.

आस्थेच्या आणि सहृदयतेच्या सामूहिक भावनेत, सामूहिक सदिच्छेत केवढे प्रचंड सामर्थ्य सामावले आहे. अत्यंत निर्विकार आणि उदासीन व्यक्तीलाही आपल्या ओघात वाहून नेणाऱ्या वादळी प्रवाहासारखे ते आहे. कोल्या, तोल्या, स्लावा आणि पेत्रिक किती उत्तेजित मनाने आपल्या मित्राला, त्या छोटया हरित लिंडन वृक्षाला भेटायला जात असत, मत्स्यालयातील माशाना खाद्य घालताना त्यांचे डोळे कसे चमकत असत हे पाहून मला अत्यानंद झाला होता.

हिंवाळ्याच्या गोठविणाऱ्या दहीवरात छोटा लिंडन वृक्ष गारठून गेला असेल या विचाराने ज्यांचे हृदय त्यावेळी कंपित झाले ती मुले आता मोठी झाली आहेत. आलेच्या मित्राचेही आता मोठ्या वृक्षात रूपांतर झाले आहे. त्याच्या फांद्या चहूबाजूला पसरल्या आहेत. तरीही अजूनही मुले आणि मुली, तरुण माणसे, तरुण मातापिता त्या वृक्षाला भेट द्यायला येतात आणि आपल्या बालपणातील त्या सोनेरी शरदाची आठवण झाली की स्निग्ध भावनोर्मीनी त्यांचे मन भरून जाते.

सहृदयतेची मुळे बालपणात आढळून येतात तर मानवता, सद्भाव, इतरांविषयी वाटणारी काळजी आणि परोपकारवृत्ती यांचा जन्म श्रमातून आणि भोवतालच्या जगातील सौंदर्याविषयीच्या आस्थेतून व चित्तथरारकतेतून होतो असे अनुभवावरून दिसून येते. सहृदयता आणि भावनिक संस्कृतीसंपन्नता हा मानवतेचा केंद्रबिंदू आहे. सहृदयतेची भावना बालपणात रुजवली गेली नाही तर तिला कधीच अस्तित्व प्राप्त होणार नाही ; कारण पहिल्या आणि सर्वात महत्त्वाच्या सत्यांच्या ज्ञानाबरोबरच, स्वतःच्या मायभाषेतील शब्दांच्या सर्वात सूक्ष्म छटांच्या अनुभवाबरोबरच आणि भावजाणिवेबरोबरच खरीखुरी मानवता मनात ठसविली जाते. माणसाने बालपणी भावनांच्या शाळेत, ज्या शाळेत सहृदयतेच्या भावनांचे शिक्षण दिले जाते त्या शाळेत दाखल झाले पाहिजे.

# श्रमविश्वातील आमच्या सफरी

काम ही मुलांची आंतरिक गरज कशी बनवायची हा प्रश्न आमच्या शाळेच्या सर्वच शिक्षकांशी संबंधित असा प्रश्न होता. वर्ग सुरू होण्याच्या अगदी पहिल्या दिवसापासून प्राथमिक वर्गांतील शिक्षक मुलाना शाळेच्या बागेत काम करण्यासाठी घेऊन जात आणि श्रमासंबंधीच्या पाठाचा एक भाग म्हणून मुलाना जे काही काम करता येणे शक्य होते ते काम मुले करीत. हिंवाळ्यात मुलाना काम करण्यासाठी जागा असावी म्हणून आम्ही एक उष्णतागृहही बांधले होते. मुलांचे श्रम उच्च वैचारिक पातळीवर नेण्याचे मार्ग तयार करताना विजय दिनाच्या* दिवशी दर वर्षी मुलानी एक ओक वृक्ष लावावा असे शिक्षकानी ठरविले. आमच्या आनंदाची ती एक साक्षात बखरनोंद ठरणार होता. ओक वृक्षाला मुलानी नाव ठेवले आहे "शतायु वृक्ष." आमच्या विजय दिन ओक वृक्षराईमध्ये दर वर्षी एक वृक्ष लावण्याची ही प्रथा आम्ही आजतागायत चालू ठेवली आहे.

मुलांचे जीवन केवळ निसर्गानेच वेढता कामा नये तर श्रम, सृजनशीलता आणि उभारणी यांचे जगही मुलांभोवती उभे करणे हे महत्त्वाचे आहे असे आमचे मत होते. माणसाचे सौंदर्य श्रमातून अत्यंत सुस्पष्टपणे प्रकट होते.

अशा रीतीने श्रमविश्वातून आमच्या आनंद विद्यालयाच्या "सफरी" सुरू झाल्या. सामुदायिक शेताच्या धान्यकोठारातून मुलानी केलेल्या पहिल्या "सफरी" मुले कधीही विसरणार नाहीत. मुलानी तेथे गव्हाच्या राशीच्या राशी पाहिल्या—हजारो सेंटनेर पाव ज्यांतून तयार होतील अशा त्या राशी होत्या. सामुदायिक शेतांवर उत्तम कामगिरी बजावणाऱ्या लोकांची वान्याच्या वडिलानी आम्हाला माहिती दिली. कापणीमळणी यंत्राचा चालक ग्रिगोरी आंद्रेयेविच याने मुलाना शेतावर नेले. हे शेत खेड्याला अगदी लागूनच होते आणि धान्यकोठाराच्या मागूनच ते ताबडतोब सुरू होत होते. "या शंभर हेक्टरमधून या वर्षी मी चार हजार सेंटनेर पाव तयार होतील इतके धान्य गोळा केले," तो म्हणाला. "आणि गेल्या दहा वर्षांत माझ्या कापणीमळणी यंत्राने मी जितके धान्य गोळा केले त्यातून अलेक्झां-

---

*विजय दिन—फॅसिस्ट जर्मनीवर सोविएत जनतेने मिळविलेल्या विजयाचा दिवस, ९ मे, १९४५. हा दिन दर वर्षी साजरा केला जातो.

द्रिया — इतक्या मोठ्या शहराला पुरतील — इतके पाव तयार होऊ शकतील."

जगाची ही ओळख केवळ बौद्धिक नव्हती तर भावनिकही होती. कामगार म्हणून माणसात वसत असलेल्या सौंदर्याच्या दर्शनाने मुले स्तिमित झाली. माणसाविषयीच्या अभिमानाची एक भावना ती अनुभवीत होती. या "सफरीं" मध्ये मुले जेव्हा आपल्या पालकाना भेटली तेव्हा तर ही भावना अधिकच सखोल बनली. पंधराशे माणसाना पुरेल इतके दूध तान्याची आई जमा करते ही माहिती त्याना दुग्धालयात मिळाली. शरदातल्या एका ऊबदार दिवशी आम्ही अभियांत्रिकी फॅक्टरीला भेट दिली. तेथे आम्हाला वाल्याचे वडील भेटले. त्यानी मुलाना ओतकाम विभागात नेले. घन पदार्थांचे आपण अग्नीसारख्या धगधगीत लाल नदीत कसे रूपांतर करतो, आपल्या श्रमाच्या व इच्छाशक्तीच्या जोरावर त्या नदीला आपण धातूच्या लगडींचे कसे रूप देतो याविषयीची कथा ही मुलानी ऐकलेल्या किंवा स्वतः रचलेल्या कथांतील सर्वात उद्बोधक कथा होती. ही नवी माहिती आत्मसात करताना मुलांच्या चेहऱ्यावर पसरलेले अपार आनंदाचे भाव मी निरखीत होतो. ज्वालांसारख्या धगधगणाऱ्या धातूच्या नद्या निर्माण करणाऱ्या योद्ध्यांविषयी त्यानी गोष्टी रचल्या आणि धातू-कामगारांची चित्रेही काढली. ओतकाम विभागाला दिलेल्या या पहिल्या भेटीने त्यांच्या मनावर चिरस्मरणीय ठसा उमटविला. एका नव्या नजरेने मुले या गोष्टी पहात होती: धातूशिवाय माणूस एकही दिवस जगू शकणार नाही किंवा काम करू शकणार नाही हे त्याना जाणवले. कामगार, धातू-कामगार, यंत्र-उभारणीकार हे जीवनाचे खरे निर्माते आहेत याचा त्याना प्रत्यय आला. या लोकांविषयीचा प्रगाढ आदर माझ्या विद्यार्थ्यांच्या मनात ठामपणे रुजला गेला.

विविध कुशल कामगारांच्या, यंत्र आणि ट्रॅक्टर केंद्राच्या फिटर आणि टर्नरांच्या यंत्रशाळांच्या आम्ही केलेल्या "सफरी" ही तेवढ्याच उद्बोधक होत्या. धातूच्या तुकड्यांतून ट्रॅक्टर आणि कापणीमळणी यंत्रांचे सुटे भाग कसे आकार घेतात हे मुलानी तेथे पाहिले. स्क्रूशिवाय यंत्रे चालूच शकत नाहीत. लारिसाचे वडील आपल्या कुशल हातानी स्क्रू तयार करीत असता ती क्रिया मुले श्वास रोखून पहात होती.

व्यक्तीव्यक्तीमधील संबंधांचा, सामाजिक जीवनाचा शोध प्रथमतः मानवजातीच्या हितासाठी वेचण्यात आलेल्या श्रमातून लागतो. माणूस इतरांसाठी जे काही करीत असतो त्याच्याच साथीने माणसामधील मानवतेचा

आविष्कार घडत असतो. आपल्या समाजसत्तावादी वास्तवाची नेमकी हीच बाजू मुलाना खुली होईल अशा वातावरणात मुलाना वेढून टाकणे ही माझी एक पहिली विवंचना होती. केवळ निसर्गसौंदर्याशी संबंधित असलेल्या गोष्टीतच नव्हे तर आपल्या देशात निर्माण होत असलेल्या नव्या माणसाचा मूळ गाभा ज्यात सामावला आहे त्या गाभ्यात, मायभूमीची, समाजाची व इतर लोकांची हा माणूस जी सेवा बजावीत आहे त्या सेवेत मुलानी आनंद घ्यावा असा मी प्रयत्न केला. श्रमिक माणसाविषयी मुलाना वाटणारे प्रेम हे मानवी नीतिमत्तेचे उत्पत्तिस्थान होते.

## निसर्गसंगीताचे श्रवण

संगीत, सूर, स्वर-नादांचे सौंदर्य ही सर्व नैतिक आणि बौद्धिक संगोपनाची महत्त्वाची साधने आहेत, हृदयाच्या उदात्ततेचे आणि आत्म्याच्या विशुद्धतेचे ते उगमस्थान आहे. निसर्गाचे सौंदर्य, नैतिक संबंध आणि श्रम यांचे प्रतीतीदर्शन माणसाना संगीतातून घडते. केवळ भोवतालच्या जगातच नव्हे तर आपल्या अंतर्यामी जे जे काही उदात्त, भव्य आणि सुंदर आहे त्याविषयीच्या कल्पना संगीताद्वारे माणसाच्या मनात जागृत होतात. संगीत हे स्वयंशिक्षणाचे अत्यंत शक्तिशाली साधन आहे.

अगदी लहान वयापासून विद्यार्थी मोठे होईपर्यंत त्याच त्या विद्यार्थ्यांच्या आत्मिक विकासाचे अनेक वर्षे मी जे अवलोकन केले त्यावरून माझी खात्री पटली की चित्रपट, नभोवाणी आणि दूरचित्रवाणी यांच्या अनियंत्रित, असंघटित परिणामातून इष्ट सौंदर्यशास्त्रीय शिक्षण घडू शकत नाही आणि अनेक वेळा हा परिणाम अपायकारक ठरतो. अत्यंत वैपुल्याने मनावर उमटलेले, अनियंत्रित संगीताचे ठसे हे तर विशेषच अपायकारक असतात. शांत, निःस्तब्ध शेतांमध्ये आणि कुरणांमध्ये, ओकवृक्षांच्या रायांच्या सळसळीमध्ये, निळ्या आकाशातील चंडोलाच्या गाण्यामध्ये, गव्हाच्या पिकलेल्या रोपांच्या कुजबुजीमध्ये, मधमाश्यांच्या आणि भ्रमरांच्या गुणगुणण्यामध्ये संगीताच्या सौंदर्याचा बोध होण्यास आणि त्या सौंदर्याची अनुभूती घेण्यास मुलाना अवसर मिळेल अशारीतीने निसर्गाच्या पार्श्वभूमीवर मुलाना संगीताची गोडी चाखण्यास शिकविले पाहिजे. हे सारे निसर्गाचे संगीत आहे; यातूनच सुरांच्या निर्मितीची माणसाला स्फूर्ती मिळते.

एकूण सौंदर्यशास्त्रीय शिक्षणात आणि विशेषतः संगीताच्या प्रांगणात, सौंदर्यविश्वाचा मुलाना सराव करून देण्यासंबंधी शिक्षणतज्ज्ञाच्या मनात जी मानसशास्त्रीय उद्दिष्टे असतात ती अत्यंत महत्त्वाची आहेत. सुंदरतेशी भावनिक संबंध जोडण्याची **क्षमता** मुलाना शिकविणे आणि सौंदर्यात्मक स्वरूपाच्या ठशांची **गरज** त्यांच्या मनात निर्माण करणे हा माझा मुख्य उद्देश होता. सौंदर्य हा माणसांच्या जीवनाचा अविभाज्य भाग बनला पाहिजे आणि हे कार्य शिक्षणाद्वारेच साध्य होते.

आनंद विद्यालयात संगीताच्या श्रवणाकडे — विविध संगीतकारांच्या संगीताच्या आणि निसर्गाच्या संगीताच्या श्रवणाकडे मी विपुल ध्यान दिले. सूरांबाबत भावनात्मक प्रतिक्रियेला साद घालणे आणि नंतर भोवतालच्या जगाच्या सौंदर्यातच संगीताच्या सौंदर्याचा उगम आहे हे मुलाना हळूहळू पटवून देणे हे आमच्यासमोर उभे असलेले पहिले कार्य होते. सुरामुळे निसर्गाचे संगीत ऐकण्यासाठी माणूस जागच्या जागी थबकला पाहिजे, जगाच्या सौंदर्याचा त्याने आनंद घेतला पाहिजे, ते सौंदर्य त्याने जपले पाहिजे आणि ते वृद्धिंगत केले पाहिजे. अनेक वर्षांच्या अनुभवानी हेच दाखवून दिले आहे की, केवळ शैशवकाळातच मायबोलीवर आणि संगीतास्वादाच्या मूलतत्त्वांवर — सूरांचे सौंदर्य अवलोकण्याची, ते समजावून घेण्याची, ते जाणवण्याची व त्याची अनुभूती घेण्याची क्षमता अंगी बाणविण्यावर — माणूस प्रभुत्व मिळवू शकतो. बालपणात जे गाळले गेले आहे त्याची भरपाई प्रौढ वयात होणे अतिशय कठीण, नव्हे, केवळ अशक्यप्राय आहे. मायबोली, निसर्गाचे सौंदर्य आणि सूर यांची मुलाच्या मनाला जी जाणीव होते त्यात कोणताही भेदभाव नसतो. संगीताच्या सौंदर्याने मुलाच्या हृदयाला जर बालपणातच स्पर्श केला, मानवी भावनांच्या अनेकविध व अनेकांगी छटा मुलाला जर स्वरातून जाणवल्या तर संस्कृतीची अशी एक पातळी ते गाठील की जी पातळी गाठणे इतर कोणत्याही मार्गांनी शक्य होणार नाही. सूराच्या सौंदर्याच्या जाणिवेतून मुलाला स्वतःलाच आपल्या अंतर्यामीच्या सौंदर्याचे दर्शन घडते — त्या छोट्या जीवाला आपल्या प्रतिष्ठेची ओळख पटते. संगीताचे शिक्षण म्हणजे कुणालातरी संगीतकार बनविण्याचे शिक्षण नव्हे; प्रथमतः माणूस बनविण्याचे ते शिक्षण आहे.

...शरत्कालाचे ते सुरुवातीचे दिवस होते. पारदर्शक वातावरणातून प्रत्येक ध्वनी अत्यंत स्पष्टपणे ऐकू येत होता. एका संध्याकाळी आम्ही हिरवळीवर बसलो होतो. रिम्स्की-कोर्साकोव यांच्या, 'त्सार सुलतानची कथा'

या संगीतिकेतील 'भ्रमर-भरारी' हे गाणे आपण ऐकू या अशी मी सूचना केली. संगीताचे ते स्वर ऐकत असताना मुलांकडून मिळणारा भावनात्मक प्रतिसाद लक्षणीय होता. ती म्हणाली: "असे वाटते की भ्रमर जवळ येत आहे आणि पुन्हा दूर जात आहे. छोटचा पक्ष्यांची किलबिलही आपल्याला ऐकू येत आहे..." आम्ही ते गाणे पुन्हा ऐकले आणि नंतर मधुगंधित फुलानी भरलेल्या गवतात गेलो. मुले मधमाश्यांचे गुंजन आणि भ्रमरांचा गुंजारव ऐकत होती. एका फुलावर एक मोठा केसाळ भुंगा फिरत होता. फिरता फिरता तो भुंगा एकदम फुलात शिरलेला मुलानी पाहिला. मुले आनंदली. ध्वनिमुद्रिकेवरील संगीतच जणू तेथे साकार झाले होते; पण त्या संगीत रचनेला एक प्रकारचे अद्वितीय असे सौंदर्य प्राप्त झाले होते. संगीतकाराने निसर्गातून ते उचलले होते आणि आमच्यापर्यंत पोहोचविले होते. मुलाना ते संगीत पुन्हा ऐकावयाचे होते.

त्याच्याच तिसऱ्या दिवशी सकाळी आम्ही आणखी एका जागी गेलो. ती जागा फुलानी डंवरली होती. मुले मधमाश्यांचे गुणगुणणे एकाग्रतेने ऐकत होती आणि केसाळ भ्रमरांचा गुंजारव कानात साठविण्याचा प्रयत्न करीत होती. पूर्वी जे अगदी सामान्य भासत होते त्यातल्या सौंदर्याचा त्याना आता शोध लागला होता—संगीताचे सामर्थ्य हे असे आहे.

पक्ष्यांची किलबिल, पानांची सळसळ, मेघांचा गडगडाट, ओढ्याची झुळझुळ, वाऱ्याचे घोंघावणे... असे अनेक ध्वनी मुलानी आपल्या भोवती कानानी टिपलेले असतात. त्या ध्वनींची पुनर्निर्मिती करणारे आणि मुलाना आकलतील अशा सुस्पष्ट प्रतिमा असलेले संगीताचे काही भाग उचलण्याचा मी प्रयत्न केला... त्याच्याच जोडीला मुलांच्या मनावर प्रतिमांचे डोंगर साचू नयेत याबद्दल मी दक्षता घेतली. मी पुन्हा सांगतो की स्वरप्रतिमांचे वैपुल्य मुलांच्या दृष्टीने चांगले नसते. त्यामुळे मुलांचे मन गोंधळून जाऊ शकते आणि त्यांचा भावनात्मक प्रतिसाद संपूर्णतया नीरस बनू शकतो. महिन्याला मी फक्त दोन गाण्यांचा उपयोग करीत होतो; पण या गाण्यांशी संबंधित असे फार मोठे शैक्षणिक कार्य मी पार पाडीत होतो आणि ती स्वररचना ऐकत असता मुलाना प्रत्येक वेळी नव्या नव्या सौंदर्याचा शोध लागेल असा बिंदू गाठीपर्यंत ते संगीत पुन्हा पुन्हा ऐकण्याची मुलांमध्ये इच्छा उत्पन्न व्हावी हा त्याचा हेतू होता. स्वररचनांच्या श्रवणातून संगीतास्वादाच्या मूलतत्त्वांवरील प्रभुत्वाला एक निश्चित अर्थ प्राप्त झाला पाहिजे; म्हणूनच स्वररचना ऐकत असता त्या दरम्यान उत्स्फूर्त, व्यामिश्र प्रतिमा

निर्माण न होणे हे महत्त्वाचे आहे. स्वररचना ऐकल्यानंतर शेतांवर पसर-लेल्या निःस्तब्ध शांततेत मुलांची श्रवणक्रिया घडली पाहिजे आणि या दोन स्वररचनांच्या बोधनप्रक्रियेत त्याना निसर्गाच्या सौंदर्याचे ज्ञान झाले पाहिजे असा माझा प्रयत्न होता.

आम्ही ओक वृक्षांच्या राईत गेलो. भारतीय उन्हाळ्याप्रमाणे सूर्याचा लख्ख प्रकाश पडला होता. वातावरण शांत होते. वृक्षानी धारण केलेला विविधरंगी पेहेराव सूर्याच्या किरणांत लखलखत होता. शारदीय पक्ष्यांचे मंजुळ स्वर ट्रॅक्टरच्या आवाजात मिसळून जात होते. निळ्याभोर आकाशातून हंसपक्ष्यांचा एक थवा उडत जात होता. आम्ही चैकोवस्कीचे 'शरद्‌गीत (ऑक्टोबर)' ऐकले. आता पिवळ्या पडलेल्या ओकवृक्षांच्या पानांची शांत सळसळ, पारदर्शक हवेचा सुगंध, रस्त्याच्या कडेला शुष्क होऊन पडलेली डेझीची फुले या गोष्टी त्यांच्या नैसर्गिक वातावरणात मुलानी अजून पाहिल्या नव्हत्या; चैकोवस्कींच्या स्वररचनेने त्या गोष्टींचे अनिर्व-चनीय सौंदर्य जाणवण्यास मुलाना मदत झाली.

मुले आनंदात होती; पण त्या आनंदमय स्वररचनेबरोबरच एक किं-चितशी उदास छाया त्यांच्या मनावर दाटली. अभ्राच्छादित दिवस, थंडगार हिमवादळे, आणि लवकर दाटणाऱ्या संध्याछाया आता जवळ येऊन ठेपल्या आहेत हे त्याना जाणवले. त्या संगीताने प्रेरित होऊन ग्रीष्माच्या सौंदर्या-विषयी, शरदातल्या पहिल्या सोनेरी दिवसांविषयी ती बोलू लागली. प्रत्येक मुलाच्या स्मृतिपटलावर एक सुस्पष्ट आणि बोलके असे चित्र उभे राहिले आणि मुलांच्या कल्पनाचक्षूंसमोर ग्रीष्माच्या आणि शरदाच्या प्रतिमा आपल्या सर्व सौंदर्यानिशी तरळू लागल्या. उदाहरणार्थ, लारिसा म्हणाली, "मी आणि माझे वडील घळीत फिरायला गेलो होतो. घळीच्या दोन्ही अंगाना हिरवी थप्पी लागली होती–सर्वत्र सूर्यप्रकाशात न्हाऊन निघालेले फक्त जंगल आणि जंगलच दिसत होतं. कुठेतरी एक पारवा घुमत होता. जंग-लात सारंच काही इतकं सुंदर होतं, इतकं सुंदर होतं... वाटत होतं सारखं फिरतच रहावं आणि सदासर्वकाळ सूर्य प्रकाशतच रहावा. ज्यावेळी भोवती पारवे घुमत असतात त्यावेळी असं वाटतं की जणू काही झाडांची पाने निःस्तब्ध होऊन आपल्या सर्व शक्तीनिशी त्यांचे गाणे ऐकत आहेत."

शूराने आपली आठवण सांगितली: "आई मला शेतावर घेऊन गेली होती. एका कापणीमळणी यंत्राजवळ ती काम करीत होती. माझे काका कापणीमळणी यंत्र चालवतात. त्यांच्याबरोबर मीही यंत्रावर बसलो. मग

मला झोप येऊ लागली. आईने मला ताज्या पेंढ्याच्या गंजीवर झोपवले. माझी नजर निळ्या आकाशाकडे गेली आणि माझी गंजी खूप खूप उंच आकाशात तरंगू लागली. आकाशात थरथरणाऱ्या एका पक्ष्याजवळ मी गेलो; आणि मग तो पक्षी माझ्यापासून दूर उडून गेला. माझ्याबरोबर नाकतोडे तरंगत होते. त्यांचा संपूर्ण गानवृंद गात होता आणि पक्ष्याला भेटण्यासाठी उडत होता. आणि अशा रीतीने मला झोप लागली. मी जागा झालो तेव्हा पक्षी आकाशात अजूनही थरथरत होता आणि नाकतोडे अधिकच मोठ्याने गात होते."

आम्ही पुन्हा चैकोवस्कींचे संगीत ऐकले आणि मला असे वाटले की संगीतातून त्यांच्या हृदयाशी एकजीव झालेल्या ग्रीष्माच्या व शारदीय दिवसांच्या अविस्मरणीय सौंदर्याच्या स्मृतीचे भांडार मुलाना आढळले आहे. नव्या नव्या स्मृती मुले ऐकत होती.

"मी आणि माझे वडील गवताच्या गाडीतून चाललो होतो. मी गवतावर पडले होते आणि आकाशात चांदण्या लुकलुकत होत्या. शेतात क्वेल पक्षी गात होते आणि चांदण्या माझ्या इतक्या जवळ आल्या की नुसता हात पुढे केला तरी छोट्याशा दिव्याप्रमाणे त्या माझ्या हातात येतील असं मला वाटलं."

ही झीनाची आठवण होती. मी स्तिमित होऊन तिचे शब्द ऐकत होतो. ती नेहमीच अगदी मुग्ध असायची. कितीही प्रयत्न केलात तरी तिच्या तोंडून कधी एक शब्दही फुटायचा नाही. परंतु संगीताने तिला बोलायला लावले होते.

स्वर-प्रतिमांच्या सौंदर्यातून आकारास येणाऱ्या कल्पना जागृत करून संगीताद्वारे भावनात्मक प्रतिक्रिया अधिक तीव्र बनविल्या जातात ही एक आनंददायक गोष्ट आहे. संगीताच्या प्रभावाखाली प्रत्येक मुलाने स्वप्ने पहावीत आणि अद्भुत कल्पनाविलासात्मक कथा रचाव्यात असे मला वाटत होते. मुलांच्या स्वभावातील काव्यमयता, स्वप्निलता संगीतामुळे अधिक सखोल बनते आणि ही फार चांगली गोष्ट आहे. तान्या आणि लारिसा यांच्या भावभरित गोष्टी कोल्या आणि तोल्या विचारमग्न होऊन ऐकत होते हे पाहून मला आनंद झाला—त्यांच्याही स्मृती चाळवल्या गेल्या होत्या.

संगीत हे विचारांचे शक्तिशाली उगमस्थान आहे. संगीतास्वादाच्या शिक्षणाशिवाय मुलाचा खराखुरा मानसिक विकास अशक्यप्राय आहे. संगी-

ताचे मूळ केवळ भोवतालच्या जगातच नसते तर ते माणसात असते, त्याच्या विचारांत, शब्दांत आणि त्याच्या आंतरिक विश्वात असते. स्वर-प्रतिमांमुळे वस्तूंची आणि वास्तवातील घटनांची वैशिष्टये नव्याने प्रकट होतात. संगीतामुळे मुलासमोर नव्या प्रकाशात प्रकट झालेल्या वस्तूंवर आणि घटनांवर मुलाचे लक्ष केंद्रित होते आणि त्याच्या विचारांत एक सुस्पष्ट चित्र तयार होते. हे चित्र शाब्दिक आविष्कारासाठी आसुसलेले असते. नव्या कल्पनांसाठी आणि विचारांसाठी आपल्या भोवतालच्या जगातून साहित्य जमा करून मूल शब्दांतून निर्मिती साधीत असते.

संगीत, कल्पनाविलास, उद्भुतरम्यता, परीकथा, सृजनशीलता – या मार्गाने मूल आपल्या आंतरिक सामर्थ्याचा विकास साधू शकते. संगीतामुळे मुलाच्या मनात सुस्पष्ट कल्पना उद्भूत होतात. विचारशक्तीच्या सृजनशील सामर्थ्यांना शिक्षण देण्याची ती सर्वात उत्कृष्ट पद्धत आहे. एडवर्ड ग्रीग यांचे स्वरसंगीत ऐकताना मुलांच्या कल्पनेसमोर जादूच्या गुहा, घनदाट अरण्ये आणि सुष्ट व दुष्ट प्राण्यांची चित्रे उभी राहिली. सर्वात मुग्ध असलेल्या मुलानाही बोलावेसे वाटत होते; परीकथांतील या प्रतिमा कागदावर उतरविण्यासाठी मुलांचे हात पेन्सिलीकडे व चित्रवहीकडे गेले. सर्वात जड वृत्तीच्या मुलांमध्येही संगीतामुळे विचारांची एक शक्ती प्रादुर्भूत झाली. असे वाटत होते की संगीतामुळे मेंदूच्या पेशींत एक अद्भुत शक्ती ओतली गेली आहे. संगीताच्या प्रभावाखाली बौद्धिक सामर्थ्याच्या या विकासामध्ये विचारांची भावनिक उगमस्थाने मला आढळली.

हिंवाळयामध्ये, जेव्हा सर्व रस्ते बर्फात गाडले गेलेले असत अशा वेळी आम्ही आमच्या शाळेच्या वर्गात चैकोवस्की, ग्रीग, शूबर्ट आणि शूमान यांचे संगीत ऐकत बसत असू. संध्यासमयीच्या सुमारास परीकथा-स्वरसंगीत ऐकताना मुलाना विशेष आनंद होई. बाबा-यागा या दुष्ट चेटकिणीबद्दल मी मुलाना उक्रेनियन लोककथा सांगितली आणि नंतर आम्ही चैकोवस्कींची 'बाबा-यागा' ही स्वररचना ऐकली. त्या संगीताच्या प्रभावाखाली ज्या अद्भुतरम्य प्रतिमा आणि कल्पना निर्माण झाल्या त्यांच्या समृद्धतेचे शब्दांत वर्णन करणे केवळ दुरापास्त आहे. आपल्या स्वप्नविलासात मुले अरण्याच्या अगदी खूप खूप पलिकडे, निळया समुद्रापार असलेल्या दूरस्थ पर्वतांवर, गुप्त गुहांमध्ये आणि घळयांमध्ये प्रवास करून आली. मुलानी ज्या विलक्षण अकल्पनीय गोष्टी रचल्या त्या ऐकून मी अचंबित झालो. सदैव त्या माझ्या स्मरणात राहिल्या. युराच्या कल्पनेत बाबा-यागा या दुष्ट चेटकिणीने मानव-

जातीच्या आनंदावर – गाण्यांवर – अतिक्रमण करणाऱ्या मानवद्वेष्टया व्यक्तीचे रूप घेतले. "तिने एक मोठे भांडे घेतले, ती आपल्या उखळीवर बसली (आपल्या पारंपारिक झाडूवर बसण्याऐवजी बाबा-यागा उखळीवरून हिंडत आहे) आणि साऱ्या जगभर ती उडू लागली. एखादे गाणे कानावर पडताच जेथून ते सूर येत असत आणि लोकाना आनंद देत असत त्या ठिकाणी ती उडत जाई आणि आपल्या उखळी तोफेवर ती भांडे आपटी. त्याबरोबर लोकाना गाणे कसे म्हणावयाचे याचाच विसर पडून ते मूक होत. कारण बाबा-यागा ते गाणे आपल्या भांड्यात दडवून ठेवी. अशा रीतीने बाबा-यागाने सर्व गाणी आपल्या भांड्यात दडवून ठेवली. साऱ्या जगात गाणे गाणारा फक्त एकच माणूस उरला आणि तो होता मेंढपाळाचा एक मुलगा. तो आपली बासरी वाजवीत असे आणि गाणी म्हणत असे. बाबा-यागाने आपले भांडे उखळी तोफेवर कितीही आपटले तरी त्याचा काही उपयोग होत नव्हता; कारण ती जादूची बासरी होती. तेव्हा सर्व गाणी आपल्या भांड्यात गोळा करून ती अतिदुष्ट चेटकीण दुःख करीत बसली. सर्व जग मूक बनले होते; कोणीच गात नव्हते आणि कुठेच आनंद नव्हता. मेंढपाळाचा हा मुलगा फक्त बासरी वाजवीत होता. नंतर तो झोपी गेला; तशी बाबा-यागाने त्याची बासरी पळवली. तो मुलगा जागा झाला आणि बाबा-यागाकडे जाण्यासाठी त्याने आपले सर्व शूर मित्र गोळा केले..." त्यानंतर त्या मुलाने सर्व गाण्यांची कशी मुक्तता केली, लोकाना पुन्हा आनंद कसा परत मिळाला याची युराने गोष्ट रचली. संगीताच्या प्रभावाखाली परीकथांतील प्राण्यांच्या ज्या प्रतिमा मूल निर्माण करते त्या किती सुस्पष्ट असतात, सुष्ट आणि दुष्ट मूर्तस्वरूपात कसे उभे रहाते आणि मूल न्यायासाठी चालणाऱ्या झगड्यात कसे सहभागी होते हे पाहिले की मन स्तिमित होते. संगीतामुळे परीकथात्मक प्रतिमा जिवंत हृदयस्पंदानी आणि रोमांचित विचारानी परिप्लुत बनतात. संगीत मुलाला सुष्टतेच्या जगात आणून सोडते.

मुलांच्या विचारक्रियेत जडता आल्याचे मला ज्या ज्या वेळी आढळून येत असे त्यावेळी मी मुलाना ओक वृक्षांच्या राईत किंवा बगिचात घेऊन जात असे. तेथे आम्ही संगीत ऐकत असू आणि सुष्ट आणि दुष्टतेच्या सुस्पष्ट कल्पना मुलांच्या मनात जागृत होत असत. संगीतामुळे विचारांचे जलस्रोत जणू खुले होत असत.

हिंवाळ्याच्या दिवसांत आमच्या शाळेत स्वप्नदुनियेत सफर करणारे

नवे नवे प्रवासी आढळून येऊ लागले. छोटा दान्को तर इतका लाजखुरा होता की त्याच्या तोंडातून एक शब्दही कधी ऐकायला मिळत नसे. पण त्यानेही बाबा-यागाबद्दल स्वतः रचलेली एक गोष्ट सांगितली. अर्थातच युरा-च्या आणि त्याच्या गोष्टीत पुष्कळच साम्य होते. दान्कोच्या गोष्टीत बाबा-यागा आपल्या उखळीवरून साऱ्या जगभर फिरत असे आणि सर्व फुले गोळा करीत असे. नंतर ती आपल्या भयभेसूर स्वयंपाकघरात शिरत असे आणि चुलीवर भांडे ठेवून सारी फुले निष्प्राण होईपर्यंत ती ते भांडे उकळ-वीत असे. "पण मी,"—गोष्टीतील दमदार नायकाची भूमिका मूल अनेक वेळा स्वतःकडे घेत असते—"सगळया फुलांतील बी गोळा केले आणि ते जमिनीत रोवले. पुन्हा सर्वत्र फुले फुलली. बाबा-यागाला हे समजताच ती द्वेषाने इतकी पेटली की तिने आपली उखळ आणि हाडनळी छिन्नभिन्न करून टाकली, आणि आता ती कोणालाही इजा करू शकत नाही."

या कथांनंतर मी शिक्षकांशी बोललो आणि शिक्षणातील अडचणींविषयी आणि अपुरेपणाविषयी मी त्यांच्याशी चर्चा केली. सर्वांनी काढलेला निष्कर्ष एकच होता: विद्यार्थ्यांची शाळेमध्ये जेवढी वर्षे व्यतीत होतात त्या वर्षांपैकी अर्धीअधिक वर्षे विद्यार्थी हे प्रथमतः मूल असते ही गोष्ट आमच्या शिक्षण-पद्धतीत विसरली जाते. कधी कधी मुलाच्या डोक्यात सत्ये, निरीक्षणे आणि निष्कर्ष कोंबीत असताना स्वप्ने, अद्भुतरम्यता आणि सृजनशीलतेचे पंख करकच्च आवळून विचाराच्या आणि जित्याजागत्या शब्दाच्या उगमस्था-नांच्या निकट जाण्यास शिक्षक मुलाला अवसर देत नाहीत. जित्याजागत्या, क्रियाशील, प्रत्यक्ष चालत्याबोलत्या जीवामधून मुलाचे रूपांतर एखाद्या स्मरणयंत्रात होते... असे घडता कामा नये. दगडी भिंती उभारून मुलाना आपण भोवतालच्या जगापासून तोडता कामा नये. आत्मिक जीवनाच्या आनंदापासून विद्यार्थ्यांना आपण वंचित करता कामा नये. खेळ, परीकथा, संगीत, अद्भुतरम्यता आणि सृजनशीलता यांच्या विश्वात मूल जेव्हा जगते तेव्हाच त्याचे आत्मिक जीवन खरेखुरे आत्मिक जीवन ठरते. तसे जर नसेल तर मूल आणि सुकलेले फूल यांत काही अंतर उरणार नाही.

अभ्यास म्हणजे केवळ गंमतीचा खेळ नव्हे यात शंकाच नाही. अभ्यास हा प्रथमतः परिश्रमाचाच भाग आहे. पण हे श्रम संघटित करताना मुलाच्या बौद्धिक, नैतिक, भावनिक आणि सौंदर्यात्मक विकासाच्या प्रत्येक टप्प्याला आपण मुलाचे आंतरिक विश्व लक्षात घेतले पाहिजे. मुलाचे बौद्धिक श्रम आणि प्रौढ माणसाचे बौद्धिक श्रम यात फरक आहे. मुलाच्या दृष्टीने ज्ञान-

प्राप्तीचे अंतिम उद्दिष्ट ही प्रौढांप्रमाणे त्याच्या बौद्धिक प्रयासांची मुख्य प्रेरणा होऊ शकत नाही. मुलाच्या मानसिक श्रमाचे जे स्वरूप आहे त्या प्रत्यक्ष स्वरूपातच, त्याच्या विचाराच्या भावनिक रंगछटांतच आणि बौद्धिक अनुभूतींतच मुलाच्या ज्ञानार्जनाच्या इच्छेचे उगमस्थान आपल्याला पहावयास मिळते. हा मूळ झरा जर आटला तर हातात पुस्तक घेऊन मुलाला अभ्यासाला लावणारा दुसरा कोणताही मार्ग उरणार नाही.

आनंद विद्यालयाचा पहिला हिंवाळा मी कधीही विसरणार नाही. संगीत नसते, अद्भुतरम्य कल्पनाविलास नसता किंवा सृजनशीलता नसती तर आमची ऊबदार, आरामशीर वर्गाची खोली म्हणजे एक वैतागवाडी बनली असती. संगीताने आमच्या भोवतालचे जग विलक्षण मोहकतेने भारून टाकले. जानेवारीच्या संध्यासमयीची खिन्न, उदासीनता दाटली असताना, चंद्राच्या किरणांत बर्फाचे चंदेरी गालिचे चमकत असताना, झंझावाती वारे किंवा हिमवादळे घोंघावत असताना, गोठलेल्या तळ्यांतील बर्फ दुभंगत असताना त्या सर्वांमध्ये आमच्या कल्पनाविलासात आम्ही परीकथांतील प्राण्यांचा संचार पहात होतो.

आनंद विद्यालयाच्या पहिल्या वसंताचे आगमन झाले. झरे झुळझुळायला लागले. क्रोकस फुलाना बहर आला. सफरचंदाची आणि पिअरची झाडे मोहोरून आली आणि त्या शुभ्र उत्सेकामध्ये भ्रमरांचा गुंजारव ऐकू येऊ लागला. वासंतिक अरण्ये, निळे आकाश, कुरणे आणि स्टेप प्रदेशांचे संगीत आम्ही कानात साठवू लागलो.

एका शांत संध्याकाळी आम्ही चराऊ मैदानात गेलो. नाजूक पालवी फुटलेली पुसी-विलोची झाडे जणू काही अंतर्मुख होऊन आमच्यासमोर उभी होती आणि तळ्यात अथांग आकाशाचे प्रतिबिंब पडले होते. त्या स्वच्छ निळ्याभोर आकाशातून हंसांचा एक थवा उडत चालला होता. त्या रम्य संध्याकाळचे संगीत आम्ही एकचित्ताने ऐकत होतो. तळ्यातून कुठूनतरी एक मोठा नवलपूर्ण आवाज आम्हाला ऐकू आला. क्लॅव्हिकॉर्डच्या स्वरपट्ट्यांवर कोणी अगदी हळुवारपणे हात फिरवीत आहे असा तो आवाज होता. असे वाटत होते की जणू काही प्रत्यक्ष ते तळे, त्याचे काठ आणि ते आकाश त्या आवाजाने झंकारत होते. "कमाल आहे; काय असावे ते?" वान्या कुजबुजला. "वासंतिक कुरणांचे ते संगीत आहे," मी म्हटले. "तळ्यामध्ये तुम्हाला निळ्या आकाशाचे प्रतिबिंब दिसत आहे ते पाहिलेत ना? त्या तळ्यात खूप खोल स्फटिकाची एक प्रचंड घंटा आहे. तेथे एक

सुंदर राजवाडा आहे आणि त्या राजवाड्यात एक सुंदर मुलगी रहाते. तिचं नाव वासंती. आपल्या सोनेरी घणानी ती स्फटिकाची ती घंटा वाजवते आणि तो ध्वनी सर्व कुरणांतून पसरतो."

तो आवाज पुन्हा ऐकू आला. कोल्याने स्मित केले: "हां, तो तर बेडूक ओरडतोय," तो म्हणाला. मला भीती वाटली की आता मुलेही हसायला लागतील आणि प्रत्येकावर जी विलक्षण मोहिनी पडली होती ती मोहिनी विरून जाईल. परंतु कोणीच काही बोलले नाही. "कदाचित तो बेडूक असेल, कदाचित तो बेडूक नसेलही," साशा म्हणाला. "आणि समजा तो बेडूक असला तर खुशाल असू दे. कुरणाचे गीत तरीही कायमच आहे."

या शब्दाना जणू काही उत्तर म्हणून शेजारच्या तळ्यावरून एक आवाज आला आणि काही क्षणानी दूरच्या कुरणातून त्या आवाजाला प्रत्युत्तर मिळाले. वासंतिक कुरणांच्या त्या विलक्षण संगीताने आम्ही मोहून गेलो. हे संगीत म्हणजे आशादायी जागतिक दृष्टिकोनाचा जीवनदायी स्रोत होता. सौंदर्याच्या अस्तित्वाचे आकलन होण्यास, ते शोधून काढण्यास आणि त्याच्या आनंदाची अनुभूती घेण्यास त्यामुळे मुलाना मदत झाली. माझ्या दृष्टीने सौंदर्याचे सुसंवादित्व आणि एकरूपता हे एक असे तेजोवलय आहे की जे बालपणीच्या अविस्मरणीय आठवणींभोवती नेहमीच विलसत रहाते.

एप्रिल महिन्यातल्या पहिल्याच सूर्यप्रकाशित दिवशी दफनभूमीच्या प्राचीन टेकड्या धुक्याच्या विरल पटलात लहरत असताना आम्ही चंडोलाचे गाणे ऐकण्यासाठी स्टेपमध्ये गेलो. आणि तेथे निळयाभोर आकाशात भुऱ्या-करड्या रंगाचा तो चिमणा जीव भिरभिरत होता. रुपेरी घंटेचा तो कोमल नाद आमच्या कर्णेंद्रियापर्यंत पोहोचला आणि मग एकदम स्पब्ध झाला. त्या भुऱ्या-करड्या जीवाने धरतीवर झेप घेतली. हिंवाळी गव्हाच्या नाजूक, कोवळया पात्यांवर त्या चिमण्या पक्ष्याने आपले पंख पसरले आणि हळू हळू एक अदृश्य धागा चोचीत पकडून तो उंच, उंच जाऊ लागला. त्यानंतर आम्हाला जो नाद ऐकू आला तो छोट्या घंटेचा नव्हता तर एखादी रुपेरी तार छेडल्याचा तो नाद होता... हे अप्रतिम संगीत मुलांच्या हृदयाला जाऊन भिडावे आणि भोवतालच्या जगाच्या सौंदर्याचे त्याना दर्शन घडावे असे मला वाटले. त्यानंतर मुलाना मी चंडोलाची गोष्ट सांगितली.

"चंडोल म्हणजे सूर्याचा पुत्र. हिंवाळ्यात सूर्य आपल्यापासून खूप खूप दूर जातो. सारी धरणी बर्फाच्छादित आणि हिमाच्छादित होते. अगदी

सावकाश हळूहळू सूर्य आपल्याकडे पुन्हा येऊ लागतो. बर्फ वितळविणे त्याला कठीण जाते. म्हणून बर्फाच्या थरावर तो ठिणग्यांचा वर्षाव करतो. जेथे या ठिणग्या पडतात तेथे वितळणारे बर्फाचे तुकडे जिवंत बनतात आणि त्यांतून एक सुंदर पक्षी जन्म घेतो. तोच हा चंडोल. सूर्याला भेटण्यासाठी तो निळ्या आकाशात भरारी मारतो. उडता उडताच तो गाणी गात असतो आणि सूर्यही रुपेरी ठिणग्यांची पखरण करीत असतो. चंडोल निळ्याभोर आकाशात विहरत असताना त्याचे लक्ष धरतीकडे असते आणि सर्वांत तेजस्वी ठिणगीचा तो शोध घेत असतो. अशी ठिणगी दिसताच तो एखाद्या दगडासारखा जमिनीकडे सूर मारतो आणि ती ठिणगी तो चोचीत पकडतो. त्याबरोबर त्या ठिणगीचे रूपांतर निमिषार्धात एका नाजूक रुपेरी धाग्यात होते. त्या धाग्याचे एक टोक तो गव्हाच्या एका पेरावर ठेवतो आणि दुसरे टोक तो उंच उंच निळ्या आकाशाकडे, सूर्याकडे खेचत नेतो. त्याला उंच उंच जाणं किती कष्टाचं जातंय पहा, त्याचे करडे पंख कसे फडफडताहेत पहा. तार छेडावी तसा तो रुपेरी धागा छेडतो आहे आणि चंडोलाची भरारी जितकी उंच जात आहे तितका त्या तारेचा झंकारही वाढत आहे. चंडोल तो धागा अगदी सूर्यापर्यंत खेचत नेतो आणि दुसरी ठिणगी शोधण्या-साठी तो पुन्हा धरतीवर येतो."

निसर्गनियमांच्या ज्ञानामुळे परीकथेत अडथळा येत नाही का? नाही; उलट आपले निवेदन त्यामुळे अधिक सुलभ बनते. अजस्त्र लोहार, बाबा-यागा, अमर भुंजग हे जसे खरे नाहीत हे मुलाना समजते त्याचप्रमाणे पृथ्वीच्या एखाद्या तुकड्याचे जिवंत प्राण्यात रूपांतर होऊ शकत नाही हेही त्याना चांगलेच समजते. पण मुलांकडे या सर्व गोष्टी नसतील, सुष्ट आणि दुष्ट यांमधील झगड्याचा ती जर अनुभव घेऊ शकली नाही, सत्य, सन्मान आणि सौंदर्य यांचे प्रतिबिंब परीकथांत पडलेले असते हे जर त्याना प्रतीत झाले नाही तर त्यांचे विश्व बजबजाटाने आणि बेचैनीने भरून जाईल.

चंडोलाच्या गोष्टीमुळे निसर्गाच्या संगीताचे आकलन होण्यास मुलाना मदत झाली आणि स्वरसंगीताचे श्रवण करण्यासाठी त्यांच्या मनाची एक बैठक तयार झाली. आम्ही शाळेत परतलो आणि चैकोवस्कींची 'चंडोलाचे गाणे' ही स्वररचना ऐकली. संगीताच्या स्वरलहरींमध्ये निबद्ध झालेल्या रुपेरी घंटेच्या नादाने आणि हिरव्या शेताला आणि सूर्याला जोडणाऱ्या नाजूक रुपेरी तारेच्या आरोहावरोहाने मुले प्रभावित झाली. आम्ही हे गीत अनेक वेळा ऐकले—अगदी सुंदर, स्वच्छ सकाळच्या वेळी आणि कुंद पाव-

साळी दिवसांतही. पण मुलांच्या सदैव आठवणीत राहिले ते अप्रतिम, सूर्य-प्रकाशित विश्व, निळे आकाश, भुऱ्या-करडया रंगाचा तो चिमुकला जीव आणि विस्तीर्ण शेते. त्या पक्ष्याविषयीच्या कल्पना मुलाना सुस्पष्ट परीकथा-त्मक प्रतिमांमध्ये निबद्ध करावयाच्या होत्या. तो चंडोल, त्या रुपेरी ठिण-ग्या, आणि धरतीपासून सूर्यापर्यंत पसरलेली ती तार याची मुलानी अनेक परीकथाचित्रे काढली.

मुलाना ज्या संगीतरचना आवडल्या त्यांचा हळू हळू आम्ही एक संग्रह तयार केला. अनेक वेळा आम्ही आमच्या खोलीत जात असू आणि संगीत ऐकत असू. मी या संग्रहाला नाव दिले होते आमची "संगीत-रत्नमंजुषा". मुलाना हे नाव आवडले आणि ती अभिमानाने म्हणाली: "आमच्याकडे संगीत-रत्नमंजुषा आहे." प्रतिवर्षी या संगीत-खजिन्यातील सर्वोत्कृष्ट कृती निवडाव्यात आणि माणसाने आणि निसर्गाने निर्माण केलेल्या सौंदर्याचा जेथे आम्हाला आस्वाद घेता येईल असे एक संगीत दालन उघडावे अशी मला कल्पना सुचली. आम्हाला तेथे गाणी म्हणता येतील आणि व्हायोलिन व पियानो शिकता येईल ही माझी कल्पना होती. पण या साऱ्या पुढच्या गोष्टी होत्या; आता आम्हाला शिकावयाची होती ती बासरी.

एका अभ्राच्छादित दिवशी आम्ही राईत गेलो आणि एल्डरबेरी झाडाची एक नळकांडी तोडून आणली. आम्ही ती घासून चकचकीत केली आणि त्या नळकांडीला भोके पाडली. आनंदी चिमुकल्या मेंढपाळाविषयीच्या एका उक्रेनियन लोकगीताची सुरावट मी त्या बासरीवर वाजविली. मुलाना त्यावेळी झालेला आनंद केवळ अवर्णनीय होता. आपल्यालाही सूर काढता येतील का अशी प्रत्येक मुलाला उत्कंठा लागली होती आणि त्यांच्या मनात स्वतःच्या संगीत वाद्यांविषयीची स्वप्ने तरळू लागली. त्यानी आपापल्या स्वतःच्या बासऱ्या बनवल्या. लीदा, लारिसा, युरा, तीना, सिऱ्योझा आणि कोस्त्याला संगीताची, सूरांची चांगली जाण होती आणि स्वरसंगीताच्या बाबतीत त्यांचे मन संवेदनाक्षम होते. काही दिवसांतच मुलांच्या बासरींतून लोकसंगीताचे आणि नृत्यसंगीताचे स्वर उमटू लागले. त्या शांत संध्याकाळचे क्षण मी कधीही विसरणार नाही. तीनाने एका जुन्या उक्रेनियन लोकसंगी-ताचे स्वरसंगीत वाजवून दाखविले. त्या चिमण्या मुलीचे डोळे चमकत होते आणि तिच्या गालावर लाली चढली होती. तिच्या आईने मला सांगितले की तीना खूप वेळ घराच्या बागेत बसते आणि बासरीवर गीतांचे सूर

काढीत ती स्वररचना "तयार करीत असते." अशा वेळी कधी तिची स्वप्नाळू नजर आकाशाकडे किंवा झाडांकडे लागलेली असते.

एके दिवशी मी सकाळी लवकरच शाळेत आलो. सर्वत्र शांतता होती. इतक्यात, अचानक, बागेच्या अगदी मागच्या कोपऱ्यावरून बासरीचे अत्यंत हळुवार स्वर माझ्या कानी आले. कोणीतरी काहीतरी गीत वाजवत होते आणि स्वतःच बनविलेली ती सुरावट होती हे अगदी उघड दिसत होते. त्या सर्व गीतामधून खिन्नतेचा एक जास्वंदी धागा गुंफला गेला होता, पण तो अत्यंत लखलखीत आणि विशुद्ध होता. त्या संगीतकाराच्या समाधीचा भंग होऊ नये म्हणून अतिशय सावधानतेने मी गुलाबांच्या झाडांशी गेलो. तीना तेथे हिरवळीवर बसली होती. असे वाटत होते की ती बासरी म्हणजे तिच्या अस्तित्वाचाच एक भाग होता. तीना एक गुलाबाकडे अत्यंत स्निग्ध, गोंजारत्या नजरेने पहात होती. आणि मग त्या गीताचा अर्थ माझ्या ध्यानात येऊ लागला. त्या सुंदर फुलाविषयीचे, निळया वासंतिक आकाशाविषयीचे ते सूर होते. ज्या सूरांत खिन्नता जाणवत होती ती वास्तविक खिन्नता नसून मनाची एक प्रकारची अस्वस्थता होती. भविष्याविषयीचे विचार ती आपल्या संगीतात ओतीत होती.

कोस्त्यालाही बासरीची आवड निर्माण झाली होती. एका हाताने बासरी वाजविणे त्याला कठीण जात होते; पण लवकरच तो कित्येक लोकगीतांची सुरावट वाजवावयास शिकला आणि मग त्याने स्वतःच्या रचना सुरू केल्या — त्याच्या संगीतात अद्‌भुतरम्य कल्पना आकार घेऊ लागल्या, त्याच्या विचाराना, भावनाना आणि अनुभवाना संगीतातून व्यक्तीकरण मिळू लागले. एके दिवशी आकाशात मेघगर्जना चालू असता आम्ही आमच्या स्वप्नांच्या मांदीकोपऱ्यात बसलो होतो. हळू हळू गडगडाट थांबला आणि आकाशात इंद्रधनुष्याची कमान पसरली. त्या सुंदर देखाव्याने मोहित होऊन प्रत्येकजण स्तब्ध बसला होता. आमच्या कानावर गीताचे शांत स्वर पडले. कोस्त्या बासरी वाजवीत होता. अधीर खळखळाटाने भारलेल्या फेसाळत्या ओढ्याचे नाद त्याने आपल्या संगीतात पकडले होते. गडगडाटी पावसाची सूचना देणारे काळे ढग पांगले होते आणि दूरवरून कुठूनतरी मेघगर्जनेचा आवाज येत होता. आम्ही ऐकत आहोत याचेही भान तो छोटा जीव विसरला होता; आपल्या निर्मितीत तो आपले सर्वस्व ओतीत होता. अचानक आपल्या वर्गबंधूंचे अंतर्मुख चेहरे त्याच्या नजरेस आले आणि तो एकदम ओशाळला... ही सर्वच मुले संगीतकार होणार होती अशातला प्रकार

नाही. तसे काहीच नव्हते ; पण प्रत्येक माणसामध्ये संगीताच्या रसास्वादाची गोडी निर्माण करता येणे अगदी शक्य आहे असा माझा दृढ विश्वास आहे.

या साध्या लोकसंगीताने भारून जाणे ही आमच्या प्रत्येकाच्या दृष्टीने एक अगदी व्यक्तिगत बाब होती. अनेक वेळा आम्हाला असाधारण अशी "संगीताची ऊर्मी" येत असे : कुठेतरी बसून बासरी वाजवावी अशी इच्छा मुलांच्या मनात निर्माण होई. पुष्कळ वेळा सूर्यास्तानंतरच्या शांत संध्या-काळी, ज्यावेळी सूर्य क्षितिजाखाली गेलेला असतो पण पृथ्वीवर अजून त्याचा परावर्तित प्रकाश रेंगाळत असतो अशा काळात जे क्षण निर्माण होतात त्या क्षणांच्या काळात मुलाना ही मन:स्थिती घेरून टाकीत असे. संगीतातून आम्हाला आनंद आणि समाधान मिळू लागले होते या विचारातून आम्हाला लाभणारे सुख फार मोठे होते.

कोल्याला संगीताची चांगली जाण होती आणि लोकगीतांचे सूर त्याने फार लवकर उचलले होते. एके दिवशी रानातून परत येत असता मी कोल्याला म्हटले, "रुपेरी माळा बनविणाऱ्या लोहारांचे तू कसे चित्र काढले होतेस ते आठवते तुला? तुझ्या बासरीतून तू या लोहारांचे चित्र उभं करण्याचा का प्रयत्न करीत नाहीस? – ते घण कसे घालतात, थंड ठिणग्या पृथ्वीवर कशा पडतात..."

"परंतु ठिणग्या थंड नसतात," कोल्याने जोरदार हरकत घेतली. "त्या तप्त असतात – विश्वास बसणार नाही इतक्या तप्त असतात..."

"होय, अर्थातच त्या तप्त होत्या... ऐरणीवर पडलेल्या घणाच्या घावातून उडणारी कोणतीही गोष्ट थंड असू शकत नव्हती. मीही माझ्या बासरीतून लोहारांचे – सूर्याच्या लोहारांचे – चित्र उभं करण्याचा प्रयत्न करणार होतो."

दुसऱ्या दिवशी सकाळी आम्ही शाळेच्या बगिचात गेलो. आमच्या बासरीवरील साध्या सरळ स्वरसंगीतातून आम्ही त्या अप्रतिम लोहारांचे वर्णन केले. आम्हाला एकमेकांचे विचार नुसतेच कळले नाहीत तर ज्या भावस्थितींच्या प्रभावाखाली आमच्या स्वररचना निर्माण झाल्या होत्या त्या भावस्थितीही आम्हाला जाणवल्या. कोल्याचे 'लोहार' संगीत मी कान देऊन ऐकत होतो. घणांचे निनादते घावच केवळ त्याने अत्यंत नाजूकपणे उभे केले नव्हते तर त्यांची विराट ताकदही त्याने टिपली होती. शेतांवर आणि बगिच्यांवर पडणाऱ्या रुपेरी ठिणग्यांच्या सौंदर्याने तो स्तिमित झाला होता आणि संपूर्ण पृथ्वीचा आपण वेध घेऊ शकत नाही म्हणून त्याला वाईट

वाटत होते. अस्फुटपणे जाणवणारे प्रत्येक गोष्टीतले सौंदर्य त्याला पहा-
वयाचे होते.

आता या मुलाच्या हृदयाकडे जाणारा मार्ग मला निश्चितपणे सापडला होता. संगीतामुळे मनाला शिकवण मिळते, भावना मानवी बनतात. शब्दां-प्रमाणेच संगीतातही खरीखुरी मानवता व्यक्त होते. संगीताविषयी मुलाची संवेदनक्षमता विकसित करताना आपण त्याचे विचार आणि त्याच्या आशा-आकांक्षा उदात्त बनवीत असतो. प्रत्येक हृदयातील मानवी भावनांचा जीवन-दायी झरा संगीतामुळे खुला झाला पाहिजे. आपल्या मायभाषेतील जित्या-जागत्या, लहरत्या शब्दांप्रमाणेच संगीतामुळे मुलासमोर भोवतालच्या जगातील सौंदर्य प्रकट होते. पण संगीत ही मानवी भावभावनांची भाषा आहे आणि केवळ विश्वसौंदर्यापेक्षा अधिक कशाचेतरी ते मुलाच्या मनाला दर्शन घडवीत असते. संगीतातून माणसाला मानवी महानतेचा आणि मानवी प्रतिष्ठेचा साक्षात्कार घडतो. ज्या क्षणी मूल संगीताचा आस्वाद घेत असते त्यावेळी आपण खरोखरच माणूस आहोत याची त्याला प्रतीती येत असते. मुलाचे मन हे एखाद्या संवेदनाक्षम संगीतकाराचे मन असते. त्या मनात घट्ट पिळलेल्या तारा असतात आणि तुम्ही त्याना नुसता स्पर्श करू शकलात तरी त्यांतून लाक्षणिक अर्थाने नव्हे तर अगदी शब्दश: मनमोहक संगीताचे सूर झंकारू लागतील. खेळांशिवाय किंवा परीकथांशिवाय बालपण जितके अशक्य आहे तेवढेच संगीताशिवायही ते अशक्य आहे.

संगीत ही अशी एक सर्वोदात्त पार्श्वभूमी आहे की त्या पार्श्वभूमीवर शिक्षक आणि विद्यार्थी यांच्यामध्ये एकरूपता निर्माण होऊ शकते हे अनु-भवाने दाखवून दिले आहे. संगीतामुळे माणसाची हृदये खुली होतात. संगीत ऐकत असता, त्याचे सौंदर्य अनुभवीत असता आणि त्या सौंदर्याचा आस्वाद घेत असता शिक्षक आणि विद्यार्थी परस्परांच्या अधिक निकट येतात; त्यांच्यातील परकेपणा नाहीसा होतो.

असा सामायिक अनुभव केवळ संगीतच देऊ शकते. संगीताशिवाय मुलांमधील ज्या गोष्टी कधीही प्रत्ययास येत नाहीत त्या गोष्टी अशा सामा-यिक अनुभूमीच्या क्षणी शिक्षकाच्या प्रत्ययास येऊ शकतात. संगीताच्या प्रभावाखाली मन एका उदात्त अनुभवाच्या पातळीवर जाऊन पोहोचते आणि अशा क्षणी मूल आपली भयभीती, आपल्या चिंता-विवंचना खुल्या मनाने

शिक्षकासमोर मोकळ्या करते. अशाच एका क्षणी कोल्याने मला सांगितले की घरी त्याने एक वही तयार केली आहे आणि ज्या ज्या गोष्टींनी त्याचे मन थरारून गेले आणि त्याच्या मनाला आनंद दिला त्या सर्व गोष्टींची चित्रे त्याने त्या वहीत काढली आहेत. त्यानंतर त्या चिमुकल्या मुलाने आपली चित्रे मला दाखविली. स्वप्नांच्या एका विशाल विश्वाचे मला त्यांतून दर्शन घडत होते. कोल्याला ट्रॅक्टर-चालक व्हावयाचे होते, सीमासंरक्षक सैनिक बनावयाचे होते.

## हिंवाळयातील आनंद आणि जोपासना

हिंवाळा... या आल्हाददायक काळात केवढ्या उत्कृष्ट शैक्षणिक आणि विकासात्मक संधी दडलेल्या आहेत. मुलाना केवळ उन्हाळयातच आरोग्य-संपन्न ठेवता येते असे जे म्हणतात त्यांची ती एक गंभीर चूक असते. मुलांची प्रकृती अधिक सुदृढ बनविण्यासाठी हिंवाळयातील माफक थंड तपमानांचा, मृदू, वैपुल्ययुक्त बर्फवृष्टींचा उपयोग करून घेता आला नाही तर ग्रीष्माचाही काही उपयोग होणार नाही. थंडीवारा सहन करण्यास, स्वच्छ, थंड हवा फुफ्फुसात शोषून घेण्यास मी मुलाना शिकविले.

सकाळी सूर्योदयाचे स्वागत करण्यासाठी आम्ही शाळेच्या उष्णतागृहात गेलो. सूर्याची ओसंडती किरणे आमच्या उष्णतागृहापर्यंत पोहोचली होती आणि उष्णतागृहाच्या कक्षामार्गाच्या गोठलेल्या तावदानांवर त्यानी जांभळ्या रंगाच्या चित्रविचित्र आकृत्यांची सजावट चढविली होती. त्या प्रत्येक तावदा-नातून आमच्या कल्पनाचक्षूंसमोर एक नवलपूर्ण विश्व उभे रहात होते: आम्हाला त्यात अद्भुतरम्य प्राणी दिसत होते, पर्वतांतील रहस्यमय खिंडी दिसत होत्या, ढग दिसत होते आणि फुले दिसत होती. येथे, या गोठलेल्या काचेशेजारी मुलानी अनेक गोष्टी रचल्या. येथेच ते वाचायला शिकले; पण त्याविषयी मी नंतर सांगेन.

सूर्याचे स्वागत केल्यानंतर मुलानी कक्षामार्गातून उष्णतागृहाचे दार उघडले आणि फुलांच्या दुनियेत त्यानी पदार्पण केले. त्या हिंवाळयात आमच्या एक उष्णतागृहात क्रिसँथिममची फुले फुलू लागली होती. तेथे प्रत्येक मुलाचे एक स्वतःचे फूल होते—त्याचा खास दोस्त. मुलानी फुलझाडाना पाणी घातले. ते मोठे आल्हाददायक क्षण होते. पाण्याच्या त्या छोट्याशा थेंबांतून इंद्र-धनुष्ये प्रदीप्त होत होती. मुले कौतुकमिश्रित नजरेने त्यांच्याकडे पहात होती

आणि त्यांच्या मनात ग्रीष्माची स्वप्ने फुलत होती... येथेच सूर्यकिरणांच्या पुलाची – सुवर्णांकित इंद्रधनुष्याची – गोष्ट जन्माला आली.

प्रत्येक हिमवादळानंतर, धरतीवर पुन्हा एकदा शुभ्र हिमाचे वेष्टन पडलेले असता, आम्ही शाळेच्या बगिच्यात बर्फाच्या राशी पहावयास जात असू. बर्फांच्या राशींचे हे विश्व मोठे विस्मयजनक भासे. मेघांच्या दुनियेइतकीच ही दुनियाही रहस्यमय व अनपेक्षित गोष्टींनी भरलेली असे. बर्फाच्या या चित्रविचित्र राशींमध्ये मुलाना कधी उत्तुंग व दुर्गम पर्वतशिखरांवरील परीकथांतील किल्ले, कधी समुद्राच्या गोठलेल्या लाटा, कधी एखादा शुभ्र हंसपक्षी, कधी भुरा लांडगा तर कधी लबाड कोल्हा यांची चित्रे दिसत असत. एके दिवशी तर असे दिसले की निसर्गाने जणू खास आमच्यासाठीच परीकथेतील एक जहाज तयार केले आहे; त्या जहाजाला शिडे होती, सारंगाच्या सुकाणूची जागा होती, नांगर होता आणि तेथे दूरवर पहात उभे असलेले चाचे होते. वाऱ्याने आणि सूर्यकिरणानी ते जहाज नष्ट होईपर्यंत ओळीने कित्येक दिवस आम्ही ते जहाज पहायला जात असू. चाचे, दुर्बलांचे आणि अन्यायाला बळी पडलेल्या लोकांचे रक्षण करणारे सदय लोक, सुष्ट आणि दुष्ट यांमधील झगडा, सत्याचा अन्यायावरील विजय यांविषयीच्या गोष्टी ऐकण्यासाठी मुले संध्याकाळी शाळेत येत.

फार थंडी असताना आम्ही फिरायला जात नसू. सौम्य हवामान असतानाच मुले बाहेर पडत आणि बर्फ वितळत असताना तर उत्सवी वातावरण निर्माण होई. बालवीरानी आम्हाला बर्फाचा किल्ला बांधावयास मदत केली. बर्फाच्या लाद्यांतून गुहेसारखी एक वास्तू आम्ही तयार केली. येथे कामाला आणि विश्रांतीला परीकथांची व खेळांचीही जोड मिळत होती. आपण ध्रुवप्रदेशाचा शोध घेणारे संशोधक आहोत अशी आम्ही कल्पना करीत असू. हिमप्रदेशातील भन्नाट शांततेविषयी मी मुलाना गोष्टी सांगत असे. अद्भुतरम्यता आणि मानवाची प्रत्यक्ष, शौर्यशाली कृत्ये यांची येथे गुंफण होत असे. पुढे हा किल्ला सूर्याच्या किरणानी वितळून गेला आणि मुलानी दुःखित मनाने त्याचा निरोप घेतला.

त्या हिंवाळ्यात दोनदा आम्ही रानात गेलो – एकदा मोटारीने आणि एकदा त्रोइकांत* बसून. हलक्या हिमसेकाने आमचे गाल लालबुंद झाले, पण गारठ्याविषयी कोणीही तक्रार केली नाही. तेथे व्यतीत केलेले दिवस

---

*त्रोइका – तीन घोड्यांची रशियन गाडी. – अनु.

मुले कधीही विसरली नाहीत. हिंवाळी अरण्याचे संगीत आम्ही तेथे ऐकले आणि पक्ष्यांच्या जीवनाचे निरीक्षण केले. अरण्याच्या घळीत न गोठलेला झरा आम्ही तेथे पाहिला. आम्ही तेथे शेकोटीची ऊब घेतली आणि पेजही बनवली. सूर्यास्ताचे सौंदर्य आम्ही नजरेने प्राशन करीत होतो. सूर्यास्ताच्या किरणांत आमच्या नजरेसमोर हिमवेष्टित फांद्यांचा रंग पालटत होता. आधी तेथे फिक्कट गुलाबी रंग पसरला होता, मग त्या फांद्या शेंदरी बनल्या, मग त्यांच्यावर गडद किरमिजी रंग चढला आणि शेवटी त्या जांभळया निळ्या दिसू लागल्या. या अद्‌भुतरम्य, असामान्य सौंदर्याने मुलांची मने खेचून घेतली आणि सूर्याविषयीची परीकथा नव्या प्रतिमानी अधिकच समृद्ध बनली. हिंवाळी अरण्याचे मुलांच्या मनावर जे बिंब उमटले त्याचा आविष्कार करणाऱ्या कविता आम्ही तयार केल्या. संपूर्णतया हिमाच्या वसनात वेष्टित झालेल्या देवदार वृक्षांच्या सौंदर्याने मोहित होऊन कात्या म्हणाली:

"देवदार वृक्ष झोपी गेला आहे."

झीनाच्या नजरेसमोर अधिक सुस्पष्ट प्रतिमा उभी राहिली:

"देवदार वृक्ष ग्रीष्म येइतो झोपी गेला आहे..."

"वसंतकालापर्यंत निजला देवदार रानी," सिऱ्योझा म्हणाला आणि त्या शब्दांतील स्वरमाधुर्य प्रत्येकाला जाणवले. आपल्या वर्गबंधूच्या कल्पनेचा धागा मुलाना पुढे न्यावयाचा होता.

"अखंड निद्रा घेत घेत हा गुंगतसे स्वप्नी," त्यांच्यापैकीच कोणीतरी म्हणाले.

आणि त्या छोटया मुला-मुलीनी गाण्याचा ताल धरला:

"वसंतकालापर्यंत निजला देवदार रानी
अखंड निद्रा घेत घेत हा गुंगतसे स्वप्नी"

हे गाणे गात असताना अभिमानाची एक भावना ती मुले अनुभवीत होती; कारण ते गाणे त्यानी स्वत: तयार केले होते. हिंवाळयातली ती संध्याकाळ म्हणजे मुलाच्या आत्मिक ऐश्वर्याचे संपूर्ण विश्व माझ्यासमोर खुले करणारी संध्याकाळ ठरली. मुलाना विचारांची शिकवण देण्यासाठी, त्यांचे बौद्धिक सामर्थ्य आणि क्षमता विकसित करण्यासाठी आपण त्याना विचारांच्या आणि भाषेच्या उगमस्थानांच्या थेट संपर्कात आणले पाहिजे याची मला अंतिम खात्री पटली.

बर्फाचा माणूस बनवायला किंवा घसरगाडीतून बर्फावरून घसरगुंडी करायला कोणत्या मुलाला आवडत नाही? सौम्य थंडीत, हवामान शांत

असताना, विशेषत: आकाशात तेजस्वी सूर्य प्रकाशत असताना आम्ही संपूर्ण दिवस बाहेर काढीत असू. खेड्याच्या वेशीजवळ आम्ही बर्फाचा एक डोंगर तयार केला. आम्हाला लाकडाच्या किंवा धातूच्या घसरगाड्या आवडत नव्हत्या; कारण त्या पुरेशा वेगाने जात नसत. म्हणून आम्ही सुमारे वीस बर्फाच्या गाड्या बनवल्या: आम्ही पेंढा घेतला आणि तो शेणात कालवला, त्यावर थंड पाणी ओतले आणि त्याला छोट्या घरट्याचा आकार दिला. या घसरगाड्या संपूर्णतया सुरक्षित होत्या.

मला माझे स्वत:चे बालपण आठवले... आम्ही गाडीचे एक चाक घेतले आणि त्याचा आस तळ्याच्या बर्फात रोवला. ज्या छिद्रात आम्ही आस रोवला होता ते छिद्र गोठले आणि ते चाक म्हणजे एक फिरते चक्र बनले. त्या चाकाला बांधलेल्या काठ्याना मुले लोंबकळू लागली आणि तळ्याच्या आरशासारख्या गुळगुळीत पृष्ठभागावर त्यानी घसरगुंडी सुरू केली. कित्येक दिवस आम्ही हा मजेशीर खेळ खेळत होतो. सान्या, वलोद्या, कात्या आणि कोस्त्या ही अशक्त मुले लालबुंद झाली आणि त्यांच्या गालावर गुलाबी कांती फुलली.

हिंवाळ्यातील शांत, निरभ्र, हिमाच्छादित संध्याकाळी हिंवाळी निसर्गाचे अप्रतिम सौंदर्य मुलांसमोर विशेष उत्कटत्वाने प्रकट होत असे. किरमिजी रंगाने नटलेल्या सूर्यास्ताकडे पहात आणि आकाशात पहिल्या ताऱ्यांच्या आगमनाची प्रतीक्षा करीत आम्ही बगिच्यात उभे रहात असू. सायंसमयीच्या त्या प्रकाशात बर्फावर गुलाबी रंग चढे आणि बघता बघता तेजस्वी जांभळ्या रंगात त्याचे रूपांतर होई. या वेळी मुलाना भारून टाकणाऱ्या भावनाना शब्दांतून आणि संगीतातून व्यक्तरूप मिळे. अनिर्वचनीय सौंदर्याने खळाळ-णाऱ्या लोकगीतांचे सूर त्याना आठवत. मंत्रमुग्ध होऊन आम्ही शाळेच्या इमारतीत जात असू, चुलाणा पेटवीत असू आणि गाणी गात असू.

हिंवाळ्यातील शांत सकाळी दिसणारी सूर्योदयाची शोभा मुले कौतुक-भरल्या नजरेने पहात. स्तब्ध उभे राहून मुले त्या सौंदर्याचे चिंतन करीत. आपला आनंद व्यक्त करण्यासाठी ती शब्दांसाठी धडपडत असत आणि या शोधात मी त्याना मदत करीत असे. प्रत्येक शोधातून केवळ आनंदच निर्माण होत नसे तर विचाराना त्यातून एका नव्या सामर्थ्याचे उगमस्थान लाभत असे.

# चंडोलाचा पहिला उत्सवदिन

संपूर्ण हिंवाळाभर पक्षी आणि प्राणी "रुग्णालयां"च्या पिंजऱ्यांशेजारी बसून ज्या दिवशी आमचे छोटे मित्र निळ्या आकाशात भरारी मारतील किंवा राईत तुरतुरत शिरतील त्या ऊबदार वासंतिक दिवसाची आम्ही स्वप्ने पहात होतो. आणि अखेरीस ज्या उत्सवदिनाची आम्ही दीर्घ काळ प्रतीक्षा करीत होतो तो दिवस येऊन ठेपला. ज्या दिवशी पहिल्या चंडोलाचे आकाशात आगमन झाले त्याच्या दुसऱ्या दिवशी आम्ही पक्ष्यांचे आणि प्राण्यांचे पिंजरे घेऊन टेकडीच्या माथ्यावर गेलो. विहंगकूजनाने स्टेपचा सर्व आसमंत निनादत होता. मुलानी पिंजरे उघडले आणि चंडोल, सुतार-पक्षी, ऑरिओल आणि सशाला पिंजऱ्यांतून मोकळे करण्यात आले. चंडोल ललकारी मारीत आकाशात उंच उडाला आणि पुन्हा जमिनीवर आला ... त्या सौंदर्याच्या दर्शनाने मंत्रमुग्ध होऊन आम्ही उभे राहिलो. जिवंत पशु-पक्ष्यांचे प्राण आम्ही वाचविले या विचाराने आम्ही आनंदून गेलो होतो.

या क्षणाला माझ्या कल्पनाचक्षूंसमोर भविष्याविषयीचे एक चित्र उभे राहिले: दर वर्षी चंडोलाचा उत्सवदिन साजरा करण्यासाठी आम्ही टेकडी-च्या माथ्यावर येणार होतो.

चंडोलाचा उत्सवदिन ही वसंत आणि ग्रीष्म याना विभागणारी सीमा-रेषा बनली. मुलानी पक्ष्यांचे प्राण वाचविले होते आणि त्याना हा मोठा एक सन्मान वाटत होता. प्रत्येक मुलाच्या घरात "जीवन आणि सौंदर्याचा सांदीकोपरा" तयार झाला. सूर्यप्रकाशाने लहरणाऱ्या कुरणांवर अनिर्वचनीय मधुर स्वरांची ललकारी घुमविणाऱ्या चंडोलाची प्रतिमा हा मुलांच्या अंत-र्विश्वाचा एक चिरंतन भाग बनला. मुले अत्यंत उत्कंठेने या उत्सवदिनाची प्रतीक्षा करीत त्याला आणखी एक कारण होते; कलात्मक सृजनशीलतेच्या चित्तथरारक अनुभवाशी हे दिवस निगडित झाले होते. पावाच्या सफेद लगद्यातून छोटे छोटे चंडोल, पाकोळ्या, स्टार्लिंग, बुलफिंच, मॅग्पाइ, बुलबुल आणि टिटमाऊस पक्षी बनविण्यास मुलांच्या माता मुलाना मदत करीत असत. या वस्तू मुले आपल्याबरोबर शाळेत घेऊन येत. मुलांचे निस-र्गाविषयीचे प्रेम त्यांच्या या छोट्या छोट्या निर्मितीत ओतले गेलेले असे. प्रत्येक मूल आपापल्या तऱ्हेने सौंदर्याविषयीची आपली कल्पना त्यात व्यक्त करीत असे.

शरदऋतूत मुले दुःखित मनाने स्थलांतर करणाऱ्या पक्ष्याना निरोप देत.

दुःखाच्या या भावनेमुळे मानवी मनाला उदात्ततेचा स्पर्श होतो ; या भावने-शिवाय सदिच्छा संभवू शकत नाही.

## आम्ही वाचायला आणि लिहायला कसे शिकलो

मुले वाचायला आणि लिहायला कशी शिकली हे मी आता विशद करणार आहे. मी जे काही सांगणार आहे त्याकडे, कृपया, वाचायला आणि लिहायला शिकविण्याची नवी पद्धत या दृष्टीने पाहू नका. आमच्या सृजनशीलतेच्या शास्त्रीय अधिष्ठानाचा विचार माझ्या डोक्यात आला नव्हता ; पण शैक्षणिक कार्यात आणि अभ्यासात मुलांची नेमकी हीच सृजनशीलता साहाय्यभूत होते. आतापर्यंत कसोटीस उतरलेल्या वाचायला आणि लिहा-यला शिकविण्याच्या खऱ्या पद्धतींची काही मर्यादेपर्यंत जागा घेऊ शकेल असे जे काही आहे त्यापासून या सर्व गोष्टी फार दूर आहेत. ही सृजन-शीलता जन्मास आली ती शेतांच्या आणि कुरणांच्या सान्निध्यात, ओक वृक्षराईच्या छायेत, स्टेपच्या झळाळल्या वाऱ्यात, ग्रीष्मातील सूर्योदय आणि हिंवाळ्यातील संधीप्रकाश पहात असताना.

शालेय जीवनाच्या पहिल्या दिवसांत वाचन आणि लेखन हे मुलांना किती कठीण, कंटाळवाणे आणि नीरस वाटते यावर मी अनेक वर्षे विचार करीत होतो. अभ्यास ही निव्वळ पुस्तकी बाब न बनता ज्ञानाच्या काटेरी मार्गावर मुलाना कसे प्रस्थान ठेवता येईल? निरनिराळ्या अक्षरांतील फरक ओळखण्याचा मुले कसा प्रयत्न करीत, ही अक्षरे त्यांच्या नजरेसमोर कशा वेड्यावाकड्या उड्या घेत आणि न समजणाऱ्या एखाद्या आकृतीत त्यांची कशी सरमिसळ होत असे हे मी पाहिले होते. परंतु हे कार्य चित्त-वेधक, रसप्रद अशा कोणत्यातरी गोष्टीने, खेळांशी संबंधित अशा गोष्टीने उजळलेले असते आणि विशेष महत्त्वाचे म्हणजे ज्यावेळी "हे नीट लक्षात ठेव, नाहीतर! .. विसरलास तर तुझी धडगत नाही!" अशी मुलाना तंबी दिली जात नसते अशा वेळी अक्षरे किती सहजतेने मुलांच्या स्मरणात रहातात आणि त्या अक्षरांतून किती सहजतेने मुलांकडून शब्दांची घडण केली जाते हेही मी पाहिले होते.

शालेय जीवनाच्या अगदी पहिल्या दिवसांपासून अभ्यासाच्या काटेरी मार्गात श्रेणी नावाची चीज मुलांसमोर उभी रहाते. एका मुलाच्या दृष्टीने हे दैवत सदय आणि कृपाळू असते तर दुसऱ्याच्या दृष्टीने ते क्रूर, निर्दय

आणि कठोर असते. असे का असावे? हे दैवत एकाला आश्रय देणारे असते आणि दुसऱ्याचा क्रूर छळ करणारे असते. हे असे का याचा मुलाना बोध होत नाही. श्रेणी या कामावर अवलंबून असतात, आपल्या सर्वोत्कृष्ट प्रयत्नांती मिळणारे ते फळ असते हे सात वर्षांच्या मुलाला उमजू शकत नाही. अजून त्याला या सर्व गोष्टी अनाकलनीय असतात. त्या दैवताला प्रसन्न करून घेणे किंवा अगदी काहीच जमले नाही तर त्या दैवताशी लबाडी करणे हे मुलाचे ध्येय बनते आणि व्यक्तिगत समाधानासाठी नव्हे तर श्रेणी-साठी अभ्यास करणे ही त्याची हळू हळू संवय बनते. शालेय जीवनातून श्रेणींची हकालपट्टी करावी असा माझा बिलकुल मानस नाही. नाही, श्रेणीना डावलता येणार नाही. पण आपल्या अभ्यासावर मुले जी शक्ती खर्च करतात त्यावर त्यांचे बौद्धिक श्रम अवलंबून असतात याची मुलाना उमज पडल्या-नंतरच मुलांच्या बाबतीत श्रेणींची प्रथा सुरू केली गेली पाहिजे.

प्राथमिक शाळेत, माझ्या मते, श्रेणींच्या बाबतीत मुख्य गरज कोणती असेल तर ती श्रेणींच्या आशादायक, आनंददायक प्रारंभाची. श्रेणी म्हणजे झटून केलेल्या परिश्रमांसाठी देण्यात आलेले बक्षीस असावे, आळशीपणा किंवा हेळसांड यांसाठी देण्यात येणारी शिक्षा नसावी. कमी गुण म्हणजे आळशी घोड्यासाठी वापरण्यात येणारा चाबूक आणि चांगले गुण म्हणजे मिठाईचा तुकडा अशी जर शिक्षकाने समजूत करून घेतली तर लवकर मुले दोन्हीचाही द्वेष करू लागतील – चाबकाचाही आणि मिठाईचाही. कमी गुण हे एक अत्यंत धारदार, अणकुचीदार शस्त्र आहे आणि प्राथमिक वर्गांचा सूज्ञ, अनुभवी शिक्षक ते नेहमी बाजूला राखून ठेवतो आणि त्याचा कधीही उपयोग करीत नाही. तुम्हाला ठाऊक नसल्यास एक सांगतो. हे शस्त्र कधीही उपयोगात आणावयाचे नसते नेमक्या याच कारणासाठी प्राथमिक इयत्तांमध्ये त्याचे अस्तित्व असते. आपल्या स्वतःच्या ताकदीवरचा मुलाचा विश्वास कधीही ढळू नये, आपल्याला कोणताही मार्ग उरलेला नाही असे मुलाला कधीही वाटू नये याची खात्री करून घेणे यातच शैक्षणिक सूज्ञता सामावली आहे. प्रत्येक कार्य हे विद्यार्थ्याच्या दृष्टीने एक पुढचे पाऊल असले पाहिजे; मग ते पाऊल कितीही छोटे का असेना! ज्याने नुकताच शाळेत प्रवेश केला आहे आणि "क" आणि "ख" यातला भेदही ओळखायला अजून जो शिकलेला नाही असा सात वर्षांचा मुलगा एकाएकी नापास होतो. या सर्वांचा अर्थ काय हे त्याला अजिबात कळत नाही आणि प्रथम तर त्याला याबद्दल दुःखही होत नाही की चिंताही वाटत नाही. तो फक्त सुन्न होतो.

"मुलांचे अज्ञान आदरणीय माना," असे यानुश कोर्चाक यानी लिहिले आहे. या पोलिश शिक्षणतज्ज्ञाचे हे शब्द जीवनात मी कधीही विसरलो नाही. माणसाविषयीच्या आकलनासंबंधीचे सूक्ष्म बारकावे आणि मुलाच्या अज्ञानाचा आदर करण्यासंबंधीची क्षमता ज्यावेळी शिक्षक आत्मसात करतो व त्यावर प्रभुत्व मिळवितो त्याच वेळी अनुत्तीर्ण गुण हे धारदार, अणकुचीदार पण प्राथमिक शाळेत ज्याचा कधीही वापर करावयाचा नसतो असे शस्त्र बनते.

आनंद विद्यालय सुरू होण्यापूर्वी कितीतरी वर्षे आधी घडलेली ही एक उद्बोधक घटना आहे. सहा वर्षांच्या शालेयपूर्व मुलाना घेऊन मी रानाच्या वेशीवर गेलो होतो. फुलपाखरांविषयी आणि बागुर्ड्यांविषयी मी त्याना माहिती सांगत होतो. शिंगे असलेला एक बागुर्डा गवतातून खुरडत जाताना आम्ही पाहिला. अनेक वेळा तो उडण्याचा प्रयत्न करीत होता, पण त्याला ते जमत नव्हते. मुलानी त्या बागुर्ड्याची अगदी बारीकसारीक पहाणी केली. माझ्याकडे चित्रकलेची वही होती; त्या वहीत मी बागुर्ड्याचे चित्र काढले. एका मुलाने मला "बागुर्डा" हा शब्द लिहायला सांगितला; म्हणून मोठ्या अक्षरांत मी बागुर्डा (रशियनमध्ये «ЖУК») ही अक्षरे उमटविली. मुलानी कुतूहलाने तो शब्द पुन्हा पुन्हा उच्चारला आणि ती अक्षरे निरखून पाहिली. त्याना तो चित्राचाच एक भाग वाटत होता. कोणी वाळूत ती अक्षरे काढली, कोणी गवताच्या पात्यातून तो शब्द तयार केला. प्रत्येक अक्षर मुलाना कसलीतरी आठवण करून देत होते; उदाहरणार्थ, «Ж» या अक्षरात त्याना पंख फडफडवीत उडण्याचा अयशस्वी प्रयत्न करणारा आमचा बागुर्डा दिसत होता... त्यानंतर काही महिन्यांची गोष्ट. या मुलांची नियमित शाळा सुरू झाली होती. एके दिवशी मी या मुलांच्या तासाला उपस्थित राहिलो. मुलाना वाचन नीट जमत नाही अशी शिक्षिका तक्रार करीत होती., अगदी योगायोगाची गोष्ट म्हणजे मुले त्या तासाला «Ж» हेच अक्षर शिकत होती. मुलांचे चेहरे स्मिताने उजळले आणि त्यांच्यात उत्कंठित कुजबुज सुरू झाली. "बागुर्डा" «ЖУК») हा शब्द मुलानी उच्चारला आणि «Ж» हे अक्षर त्यानी बरोबर टिपले. त्यानी हात वर केले आणि सर्व मुले "बागुर्डा" हा शब्द लिहू शकतात हे पाहून शिक्षिका गोंधळात पडली. तो पाठ मोठा आनंदात आणि मजेत पार पडला... आणि शिक्षणतज्ज्ञ म्हणून, माझ्या दृष्टीने, जीवनाने शिक्षकाला तो पाठ होता.

आणि आता आनंद विद्यालयात मला त्या घटनेची आठवण झाली.

सौंदर्य, खेळ, परीकथा, संगीत, चित्रकला, अद्भुतरम्यता आणि सृजनशीलता यांच्या विश्वात मुलांचे जीवन व्यतीत झाले पाहिजे. मुलाला वाचायला आणि लिहायला शिकवतानाही मुलाभोवती हे विश्व पसरलेले असले पाहिजे. मूल या शिडीच्या ज्या काही पहिल्यावहिल्या पायाऱ्या चढते त्यांवर ज्ञानाकडे आणि विद्यार्जनाकडे पहाण्याची त्यांची संपूर्ण दृष्टी आधारलेली असते. अनेक मुलांच्या बाबतीत याच पायऱ्या त्याना ठेचा खायला लावणारे अडथळे बनतात हा विचार खरोखरच भीतीदायक आहे. तुम्ही शालेय जीवनाकडे नुसता दृष्टिक्षेप टाकलात तरी तुम्हाला हेच आढळून येईल की, ज्यावेळी मुले वाचायला आणि लिहायला शिकत असतात अगदी नेमक्या त्याच वेळी अनेक मुलांचा आपल्या कुवतीवरचा विश्वास उडतो. या पायऱ्या आपण अशा बनवू या की ज्यांमुळे मुलाना शीण येणार नाही, ज्यांमुळे ज्ञानाकडे जाणारी प्रत्येक पायरी ही खांद्यावरच्या प्रचंड भारामुळे दमछाक झालेल्या थकल्याभागल्या पांथस्थाची ओढग्रस्त नीरस वाटचाल न ठरता तो पक्ष्याची अभिमानी भरारी ठरेल.

शब्दांच्या उगमस्थानांकडील "सफरीं" साठी मी मुलाना घेऊन जायला सुरुवात केली. जगाचे सौंदर्य मी मुलांच्या नजरेस आणून दिले आणि त्याच वेळी शब्दांच्या संगीताचे त्यांच्या मनाला दर्शन घडविण्याचा मी प्रयत्न केला. ज्यान्वये शब्द म्हणजे केवळ माणसांची, स्थळांची, वस्तूंची किंवा घटनांची नावे ठरणार नाहीत तर शब्दाना भावनांचा एक रंग असावा—स्वतःचा परिमल असावा, सूक्ष्म छटानी ते नटलेले असावेत असा मी प्रयत्न केला. बाराखडीतील अक्षरे म्हणजे मानवी वैखरीचे नादसंगीत आविष्कृत करणारी चित्रे आहेत आणि ज्यान्वये शब्दांचे सौंदर्य आणि ज्या विश्वांशाच्या संदर्भात तो शब्द आला आहे त्या विश्वांशाचे सौंदर्य यांतून त्या चित्रांविषयी स्वारस्य निर्माण होईल अशा रीतीने, एखादी मधुर स्वररचना ऐकावी त्याप्रमाणे, मुलानी ध्यानपूर्वक शब्द श्रवण करणे ही गोष्ट महत्त्वाची आहे. जोपर्यंत शब्दांचा परिमल मुलाला जाणवलेला नसतो, त्यांच्या सूक्ष्म छटा त्याने अवलोकिलेल्या नसतात तोपर्यंत वाचनाच्या आणि लेखनाच्या अभ्यासाला सुरुवात करण्यास तो सिद्ध झालेला नसतो. आणि या अभ्यासाला शिक्षकाने फार लवकर सुरुवात केली तर मुलांच्या शिरावर फार कठीण कार्य लादले जाते. (अखेरीस मूल या अडचणीवर मात करते, पण त्यासाठी जबर किंमत मोजावी लागते!)

वाचायला आणि लिहायला शिकण्याची क्रिया ही मुलाच्या दृष्टीने जर

सुस्पष्ट, थरारक जीवनानुभव असेल, जिवंत प्रतिमा, नाद आणि स्वर-संगीत यानी जर ती ओतप्रोत भरलेली असेल तर ती क्रिया अतिशय सुलभ ठरते. मुलानी जे स्मरणात ठेवले पाहिजे ते स्वारस्यपूर्ण असले पाहिजे. वाचायला आणि लिहायला शिकणे ही गोष्ट चित्रांशी निकटत्वाने निगडित असली पाहिजे.

शब्दाच्या उगमस्थानांकडील आमच्या "सफरीं" मध्ये आम्ही कागद आणि पेन्सिल घेऊन चालत असू. आमच्या पहिल्या सफरींमधील ही एक सफर होती. "कुरण" «ЛУГ» या शब्दाचे सौंदर्य आणि सूक्ष्म छटा मला मुलाना दाखवावयाच्या होत्या. तळ्यावर झुकलेल्या एका पुसी-विलो झाडा-खाली आम्ही बसलो होतो. दूरवर सूर्यप्रकाशात लखलखणारे एक हिरवे कुरण होते. मी मुलाना म्हटले: "आपल्यासमोर पसरलेले ते सौंदर्य पहा. गवतावर फुलपाखरे आणि भ्रमर उडत आहेत. दूरवर गाईंचा एक कळप आहे. तो इतका दूर आहे की त्या कळपातल्या गाई छोटया छोटया खेळण्यां-तल्यासारख्या दिसत आहेत. ते कुरण म्हणजे एखाद्या तेजाळ हिरव्या नदी-सारखे भासत आहे आणि ती झाडे म्हणजे जणू काही गर्द हिरवा किनाराच आहे. गाई जणू काही नदीत उभ्या आहेत. प्रारंभिक शरत्कालातील किती-तरी सुंदर फुले इतस्ततः विखुरली आहेत. कुरणाचे ते संगीत ऐका: चिमुक-ल्या माश्यांचे ते नाजूक गुंजन, नाकतोडयांचे गाणे ऐकू येतंय ना तुम्हाला?"

माझ्या चित्रकलेच्या वहीत मी कुरणाचे चित्र काढले—कापसाच्या शुभ्र पुंजक्यांसारख्या मधून मधून दिसणाऱ्या गाई आणि कलहंस, नजरेला अगदी पुसटसा दिसणारा धूर, आणि क्षितिजावर रेंगाळणारे धवलशुभ्र ढग. त्या शांत सकाळच्या सौंदर्याने मुले भारून गेली होती आणि त्यानीही चित्रे काढली. माझ्या चित्राखाली मी «ЛУГ» (कुरण) हा शब्द लिहिला. बहुतेक मुलाना ती अक्षरे म्हणजे चित्राचाच एक भाग वाटला. आणि प्रत्येक चित्राकडे पाहून मुलाना कशाचीतरी आठवण होत असते, पण कशाची? ती आठवण होते गवताच्या पात्याची. मी गवताच्या पात्यातून «Л» हे अक्षर तयार केले. मी दोन पाती घेतली आणि «У» हे अक्षर तयार केले. मुलानीही आपापल्या चित्राखाली «ЛУГ» (कुरण) हा शब्द लिहिला. मग आम्ही तो शब्द वाचला. निसर्गाच्या संगीताविषयी निर्माण झालेली संवेदनक्षमता मुलाना शब्दाचा नाद जाणवण्यास साहाय्यभूत ठरली. प्रत्येक अक्षर कसे लिहिले जाते हे त्या संवेदनक्षमतेतून त्यांच्या लक्षात राहिले. प्रत्येक चित्रात त्यानी जिवंत नाद ओतले आणि त्यामुळे ती अक्षरे स्मरणात

ठेवणे सोपे गेले. चित्रित केलेला शब्द एका पूर्णाकारात बोधनकक्षेत येऊ शकतो. तो शब्द वाचणे शक्य होते आणि हे वाचन म्हणजे शब्दाच्या नादांच्या तपशीलवार विश्लेषणाचा व संश्लेषणाचा परिणाम नसतो तर ती दृक्-प्रतिमाना अनुरूप अशा निनादत्या संगीतमय प्रतिमांची सहेतुक पुनर्निर्मिती असते; आणि ही दृक्प्रतिमा म्हणजे मुलांच्या दृष्टीने चित्रापेक्षा काही वेगळी चीज नसते. दृक्प्रतिमा आणि शब्दाचा संगीतमय नाद या दोन्हींमध्ये निबद्ध झालेल्या समृद्ध भावनिक रंगानी परिप्लुत अशा दृक् आणि श्राव्य बोधनक्रियांच्या अशा प्रकारच्या ऐक्यात ती अक्षरे आणि तो लहानसा शब्द एकाच वेळी मुलांच्या स्मरणात रहातो. वाचायला शिकविण्याच्या एखाद्या नव्या पद्धतीचा हा शोध नव्हे. जे तुम्हाला मुद्दाम स्मरणात ठेवावे लागत नाही ते अधिक सहजपणे तुमच्या स्मरणात रहाते हे विज्ञानानेच दाखवून दिले आहे आणि त्याचीच ही व्यावहारिक परिपूर्ती आहे. बोधनकक्षेत आलेल्या प्रतिमांभोवती निर्माण झालेला भावनिक रंग हा स्मरणप्रक्रियेत अनन्यसाधारण अशी महत्त्वाची भूमिका पार पाडीत असतो.

शब्दाची दृक्प्रतिमा, नाद आणि भावनिक रंग यांच्या ऐक्यात नादांच्या स्वतंत्र, वेगळ्या विश्लेषणाकडे कोणत्याही प्रकारे दुर्लक्ष केले जात नाही. गोष्ट अगदी उलट आहे. "कुरण" या शब्दाचा ध्वनी मुलानी जेव्हा अत्यंत लक्षपूर्वक ऐकला तेव्हा हा शब्द वेगवेगळ्या नादांमिळून तयार झाला आहे आणि त्यात प्रत्येक नादाला अनुरूप असे अक्षर आहे याचे आकलन होऊन मुलानी प्रत्येक नाद बरोबर टिपला.

त्यानंतर काही दिवसानी आम्ही एक नवी "सफर" काढली. एके दिवशी सकाळी सूर्याचे स्वागत करण्यासाठी आम्ही शाळेच्या बागेत गेलो. गवतावर, झाडांच्या पानांवर, द्राक्षांच्या घोसांवर, पिवळ्या पिअर फळांवर आणि जांभळ्या आलुबुखारवर सर्वत्र दंव साचले होते. प्रत्येक दंवबिंदूवर सूर्यकिरणांचे ठिपके चमकत होते. ते ठिपके अदृश्य होत आणि पुन्हा इतर ठिकाणी प्रकट होत. जणू काही सूर्य एक बिंदू प्राशन करीत होता आणि त्या ठिकाणी दुसरा आणून ठेवीत होता. दंवबिंदूंवर सूर्याची किरणे पडली की तेथे ते ठिपके प्रकट होत. पण ते दंवबिंदू कोठे अदृश्य होत होते? काहींचे बाष्पीभवन होत होते आणि इतर अत्यंत सावकाश गवताच्या पात्यांवरून घरंगळत येत होते आणि जमीन त्याना गिळंकृत करीत होती. दंवबिंदू नसतील तर गवत आणि फुले कोमेजून जातील. नंतर आम्ही अ‍ॅस्टर, नस्तरशम, कॅना-लिली आणि गुलाबांवर चमकणाऱ्या दंवबिंदूंकडे नजर

टाकली. गवताचे पाते, एक नस्टरशमचे फूल, सूर्य आणि दंवबिंदूंचे चमकते ठिपके यांचे मी चित्र काढले. मुलानीही आपापली चित्रे काढली. चित्राखाली आम्ही «POCA» (दंवबिंदू) हा शब्द लिहिला. या अक्षरांतून मुलांसमोर सूर्याचे व दंवबिंदूंचे चित्र उभे राहिले. आम्ही ती अक्षर-चित्रे वाचली. भोवतालच्या जगाविषयीच्या आपापल्या कल्पना त्या अक्षरांत गोवून मुलानी आपापल्या तऱ्हेने ती अक्षरे काढली होती. सिऱ्योझा आपल्या मित्राना म्हणाला, "गवताच्या पात्यावर लोंबकळणारा हा दंवबिंदू आहे." अशा रीतीने त्याने «P» या अक्षराची कल्पना केली. "लवकरच तो जमिनीवर घरंगळत जाईल. हा बिंदू सूर्याची वाट पहात आहे." «O» हे अक्षर त्याने अशा रीतीने पाहिले. "आणि या छोटचा बिंदूत सूर्यप्रकाश आधीच शिरला आहे" आणि सिऱ्योझाने आपल्या पेन्सिलीने «C» हे अक्षर गिरविले.

सर्व मुलानी दंवबिंदूसहित गवताच्या पात्यांची चित्रे काढावीत असे मी सुचविले. सर्व मुलानी "दंवबिंदू" या शब्दाची आपापली स्वतःची चित्रे तयार केली. "मुलानी चित्रे काढली आणि लेखन केले" असे सहजतेने म्हणता येईल. त्यांच्या दृष्टीने चित्रे आणि लेखन म्हणजे प्रतिमा, नाद, रंग आणि भावना यांचे संपूर्ण विश्व होते. मुलाच्या जाणिवेत प्रत्येक अक्षर चित्रात्मक प्रतिमांशी जोडले जाते, त्यामुळे एकूण शब्द आणि स्वतंत्र अक्षरे दोन्हीही लक्षात ठेवणे सोपे जाते.

कित्येक दिवस पुनःपुन्हा आम्ही त्या दंवबिंदूंचे सौंदर्य पहात होतो आणि पुनःपुन्हा चित्रे काढीत होतो आणि लिहीत होतो. प्रत्येक चित्र हा केवळ पुढचा पाठ नव्हता तर ती निर्मिती होती. "दंवबिंदू" या शब्दाभोवतीची आमची निर्मिती दोन-तीन आठवडे चालली होती. आपल्याला आवडलेल्या डहाळ्या किंवा गवताची पाती प्रत्येक मुलाने अनेक वेळा काढली आणि प्रत्येक वेगवेगळा नाद आणि त्या नादाला अनुरूप असे अक्षर टिपत त्या शब्दाचा ध्वनी कानाला कसा लागतो ते त्याने ऐकले. भोवतालच्या जगातील वस्तूंशी अक्षरांचे असलेले साम्य म्हणजे मुलांच्या दृष्टीने मूलतःच एक अद्भुतरम्यता होती, एक परीकथा होती, एक निर्मिती होती.

चित्रकलेच्या वहीच्या वेष्टनावर मी "आमची मायभाषा" असे शीर्षक लिहिले. "तुम्ही मोठे होईपर्यंत आणि तुमची शाळा पुरी होईपर्यंत ही वही अनेक वर्षे आपण जतन करून ठेवू. चित्रांच्या आणि शब्दांच्या तुमच्या

स्वतःच्या वह्या असतील ; पण ही आपल्या वर्गाची चित्रकला-वही असेल," मी मुलाना सांगितले.

असेच अनेक दिवस गेले, अनेक आठवडे गेले. जित्याजागत्या शब्दांच्या उगमस्थानाकडील आमच्या नव्या नव्या "सफरी" आम्ही चालूच ठेवल्या होत्या. **खेडे, देवदार वृक्षांची राई, ओक वृक्ष, विलो, अरण्य, धूर, बर्फ, पर्वत, राय, आकाश, गवत, वनराई, लिंडन वृक्ष,[1] अॅश वृक्ष, सफरचंदाचे झाड, ढग, टेकडी, ओक वृक्षाचे फळ, पानगळ** या शब्दांशी मुलाना झालेली ओळख त्याना मोठी उद्बोधक वाटली. वसंतामध्ये आम्ही आमच्या "सफरी" पुढील शब्दांच्या कारणी लावल्या : **फुले, लाइलक, लिली ऑफ दि व्हालेय, अॅकेशिया, द्राक्षे, तळे, नदी, सरोवर, अरण्याची वेस, धुके, पाऊस, विजांचा कडकडाट, सूर्योदय, पारवे, पॉप्लर** आणि **चेरी. एखाद्या शब्दामुळे** ज्या मुलामध्ये ज्या ज्या वेळी सुस्पष्ट कल्पना, भावना आणि स्मृती उद्भूत होत असत त्या त्या वेळी ते मूल "आमची मायभाषा" या चित्रवहीत चित्र काढीत असे. आमच्या मायभाषेच्या सौंदर्याविषयी कोणामध्येच अलिप्ततेची, उदासीनतेची भावना उरली नाही. आमच्या कामाला सुरुवात झाल्यानंतर आठ महिन्यानी, १९५२ च्या वसंतापर्यंत, सर्व मुलाना बाराखडीतली सर्व अक्षरे ठाऊक झाली होती आणि सर्वांना वाचता व लिहिता येऊ लागले होते.

हा अनुभव यांत्रिकपणे लागू करण्याच्या प्रयत्नांविरुद्ध मला येथे इशारा देऊन ठेवायचा आहे. या पद्धतीने वाचायला आणि लिहायला शिकणे ही सृजनशील कृती आहे आणि कोणत्याही सृजनशीलतेला साचा सहन होत नाही. जे नवीन आहे त्याचा फक्त सृजनशीलतेच्या मार्गानेच अंगिकार केला पाहिजे.

मुलानी अक्षरे पाठ केली पाहिजेत आणि वाचायला शिकले पाहिजे असे मुलांच्या कानीकपाळी न ओरडणे हे महत्त्वाचे आहे. खेळ खेळताना मूल ज्ञानाच्या पहिल्या काही पायऱ्या चढत असते. त्याचे बौद्धिक जीवन सौंदर्य, परीकथा, संगीत, अद्भुतरम्यता, निर्मितीक्षमता आणि कल्पनाविलास यांचे भावनीकरण करते. ज्या गोष्टींमुळे मुलांच्या भावना थरारून जातात, ज्या गोष्टींतील सौंदर्याने ती भारून जातात त्या गोष्टी मुलांच्या अगदी खोलवर स्मरणात रहातात. आपले अनुभव केवळ शब्दांतून व्यक्त करण्याची नव्हे तर ते लिहून काढण्याची अनेक मुलांची आत्यंतिक तळमळीची इच्छा पाहून मी अगदी थक्क झालो.

एके दिवशी पाऊस सुरू झाला म्हणून आम्ही अरण्यरक्षकगृहाचा आश्रय घेतला. बाहेर मेघांची गर्जना चालली होती आणि विजा चमकत होत्या. मग छोटचा छोटचा गारा पडू लागल्या. पाऊस संपला तरी हिरव्या गवतावर काही काळ त्या गारा तशाच राहिल्या होत्या. तेवढचात ढगांतून सूर्य बाहेर आला आणि त्या चिमुकल्या गारा हिरव्या रंगात चमकू लागल्या. त्यांचे ते अप्रतिम सौंदर्य पाहून मुले कौतुकाने ओरडली. दुसरा दिवस उजाडला. आदल्या दिवशी जे काही पाहिले होते ते चित्रांकित करण्याची मुलाना फार इच्छा होती. मुलानी चित्रे काढली आणि युरा, सिऱ्योझा, शूरा आणि गाल्याने तर त्या चित्राना शीर्षकेही लिहिली. त्याना यापूर्वीच उत्तम वाचायला येऊ लागले होते आणि आता मी त्यांचे पहिले शब्दांकन पहात होतो. त्यानी दिलेली शीर्षके अशी होती : "वादळी ढग गवतावर गारांची पखरण करीत आहेत", "हिरव्या गवतावरील शुभ्र गारा", "सूर्यकिरणांत वितळणाऱ्या सफेद गारा", "गडगडाटी पाऊस शुभ्र गारांचा वर्षाव करीत आहे".

यावरून माझी पुन्हा एकदा खात्री पटली की मुले जेवढी विचाराच्या आणि भाषेच्या उगमस्थानांच्या, आपल्या भोवतालच्या जगाच्या अधिक निकट येतात तेवढी त्यांची भाषा अधिक समृद्ध आणि अधिक अविष्कारपूर्ण बनते. लवकरच सर्व मुले छोटे छोटे निबंध लिहू लागतील असा मला विश्वास होता. माझ्या या विश्वासाला १९५२ च्या ग्रीष्मात पुष्टी मिळाली. शाळेच्या छोटचा शेताच्या एका कोपऱ्यात पॉपी फुलझाडांचे बी पेरले होते. जेव्हा पॉपीची फुले शेकडो विविधरंगी शिखानी उजळून निघाली तेव्हा मी मुलाना तेथे घेऊन गेलो. त्या सौंदर्याच्या दर्शनाने मुलांची मने आल्हाददायक अनुभवांच्या उन्मेषानी उचंबळू लागली. आम्ही पुष्कळ वेळ त्या फुलांचे सौंदर्य न्याहाळीत होतो आणि भ्रमरांची गुणगुण ऐकत होतो. दुसऱ्या दिवशी आमच्या चित्रवह्या आणि रंगीत पेन्सिली घेऊन आम्ही पुन्हा त्या ठिकाणी गेलो. मुले चित्र काढीत होती आणि पॉपीच्या बीजाविषयी आणि इंद्रधनुष्याने सप्तरंगाचे संपूर्ण सौंदर्य त्या बीजाला कसे अर्पण केले त्याविषयी मी मुलाना गोष्ट सांगत होतो. अनेक मुलाना त्याना दिसलेले सौंदर्य शब्दांत व्यक्त करावयाचे होते आणि त्यानी आपल्या विचाराना अत्यंत सुस्पष्ट, बोलके शब्दरूप दिले : "पॉपींचा गालिचा उमलत आहे" (तान्या), "जमिनीवर अंथरलेला पॉपींचा गालिचा" (नीना), "पॉपींची फुले उमलू लागली आणि सूर्य प्रमुदित झाला" (झीना), "पॉपींच्या गालिचावर भ्रमर

गुंजारव करीत आहेत" ( गाल्या ), "सूर्याने निळी, गुलाबी, लाल आणि आकाशी फुले पृथ्वीवर उधळली आहेत" ( लारिसा ), "आकाशी पाकळ्यांवर बसलेला केसाळ भुंगा" ( सिन्योझा ), "नाजूक ताटव्यांवर डुलणारी फुले" ( शूरा ), "पॉपींमध्ये सूर्यकिरण खेळत आहेत" ( कोल्या ), "आकाशातून निळ्या पाकळ्या खाली पडल्या आणि जमिनीवर त्यांचा गालिचा फुलला" ( कात्या ). हे शब्दांकन आणि चित्रे मुलानी आपल्या चित्रवहीतून बाजूला काढली आणि "आमची मायभाषा" या चित्रवहीत ती ठेवली.

सूर्यफुलांच्या जगात, फुलारत्या बकव्हीटच्या शेतांत आम्ही काढलेल्या "सफरीं"च्या काळात मुलांच्या कल्पना सुस्पष्ट प्रतिमांनिशी सळसळत्या वसंताबरोबर विहार करीत होत्या. सभोवतालच्या जगाचे सौंदर्य मुलाना जितके अधिक थरारून सोडत होते तितक्या अधिक तीव्रतेने अक्षरे मुलांच्या स्मरणात रोवली जात होती; अर्थात सर्व उद्दिष्टाना मागे सारून एवढे एकच उद्दिष्ट आम्ही आमच्यासमोर ठेवले नव्हते. दृक्‌जगताची प्रतिमासृष्टी आणि सौंदर्याची भावना शब्दांत व्यक्त करण्याचे प्रयत्न हा मुलांच्या विचारक्रियेचा आत्मा आहे याची मला आता अधिकच खात्री पटली. मुले अत्यंत सृजनशीलतेने, अत्यंत सुस्पष्ट रीतीने, भावनिक संपृक्ततेने भरलेल्या प्रतिमांच्या द्वारे विचार करतात. मूल जर बुद्धिमान आणि चुणचुणीत बनावयाचे असेल तर अगदी लहानपणातच जगाविषयीच्या कलात्मक दृष्टीचा आनंद त्याला दिला गेला पाहिजे.

मुलाला जेव्हा सुंदरतेचे दर्शन घडते आणि मुलाला जेव्हा सुंदरता जाणवते तेव्हा अद्‌भुतरम्यतेचे आणि सृजनशीलतेचे केवढे अक्षय स्रोत मुलाच्या जाणिवेत जिवंत विचारांचे दालन खुले करतात! जित्याजागत्या शब्दाच्या उगमस्थानाकडील एक "सफर" मी कधीही विसरणार नाही. ग्रीष्मातला तो दिवस होता. त्या दिवशी आम्ही सामुदायिक शेताच्या मधुमक्षिकापालनगृहात गेलो होतो. मधुमक्षिकापालकाने आम्हाला ताजा मध आणि झऱ्याचे थंड पाणी दिले. फुलारत्या बकव्हीटच्या शेतांचे सौंदर्य नजरेत साठवीत मुले सफरचंदाच्या झाडाखाली बसली होती. स्टेप प्रदेशात भरारी मारून माशा मोहोळ्यांकडे परतात होत्या. थंड पाण्याच्या झऱ्यावर त्या घिरट्या घालीत होत्या आणि शांतपणे गुणगुणत होत्या. "माशा एकमेकींना फुलांविषयी आणि रायांविषयी, बकव्हीटविषयी आणि सूर्यफुलांविषयी, सुंदर

चमकत्या पॉपींविषयी आणि निळया क्लोव्हर फुलांविषयी सांगत आहेत," मुले म्हणाली.

पाच वर्षांनंतर माझी ही छोटी मंडळी चौथीत गेली होती आणि "माशा कशाविषयी गुणगुणतात?" या विषयावर मी त्याना एक गोष्ट लिहायला सांगितली. जूनमधल्या त्या दिवसाचे मुलांच्या मनःपटलावर जे अविस्मरणीय ठसे उमटले होते त्या ठशानी जिवंत विचारप्रवाहात सुस्पष्ट प्रतिमांचे रूप घेतले. अगदी लहान वयातच आपल्याला जे आनंदित करते ते कधीही विसरले जात नाही. मुलांच्या मायभाषेच्या सौंदर्याचे, त्यांच्या सभोवतालच्या जगाच्या सौंदर्याचे ठसे मुलांच्या जाणिवेवर नेहमी शैशवकाळातच उमटू द्या! ज्ञानाच्या उंच, बिकट शिडीच्या पहिल्या पायऱ्या सौंदर्याने परिप्लुत बनू द्या!

मुले जसजशी अधिक उत्तम प्रकारे वाचावयास शिकली तसतसे त्यांच्या आंतरिक जीवनातील पुस्तकांचे स्थान अधिकाधिक वृद्धिंगत होऊ लागले. चित्रमय गोष्टींच्या पुस्तकांचे आम्ही एक ग्रंथालय तयार केले. दुर्दैवाने ग्रंथभांडारांत फारसे चांगले काही आढळले नाही. म्हणून मला स्वतःलाच पुस्तके लिहावी लागली आणि त्या पुस्तकाना चित्रेही काढावी लागली. मी माझे पहिले चित्रमय गोष्टींचे पुस्तक तयार केले. आजोबा फ्रॉस्ट, दुष्ट सावत्र आई, तिची आळशी मुलगी, आणि प्रेमळ सावत्र मुलगी यांची ती उक्रेनियन लोककथा होती. पुस्तक काहीसे मोठे होते – तीस-बत्तीस पानांचे. प्रत्येक पानावर एक चित्र आणि काही वाक्ये अशी त्याची मांडली होती; अर्थात काही ठिकाणी फक्त एक एक वाक्य होते. १९५२ च्या वसंतऋतूपर्यंत बहुतेक मुलाना सफाईदारपणे वाचता येऊ लागले होते. विशेषतः वाऱ्या, कोल्या, गाल्या, लारिसा, सिऱ्योझा आणि लीदा फार चांगल्या प्रकारे वाचीत. आम्ही गवतावर बसत असू आणि त्यांच्यापैकी एक जण पुस्तक उघडून वाचायला सुरुवात करी... शब्द वाचायचा आणि त्यांचे वाक्य तयार करावयाचे असे हे साधे वाचन नव्हते. त्यात एक निर्मितीक्षमता होती. परीकथा वाचीत असताना चित्रांमधून प्रकट झालेल्या जगात ते मूल प्रत्यक्ष विहार करीत आहे असे भासे. सदय अंतःकरणाचे फ्रॉस्ट आजोबा, दुष्ट सावत्र आई, कष्टाळू आणि प्रेमळ सावत्र मुलगी आणि आळशी, हृदयशून्य मुलगी यांच्या भावभावनांच्या आणि मनोविचारांच्या सूक्ष्म छटा त्या मुलाच्या आवाजाच्या चढउतारातून व्यक्त होत असत. मुले जे वाचीत त्याची ती

प्रत्यक्ष सखोल अनुभूती घेत: दुष्टतेचा त्याना कमालीचा द्वेष वाटे आणि सुष्टतेचा विजय झाला की ती आनंदून जात.

आणि उद्‌बोधक गोष्ट आहे ती हीच: मुलानी ही गोष्ट अनेक वेळा वाचली, आणि तरीही प्रत्येक वेळी ती त्या गोष्टीत रस घेत होती. येथे शिक्षणतज्ज्ञांची चिंता मला आठवली: मुले अत्यंत एकसुरी आणि भावशून्य आवाजात का वाचतात? मुलांच्या वाचनात भावनांचा रंग क्वचितच जाणवतो असे का? कारण अनेक वेळेला वाचन आणि मुलांचे आंतरिक जीवन, विचार, भावना आणि कल्पना यांची फारकत झालेली असते. मुले थरारून गेलेली असतात एका गोष्टीने आणि ती वाचीत असतात दुसरीच गोष्ट. मुलांच्या हृदयात जे कप्पे दडलेले असतात त्या कप्प्याना जेव्हा शब्द स्पर्श करतात तेव्हाच वाचन हे मुलांचे जीवन अधिक समृद्ध बनविते.

आम्ही नवी सचित्र पुस्तके तयार करायला सुरुवात केली. यूरा, सिन्योझा, कात्या, लीदा, ल्यूबा आणि लारिसाने या पुस्तकांसाठी चित्रे काढली. चित्रे काढण्यास मदत करण्यासाठी प्रत्येक मूल पुढे येत होते. चित्रकलेत मुलाना जे स्वारस्य निर्माण झाले त्यामुळेच वाचनावर व लेखनावर प्रभुत्व मिळविण्याच्या बाबतीतील अडचणींवर आम्ही मुख्यत: मात करू शकलो.

१९५२ च्या ग्रीष्मात, तोलस्तोय यानी सांगितलेल्या लोककथा आणि उशिन्स्की यांच्या 'मायबोली' या संग्रहातील लघुकथा असे छोटे छोटे छापील बालवाङ्मय वाचायला मुलानी सुरुवात केली. रशियन कवी पुश्किन, लेर्मोन्तोव, नेक्रासोव आणि उक्रेनियन कवी शेवचेन्को, लेस्या उक्राइन्का आणि फ्रान्को यांच्या कविताही मुले वाचू लागली. 'मायबोली' या संग्रहातील उशिन्स्की यांची 'मुलानो, शाळेसाठी तयार व्हा' ही कविता फक्त मी म्हणून दाखविली आणि मुलाना ती जवळ जवळ पाठ झाली. मला या गोष्टीचा अतिशय आनंद झाला आणि त्या अनुभवाने मी रोमांचित झालो. पण आमच्या पाठ्यपुस्तकांत–अगदी प्राथमिक पाठ्यपुस्तकांतही–सर्वत्र ओबडधोबड कविता भरल्या आहेत या विचाराने मला चिंतित केले. प्रवचनांच्या भाषेत लिहिलेल्या नीरस, शुष्क कवितांमुळे लिखित शब्दाविषयी प्रेम उत्पन्न होण्याऐवजी काव्यात्मक भावना मारली जाण्याचाच अधिक संभव असतो असे माझे मत आहे.

प्रत्येक यश आणि प्रत्येक अडचण मी इतर शिक्षकाना बोलून दाखवीत होतो. शालेयपूर्व मुलाना पहिल्या इयत्तेसाठी तयार करणे आमच्या शाळेतील सर्व प्राथमिक शिक्षकांची एक सामुदायिक जबाबदारी बनली. जाणाऱ्या

प्रत्येक वर्षाबरोबर शिक्षकांच्या सृजनशील अनुभवात अधिक चांगली भर पडत गेली आणि विशेषत: वर्गाबाहेरच्या व बहि:शाल कामातील त्यांच्या शैक्षणिक पद्धती अधिक सखोल बनत गेल्या. यामुळे मुलांचा एकात्म बौद्धिक विकास सुलभ झाला. यशस्वी अभ्यासासाठी आवश्यक असलेली प्राथमिक स्वरूपाची व्यावहारिक कौशल्ये मुलानी संपादन केली. वाचन हे त्यांपैकी पहिले कौशल्य आहे.

काही वर्षांच्या काळात, पहिल्या इयत्तेत प्रवेश करण्यापूर्वीच शालेयपूर्व विद्यार्थ्यांच्या शिक्षकानी मुलांची वाचनाची तयार करून घेतली. यामुळे केवळ प्राथमिक वर्गातच नव्हे तर वरच्या इयत्तांतही शिक्षणाच्या संपूर्ण कार्याचा भार फार मोठ्या प्रमाणात हलका झाला. आमच्या अनेक वर्षांच्या सामूहिक अनुभवातून सफाईदार, भावाविष्कारपूर्ण आकलनयुक्त वाचनाचे स्थान आणि वाचनप्रक्रियेतील सृजनशील मानसिक परिश्रमांच्या दृष्टीने मुलाचा बौद्धिक विकास यांविषयी आम्ही एका अत्यंत महत्त्वाच्या निष्कर्षाला आलो. हा निष्कर्ष असा: मूल जितके लवकर वाचायला सुरुवात करते तितके त्याचे वाचन त्याच्या संपूर्ण आंतरिक जीवनाशी अधिक स्वाभाविकरित्या जोडले जाते, तितक्या त्याच्या वाचनप्रक्रियेच्या काळात घडणाऱ्या विचारप्रक्रिया अधिक गुंतागुंतीच्या बनतात आणि तितका त्याच्या बौद्धिक विकासाला वाचनाचा अधिक हातभार लागतो. वयाच्या सातव्या वर्षापूर्वी वाचायला सुरुवात करणारे मूल एक अत्यंत बहुमोल कौशल्य संपादन करते: शब्दाचे आणि वाक्यांशाचे त्याचे दृश्य व मानसिक बोधन हा त्याचा पहिला टप्पा असतो व तेथून ते ध्वनिउच्चाराकडे येते. मूल वाचत असताना ते शब्दाला जखडून रहात नाही. पुस्तकावरून ते आपली नजर बाजूला वळवू शकते आणि ध्वनींच्या अर्थाच्या आरपार जाऊन विचार करू शकते. अशा रीतीने मूल एकाच वेळी वाचत असते, विचार करीत असते आणि कल्पना करीत असते.

आमच्या सामूहिक अनुभवातून आमची खात्री पटली की नेमके अशाच प्रकारचे अस्खलित वाचन हा आकलनयुक्त वाचनाचा एक अत्यंत महत्त्वाचा घटक आहे.

## तू इतर लोकांतच रहातोस, माझ्या बाळा

शाळेच्या शेतआवाराच्या एका दूरच्या कोपऱ्यात बालवीरानी क्रिसॅन्थेममची रोपे लावली होती. शरदऋतूचे आगमन होत असताना त्या झाडांवर

पांढरी, निळी, गुलाबी फुले फुलू लागली. एका निरभ्र, ऊबदार दिवशी मी माझ्या छोट्या मंडळींना तेथे घेऊन गेलो. फुलांची ती रेलचेल पाहून मुले अतिशय आनंदून गेली. परंतु सौंदर्यामुळे मुलाना होणारा आनंद अनेक वेळा अहंमन्य असतो असा एक कटु अनुभव आहे. मुले अगदी सहज फुले तोडतात ; त्यात काही दोषारपद आहे असे त्याना वाटत नाही. त्या दिवशीही असेच घडले. मी प्रथम एका मुलाच्या हातात, नंतर दुसऱ्याच्या, नंतर तिसऱ्याच्या हातात फुले पाहिली. ज्यावेळी फक्त अर्धी फुले उरली तेव्हा कात्या ओरडली :

"क्रिसॅन्थेममची फुलं तोडणं योग्य आहे का?"

तिच्या आवाजात आश्चर्यभाव नव्हता किंवा चीडही नव्हती. ती फक्त विचारीत होती. मी काहीच उत्तर दिले नाही. मुलानी या दिवसाचा काही धडा शिकावा असे मला वाटले त्यानी आणखी काही फुले तोडली. त्या कोपऱ्याचे सौंदर्य नष्ट झाले होते आणि हिरवळीचा तो भाग ओका ओका वाटू लागला होता. मुलांच्या हृदयात निर्माण झालेला सौंदर्यानंदाचा झोत नाहीसा झाला होता. या फुलांचे काय करावे तेच त्याना समजेना.

"मग काय मुलानो, हा कोपरा आता सुंदर दिसतो का?" मी विचारले. "ज्या ताटव्यांवरून तुम्ही फुले तोडलीत ते ताटवे सुंदर दिसतात का?"

मुले गप्प होती. मग काहीनी उत्तर द्यायला सुरुवात केली :

"नाही, ते सुंदर दिसत नाहीत..."

"आणि आता ही सुंदर फुले धुंडाळायला कोठे जायचे?"

"बालवीरानी ही फुले लावली," मी मुलाना सांगितले. "ती सुंदर फुले पहायला ते येथे येतील आणि त्याना काय दिसेल? तुम्ही इतर लोकांत रहाता हे विसरू नका. सुंदर गोष्टींचा आस्वाद घ्यायला सर्वानाच आवडते. आपल्या शाळेभोवती पुष्कळ फुले आहेत ; पण प्रत्येक विद्यार्थ्याने ती तोडली तर काय होईल? तेथे काहीच उरणार नाही. लोकाना पहाण्यासाठी सुंदर असे काही शिल्लकच रहाणार नाही. आपण सौंदर्य जतन केले पाहिजे, ते नष्ट करता कामा नये. शरदऋतूचे आगमन झाले आणि गारठा वाढत चालला की आपण क्रिसॅन्थेममची ही झाडे येथून काढू आणि आपल्या उष्णतागृहात लावू. त्यांच्या सौंदर्याचा आनंद आपण तेथे चाखू. एक फूल तोडण्यासाठी तुम्ही दहा फुलझाडे लावली पाहिजेत."

काही दिवसानंतर आम्ही हिरवळीच्या दुसऱ्या एका भागात गेलो.

तेथे क्रिसॅन्थेममची पुष्कळ फुले होती – पूर्वीपेक्षाही जास्त. मुलानी एकही फूल तोडले नाही; त्यांचे सौंदर्य फक्त ती नजरेत साठवीत होती.

इतर लोकांसाठी सौंदर्य आणि आनंद निर्माण करण्याच्या आवाहनाला मुलाकडून अनुकूल प्रतिसाद मिळतो. ती संवेदनक्षमता त्याच्या मनात असते. त्या आवाहनाना कामाची जोड मिळणे हे महत्त्वाचे आहे. आपल्या आजूबाजूला लोक आहेत, आपल्या कृतींतून त्याना आनंद मिळू शकेल हे जर मुलाला जाणवले तर अगदी लहान वयापासून इतर लोकांच्या हितसंबंधांशी आपल्या इच्छांचा मेळ घालण्यास ते शिकेल. आणि सहृदयतेच्या आणि मानवतेच्या विकासाच्या दृष्टीने ही गोष्ट अनन्यसाधारण महत्त्वाची आहे. ज्यांच्या वैयक्तिक इच्छा-मनीषाना मर्यादा नसतात ते कधीही उत्तम नागरिक बनू शकत नाहीत. अहंमन्य, स्वार्थपरायण, दुसऱ्यांच्या हालअपेष्टांबाबत, क्लेश-यातनांबाबत जे बेपर्वा असतात असे लोक बालपणात आपल्या इच्छाना आळा घालण्यास कधीही शिकलेले नसतात आणि सर्वांच्या भल्याचा त्यानी कधीही विचार केलेला नसतो. स्वतःच्या इच्छाना आळा घालण्याची क्षमता ही अगदी साधी पण त्याच वेळी अत्यंत जटिलतापूर्ण अशी संवय आहे – मानवता, संवेदनक्षमता, प्रेमळपणा आणि स्वयंशिस्त यांचे ते उगमस्थान आहे. या गुणांच्या अभावी व्यक्तीला सदसद्विवेकबुद्धी उरणार नाही आणि त्या व्यक्तीला खराखुरा माणूस बनता येणार नाही.

आणि येथेच मुलाला खराखुरा माणूस बनण्यास शिकविण्याच्या बाबतीत बालवयाचे महत्त्व ठासून सांगणे पुन्हा एकदा आवश्यक बनते. नैतिक निष्ठा, प्रवृत्ती आणि संवयी या सर्व गोष्टी भावनांशी अत्यंत घनिष्टरित्या निगडित आहेत. अलंकारिक भाषेत बोलावयाचे झाल्यास भावना म्हणजे उच्च नैतिक दर्जाच्या आचरणासाठी लाभलेली सुपीक भूमी आहे. जेथे संवेदनक्षमता नसते, जेथे सभोवतालच्या जगाचे उत्कट बोधन नसते तेथे भावशून्य व हृदयशून्य लोकांची वाढ होते. संवेदनक्षमता, मनाची प्रतिबिंबनक्षमता बालपणातच आकार घेते. या गोष्टी बालपणातच अंगी बाणवल्या नाहीत तर त्यांची पुढे कधीही भरपाई करता येणार नाही.

मानवी संबंधांच्या जटिल जगातून मुलाला पुढे घेऊन जाणे हे शिक्षणतज्ज्ञाचे एक अत्यंत महत्त्वाचे कार्य आहे. आनंद हा मुलांचा प्राण आहे; त्याच्याशिवाय ती राहू शकत नाहीत. बालपण हे आनंदमय असावे म्हणून आपला समाज सर्व ते काही करीत आहे. पण आनंदामध्ये बेफिकीरपणाची भावना असता कामा नये. आपल्या वाडवडिलानी अत्यंत काळजीपूर्वक जोपास-

लेल्या झाडावरून आनंदाचे फळ तोडताना इतरांसांठी काय उरले आहे याचा मूल जेव्हा विचार करीत नाही तेव्हा माणसाच्या एका अत्यंत महत्त्वाच्या गुणधर्माला – सदसद्विवेकबुद्धीला – ते मुकते. समाजसत्तावादी समाजाचे आपण भावी नागरिक आहोत हे मुलाला उमजण्यापूर्वी भल्याची परतफेड भल्याने करणे, आपल्या स्वतःच्या हातानी इतरांसाठी सुख आणि आनंद निर्माण करणे या गोष्ट ते शिकले पाहिजे.

आनंद विद्यालय निर्माण होण्यापूर्वीच्या काळात मला एका गोष्टीची खंत व चिंता वाटत होती. आपल्या मुलांबद्दलच्या सहजप्रवृत्त प्रेमामुळे मुलामधली फक्त चांगलीच बाजू आईवडील पहात असत आणि त्यांच्या अवगुणांकडे दुर्लक्ष करीत असत. एका चार वर्षाच्या मुलाने शौचालयात जाण्याचे श्रम न घेता आपल्या आईसमोर आणि शेजाऱ्यांसमोर तो विधी कसा उरकला याची मला अजूनही आठवण आहे. आईला राग तर आला नाहीच, उलट तिला प्रेमाचे भरते आले. "बघा माझा मुलगा किती हुशार आहे – त्याला कश्शाकश्शाची म्हणून भीती वाटत नाही," ती म्हणाली. मुलाने तुच्छतेने ओठाची हालचाल केली आणि दात विचकत बेमुर्वतखोरपणे लोकांकडे पाहिले. ज्याची घृणा वाटावी असाच तो मुलगा बनला होता आणि त्याला असेच मोकाट सोडले असते, दुसऱ्याच्या नजरेतून स्वतःकडे पहाण्यास त्याला कोणी शिकविले नसते तर तो पुढे बदमाष बनण्याचाच संभव होता.

अनेक वेळा वलोद्याच्या आईबरोबर माझे संभाषण होई. तिने बोलायला सुरुवात केली रे केली की तिचा मुलगा तिचा झगा खेचायला सुरुवात करी आणि तिचे हात तो ओढू लागे. त्याला तिला काहीतरी तातडीने सांगावयाचे असे. आपलाच हेका चालू ठेवणे आणि अमर्यादशीलपणे वागणे हा मुलाच्या स्वार्थी वृत्तीचाच एक प्रकार आहे आणि मुलाला सर्व काही माफ करणे, बोबडे बोबडे बोलणे आणि आपण काहीही केले तरी आपल्याला शिक्षा होणार नाही अशी मुलाची भावना करून देणे हे त्याचे मूळ आहे. मुलाशी बोलताना आपण बालिश सूरातच बोलले पाहिजे अशी काही पालकांची (आणि दुर्दैवाने काही शिक्षकांचीही) समजूत असते. हा सूर म्हणजे बोबडे-पणाच असे मुलाला वाटते. प्रौढाच्या या बालिश बडबडीला मुलाच्या अननु-भवी अंतःकरणाकडून प्रतिसाद मिळतो तो गैरवर्तनाच्या द्वारे. त्या विशिष्ट सूरात दडून बसलेल्या धोक्यांबाबत मी नेहमीच जागरूक असतो आणि प्रत्येक चिमुकल्या माणसात भावी प्रौढ नागरिक वसत असतो हे मी क्षण-

भरही विसरत नाही. इतरांसाठी काम करण्याचा प्रश्न जेव्हा चर्चेला येत असे त्यावेळी अशा प्रकारचा दृष्टिकोन मला अनन्यसाधारण महत्त्वाचा वाटत असे. मुलांसंबंधीच्या कामाच्या जोडीने एक कल्पना अनेक वेळा आढळून येते ती ही की, मुले मोठ्या माणसांवर काहीतरी फार मोठे उपकार करीत आहेत, आणि त्यासाठी त्यांचे भरमसाठ गोडवे गाणे किंवा त्यासाठी त्याना काहीतरी बक्षीस मिळणे योग्यच आहे. सर्वात वाईट गोष्ट आहे ती हीच.

...शरद ऋतूत आम्ही क्रिसॅन्थेममची झाडे खणून काढली आणि ती उष्णतागृहात लावली. खेड्यातील मुलांच्या दृष्टीने हे अगदी समर्पक असे काम होते. मुले रोज या झाडाना पाणी घालीत असत. पहिली फुले उमलण्याची मुले अधीरतेने वाट पहात होती. हे उष्णतागृह म्हणजे एक सुंदर सांदीकोपरा बनला. "आता आपण पाहुण्याना बोलवू या!" मी मुलाना सांगितले. "कोणाला बोलवू या आपण?" अनेक मुलाना लहान भाऊबहिणी होत्या. मुले त्या छोट्याना बोटाला धरून आली. ती छोटी बच्छडी क्रिसॅन्थेममची फुले तोडण्यासाठी पुढे सरसावली, पण मुलानी त्याना ती तोडू दिली नाहीत.

"आपण पुष्कळ फुले फुलवली तर ८ मार्चला, आंतरराष्ट्रीय महिला-दिनाच्या दिवशी, प्रत्येकाच्या आईला आपण एकएक फूल देऊ शकू" मी मुलाना म्हटले. या उद्दिष्टाने मुलाना चांगलीच प्रेरणा दिली आणि मार्चच्या सुरुवातीला आमच्या झाडांवर भरपूर फुले तयार झाली. त्या उत्सवदिनी आम्ही सर्व माताना आमंत्रण दिले, त्याना आमचे उष्णतागृह दाखविले आणि सर्व सुंदर सुंदर फुले आम्ही त्याना दिली. गाल्याची सावत्र आई तिच्याबरोबर आली होती आणि गाल्याने तिला क्रिसॅन्थेममचे एक फूल दिले. आपल्या सावत्र आईबरोबरच्या गाल्याच्या संबंधांविषयी मी गाल्याशी अनेक वेळा बोललो होतो आणि तिची आई खरोखरच चांगली आहे हे मी तिला पटवून दिले होते. माझे शब्द तिच्या अंतःकरणापर्यंत जाऊन पोहोचले होते. कोल्याची आणि तोल्याची आई, साशाची आजी आणि कोस्त्याची सावत्र आई आमच्या मेळाव्याला आली होती हे पाहून मला आनंद झाला.

अशा अनेक गोष्टी आहेत की ज्या लहान मुलाना विशद करून सांगता येत नाहीत. उदात्ततेविषयी तुम्ही सुंदर सुंदर शब्द वापरलेत तरी ते अनेक वेळा त्यांच्या जाणिवेत जाऊन बसत नाहीत; पण माणुसकीचे सौंदर्य मुलाच्याही हृदयाला जाणवते. आनंद विद्यालयाच्या अगदी पहिल्या दिवसापासून इतरांच्या आनंदाची, दुःखाची, व्यथांची आणि विपत्तींची प्रत्येक विद्यार्थ्याने

अनुभूती घ्यावी असा मी प्रयत्न केला. शरदात आणि वसंतऋतूत सामुदायिक शेताचे मधुमक्षिकापालक आंद्रेइ आजोबाना आम्ही भेटावयास जात असू. त्या वृद्ध आजोबाना कोणीही कुटुंबीय नव्हते आणि एकलेपणाचे त्याना फार दु:ख होत असे. आंद्रेइ आजोबाना आम्ही जेव्हा भेटायला जात असू तेव्हा त्याना फार आनंद होई असे मुलाना जाणवले. त्याना भेटायला जाण्या-पूर्वी आजोबांसाठी सफरचंदे, द्राक्षे, आलुबुखार आणि रानफुले गोळा कराय-ला मी मुलाना सांगत असे. त्यामुळे त्याना खूप आनंद होई. इतरांचे मन, अनुभव आणि भावना यांविषयी मुलांचे अंत:करण अधिकच संवेदनाक्षम बनले. आजोबाना आनंद होईल अशी कोणती गोष्ट करता येईल याचा मुले स्वत:च शोध घेऊ लागली. एके दिवशी रानात आम्ही पेज बनवीत होतो. भांड्याखाली जाळ पेटत असताना कितीतरी आनंदाचे क्षण मुले अनुभवीत होती... आणि त्याच आनंदाच्या क्षणी विचारमग्न होत वाऱ्या म्हणाली,

"पण आंद्रेइ आजोबा आता एकटेच आहेत."

मुलांच्या चेहऱ्यावरही विचारमग्नतेचे भाव उमटले. काही प्रौढाना ही एक भावविवशता वाटेल. काहीजण असा विचार करत असतील: सात वर्षे वयाच्या मुलांत अशा प्रकारच्या आत्मिक प्रेरणा संभवू शकतात का? होय, माझ्या प्रिय शिक्षकबंधूनो, नेमक्या याच वयाला मुलाची आत्मिक संवेदन-क्षमता धारदार बनवली, आपण इतर लोकांमध्ये रहातो हे महान सत्य त्याच्या अंत:करणापर्यंत पोहोचविले तर आपला आनंद इतराना वाटून देण्यास मूल सहज प्रवृत्त होईल. आपण मौज करीत असताना आपला मित्र एकटा आहे या विचाराने त्याचे मन दु:खित होईल.

आपल्या आनंदात आंद्रेइ आजोबाना सहभागी करून घेण्याचे मुलानी ठरवले. "आपण त्यांच्यासाठी थोडी पेज आणि डुकराची खारवलेली चरबी घेऊन जाऊ या..." कोस्त्या म्हणाला. या शब्दानी मुले रोमांचित झाली. त्यानी आजोबांसाठी इतकी पेज नेली की एखादे भुकेले माणूसही ती संपवू शकले नसते. आम्ही मधुमक्षिकाकेंद्रामध्ये पुन्हा एकदा त्या पदार्थांचा समा-चार घेतला, पण यावेळी आजोबांच्या बरोबर.

आनंद आणि दु:ख यांच्याबद्दलची संवेदनक्षमता फक्त बालपणातच बाण-विता येते. या वयात मानवी यातना, दुरापत्ती, वैफल्य आणि एकलेपणा यांबाबत अंत:करण विशेष संवेदनाक्षम असते. मुलाचा कायाकल्प झाल्या-सारखा वाटतो व ते दुसऱ्या माणसाच्या जागी स्वत:ला कल्पिते. मला आठवते: एकदा आम्ही रानातून परतत होतो. तेथे एक उघडीवाघडी एकाकी झोपडी

होती आणि आम्ही त्या झोपडीवरून जात होतो. महान देशाभिमानी युद्धातला एक अपंग माणूस या झोपडीत रहातो असे मी मुलाना सांगितले. तो आजारी होता आणि सफरचंदाची झाडे किंवा द्राक्षाचे वेल लावण्याचे बळ त्याच्या अंगी नव्हते. मुलांचे डोळे अश्रूनी भरून आले. त्या आजारी माणसाचा एकलेपणा प्रत्येक मुलाला जाणवला. त्याला भेट म्हणून आम्ही दोन सफरचंदाची झाडे आणि दोन द्राक्षाचे वेल तेथे लावले. आणि त्या बदल्यात आम्हाला अत्यंत बहुमोल अशा आनंदाचा लाभ झाला – दुसऱ्याला सुख देण्यातील आनंद.

इतरांच्या दुःखाबद्दल व यातनांबद्दल संवेदनक्षमता आणि सहानुभूती अंगी बाणविणे हे सोविएत शाळेच्या दृष्टीने एक महत्त्वाचे कार्य आहे. माणसाला जर दुसऱ्याचे दुःख हे आपलेच दुःख आहे असे वाटले तरच एक माणूस दुसऱ्या माणसाचा मित्र, साथी आणि बंधू बनू शकतो. **दुसऱ्याच्या अंतःकरणातली भावना मुलाला जाणवलीच पाहिजे.** माझ्यासमोर जे महत्त्वाचे शैक्षणिक कार्य मी ठेवले होते त्याचे सूत्र हे असे आहे.

आपल्या कॉम्रेडला, मित्राला, आईला, वडिलाना किंवा देशबंधूला काय वाटते याबद्दल मूल जर उदासीन असेल, दुसऱ्या माणसाच्या अंतःकरणात काय आहे हे त्याच्या नजरेत जर मुलाला दिसले नाही तर ते मूल कधीच खरा माणूस बनणार नाही. केवळ दररोज भेटणाऱ्या माणसाच्याच नव्हे तर योगायोगाने भेटणाऱ्या माणसाच्या नजरेतीलही त्याच्या भावभावना, अनुभव, आनंद आणि दुःख माझ्या विद्यार्थ्यांना दिसाव्यात अशा रीतीने मी माझ्या विद्यार्थ्यांची संवेदनाक्षमता धारदार बनविण्याचा प्रयत्न केला.

एकदा रानातून परतत असताना रस्त्याच्या कडेला गवतावर बसलेला एक वृद्ध माणूस आम्हाला दिसला. कशामुळेतरी तो अस्वस्थ झाला होता. "त्याला काहीतरी झाले असावे," मी मुलाना म्हटले. "कदाचित प्रवासात तो आजारी झाला असावा किंवा त्याचे काहीतरी हरवले असावे." आम्ही त्या वृद्धाजवळ गेलो आणि विचारले, "आजोबा, आम्ही तुम्हाला काही मदत करू शकतो का?" त्या वृद्धाने एक जड सुस्कारा सोडला. "फार आभारी आहे मी तुमचा, मुलानो," तो म्हणाला. "पण तुम्हाला कितीही इच्छा असली तरी तुम्ही मला मदत करू शकणार नाही. माझी बायको रुग्णालयात फार अत्यवस्थ आहे. मी तिच्याचकडे जायला निघालो आहे आणि बसची वाट पहात थांबलो आहे. काय मदत करू शकणार तुम्ही मला.

पण तुम्ही माझ्या मनावरचा भार हलका केला आहे. आता मला समजले की जगात अजून चांगली माणसे आहेत." मुले गप्प झाली. त्यांची स्वच्छंद बडबड थांबली. त्या वृद्धाचे दुःखभरले शब्द मनात साठवून मुले आपापल्या मार्गाने घरी गेली. त्याना अजून थोडे खेळावयाचे होते, पण ती खेळ विसरली आणि थेट घरी गेली.

**भावनांची शिकवण देणे** हे शिक्षणातील सर्वात अवघड कार्य आहे. मैत्रीतून, प्रत्येकजण आपला कॉम्रेड आहे या भावनेतून, बंधुभावातून सहृदय-तेचे, संवेदनक्षमतेचे, सहानुभूतीचे आणि अनुकंपेचे शिक्षण मिळते. मूल जेव्हा इतरांच्या सुखासाठी, आनंदासाठी आणि आंतरिक शांततेसाठी काहीतरी कार्य करते तेव्हा अत्यंत हळुवार अनुभवांची ते प्रतीती घेत असते. आपल्या आईबद्दल, वडिलांबद्दल, आजीबद्दल आणि आजोबांबद्दल प्रेम काहीतरी चांगलेपणाच्या निर्मितीतून प्रेरित झाले नसेल तर त्या प्रेमाचे रूपांतर अहंभावात होते. मुलाला आईकडून आनंद मिळत असतो आणि तो आनंद त्याला हवा असतो केवळ याच कारणासाठी ते आईवर प्रेम करते. पण मुलाच्या मनात खरेखुरे मानवी प्रेम रुजविले पाहिजे — दुसऱ्या माण-साच्या भवितव्याबद्दल त्याला चिंता वाटली पाहिजे, उत्कंठा वाटली पाहिजे, फिकीर वाटली पाहिजे आणि काळजी वाटली पाहिजे. दुसऱ्यांच्या भवित-व्याची ज्याला काळजी आहे अशाच माणसाच्या हृदयात खरेखुरे प्रेम निर्माण होते. ज्याच्याविषयी काळजी वाटावी असा एखादा मित्र मुलाना असणे हे महत्त्वाचे आहे. मधुमक्षिकापालक आंद्रेइ आजोबा हे माझ्या विद्यार्थ्यां-च्या दृष्टीने असेच एक मित्र बनले. इतरांविषयी मुलाला जितकी अधिक काळजी वाटते तितके कॉम्रेड्स्‌विषयी आणि कुटुंबाविषयी त्याचे मन अधिक संवेदनाक्षम बनते अशी माझी खात्री पटली. आंद्रेइ आजोबांचे आयुष्य किती बिकट आहे हे मी मुलाना सांगितले: त्यांची दोन मुले युद्धात मारली गेली होती आणि त्यांची पत्नी दिवंगत झाली होती. आपण जगात अगदी एकटे आहोत असेच त्याना वाटत होते.

"आपण आजोबाना अधिक वेळा भेटत जाऊ या मुलानो; आणि आपली प्रत्येक भेट त्याना आनंदाची वाटली पाहिजे," मी मुलाना सांगितले.

आम्ही आजोबा भेटायला जात असू त्यावेळी त्याना कशामुळे आनंद होईल याचा प्रत्येकजण विचार करीत असे. मुलानी त्यांच्यासाठी एक चित्रवही तयार केली आणि त्या चित्रवहीत प्रत्येकाने काही ना काहीतरी चित्र काढले होते. त्यानी नदीकिनाऱ्यावरचे रंगीबेरंगी खडे गोळा केले

आणि ते आजोबाना दिले. आजोबानी लाकडाची एक छोटी पेटी बनवली, त्या पेटीत त्यानी ते खडे ठेवले आणि ती पेटी आम्हाला दिली... आपल्या मित्रासाठी मुलानी गवताची एक टोपी बनवली. आजोबानी आमच्यासाठी ससा, कोल्हा, मेंढा अशी लाकडातून कोरलेली प्राण्यांची चित्रे तयार केली...

आपल्या मित्राबद्दल मुलांची आत्मिक आस्था जेवढी वाढत गेली तेवढ्या आपल्या भोवतालच्या जगातील विपत्ती, दुःख, विवंचना त्यांच्या नजरेस येऊ लागल्या. त्याना असे दिसले की नीना आणि साशा कधी कधी शाळेत उदास होऊन येत. त्यांच्या नजरेत खिन्नता आणि अंतर्मुखता दाटलेली असे. मुले चौकशी करीत – तुमची आई कशी आहे आता? त्यांच्या आईची तब्येत चांगली नसे म्हणून त्या बहिणी खिन्न असत... आपल्या कॉम्रेड्स्चे दुःख हलके करण्याच्या दृष्टीने मुलांच्या हातून काही घडले की त्यांच्या हृदयातील सहृदयतेची भावना अधिकच दृढमूल होई. अनेक वेळा बागेची बेणणी करण्यासाठी आणि बटाट्यांचे पीक गोळा करण्यासाठी आम्ही नीना व साशाकडे जात असू. जेव्हा जेव्हा आम्ही रानात जात असू त्या त्या वेळी मुलांच्या मनात विचार येई: नीनाला आणि साशाला येता येईल ना आपल्या-बरोबर. कारण कधी कधी त्याना घरी रहावे लागे आणि वडिलाना मदत करावी लागे. म्हणून ज्या दिवशी हा एकत्रित आनंद आम्ही चाखत असू त्याच्या आदल्या दिवशी आम्ही नीना व साशाकडे जात असू आणि जी काही मदत करता येईल ती करीत असू.

समाजात रहाणे म्हणजे इतरांच्या कल्याणासाठी आणि मनःस्वास्थ्यासाठी आपला आनंद बाजूला ठेवण्यास सक्षम बनणे होय. अशा घटना कदाचित सर्वांनी पाहिल्या आहेत: शोक, दुःख, अश्रू मुलाला आपल्या नजरेसमोरच दिसत असतात; तरीही ते आपल्या आनंदात मश्गूल असते. कधी कधी असेही घडते की, काठोकाठ भरलेल्या आनंदाच्या प्यालयातील एक थेंबही बाजूला सांडू नये म्हणून उदासीनतेपासून आणि खिन्नतेपासून मुलाचे लक्ष दुसरीकडे वेधण्याचा आई प्रयत्न करते. पण हा संप्रदाय झाला उघडचावाघडचा अंहतेचा. मानवी अस्तित्वाच्या उदास बाजूकडून मुलाला दूर नेऊ नका. जीवनात फक्त आनंदच नाही तर दुःखही आहे हे त्याला कळू द्या. इतर लोकांचे दुःख त्याच्या हृदयाला जाऊन भिडू द्या.

अखेरीस, बालपणाच्या काळात माणूस जो आनंद मिळवितो त्याचे उगमस्थाने कोणती यावर माणसाच्या व्यक्तिमत्वाची नैतिक घडण अवलंबू असते. जर हे आनंद अविचारी आणि स्वार्थमूलक असतील, दुःख, मान

हानी आणि यातना म्हणजे काय हे जर मूल शिकले नाही तर ते मोठेपणी अहंभावी बनेल ; इतर लोकांची त्याला क्षिती रहाणार नाही. इतर लोकांबद्दलच्या आस्थेतून निर्माण झालेल्या उन्मेषयुक्त अनुभवाचा आनंद हा सर्वात उच्च आनंद आहे आणि हा आनंद प्रत्येक मुलाने शिकणे हे अत्यंत महत्त्वाचे आहे.

## आमचे सामूहिक – एक स्नेहशील कुटुंब

आनंद विद्यालयाचे जीवन सुरू झाले त्याच्या अगदी प्रारंभिक दिवसांपासून आमच्या सामूहिकात कौटुंबिक ममता, सहृदयता, सहानुभूती, परस्पर विश्वास व साहाय्य या भावनांचे बीजारोपण करण्याचा मी प्रयत्न केला. सप्टेंबरमध्ये तीन मुलांचा वाढदिवस होता : वित्या, वाल्या आणि कोल्याचा. आम्ही सामुदायिकरित्या तो साजरा केला. शाळेच्या भोजनगृहाने केक तयार केला आणि ज्यांचा वाढदिवस होता त्या मुलाना आम्ही मुलांची चित्रे आणि पुस्तके भेट दिली. कोल्याच्या कुटुंबात वाढदिवस साजरे केले जात नव्हते हे ऐकून मला आश्चर्य वाटले – ना पालकांचे ना मुलांचे. आमचा सोहळा हा त्या छोटया मुलाच्या आयुष्यातील पहिला सोहळा होता. त्याच्या वर्गबंधूंचे लक्ष त्याच्यावर केंद्रित झाले होते आणि ती गोष्ट त्याला मोठी रोमांचकारी वाटली.

बालपणाच्या काळात प्रत्येक व्यक्तीला ममतेची आणि सहानुभूतीची आवश्यकता असते. जे मूल हृदयशून्य वातावरणात वाढते ते सौंदर्याच्या व सहृदयतेच्या बाबतीत उदासीन बनते. शाळा कुटुंबाची, आणि विशेषतः आईची जागा घेऊ शकत नाही ; पण घरी जर त्याची नीट काळजी वाहिली जात नसेल, त्याला मायेची ऊब मिळत नसेल, त्याच्याबद्दल आस्था दाखविली जात नसेल तर आपण शिक्षणतज्ज्ञानी त्याकडे खास लक्ष पुरविले पाहिजे.

लवकरच आमच्या सामूहिकाकडे स्वतःच्या अशा वस्तूंचे, रहस्यांचे, चिंताविषयांचे आणि व्यथाविवंचनांचे भांडार तयार झाले. एका कपाटात आम्ही खेळणी, पेन्सिली आणि वह्या साठविल्या. स्वप्नांच्या सांदीकोपऱ्यात आम्ही एक "अन्न-भांडार" तयार केले. तेथे आम्ही बटाटे, धान्य, वनस्पती तेल आणि कांदे अशा शरत्कालातील पावसाळी संध्याकाळी आवश्यक असलेल्या सर्व वस्तूंचा संग्रह करून ठेवला. आमच्या कुटुंबात ही सर्व छोटी मुले होती, पण त्यांच्यापैकी दान्को, तीना आणि वाल्या यांच्यासारखी काही

मुले अगदीच लहान होती. आम्ही फेरफटक्याला किंवा रानात जात असू त्यावेळी या लहानग्याना मदत करणे हे प्रत्येकजण आपले वैयक्तिक कर्तव्य मानत असे.

काही अज्ञात कारणांमुळे काही मुले जर घरी राहिली तर ती आजारी नाहीत ना हे पहाण्यासाठी त्यांचे वर्गबंधू संध्याकाळी त्यांच्या घरी जात असत. ही एक सुंदर प्रथा बनली. ममत्वाची भावना हे महत्त्वपूर्ण आंतरिक गरजांचे अधिष्ठान आहे. त्याशिवाय इतर माणसांच्या गरजाना उपयोगी पडणे हे जे माणसामाणसांमधील कम्युनिस्टप्रवण संबंधांचे बीज आहे त्याची कल्पना करणे अशक्यप्राय होय. आपल्या वर्गबंधूंच्या परस्पर संबंधांत सर्व मुलाना आनंदाच्या, भावनात्मक परिपूर्णतेच्या आणि अनुभवांच्या उगमस्थानाना आंतरिक मुल्यांच्या देवाणघेवाणीचे रूप देण्याचा मी प्रयत्न केला. प्रत्येक मुलाने सामूहिकात आपली स्वतःची काहीतरी भर घातली पाहिजे, इतर लोकांसाठी सुख आणि आनंद निर्माण केला पाहिजे ही माझी दृष्टी होती.

बाल-सामूहिकाची जोपासना करण्याच्या कार्याच्या क्रमात मला अनेक अडचणी आल्या आणि त्यांच्यावर मात करण्यासाठी अनुभवी शिक्षणतज्ज्ञांचा, ज्याना मुलाचा आत्मा नेमका जाणवला आहे, सामूहिकाची नाडी नेमकी उमगली आहे अशा प्राथमिक शाळाशिक्षकांचा मी सल्ला घेतला आणि त्यांच्याशी चर्चा केली. शाळेच्या इमारतीमध्ये आणि शेताच्या आवारामध्ये मुलांचा गलबला जेव्हा संपलेला असे अशा वेळी, संध्याकाळच्या समयी, मधून मधून आम्ही जमत असू आणि बाल-सामूहिकाच्या बहुमुखी जीवना-संबंधी आमच्यापैकी प्रत्येकाकडे काही ना काहीतरी कल्पना आहेत ही भावना आम्हा सर्वांना जाणवत असे. माणसाविषयीच्या ज्ञानाला कुटुंबामधून सुरुवात होते – आई अंगाईगीत गात असताना मूल जेव्हा प्रथम आईकडे पाहून हसते त्या क्षणाला ती सुरुवात होते हे आम्हाला चांगले ठाऊक होते. सुष्ट गोष्टींचा, प्रेमळपणाचा, जगात जे सर्वोत्कृष्ट आहे त्याचा – माणसा-माणसामधील प्रेमाचा – विचार व्यक्तिगत अनुभवातून फुलणे, आपल्या आईवडिलांबद्दल मुलाच्या मनात सर्वात प्रिय भाव निर्माण होणे हे महत्त्वाचे आहे. पण कुटुंबात खराखुरा जिव्हाळा अपुरा पडत असेल, किंवा त्याचा संपूर्ण अभाव असेल तर सामूहिक किती प्रमाणात तो जिव्हाळा देऊ शकेल? मुलाच्या संवेदनाक्षम, प्रतिबिंबनशील मनासमोर मानवी आत्म्याच्या सहृदयतेचा आणि सौंदर्याचा मार्ग आपल्याला कसा खुला करता येईल?

संध्याकाळी होणाऱ्या या संभाषणांच्या काळात माझ्या दृष्टीने महत्त्वपूर्ण अशा एका शैक्षणिक विचाराकडे आम्ही हळू हळू आलो आणि ते आमच्या शैक्षणिक सामूहिकाचे एक ठाम मत बनले. हा विचार असा : बालसामूहिक प्रत्येक माणसाला जेव्हा उदात्ततेच्या पातळीवर नेते आणि प्रत्येकामध्ये व्यक्तिगत परिपूर्णतेची व स्वाभिमानाची भावना दृढतर करते तेव्हा एक शैक्षणिक ताकद म्हणून बाल-सामूहिकाला बळ प्राप्त होते ; कारण खऱ्या-खुऱ्या मातृप्रेमाची व पितृप्रेमाची परिणती मुलामध्ये स्वाभिमानाची हीच भावना आणि चांगली माणसे बनण्याची इच्छा जागृत करण्यात होते. मुला-च्या मनात आपल्या स्वतःबद्दल व आपल्या कृतींबद्दल स्वाभिमानाची भावना कशी निर्माण करता येईल, आपला मान व प्रतिष्ठा यांचे त्याला कसे संरक्षण करता येईल हा विचार म्हणजे या अनुभवी शिक्षणतज्ज्ञांमध्ये मला सापडलेला सृजनशीलतेचा एक बहुमोल अंश होता.

आमच्या शाळेतील सर्वोत्कृष्ट शिक्षकांकडून शैक्षणिक सुज्ञतेची ही रत्ने सावधानतेने गोळा करीत बालसामूहिकात मुलांमुलांमधील सौहार्दपूर्ण प्रामा-णिक संबंधांत चांगले बनण्याची इच्छा कशी प्रविष्ट होईल हे पहाण्याचा मी प्रयत्न केला. सामूहिकातील प्रामाणिक आणि प्रेमळ संबंध यांची मी सतत काळजी वहात असे. बाल-सामूहिकाचे बहुमुखी जीवन म्हणजे समान उद्दि-ष्टानी आणि श्रमानी एकत्र बांधलेल्या समानधर्मी लोकांची सहकारी संस्था नसून एकमेकांबद्दल वाटणारी ती एक संवेदनक्षमता आहे, दुसऱ्याचे मन आणि आत्मा, सुख आणि दुःख जाणून घेण्याची आत्मिक क्षमता आहे असा मी विचार करू लागलो. कारण प्रदर्शन करण्यासाठी नव्हे, प्रशंसा मिळ-विण्यासाठी नव्हे तर आपली स्वतःची प्रतिष्ठा जाणविण्याच्या जैव गरजेतून निर्माण झालेली सद्गुणी माणूस बनण्याची उदात्त आकांक्षा सामूहिकातील या प्रेमळ आणि प्रामाणिक संबंधांत सामावली आहे.

पुढील सर्व वर्षांच्या काळात माझ्या शैक्षणिक कार्यामध्ये मी मुख्यतः चिंता वाहिली ती मुलामधील, किशोरांमधील आणि युवक-युवतींमधील मान-वतेची भावना उच्च पातळीवर नेण्याची. आंतर-सामूहिक संबंध आधारलेले असतात ते यावरच. समाजाचा एक भाग म्हणून बाल-सामूहिकाचे जीवन मी नेहमीच व्यक्तीला उच्च पातळीवर नेण्याच्या कार्याच्या कारणी लावण्याच प्रयत्न केला. मुलांची सृजनशीलता आणि त्यांच्या प्रवृत्ती, कुवती आणि बुद्धिमत्ता यांचा विकास मी याच कार्याच्या कारणी लावला.

# आमचे आरोग्य-उद्यान

माझ्या विद्यार्थ्यांना शाळेत प्रवेश करायला आता एक महिना शिल्लक होता. ऑगस्टचा अप्रतिम ग्रीष्म-महिना जवळ येत होता. जुलैच्या तापलेल्या दिवसांत मुले एकतर भल्या सकाळी शाळेत येत किंवा दुपारी उशिरा येत. काही मुले खूप दूर रहात असत; त्यामुळे दुपारी त्याना जेवायला घरी जाता येत नसे. कधी कधी सहा-सात मुले शाळेच्या भोजनगृहात जेवत असत. शाळा सुरू होण्यापूर्वी एक महिना घरी रहाण्यापेक्षा मुलानी तळयाच्या काठावरील उद्यानात कुठेतरी रहावे असा विचार माझ्या मनात आला. तळयाशेजारचीच एक जागा आम्ही निवडली. गर्द झाडांच्या छायेत काही झोपडया उभारण्यास बालवीरानी आम्हाला मदत केली. सामुदायिक शेता-च्या कलिंगडाच्या बागेचे रखवालदार संपूर्ण उन्हाळाभर अशाच झोपडयांत रहातात. आम्ही झोपडयांमध्ये पेंढा पसरला आणि चित्रकलेसाठी छोटी छोटी टेबले तयार केली. सामुदायिक शेताचा विस्तृत मळा आमच्या झोप-डयांशेजारीच होता. आमची मुख्य विश्रांतीची जागा म्हणून या मळयाचा उपयोग करण्याची मळेकऱ्याने आम्हाला मुभा दिली. झोपडयांच्या शेजारीच आम्ही एक पाकगृह तयार केले. सामुदायिक शेताने आम्हाला अन्नपदार्थ दिले आणि आम्हाला एक स्वयंपाकीही मिळवून दिला. सान्याच्या वडिलानी एक स्नानगृह बांधून दिले आणि त्या स्नानगृहाच्या शेजारी उभी असलेली मोटरबोट जेव्हा मुलानी पाहिली तेव्हा रोमांचित होऊन त्यांचे डोळे चमकले.

आमच्या या वसतिस्थानाला आणि विश्रांतीस्थानाला मुलांचे पालक आरोग्य-उद्यान म्हणत असत. तर अशा रीतीने आमच्या सामूहिकाचे आरोग्य-उद्यानातील जीवन सुरू झाले. सबंध महिना आम्ही मोकळया हवेत काढला. सूर्योदयापूर्वीच भल्या पहाटे आम्ही उठत असू. तळयात न्हाऊन झाल्यानंतर आम्ही सकाळचा व्यायाम करीत असू, नंतर न्याहारी घेत असू आणि मग रानात, उद्यानात किंवा शेतावर फिरायला जात असू. या महिन्याच्या काळात आम्ही भाषेच्या उगमस्थानांकडील अत्यंत उद्‌बोधक अशा "सफरी" केल्या. स्टेपमधल्या टेकडयांच्या माथ्यावरून आम्ही सूर्योदय पाहिला. ऊब-दार प्रदेशांकडे जाण्याच्या तयारीत शेकडो पाकोळयांचे थवेच्या थवे कसे जमा होत होते ते आम्ही पाहिले. नदीवर पडलेले धुक्याचे अवगुंठन सूर्याच्या किरणांत आणि प्रभातवाऱ्याच्या झुळुकांत विरत जात असताना आम्ही पाहिले. शेतांवर, कुरणांमध्ये किंवा रानात मुले दुसऱ्यांदा न्याहारी घेत:

सफरचंदे, पिअर, आलुबुखार, नुकतेच तयार झालेले उकडलेले बटाटे व ताज्या काकडया, कलिंगडे, टरबुजे, मक्याची कणसे किंवा टोमॅटो असा त्यावेळी त्यांचा आहार असे. ऑगस्ट महिना हा फळांचा आणि भाज्यांचा हंगाम असतो. या दिवसांत प्रत्येक मुलाने जवळ जवळ दोन किलो सफरचंदे किंवा पिअरची फळे खाल्ली असतील. आंद्रेइ आजोबा दररोज आमच्यासाठी मध घेऊन येत. रोज सकाळी व संध्याकाळी मुले ताजे दूध घेत. स्वयंपाकी आमच्यासाठी ताज्या भाज्यांचे चवदार, रुचकर बोर्श बनवीत असे.

उन्हाने रापलेल्या अंगाने टी-शर्टमध्ये व चड्डयांमध्ये मुले अनवाणी धावतपळत असत. रोज ती सफरीला जात आणि मोटरबोटीमधूनही प्रवास करीत.

सकस अन्न, सूर्यप्रकाश, ताजी हवा व पाणी व त्याच जोडीला वाजवी काम आणि मनोरंजन यांचा झालेला मिलाफ हा उत्तम आरोग्याचा अनन्य असा स्रोत ठरला.

## प्रथमवर्षीय अभ्यासाच्या पूर्वसंध्यासमयीचे विचार

आनंद विद्यालयाच्या जीवनाची सांगता आता जवळ आली होती. माझे विद्यार्थी लवकरच शाळेत पदार्पण करणार होते; त्या विचाराने माझे मन जसे आनंदित झाले तशीच माझ्या मनाला चिंतेची एक हुरहुरही लागून राहिली. आनंदित एवढ्यासाठी की, आणखी कित्येक वर्षे या मुलांबरोबर जीवनाचा, कार्याचा व ज्ञानाचा मार्ग मी आक्रमिणार होतो. या आनंदाचे आणखीही एक कारण होते. या एका वर्षाच्या काळात माझी ही छोटी बालके सुदृढ बनली होती आणि छोटया बेरी फळांप्रमाणे त्यांच्या अंगावर लाल-रापट कांती चढली होती.

आनंद विद्यालयाचे दिवस जसे संपत आले तशी वलोद्या, कात्या, सान्या, तोल्या, वाऱ्या आणि कोस्त्या ही मुले वर्षापूर्वी कशी होती आणि आता ती कशी बनली आहेत याविषयीची एक तुलना माझ्या मनात सकून गेली. त्यावेळी त्यांची कांती अगदी फिक्कट होती; ती आजारी दिसत आणि त्यांच्या डोळ्याभोवती काळी वर्तुळे उमटली होती. आता ती चांगली लालबुंद आणि रापलेल्या शरीराची दिसत होती. उत्तम आरोग्याच्या ऐन भरात असे ज्याचे तुम्ही वर्णन करू शकाल अशी ती मुले बनली होती. खडूशिवाय आणि फळ्याशिवाय, अंधुक रेखाटनांशिवाय आणि कातरलेल्या

अक्षरांशिवाय माझी मुले ज्ञानाच्या पहिल्या पायऱ्या चढली होती याचाही मला आनंद वाटत होता. ती वाचायला आणि लिहायला शिकली होती. ज्या मुलांच्या बाबतीत फळयाच्या काटकोनी चौकटीत ही पायरी सुरू होते त्या मुलांपेक्षा या मुलाना सर्व गोष्टी आता अतुलनीयरित्या सुलभ जाणार होत्या.

अध्यापनशास्त्राविषयी मला प्रगाढ आदर आहे आणि फाजील साहसी योजनांचा मला तिरस्कार वाटतो. परंतु ज्ञानावरील प्रभुत्व पायरीपायरीने सुरू होते, अध्ययन – मुलाचे सर्वात गंभीर व कष्टप्रद असलेले हे कार्य – ही त्याच वेळी, एक आनंदमय श्रमसाधना बनली पाहिजे आणि त्यातून मुलाच्या आत्मिक व शारीरिक शक्ती बळकट बनल्या पाहिजेत ही प्रत्यक्ष जीवनाचीच गरज आहे. विशेषतः मुलांच्या बाबतीत, ज्याना श्रमाच्या उद्दिष्टांचे आकलन नसते, अडचणींच्या मर्माची जाण नसते अशांच्या बाबतीत तर ही गोष्ट विशेषच महत्त्वाची आहे.

अध्ययन म्हणजे कठोर परिश्रम; अध्ययनाला खेळाचे रूप देता येणे शक्य नाही असे सहस्र वेळा बोलले जाते. पण त्याचबरोबर काम आणि खेळ यांच्यामध्ये आपण अनुल्लंघ्य अशी भिंत उभी करता कामा नयेत. मुलाच्या जीवनात, विशेषतः शालेयपूर्व मुलाच्या जीवनात खेळाचे काय स्थान आहे याकडे तुम्ही अत्यंत जवळून दृष्टिक्षेप टाकलात तर तुम्हाला हेच आढळून येईल की मुलाच्या दृष्टीने खेळ ही एक अत्यंत महत्त्वाची बाब आहे. जगाची तसेच मुलाच्या सृजनशील क्षमतांची मुलाला खेळांतूनच ओळख होते. खेळाशिवाय मनाचा पूर्ण विकास ही अशक्यप्राय गोष्ट आहे. खेळ ही एक अशी अजस्र आणि सूर्यप्रकाशाने तेजान्वित झालेली खिडकी आहे की ज्या खिडकीतून कल्पनांचे जीवनदायी स्रोत आणि सभोवतालच्या जगाचे आकलन मुलाच्या अंतर्विश्वात ओसंडू लागते. खेळ हा असा एक स्फुल्लिंग आहे की ज्यातून चौकसपणा आणि जिज्ञासा यांची ज्वाला प्रज्वलित होते. खेळ खेळत असताना मूल लिहायला शिकले, बौद्धिक विकासाच्या एका विशिष्ट पातळीवर खेळाची कामाशी सांगड घालण्यात आली आणि "आता पुष्कळ खेळलात, चला कामाला लागा पाहू!" असे मुलाना सांगण्याची शिक्षकावर कमीत कमी वेळा पाळी आली तर त्यात भयंकर असे काय आहे?

खेळाचा अर्थ व्यापक आणि अनेक प्रकारे होऊ शकतो. सर्वात जोरात कोण पळतो हे पहाण्यासाठीच केवळ मुलाना खेळाची लहर येते असे नाही.

क्षमतेच्या आणि कल्पनाशक्तीच्या व्यापक आविष्कारात खेळाचा अंतर्भाव करता येणे शक्य आहे. मानसिक ताकद वाढविणाऱ्या खेळांशिवाय, सृजनशील कल्पनाविलासाशिवाय, विशेषत: शालेयपूर्व काळात, खऱ्याखुऱ्या अभ्यासाची कल्पनाच करता येणार नाही. जेथे सौंदर्य आहे तेथे खेळाला सुरुवात होते असे "खेळ" या संज्ञेच्या व्यापक अर्थाने म्हणता येईल. परंतु लहान मुलाच्या दृष्टीने सौंदर्यात्मक प्रारंभाशिवाय श्रमाचा विचारच करता येणे शक्य नसल्यामुळे अगदी लहान वयातच काम आणि खेळ यांची अत्यंत घनिष्ट सांगड घातली गेली पाहिजे असाच त्यावरून निष्कर्ष निघतो. शाळेच्या आवारात सुगीच्या सणाला मुले चांगले चांगले कपडे घालून येत. टेबलावर सुंदर आच्छादन घातलेले असे. फुलदाणीत नुकतीच कापून आणलेली गव्हाची कणसे असत. या खेळाला अत्यंत सखोल असा अर्थ असे. पण खेळांची श्रमाशी कृत्रिमरित्या "सांगड घालण्यात आली" तर खेळांचे शैक्षणिक मूल्य नष्ट होते; कारण मग सभोवतालच्या जगाचे आणि माणसाचे भावनिक मूल्य खेळाच्या सौंदर्यातून कधीच व्यक्त होत नाही.

वाचायला आणि लिहायला सुरुवात करण्याची सर्वात योग्य वेळ कोणती — मूल पहिल्या इयत्तेत प्रवेश करते आणि आपल्या बाकावर बसते ती की कदाचित मुलाने शाळेत प्रवेश करण्यापूर्वी एक वर्ष आधी — हा प्रश्न अनुत्तरित राहिला आहे. शाळेमुळे मुलाच्या जीवनात फार मोठा खंड पडू नये अशी आमच्या शिक्षण-सामूहिकाची अनुभवातून खात्री पटली होती. मूल जेव्हा विद्यार्थी बनते त्यावेळी ते जे काल करीत होते तेच त्याला आजही पुढे चालवू द्या. नव्या गोष्टी त्याच्या जीवनात हळूहळू प्रकट होऊ द्या आणि मनावर उमटणाऱ्या ठशांच्या हिमप्रपाताखाली त्याला दिङ्मूढ बनू देऊ नका.

वाचायला आणि लिहायला शिकणे ही गोष्ट चित्रकला आणि खेळ यांच्याशी अत्यंत घनिष्टरित्या निगडित आहे अशी माझी खात्री झाली आहे, आणि मुलाचे शालेयपूर्व संगोपन व अभ्यास आणि शाळा याना जोडणारा तो एक पूल बनू शकतो अशीही माझी खात्री पटली आहे. दंवबिंदूत परावर्तित झालेल्या सूर्यकिरणांचे सौंदर्य, तशीच शंभर वर्षांच्या बलदंड ओक वृक्षाची भव्यता, तळ्यावर झुकलेल्या विलो वृक्षाचा डौल, निळ्याभोर आकाशात उडणाऱ्या क्रौंचपक्ष्यांचा थवा, आणि जुलैच्या रणरणत्या दिवसानंतर झोपी गेलेले कुरण हे सर्व माझ्या विद्यार्थ्यांच्या अक्षरांच्या चित्रांतून त्यांच्यासमोर प्रकटरूपात व्यक्त झाले होते. मुलाना जरी अजून उत्तम अक्षर

काढता येत नसले तरी त्यात वावगे काही नाही – त्या बदल्यात प्रत्येक चित्रातून त्याना जीवनाचे स्पंदन जाणवत असेल तर उत्तम अक्षर ही मुख्य गोष्ट होऊ शकत नाही. शब्दामधून प्रकट होणाऱ्या रंगाच्या व संगीताच्या विविध छटा मुलाना आकलायला लागल्या होत्या हे पाहून मला आनंद झाला. त्यांच्या जाणिवेत सुस्पष्ट, आविष्कारपूर्ण, काव्यात्म विचारक्रियेचा भक्कम पाया घातला गेला होता. चित्रकला ही मुलांच्या आत्मिक जीवनाचा एक भाग बनली. आपल्या भावना, विचार आणि अनुभव चित्रांतून व्यक्त करण्याचा मुले प्रयत्न करीत होती. संगीताचे श्रवण ही माझ्या विद्यार्थ्यांची एक आंतरिक गरज बनली.

नैतिक विकासाच्या बाबतीतही मुलानी आपले पहिले पाऊल टाकले होते या विचाराने माझे मन रोमांचित झाले. मानवतापूर्ण कृतींच्या सौंदर्याच्या जगात त्यानी पाऊल ठेवले होते. इतरांच्या सुखदु:खांबद्दलची संवेदनक्षमता त्यांच्या हृदयात उदित झाली होती. दुसऱ्यासाठी सौंदर्य आणि आनंद निर्माण करण्यातील सुख त्याना ठाऊक झाले होते. मूल जेव्हा शाळेच्या वास्तूत प्रथम पाऊल टाकते तेव्हापासून पूर्णविकसित व्यक्तिमत्वासहित प्रौढ जगात ते पदार्पण करीपर्यंत जो अनेक वर्षांचा काळ पसरलेला असतो त्या काळात शिक्षणप्रक्रिया घडत असते. माणसाला भावानुभूती घेण्यास कसे शिकवावे ही माझ्या दृष्टीने मुख्य गोष्ट होती. आपल्या बाजूला जी माणसे रहातात त्याना आपल्यासारखीच दु:खे, यातना, वेदना आणि विपदा असू शकतात हे ज्याना आपण शिक्षण देतो त्याना उत्कटतेने जाणवले पाहिजे. माझ्या विद्यार्थ्यांची सत्कृत्ये ही प्रथमत: माणसाच्या भावनांवर आधारलेली आहेत हे पहाण्याचा मी प्रयत्न केला. मुले सहानुभाववृत्ती शिकली, आपल्या सौंगड्यांच्या व वडीलधाऱ्या मुलांच्या, आपल्या आईवडिलांच्या आणि एकूण वडीलधाऱ्या माणसांच्या भावभावना व त्यांचे उन्मेष त्वरित जाणण्यास शिकली याचा मला आनंद झाला होता. मुले ज्यांच्या ज्यांच्या संपर्कात आली त्यांच्याकडे त्यानी प्रथमत: माणूस या नजरेने पाहिले ही गोष्ट मला सर्वात आनंददायक वाटली.

हे सर्व भावविचार फार चांगले होते; पण त्याचबरोबर काही चिंताही माझ्या मनात वास करीत होत्या. दररोजचे बौद्धिक श्रम हे तर मुलांचे मुख्य कर्तव्य होते; पण भोवतालच्या जगाविषयीचे त्यांचे चैतन्यपूर्ण स्वारस्य मी कायम ठेवू शकेन का? प्रत्येक मूल आपापल्या तऱ्हेने जगाकडे पहाते, आपापल्या पद्धतीने वस्तूंचे आणि घटनांचे निरीक्षण करते, आपापल्या

पद्धतीने विचार करते. बेफाम गतीने धावणारे आवेगयुक्त जलौघ आणि जेथे प्रवाहाचा फारसा मागमूसही नाही अशा संथ, सखोल नद्या या दोघानाही मी ज्ञानाच्या विश्वात घेऊन जाऊ शकेन का?

त्याहूनही मला अधिक चिंता वाटत होती ती प्रत्येक मुलाच्या अंतर्विश्वाची. मला माझ्यासमोर दिसत होती ती संवेदनाक्षम, कोमल, प्रतिबिंबनशील मने. मी मुलांच्या जितका अधिक संपर्कात आलो तितके या संपर्कामुळे माझे शब्द, माझी मते, सल्ल्याचा व टीकेचा माझा स्वर यांविषयीची मुलांच्या हृदयाची व मनाची स्वीकारक्षमता किती तीव्रतेने वाढली आहे हे मला ठळकपणे दिसून आले. माझ्यासमोर एकतीस मुले—एकतीस विभिन्न विश्वे—होती.

ही मुले—कोल्या आणि कोस्त्या, वाऱ्या आणि तीना, दान्को आणि लारिसा, वलोद्या आणि स्लावा—अगदी शालेयपूर्व वर्षांतही किती वेगवेगळी होती... आणि प्रत्येक दिवसागणिक आणि आठवड्यागणिक त्यांचे व्यक्तित्व अधिक सखोल व अधिक ठळक बनणार होते! प्रत्येक मुलाच्या हृदयाच्या सर्वात गुप्त अशा कोपऱ्यात खोल कुठेतरी स्वतःची अशी एक तार होती. या तारेला स्वतःचा असा एक स्वर होता, आणि माझ्या शब्दामुळे हे हृदय स्वरकंपित होण्यासाठी प्रत्येक तारेच्या पिळाशी मला माझा स्वर जुळवून घेणे आवश्यक होते. एखाद्या मुलाचे हृदय कशामुळेतरी भयकंपित झाले किंवा व्यथित झाले तर किती दुर्धर अनुभूतींच्या लहरी तेथे उदय पावतात आणि शिक्षकाला त्याची जाणीवही नसते हे मी आधीच पाहिले होते. मुलाच्या हृदयात प्रत्येक दिवशी काय चालले आहे, ते कोणत्या अनुभवातून जात आहे हे मी जाणू शकेन का? मुलाना नेहमीच न्याय देऊ शकेन का?

पण, सामाजिक जीवनाच्या विशाल जगात चिमुकल्या शाळकरी मुलाला कसे घेऊन जावयाचे, मुलाची दृष्टी केवळ आपल्या खेड्यापुरतीच मर्यादित रहाणार नाही, ज्या नदीच्या काठी त्याने आपल्या बालपणाची सुरुवातीची वर्षे घालविली त्या नदीच्या सौंदर्यापुरतीच त्याची दृष्टी मर्यादित रहाणार नाही तर आपल्या मायभूमीचे विराट, असीम विश्व त्याच्या नजरेला दिसेल अशा रीतीने त्याची घडण कशी करावयाची हा सर्वात महत्त्वाचा प्रश्न माझ्यासमोर होता आणि माझ्या कामाच्या संपूर्ण काळात या प्रश्नाने मला कधीच स्वस्थता लाभू दिली नाही. प्रत्येक मुलाला केवळ निसर्गाच्या व मानवी आत्म्याच्या सौंदर्याविषयीच ओढ वाटणार नाही तर राष्ट्राराष्ट्राना दास्यशृंखलांत अडकविणाऱ्या वैरी शक्तींविषयी—साम्राज्यवादाविषयी—

त्याच्या मनात प्रखर द्वेषभावना निर्माण होईल अशा प्रकारे त्याच्या मनाची कशी घडण करावयाची? सोविएत जनतेच्या सिद्धींचे – समाजसत्तावादी व्यवस्थेचे ; स्वातंत्र्याचे, प्रतिष्ठेचे आणि आपल्या देशाच्या जनतेजनतेमधील मैत्रीचे – ते संरक्षण करण्यास समर्थ होईल का? नागरी शिक्षण व सर्वांगीण विकास यांची मला कशी सांगड घालता येईल? लहान शालेय मुलांचे शिक्षण ही एक गुंतागुंतीची समस्या आहे. मुलांच्या नाजूक वयाच्या गरजेनुसार मी ती समस्या सोडवू शकेन का?

# बालपणाची वर्षे

## प्राथमिक शाळा म्हणजे काय ?

१९५२ च्या ऑगस्ट महिन्याचा तो शेवटचा दिवस होता. सूर्यप्रकाशाने न्हाऊन निघालेल्या त्या शांत सकाळी विद्यार्थी, शिक्षक आणि पालक शाळे-समोरच्या हिरवळीवर जमा झाले. शालेय वर्षाला प्रारंभ होण्यापूर्वीचा हा उदात्त दिवस फार वर्षांपासून शाळेचा आणि पुस्तकांचा पारंपारिक उत्सवदिन बनला होता. या सकाळचा सोहळा तर विशेषच रोमांचक होता.

आपल्या सहप्रवाश्यांच्या आणि साथीदारांच्या नजरेत पहात दूरस्थ, अज्ञात भूमीकडे पाऊल ठेवणाऱ्या भू-संशोधकाप्रमाणे मी माझ्या या लहान-ग्या मुलांच्या नजरेत पहात होतो. माझ्यासमोर ती उभी होती – १६ छोटे मुले आणि १५ छोटया मुली. मुलांचे आईवडील आणि अनेकांचे आजी-आजोबा मुलांबरोबर आले होते. कोल्याची आई आणि तोल्याची आई तेथे आली होती गाल्याची सावत्र आईही तेथे उभी होती आणि तिचा एक हात त्या छोटया मुलीच्या खांद्यावर होता; पण वर्षापूर्वी गाल्याच्या कपाळावर रागाच्या जशा आठ्या चढायच्या तशा आठ्या आता तेथे नव्हत्या. सर्वांनी आमचे अभिनंदन केले आणि आम्हाला सुयश चिंतिले. दहाव्या इयत्ते-तील विद्यार्थी या मुलांकडे आले आणि त्यानी त्याना नव्या जीवनाचे प्रतीक म्हणून पुस्तके दिली; त्या पुस्तकांवर लिहिले होते: "शुभचिंतन, छोटया मित्रा. या पुस्तकाची नीट काळजी घे. ज्या दिवशी तू शाळेत पदार्पण केलेस त्या दिवसाची ही स्मृतिशलाका बनू दे. तुझ्या कौटुंबिक वाचनालयात ते नीट जपून ठेव." (अनेक वर्षे निघून गेली, माझे विद्यार्थी मोठे झाले, पण सर्वांनी ही पुस्तके जपून ठेवली. जणू ती एक पवित्र गोष्ट होती आणि सोनेरी बालपणाचा तो एक बहुमोल स्मृतिठेवा होता).

आम्ही सर्वजण शाळेच्या बागेत गेलो. मुलांबरोबर त्यांचे पालक, शिक्षक आणि दहावीचे विद्यार्थी होते. विद्यार्थ्यांनी अत्यंत काळजीपूर्वक

सफरचंदाचे एक झाड खणून काढले, मातीच्या ढेकळासकट त्यानी ते दुसऱ्या जागी आणले आणि तेथे खणलेल्या एका खड्डयात ते लावले. सर्व नव्या विद्यार्थ्यानी त्या खड्डयात मूठ मूठ माती टाकली आणि तो खड्डा भरला. मुलानी त्या झाडाला पाणी घातले आणि मग ती घरोघर गेली. दुसऱ्या दिवशी ती शाळेला येणार होती आणि त्यांचा पहिला पाठ सुरू होणार होता. चार वर्षे ती प्राथमिक शाळेत शिकणार होती आणि चार वर्षे मी त्याना शिकवणार होतो आणि त्यांची वाढ करणार होतो. पहिल्या दिवसाच्या उंबरठ्यावर मी प्राथमिक शाळा म्हणजे काय याचा विचार करीत होतो. प्राथमिक शाळेच्या विशाल, निर्णायक भूमिकेविषयी पुष्कळ काही बोलले गेले आहे. "ज्ञानाचा भक्कम पाया प्राथमिक वर्गात घातला जातो" आणि "प्राथमिक इयत्ता हे अधिष्ठानांचे अधिष्ठान आहे" असेही सांगितले गेले आहे. माध्यमिक आणि वरच्या इयत्तांच्या शिकविण्यात ज्यावेळी उणीवा आणि चुका दिसून येतात किंवा मुलांच्या ज्ञानातील वरपांगीपणा आणि डळमळीतपणा प्रत्ययास येतो त्यावेळी वरील वाक्प्रयोग अनेक वेळा घोळविले जातात. पुढच्या अभ्यासात आवश्यक असलेले विशिष्ट ज्ञान आणि प्राविण्ये मुलाना न दिल्याबद्दल अनेकदा प्राथमिक शाळेवर ठपका ठेवला जातो.

होय. अनुभवाने हेच दाखवून दिले आहे की, प्रथमतः अभ्यास कसा करावा हे प्राथमिक शाळेत मुलाना शिकविले गेले पाहिजे. यान अमोस कोमेन्स्की (१५९२-१६७०), के. डी. उशिन्स्की आणि एफ. ए. दिस्तेरवेग (१७९०-१८६६) या असामान्य शिक्षणतज्ज्ञानी नेमक्या याच प्रश्नावर लिहिले होते. यावरून शिक्षकांच्या अनुभवाला व्यवहारात पुष्टी मिळाली आहे. भक्कम ज्ञानाचे व प्राविण्यांचे एक विशिष्ट क्षेत्र विद्यार्थ्याना प्राप्त करून देणे हे प्राथमिक शाळेचे एक सर्वात महत्त्वाचे कार्य आहे. वाचण्याची, लिहिण्याची, सभोवतालच्या जगातील घटनांचे अवलोकन करण्याची, विचार करण्याची आणि आपले विचार शब्दांत व्यक्त करण्याची क्षमता ही ज्ञानाच्या प्रभुत्वाशी निगडित असलेली अनेक प्राविण्ये अध्ययनाच्या क्षमतेत अंतर्भूत आहेत. अलंकारिक भाषेत बोलावयाचे झाल्यास या क्षमता म्हणजे अशी साधने आहेत की ज्यांच्याशिवाय ज्ञानावर प्रभुत्व मिळविणे ही अशक्यप्राय गोष्ट बनेल.

प्राथमिक वर्गातील मुलाना शिकविण्यासाठी मी स्वतःची तयारी करीत असताना मुलाना कोणत्या गोष्टींचे सर्वांगपरिपूर्ण ज्ञान असले पाहिजे आणि

कोणत्या गोष्टी त्याना करता आल्या पाहिजेत हे ठरविण्याचा मी प्रयत्न केला.

परंतु प्राथमिक शाळेतच ही कार्ये संपवून टाकता कामा नयेत. प्राथमिक शाळेत आपण मुलांशी व्यवहार करीत आहोत ही गोष्ट क्षणभरही विसरता कामा नये.

सात ते अकरा वर्षे वयाच्या मुलांच्या चार प्राथमिक वर्गांत माणसाची घडण होते. अर्थात प्राथमिक शिक्षण संपताच ही प्रक्रिया संपुष्टात येते असे समजून चालणार नाही; पण मानवी जीवनाचा अत्यंत कसदार असा भाग नेमक्या याच काळात तयार होतो. भावी काळातील यशस्वी अभ्यासाला उपयोगी पडतील अशा प्रकारच्या ज्ञानाचे व क्षमतांचे बाडबिस्तरे जमा करून पुढील अभ्यासासाठीच केवळ मुलाने स्वतःला तयार करता कामा नये तर त्याने समृद्ध असे आंतरिक जीवनही जगले पाहिजे. प्राथमिक शाळेतील वर्षे हा नैतिक, बौद्धिक, भावनिक, शारीरिक आणि सौंदर्यात्मक विकासाचा संपूर्ण असा एक कालखंड असतो आणि ज्ञानप्रभुत्वाच्या जोरावर केवळ भाविकालासाठी स्वतःला तयार करण्यापेक्षा मुलाने जर प्रत्येक दिवशी समृद्ध जीवन जगले तरच या कालखंडाला खरेपणा प्राप्त होईल, नाहीतर ती एक निव्वळ पोकळ बडबड ठरेल.

आपल्या देशातील पाठशाळांमध्ये हजारो उत्कृष्ट प्राथमिक शाळाशिक्षक आहेत. आणि मुलाच्या दृष्टीने त्यांतील प्रत्येकजण हा ज्ञानाचा केवळ दीपस्तंभच नाही तर खऱ्याखुऱ्या अर्थाने त्याचा गुरू, त्याच्या जीवनाचा शिक्षक आहे. सोविएत भूमीतील प्राथमिक शाळा ही सर्वसाधारण माध्यमिक शिक्षणाचा एक भक्कम पाया आहे. परंतु अनेक प्राथमिक शाळांमध्ये, विशेषतः अष्टवर्षीय आणि माध्यमिक शाळांतील प्राथमिक वर्गांच्या विभागांमध्ये फार गंभीर उणीवा आहेत याबद्दल आपण मौन बाळगता कामा नये. काही शाळांतील प्राथमिक वर्गाच्या विद्यार्थ्यांच्या भाळी आलेले प्रारब्ध मला खेदजनक वाटते. शिक्षकाने जितके कोंबता येईल तितके कोंबून डोक्यावर लादलेल्या पोत्याच्या भाराखाली ते मूल दबून गेलेले असते. माध्यमिक इयत्तांतील आणि वरच्या इयत्तांतील अभ्यास ही शिक्षकाने ठरविलेली सरहद्द असते आणि विद्यार्थ्याने ते पोते या हद्दीपर्यंत वाहून नेणे हाच विद्यार्थ्याच्या जीवनाचा आणि व्यवहारांचा अर्थ आहे असे अनेकदा शिक्षकाला वाटत असते.

प्राथमिक शाळेने विद्यार्थ्याला ज्ञानाचे एक भक्कम क्षेत्र प्राप्त करून दिले पाहिजे. या प्रक्रियेतील कोणत्याही प्रकारच्या सुस्पष्टतेचा अभाव किंवा

संदिग्धता यामुळे केवळ प्राथमिक शाळेलाच कमजोरी येईल असे नाही तर अभ्यासातील पुढचे दुवेही कमजोर बनतील. मुलाना प्राप्त करून द्यावयाचे ज्ञान, क्षमता व व्यावहारिक प्राविण्ये यांचे क्षेत्र जर अचूकपणे व काटे-कोरपणे ठरविण्यात आले नाही तर शाळा ही शाळा उरणार नाही. पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या या क्रमाने पुढे जाणाऱ्या प्रत्येक इयत्तेत मुलाने कोणत्या नियमांचे व व्याख्यांचे काळजीपूर्वक मनन केले पाहिजे व स्मरण ठेवले पाहिजे आणि स्पेलिंग न विसरता विद्यार्थ्याने कोणते शब्द योग्यप्रकारे लिहायला शिकले पाहिजे याकडे अनेक वेळा शिक्षकांचे दुर्लक्ष होते आणि अनेक शाळां-मधील अभ्यासाच्या प्राथमिक दुव्यांतील नेमकी ही एक गंभीर उणीव आहे. मुलांचा बौद्धिक भार हलका करण्याच्या भरात काही शिक्षक ही गोष्ट विसरतात की मुलानी काही गोष्टींची फक्त माहिती मिळवूनच आणि त्यात स्वारस्य घेऊनच थांबता कामा नये तर त्या त्याने स्मृतिबद्धही केल्या पाहि-जेत आणि सदैव स्मरणात ठेवल्या पाहिजेत. आजकाल प्राथमिक विद्यार्थ्यांच्या एकूण विकासाविषयी पुष्कळच बोलले जात आहे. अर्थात एकूण विकास हा अभ्यासातील आणि संगोपनातील एक अनन्यसाधारण महत्त्वाचा घटक आहे यात शंका नाही; पण ज्या ज्ञानाशिवाय भक्कम प्रदीर्घ स्मृती आणि एकूण विकास अशक्य आहे ते मूलभूत ज्ञानही तेवढेच महत्त्वाचे आहे. कारण एकूण विकास याचा अर्थ ज्ञानावरचे संतत प्रभुत्व व त्यासाठी माणूस अभ्यासासाठी सक्षम असणे निरपवादपणे आवश्यक आहे.

प्राथमिक शाळेसमोर उभ्या असलेल्या सर्व महत्त्वाच्या कार्यांचा विचार करता मज्जातंतूसंस्थेच्या घडणीच्या एका सक्रिय कालखंडातून जाणाऱ्या माणसाशी शिक्षक व्यवहार करीत असतो हे कोणीही विसरून चालणार नाही. मुलाचा मेंदू म्हणजे ज्ञान आत्मसात करणारी, ते स्मृतिबद्ध करणारी आणि माहिती साठवून ठेवणारी शिक्षकासाठी सज्ज ठेवण्यात आलेली एक जिवंत तयार यंत्रणा या दृष्टीने आपण मुलाच्या मेंदूकडे पहाता कामा नये. सात ते अकरा वर्षांच्या मुलाचा मेंदू हा जलद विकासाच्या प्रक्रियेत असतो. आणि माणसाच्या मज्जातंतूसंस्थेच्या विकासाची आपण काळजी घेतली पाहिजे, मज्जापटलातील पेशीना बळकटी आणण्याची आपण काळजी घेतली पाहिजे याचे जर शिक्षकाला विस्मरण झाले तर अभ्यासामुळे मुलाला एक प्रकारची मरगळ येईल.

अखंड ज्ञानसंचय, स्मरणशक्ती वाढविण्यासाठी योजण्यात येणारे अविरत उपाय, घोकंपट्टीच्या द्वारे येणारी मरगळ आणि बधिरता ही अभ्यासाची

निष्पत्ती असता कामा नये. अशा घोकंपट्टीची कोणालाही जरूरी नाही; उलट मुलाच्या आरोग्याला आणि मानसिक विकासाला ती हानीकारक ठरते. अभ्यास हा मुलाच्या विकासाला हातभार लावणारा आणि त्याचे मन संपन्न करणारा त्याच्या समृद्ध आंतरिक जीवनाचा एक भाग बनविण्याचा मी प्रयत्न केला. घोकंपट्टी नव्हे तर खेळ, परीकथा, सौंदर्य, संगीत, अद्भुत-रम्यता आणि सृजनशीलता यांच्या जगात प्रवेश करणारे पूर्ण जोमातील बौद्धिक जीवन हे माझ्या विद्यार्थ्यांसाठी अभ्यासाचे स्वरूप असेल असे मी ठरविले. मुलानी त्या जगातील प्रवासी, संशोधक आणि निर्माते बनावे अशी माझी इच्छा होती. निसर्गाचे अवलोकन करणे, विचार करणे, चर्चा करणे, श्रमानंदाचे अनुभव घेणे, आणि आपल्या निर्मितीविषयी अभिमान बाळगणे, लोकांसाठी सौंदर्य आणि आनंद निर्माण करणे आणि त्या निर्मितीत आनंद घेणे, निसर्ग, संगीत व कलेच्या सौंदर्याचा आस्वाद घेणे, या सौंदर्याने स्वतःचे अंतर्विश्व समृद्ध बनविणे, इतर लोकांच्या सुखदुःखाशी समरस होणे आणि त्यांची प्रारब्धे आपलीच प्रारब्धे आहेत अशी प्रचीती घेणे – हे मी माझे शैक्षणिक आदर्श मानले होते. पण त्याचबरोबर मुलाना निश्चितपणे काय **ठाऊक** असले पाहिजे? कोणते शब्द त्यानी लिहायला शिकले पाहिजेत आणि ते सदैव स्मरणात ठेवले पाहिजेत? अंकगणिताचे कोणते नियम त्याना पाठ आले पाहिजेत? या नेमक्या, काटेकोर उद्दिष्टाकडेही मला पाठ फिरविता येणार नव्हती. आनंद विद्यालयाचे काम चालू असताना पहिल्या चार इयत्तांतील विद्यार्थ्याना उत्तम प्रकारे ठाऊक असले पाहिजेत अशा शब्दांची मी जंत्री केली.

बौद्धिक श्रमाच्या पद्धती, प्रकार व रीती यांवर प्रभुत्व मिळविताना संगोपनाच्या कार्यातील अपार महत्त्वपूर्णता मी जाणली होती. अनेक शाळा-संचालक आणि शाळा-तपासनीस प्राथमिक वर्गांच्या बाबतीत जी तुच्छताबुद्धी दाखवितात त्यामुळे माझे मन व्यथित होत असे. शाळा तपासायला आल्यानंतर तपासनीसाना प्रथम स्वारस्य वाटे ते माध्यमिक आणि वरच्या इयत्तांत. खालच्या इयत्तांमध्ये खरेखुरे शिक्षण नव्हे तर फक्त मुलांचे खेळ चाललेले असतात अशीच त्यांची भावना असे. परंतु विद्यार्थ्यानी पाचव्या इयत्तेत प्रवेश करताच विषयासंबंधीचे त्यांचे अगदी सुमार ज्ञान पाहून खेळासंबंधीच्या या हळवेपणाचे रूपांतर भयात व विस्मयात व्हायला वेळ लागत नाही.

छोटया मुलांबरोबर कामाला सुरुवात करताना मी कोणत्याही प्रकारच्या हळवेपणाला थारा दिला नाही. दुसरी इयत्ता पुरी करण्यापूर्वीच त्यान

अस्खलितपणे, आविष्कारयुक्त व आकलनयुक्त पद्धतीने वाचता आले पाहिजे, छोटया छोटया वाक्यांचा व मोठया वाक्यांतील शब्दप्रयोगांचा एकसंध पूर्णाकारात त्याना दृक्‌बोध झाला पाहिजे यावर माझा कटाक्ष होता. वाचन हे विचारांचे व मानसिक विकासाचे एक उगमस्थान आहे. **वाचताना** मुलाच्या **विचारक्रियेलाही** चालना मिळावी या दृष्टीने अशा प्रकारचे वाचन शिकविण्याचे कार्य मी माझ्यासमोर ठेवले. समृद्ध आत्मिक जीवनाची जी उगमस्थाने आहेत त्या उगमस्थानांबरोबरच वाचन हे मुलाच्या ज्ञानप्रभुत्वाचे एक नेमके, काटेकोर साधन बनले पाहिजे.

मुलाना प्रतिपाद्यविषयाचे सखोल, भक्कम ज्ञान प्राप्त करून देणे व त्याचबरोबर घोकंपट्टी टाळणे आणि मुलांच्या समृद्ध आत्मिक जीवनाची व आरोग्याची काळजी वहाणे ही प्राथमिक शाळेची दोन समान महत्त्वाची कार्ये आहेत. १९५२ च्या शरद ऋतूपासून ते १९५६ च्या वसंत ऋतूपर्यंतच्या चार वर्षांच्या काळात या दोन कार्यांचे ऐक्य मी कसे साधले हेच मी पुढील प्रकरणांत सांगणार आहे.

## आरोग्य, आरोग्य आणि पुन्हा एकदा आरोग्य

मुलाच्या आरोग्याची काळजी वहाणे हे शिक्षणतज्ज्ञाचे एक अत्यंत महत्त्वाचे कार्य आहे हे मी पुन्हा एकदा निःसंदिग्धपणे सांगतो. मुलांचे आत्मिक जीवन, जगाविषयीची त्यांची दृष्टी, बौद्धिक विकास, भक्कम ज्ञान आणि त्यांचा स्वतःवरील विश्वास हा त्यांच्या आनंदी वृत्तीवर अवलंबून आहे. विद्यार्जनाच्या पहिल्या चार वर्षांच्या काळात मुलांविषयीच्या माझ्या चिंता आणि विवंचना मोजावयाच्या झाल्यास त्यांपैकी अर्ध्याअधिक चिंता व विवंचना त्यांच्या आरोग्याविषयी होत्या.

कुटुंबाशी सतत संपर्क असल्याशिवाय मुलाच्या आरोग्याची काळजी वहाणे अशक्यप्राय आहे. विशेषतः शाळेच्या पहिल्या दोन वर्षांच्या काळात कुटुंबांशी माझे जे बोलणे होई त्यापैकी बहुतेक बोलणे हे मुलांच्या आरोग्याविषयी असे. मी पालकाना सांगितले की मुलाना गृहपाठ देण्यात येणार नाही. पाठाच्या काळातच मुले नियम व व्याख्या पाठ करतील. मुलानी जे ज्ञान मिळविले असेल त्याच्या सखोल आकलनाला पोषक असलेले व्यवसाय पार पाडण्यातच मुलांचा घरचा बहुतेक वेळ व्यतीत होईल. त्याव्य-

तिरिक्त मुले वाचन करतील, चित्रे काढतील, सृष्टीतील घटनांचे अवलोकन करतील, सभोवतालच्या जगातील वस्तूंविषयी आणि घटनाविषयी छोटे छोटे निबंध तयार करतील आणि त्यांच्या आवडत्या कवितांचे पाठांतर करतील. गृहपाठ कंटाळवाणे असता कामा नयेत, पण ते अजिबात टाळणे हेही शक्य नाही. अभ्यासाच्या पद्धतींत निर्दोषता व परिपूर्णता आल्यामुळे वर्गोत्तर व्यवसायाला फाटा देता येईल असा युक्तिवाद करणे हे गंभीरपणाचे लक्षण नव्हे. अभ्यासाची खरी उद्दिष्टे आणि नियम या युक्तिवादात प्रति-बिंबित होत नाहीत; कारण तीन-चार तासाच्या क्रमात मुलाचे बौद्धिक श्रम एकवटित करणे कोणालाही शक्य होणार नाही.

मुलांचा पुष्कळसा वेळ मोकळ्या हवेत जाईल, ती लवकर झोपायला जातील, लवकर उठतील, आणि खिडकी उघडी टाकून झोपतील याची मी पालकाना काळजी घ्यावयास सांगितली आणि पालकानीही मला तसे अभिवचन दिले. सबंध उन्हाळयात, शरद ऋतूतील आणि वसंत ऋतूतील ऊब-दार दिवशी मुले आवारात झोपतील याला पालकानी संमती दिली. आपल्या धान्यकोठारांत गवताच्या माळ्यांवर पावसापासून सुरक्षित असे आईवडिलानी मुलांसाठी खास "निद्रेचे सांदीकोपरे" तयार केले. मुलाना ही गोष्ट फारच आवडली. मुलाना जेथे वसंताच्या प्रारंभापासून शरदाच्या अखेरपर्यंतच्या काळात वाचन करता येईल, चित्रे काढता येतील, विश्रांती घेता येईल असा एक लताकुंज शाळकरी मुलांच्या प्रत्येक कुटुंबाच्या बागेत असला पाहिजे असे काही वर्षांपूर्वीच मी पालकाना सांगितले होते आणि पालकानी तसे कबूल केले होते. ही योजना अमलात आणण्यास वडीलधाऱ्या शालेय मुलांची मदत झाली.

आनंद विद्यालयात सकाळच्या व्यायामाचा मुलाना यापूर्वीच सराव झाला होता. ही संवय पुढे चालू रहाण्याची मी तजवीज केली. व्यायामाची संवय अगदी लहान वयातच दृढबद्ध केली पाहिजे याबद्दल माझी खात्री होती. दर दिवशी एका विशिष्ट वेळेला उठण्याची पालकानी मुलाना संवय लावली. मोकळया हवेत व्यायाम केल्यानंतर मुले स्नान करीत. उन्हाळ्यात तळयावर स्नान करण्याची मुलाना संवय झाली आणि त्याशिवाय अनेक पालकानी आपल्या आवारात किंवा बागेत मुलांसाठी जलधारांचीही सोय केली. वर्षांतील पाच महिने (मेपासून सप्टेंबरपर्यंत) मुले तेथे जलस्नान घेत असत. ही संवय मुलांच्या अंगात इतकी मुरली की हिंवाळ्यातही, अर्थात घरातल्या घरात, मुले डोक्यापासून कमरेपर्यंत स्वतः स्नान घेत.

ज्याना जलधारांची विशेष आवश्यकता होती अशा मुलांच्या – तीना, तोल्या, कोस्त्या, लारिसा, नीना व साशा आणि स्लावा – यांच्या उपयोगासाठी पालकांच्या मदतीने मोकळ्या हवेत सहा सार्वजनिक जलधारांची सोय करण्यात आली. काही ना काही शारीरिक व्यंग असलेल्या, उदाहरणार्थ, पाठीत पोक असलेल्या किंवा शरीरात किंवा चेहऱ्यात वाकडेपणा असलेल्या मुलानी कसरतीचा व्यायाम करावा आणि जलधारांमध्ये स्नान करावे याबाबत मी विशेष दक्ष असे... माणसाने फक्त आरोग्यसंपन्नच असता कामा नये तर आकर्षकही असले पाहिजे; आणि आकर्षकता ही उत्तम आरोग्यापासून, शरीराच्या प्रमाणबद्ध, सुसंवादी वाढीपासून अलग करता येत नाही.

शरीराच्या भागांचे सुसंवादित्व आणि प्रमाणबद्धता व, काही अंशी, अस्थितंतूपेशींची आणि विशेषतः छातीच्या तंतूपेशींची सुरळीत वाढ ही शैशवकाळातील आहारावर अवलंबून असते. आहारात जर खनिज द्रव्यांचा आणि मौलांशांचा अभाव असेल तर त्याचा परिणाम अस्थिपिंजऱ्याच्या काही भागांच्या अप्रमाणशीर वाढीत होतो आणि ते व्यंग शरीराच्या ठेवणीत जन्मभर कायम रहाते असे अनेक वर्षांच्या अवलोकनातून दिसून आले आहे. हे टाळण्यासाठी मुलाना आवश्यक त्या सर्व जीवनसत्त्वानी युक्त असे अन्न मिळावे आणि त्यात जीवनसत्त्वे आणि खनिज द्रव्ये यांचा योग्य मिलाफ असावा हे पहाण्याची मी दक्षता घेतली.

अनेक वर्षांच्या क्रमात या विषयावर जे अवलोकन करण्यात आले आणि जे खास संशोधन करण्यात आले त्यावरून पुढील भयसूचक निष्कर्ष निघाले आहेत: लहान मुलांपैकी २५ टक्के मुले शाळेत जाण्यापूर्वी न्याहारी करीत नाहीत – त्याना सकाळचे खाणे नको असते; ३० टक्के मुले सकाळच्या नियमित आहाराला जे आवश्यक असते त्यापेक्षा निम्म्याहून कमी आहार घेतात; २३ टक्के मुले नियमित न्याहारीच्या निम्म्याने न्याहारी घेतात आणि फक्त २२ टक्के मुले योग्य न्याहारी करतात. वर्गात अनेक तास बसल्यानंतर ज्या मुलाने न्याहारी केलेली नसते त्या मुलाचे पोट गुरगुरायला लागते आणि त्याला चक्कर आल्यासारखी वाटते. असा विद्यार्थी जेव्हा घरी जातो तेव्हा वास्तविक अनेक तास त्याने काही खाल्लेले नसते; पण त्याच्या पोटात नेहमीची, निकोप भूक नसते (पालक अनेक वेळा तक्रार करतात की मुलाना साधे सकस अन्न – सूप, बोर्श, पेज किंवा दूध – नको असते; त्याना काहीतरी "चविष्ट" हवे असते).

भूक न लागण ही उत्तम आरोग्याला ग्रासणारी एक भयानक आपत्ती आहे; आजाराचे आणि अस्वास्थ्याचे ते उगमस्थान आहे. कोंदट वर्गात अनेक तास बसून रहावे लागणे, एकसूरी बौद्धिक श्रम, ताज्या हवेतील विविध उद्योगांचा अभाव आणि एकूणच "ताज्या हवेबाबत होणारी उपासमार" हे त्याचे मुख्य कारण आहे. सबंध दिवस कर्बद्विवायूने संपृक्त झालेली हवा मूल श्वासावाटे आत घेत असते. अनेक वर्षांच्या अवलोकनातून मी आणखी एका निष्कर्षाला आलो आहे आणि हा निष्कर्षही फारसा संतोषदायक नाही. कर्बद्विवायूने संपृक्त झालेल्या इमारतीत फार काळ राहिल्यामुळे पचनक्रियेत महत्त्वाची भूमिका बजावणाऱ्या स्रावग्रंथींवर प्रतिकूल परिणाम होतो. हे आजार कायम घर करून रहातात आणि असाध्य बनतात. पचनेंद्रियांचे हे गंभीर आजार असे असतात की काहीतरी गोडधोड पदार्थ देऊन विशेषतः मिठाईसारख्या पदार्थांच्या द्वारे आईवडील अनेक वेळ मुलाची भूक चेतविण्याचा प्रयत्न करतात. "ताज्या हवेची उपासमार" टाळण्यासाठी आपण ताज्या हवेसाठी पुरेसा दिनक्रम आखला पाहिजे. उत्तम आरोग्य राखण्यासाठी आवश्यक असलेली ही एक अत्यंत महत्त्वाची अट आहे.

मुलांसाठी चविष्ट, सकस जेवण बनविण्याचा मी पालकाना सल्ला दिला आणि हिंवाळयासाठी जीवनसत्त्वानी समृद्ध असलेल्या फळांचा साठा करून ठेवण्यास सांगितले. त्यावेळी आमच्याकडे मधाची काही पोळी होती; त्यामुळे शाळेच्या भोजनगृहात हिवाळयामध्ये मुलाना मध देणे आम्हाला शक्य झाले होते.

बहुतेक वेळ मुले मोकळयावरच असत, इतस्ततः मनसोक्त फिरत असत, शारीरिक मेहनत करीत असत, आणि वर्ग संपल्याबरोबर ताबडतोब ती अभ्यासाला बसत नसत. या सर्वांच्या परिणामी त्याना उत्तम भूक लागत असे. सकाळी मुले भरपूर न्याहारी करीत, नंतर ती शाळेत यायला निघत. त्यानंतर तीन तासानी (पाठ सुरू झाल्यानंतर अडीच तासानी) शाळेच्या भोजनगृहात ती दुपारचे जेवण घेत. गरम गरम सूप किंवा मासाचे तुकडे घातलेले बोर्श, कटलेट, पेलाभर दूध, पाव आणि लोणी असा त्यांचा आहार असे. शाळा सुटल्यावर (शाळेत घेतलेल्या दुपारच्या जेवणानंतर तीन-साडेतीन तासानी) ती घरी रात्रीचे जेवण घेत.

दिवसाच्या उत्तरार्धात घरी किंवा शाळेत मुले मोकळयावरच असत. पाऊस पडत असला किंवा बर्फ पडत असला तरच ती आत बसत.

मुलाच्या सुसंवादी वाढीच्या दृष्टीने प्रत्येक गोष्ट ही परस्पर-संबंधित

आहे. उत्तम आरोग्य हे मुलाला कोणत्या प्रकारचा गृहपाठ देण्यात आला आहे आणि मूल हा गृहपाठ केव्हा व कसा करते यावर अवलंबून असते. स्वतंत्र बौद्धिक श्रमाला घरी लाभणाऱ्या भावनिक छटा प्रचंड महत्त्वाची भूमिका बजावीत असतात. मुलाला अभ्यासात रस वाटत नसेल तर अशा अभ्यासामुळे त्याची आंतरिक ताकदच केवळ खच्ची होत नाही तर शरीराच्या अंतर्भागातील विविध इंद्रियांचे जे अन्योन्य परस्परावलंबन असते त्या परस्परावलंबनाच्या गुंतागुंतीच्या व्यवस्थेवरही त्याचा प्रतिकूल परिणाम होतो. मला अशी अनेक उदाहरणे ठाऊक आहेत की जेथे मुलाला अभ्यासाविषयी अतिशय तिटकारा वाटत होता; त्याचा परिणाम म्हणून त्याची पचनक्रिया पार बिघडून गेली आणि त्याला जठराचा विकार जडला.

आम्ही आमची शारदीय सुटी, वासंतिक सुटी आणि हिंवाळयाची सुटी नेहमी मोकळयावर, निसर्गाच्या सान्निध्यात – कधी सहल, कधी रानातील फेरफटका, कधी विश्रांती, कधी खेळ – अशा रीतीने व्यतीत करीत असू... आमच्या पहिल्या हिंवाळी सुटीत मुलानी पायात घसरपट्टया चढविल्या आणि ती रानात घसरगुंडीचा खेळ खेळावयास गेली. आनंद विद्यालयात आम्ही व्यतीत केलेल्या हिंवाळयाप्रमाणेच मुलानी बर्फाचा किल्ला बांधला आणि बर्फाचे फिरते चक्रही तयार केले. मुलानी जेव्हा बालवीर पथकांत प्रवेश केला तेव्हा त्यांच्या पथकांच्या अत्यंत उद्‌बोधक सभा रानात होत असत.

हिंवाळयाच्या दिवसांत मोकळयावर आम्ही जे काम करीत होतो ते उत्तम आरोग्याचे एक अत्यंत महत्त्वाचे असे उगमस्थान होते. सौम्य बर्फवृष्टीच्या काळात (– १० सें. पर्यंत) आठ वर्षांची मुले आठवडयातून एकदा दोन तास काम करीत, नऊ-दहा वर्षांची मुले तीन तास व अकरा वर्षांची मुले चार तास काम करीत. झाडांच्या खोडांभोवती वेत गुंडाळणे, वनस्पतींचे थंडीपासून रक्षण करण्यासाठी चाकाच्या छोटया ढकलगाडीतून बर्फ आणून टाकणे अशा प्रकारची ती कामे असत. मोकळया हवेतील हे काम म्हणजे आपली शरीरे दणकट करण्याचे आणि थंडीची बाधा होण्यापासून त्यांचे रक्षण करण्याचे एक उत्कृष्ट साधन होते.

कुरणांमध्ये, शेतांवर किंवा रानावनांत सहली काढण्यात मुले आपली उन्हाळयाची सुटी व्यतीत करीत. महिनाभर निसर्गाशी साधण्यात येणाऱ्या या प्रत्यक्ष सन्निध संपर्कामुळे आपल्या आरोग्याला बळकटी आणण्यास व त्याचबरोबर बौद्धिक विकासात भर घालण्यास मुलाना निरतिशय मदत

होई. पहिली इयत्ता पूर्ण केल्यानंतर मुलानी ऑगस्ट महिना सामुदायिक शेताच्या मळयावर आणि मधुमक्षिकाकेंद्रात घालविला. दुसऱ्या इयत्तेनंतर सामुदायिक शेताच्या कलिंगडाच्या शेतात मुले राहून आली.

ऑगस्ट महिना म्हणजे निसर्गाकडून उदारहस्ताने मिळणाऱ्या अनेकविध भेटींचा काळ. बहरत्या सौंदर्याचा तो परमोत्कर्षबिंदू असतो, उत्सवी श्रमांचा तो हंगाम असतो. त्यावेळी हवा विशेष स्वच्छ असते, पारदर्शक असते, आल्हाददायक असते. कापणी केलेल्या गव्हाच्या, तयार झालेल्या कलिंगडांच्या, द्राक्षांच्या आणि सफरचंदाच्या परिमलाने ती जणू काही भारून गेलेली असते. ग्रीष्माच्या आणि शरदाच्या सीमारेषेवर खेड्यातील हवा वनस्पतीद्रव्यानी विशेष शिगोशिग भरलेली असते. फुफ्फुसाचे विकार, सर्दी, संधिवाताचे आजार यांकडे कल असलेल्या मुलाला जर तुम्हाला कणखर बनवायचे असेल तर संपूर्ण महिनाभर त्याला मोकळयावर राहू द्या.

एकदा मुलानी एक दिवस सामुदायिक शेताच्या कलिंगडाच्या मळयात घालविला. त्याना अगदी भरपूर कलिंगडांची व खरबुजांची मेजवानी देण्यात आली. स्टेपच्या त्या विस्तीर्ण मनमोहक प्रदेशाचा आम्ही दुःखानेच निरोप घेतला. त्या दिवशी संध्याकाळीच सामुदायिक शेताच्या अध्यक्षानी कलिंगडाच्या मळयात चार नवी कुटिरे उभारण्याची आज्ञा दिली. एका दिवसात ती उभारणी पुरी करण्यात आली. मी मुलाना जेव्हा सांगितले की आपण आपली सुटी कलिंगडाच्या मळयात घालविणार आहोत तेव्हा मुलांचा विश्वास बसला नाही. "आपल्याला ते खरोखरच राहू देतील तेथे?" त्यानी विचारले. पेंढ्याच्या छपरांची त्यांच्यासाठी बांधलेली ती कुटिरे पाहिल्यानंतरच त्यांचा माझ्यावर विश्वास बसला. आपण तेथे महिना घालविणार आहोत या विचारानेच मुले आनंदाने नुसती वेडावून गेली. कुटिरांची जमीन आम्ही गोड सुवासिक गवताने आच्छादिली, आमच्या चादरी व लोकरी पांघरुणे आणली, पाण्याचा एक डोण बनवला आणि मुलांच्या खाण्याची सोय करण्यासाठी पालकानी एक स्वयंपाकघर तयार केले. दोन कुटिरांत मुले राहिली व दोन कुटिरांत मुली. निळया आकाशाच्या आणि लखलखीत सूर्यप्रकाशाच्या एखाद्या चेतोहर गाण्याप्रमाणेच कलिंगडाच्या मळयात घालविलेल्या या महिन्याचे मुलाना कधीही विस्मरण पडले नाही.

आम्ही भल्या पहाटे उठत असू, रात्रीच्या स्वप्नांची दुलई बाजूस सारून

जाग्या झालेल्या निसर्गाचे अनिर्वचनीय सौंदर्य आम्ही दोन डोळयात साठवीत असू. आम्ही दवातून भटकत असू. मोठमोठ्या लाकडी पिंपांतून झऱ्यावरून वाहून आणलेल्या आणि डोणात साठविलेल्या पाण्याने आम्ही मुखमार्जन करीत असू. या सर्वच गोष्टींची – सकाळचा व्यायाम करणे, थंड पाण्याने मुखमार्जन करणे, टोमॅटोंबरोबर खाण्यासाठी बटाटे उकडणे आणि मग कलिंगडांचा आस्वाद घेणे या सर्वांचीच मुलाना मोठी मौज वाटत होती. न्याहारीनंतर आमचे काम सुरू होई: कलिंगडे व खरबूज गोळा करण्यासाठी आम्ही सामुदायिक शेतकऱ्याना मदत करीत असू.

शहरांतील मुले व त्यांचे पालक आमच्या भेटीसाठी येत. त्याना अगदी अभिमानाने आम्ही कलिंगडांचा मळा दाखवीत असू आणि त्याना खरबुजांचा व कलिंगडांचा पाहुणचार घडवीत असू. कलिंगड तयार झाले आहे की नाही हे केवळ नजरेनेच सांगण्यास मुले शिकली. कलिंगडाच्या मळ्याशेजारीच मधुरससंपन्न वनस्पती लावण्यात आल्या होत्या आणि सामुदायिक शेताचा मधुमक्षिकापालक ऑगस्टमध्ये तेथे येत असे. त्यामुळे आंद्रेइ आजोबांची आमची रोज भेट होई. आम्ही त्यांच्यासाठी कलिंगडे आणि आमच्या स्वयंपाकीणबाईनी – पाशाकाकूनी – बनविलेले गरम गरम कटलेट घेऊन येत असू. आंद्रेइ आजोबानी आम्हाला मधमाश्यांसकट मधाचे एक पोळे दिले. "तुमच्या शाळेच्या बागेच्या आवारात हे घेऊन जा", ते म्हणाले. मुले माश्यांच्या जीवनाचे मोठ्या गोडीने अवलोकन करीत.

दर दिवशी मुले तळ्यात स्नान करीत, नंतर रानात जात किंवा आंद्रेइ आजोबांसाठी आणि पाशाकाकूंसाठी रानफुले गोळा करून आणीत. बाहेर दुपारचे उन्ह तापले असता आम्ही कुटिरांत वामकुक्षी करीत असू. ताजी हवा आत येण्यासाठी कुटिरांच्या भिंतीना "छोट्या खिडक्या" ठेवण्यात आल्या होत्या. माळवनस्पतींच्या बोख्यानी त्या आच्छादिलेल्या होत्या. माशा आणि मच्छर अशा वनस्पतींच्या वाऱ्यालाही उभे राहू शकत नाहीत. वामकुक्षी करताना आम्ही या खिडक्या उघड्या ठेवीत असू. बाहेर हवा तापलेली असली तरी कुटिरांत शीतल वाटत असे. वाऱ्याचा झोत अंगावर घ्यायला घाबरू नका असे आनंद विद्यालयाच्या अगदी पहिल्या दिवसापासून मी मुलाना शिकविले होते. अगदी लहानपणापासून वाऱ्याचे झोत अंगावर घेण्याची संवय झाल्यास माणसाला त्यांपासून मुळीच धोका नसतो असे जीवनातूनच अनुभवास आले आहे. वायुवीजन नसलेल्या खोलीतल्या कोंदट

हवेविषयी माणसाला तिटकारा वाटण्यास शिकविणे हे आरोग्याचे चांगले नियम अंगी मुरविण्याइतकेच महत्त्वाचे आहे.

उन्हाचा ताप उतरल्यानंतर मुले कामाला लागत : बहुतेक वेळा शेतकरी दुपारी कलिंगडे आणि खरबुजे गोळा करावयास येत. सूर्य अस्तास गेल्या-नंतर शेतांवर, डोंगरांवर, कुरणांवर फिक्कट जांभळया धुक्याचे आवरण पडे आणि एका पाठोपाठ एक तारे आकाशात चमकू लागत. अशा वेळी मुले एका कुटिरांभोवती जमत. संध्याकाळच्या वेळी असाधारण साहसांच्या आणि सफरींच्या शौर्यशाली पराक्रमांच्या गोष्टी आणि परीकथा ऐकायला मुलाना विशेष आवडे. आपल्या लोकांच्या कल्पनाविहारातून निर्माण झालेल्या परीकथांतील प्राण्यांच्या , जलकन्यांच्या आणि चेटकिणींच्या, लोकांमध्ये प्रचलित असलेल्या कल्पनेनुसार ऑगस्टच्या शांत रात्रीना सुपीकतेची देणगी देणाऱ्या शरतसुंदरीच्या मी मुलाना गोष्टी सांगत असे.

रात्रीच्या शांत समयी पुन्हा एकदा एक विस्मयकारक अशी मंजुळ स्वरलहरी आमच्या कानावर पडली : काही दिवसांपूर्वीच जेथे गव्हाची कापणी झाली होती अशा शेतांवरून वेळूच्या पांव्यातून निघावा असा एक मधुर नाद ऐकू येत होता. रात्री गाणारा एक अपरिचित पक्षी तेथे गात होता ही गोष्ट अगदी उघड दिसत होती. पण मुलांच्या कल्पनाशक्तीतून त्या जागी एक प्रेमळ अद्‌भुतरम्य आकृती चितारली गेली – त्यांच्या कल्पनाचक्षूंसमोर एक लहान मुलगा उभा राहिला. त्याने गळयात गव्हांची माळ घातली होती आणि लोकाना आनंद देण्यासाठी तो आपला पांवा वाजवीत होता. या मुलाला त्यानी सूर्यकेंसर असे नाव दिले. त्यांच्या कल्पनेनुसार सूर्यकेंसर हा सूर्याचा व सुपीक भूमीचा पुत्र होता. गव्हाची कणसे जेथे तयार होत आलेली असतात तेथे तुम्हाला सूर्यकेंसर आढळतील. गव्हाची कापणी झाल्यानंतर हा सूर्यकेंसर मधुर वासाच्या पेंढ्याच्या गंजीत जातो आणि तेथे संध्याकाळी आपली आनंदाची आणि दुःखाची गाणी गातो. हिंवाळा जवळ येतो तेव्हा जेथे सुपीकतेचे जीवनदायी रस निद्रा घेत असतात अशा ऊबदार धरणीत तो प्रवेश करतो. पण गव्हाची हिरवीगार रोपे जेव्हा पुन्हा वर येतात तेव्हा शेतांमध्ये मूर्यकेंमर पुन्हा प्रकट होतो आणि आपली सुंदर गाणी म्हणू लागतो.

मुले फार वेळा निसर्गाला मनुष्यरूप देतात आणि अद्‌भुतरम्य कल्पना-विलासामुळे ती वास्तवापासून काही प्रमाणात दूर जाण्याची शक्यता असते असे वाटण्याचा संभव आहे. पण सहस्र वेळा त्याचे उत्तर "नाही" असेच

आहे. वास्तविक जीवन, भूमीची सुपीकता, माणसे यांच्याविषयीच्या परीकथा हेच प्रतिभेचे शक्तिशाली उगमस्रोत आहेत. सूर्यकेंसरासंबंधी मुलानी स्वत: रचलेल्या गीतामध्ये जीवन, सौंदर्य, सुपीकता आणि सुबत्ता यांचे मूर्तिमंत प्रतीक असलेल्या एका सजीव वस्तूची मनुष्यरूप धारण केलेली एक परीकथात्मक प्रतिमा प्रकट झाली होती. हे अगदी साधे गीत असे आहे :

रविस्पर्शाने जाग आली
धरतीला
पिकू लागली गव्हाची रोपे
पण बासरीवर कोण घुमवीत आहे ते
मंजुळ नाद?
सूर्यकेंसर, सूर्यकेंसर,
गव्हाच्या लोंब्यांतून
आणि पेरांतून विणलेली
जादूची वस्त्रे परिधान केलेला;
आणि कोरलेल्या त्याच्या
कणसांच्या केसांतून
सुवर्ण भ्रुकुटी अन् प्रमुदित पापण्या...

मुले जेव्हा परीकथात्मक प्रतिमांच्या प्रभावाखाली असतात तेव्हा एक विस्मयजनक गोष्ट घडते: कुठेतरी, कधीतरी त्यानी ऐकलेला किंवा वाचलेला शब्द शेतांच्या आणि कुरणांच्या परिमलाने परिप्लुत होऊन तेजस्वी रंगांचा प्रकाश उधळीत जाणिवेच्या खोल गर्भातून जागा होतो आणि काव्यात्मक प्रतिमांच्या रूपाने मूल निर्मिती करू लागते.

या प्रकरणात आरोग्याची चर्चा करीत असताना मी परीकथांविषयी, अद्‌भुतरम्य प्रतिमांविषयी, मुलांच्या निर्मितीक्षमतेविषयी का बोलत आहे असा वाचकाना प्रश्न पडेल. त्याचे कारण असे आहे की तो मुलांचा आनंद आहे, आणि आनंदाशिवाय आत्मिक आरोग्य आणि शारीरिक आरोग्य यांचा सुसंवादी मेळ अशक्यप्राय आहे. शेतांच्या आणि लुकलुकत्या ताऱ्यांच्या सौंदर्याने, नाकतोडयांच्या अखंड गीतस्वराने आणि रानफुलांच्या सुगंधाने मोहित होऊन मुलाने एखादे गाणे रचले तर त्याचा अर्थ हाच होतो की मुलाच्या आत्म्याचा व शरीराचा हा सुसंवादी मेळ परमोच्च बिंदूला

पोहोचलेला आहे. माणसाच्या आरोग्याची जोपासना, आणि विशेषत: मुलाच्या आरोग्याची जोपासना म्हणजे स्वच्छतेच्या आणि आरोग्याच्या नियमांची केवळ एखादी गुंतावळ नव्हे किंवा आहार, काम आणि मनोरंजन यांच्या एका विशिष्ट दैनंदिन क्रमाला आवश्यक असलेली संहिता नव्हे. ती मुख्यतः आणि प्रथमतः शारीरिक आणि आत्मिक शक्तींच्या सुसंवादी परिपूर्णतेची जोपासना आहे आणि निर्मितीचा आनंद हा त्या सुसंवादित्वाचा कळस आहे.

मुलानी तिसरी इयत्ता पुरी केल्यानंतरही आम्ही आमची उन्हाळयाची सुटी कलिंगडाच्या मळयात घालविली; पण यावेळी आमची जागा दुसरी होती – द्राक्षांच्या मळयांशेजारी. यावेळी मुले मळयात काम करीत असत आणि द्राक्षांचे घड टोपल्यांत भरण्यासाठी मोठ्या माणसाना मदत करीत असत. सकाळी आणि संध्याकाळी ते तळयावर पोहायला जात. तेथे एक मनोरंजक खेळ त्यानी शोधून काढला: तेथे असलेल्या तीन होडया म्हणजे देवमाश्यांच्या शिकारीला जाणारा जहाजांचा ताफा आहे अशी त्यानी कल्पना केली. ते छोटेसे सरोवर म्हणजे महासागर बनला आणि टेहळणी करीत देवमाश्यांच्या शोधात आम्ही निघालो... येथेही आम्ही बासऱ्या बनविल्या; आमची संगीत-सभा संध्याकाळी भरत असे. आम्ही बासरीवर लोकगीते वाजवीत असू; त्याचप्रमाणे ग्रीष्मातील संध्याकाळ, वादळी पाऊस, किरमिजी आकाश, धरणाशेजारचे रहस्यमय पाणभोवरे, स्थलांतर करणारे पक्षी यांविषयी आम्ही गाणीही रचली. प्रत्येक वर्षागणिक संगीताने आमच्या आत्मिक जीवनात अधिकाधिक खोल शिरकाव केला. मुले जेथे जेथे सुटीत जात तेथे तेथे ती असामान्य संगीतकारांच्या आणि लोकगीतांच्या ध्वनिपट्टिका ऐकत.

चवथी इयत्ता संपविल्यानंतर १९५६ च्या उन्हाळयात मुलानी आपली सुटी ओक राईच्या आणि तळयाच्या काठाशेजारच्या कुरणात घालविली. झाडांच्या फांद्यांची त्यानी कुटिरे बनवली आणि पेंढ्याने त्यांची शाकारणी केली. मुलांच्या पालकानी एक स्नानगृह आणि पाकगृह बनविण्यास मदत केली. स्वयंपाकीणबाईना मदत करण्याइतकी, खेडयात जाऊन पाव, बटाटे, मासे, दूध व भाजीपाला घेऊन येण्याइतकी मुले आता मोठी झाली होती. वीस वासरे आणि दोन घोडयांची आम्ही निगा राखीत होतो. दिवसा मुले वासराना चराऊ कुरणात घेऊन जात असत आणि रात्री त्याना सरोवरा-शेजारच्या छोटयाशा गोठयात बांधीत असत. प्रत्येकजण घोडयावर बसायला

शिकला आणि धान्य, कडधान्य इ. किराणा माल आणण्यासाठी घोड्या-वरून खेड्यात जाऊ लागला. प्रत्येकालाच काही किलोमीटर दौड मारण्याची इच्छा असे; त्यामुळे आम्ही घोड्यावर बसण्याचा अगदी काटेकोर क्रम ठरवून दिला. वलोद्या, सान्या आणि तीना घोड्यावर बसण्यात विशेष तरबेज झाल्याचे पाहून मला फार आनंद झाला. घोड्यावरून मारलेल्या रपेटींमुळे त्यांचे आरोग्य सुधारण्यास मदत झाली.

त्या वर्षी खोल सरोवरात मुले पोहत असत आणि ती उत्तम प्रकारे पोहायला शिकली. पोहण्यासाठी मी एक सुरक्षित जागा शोधली आणि प्रत्येक फेरीत एकेका मुलाला घेऊन मी तेथे जात असे.

गवतकापणीच्या दिवसांत तर विशेष मौज येत असे. गवत वाळविण्यास व त्यांच्या गंज्या रचण्यास आम्ही मोठ्या माणसाना मदत करीत असू आणि संध्याकाळी गवताच्या गंजीच्या उंच माथ्यावर चढून जात असू. अशा वेळी मुले अगदी हरखून जात असत. ताऱ्यांविषयीच्या आणि दूरदूर-च्या जगांविषयीच्या गोष्टी त्याना ऐकायच्या असत. तारांकित घुमटाखाली सारे विश्व मुलांच्या अगदी नजरेसमोरच पसरलेले असे आणि त्यांच्या मुखातून प्रश्न बाहेर पडत: "ही पृथ्वी, हा सूर्य, हे तारे — हे सारे कुठून आले?" निसर्गाच्या सौंदर्याविषयी व भव्यतेविषयी वाटणाऱ्या आश्चर्याने आणि विस्मयाने विचारांची व भावनांची पकड घेतली की मुलां-च्या जाणिवेत अशा प्रकारचे प्रश्न आकार घेतात अशी माझी खात्री पटली आहे.

ग्रहांविषयीच्या एका गोष्टीनंतर "पण त्याच्या पलिकडे काय आहे?" हा मुलानी विचारलेला प्रश्न मी कधीही विसरणार नाही. दृग्गोचर जगांच्या पलिकडे असेच विश्व पसरले आहे आणि अशी असंख्य जगे आहेत असे मी जेव्हा मुलाना सांगितले तेव्हा त्याना अतिशय विस्मय वाटला. "पण हे जग संपते तरी कुठे?" त्यानी विचारले. विश्वाची अनंतता ही त्याना सर्वात अनाकलनीय अशी गोष्ट होती. या स्तिमितकारक वस्तुस्थितीच्या दर्शनाने मुले एकदम कशी गप्प झाली हे अजूनही मला आठवते. अनंततेची कल्पना करण्याचा ती प्रयत्न करीत होती पण त्याना ते शक्य होत नव्हते. त्या रात्री त्याना बराच वेळ झोप आली नाही. काही मुलाना दूरवरच्या सूर्यांची आणि ग्रहांची स्वप्नेही पडली. दुसऱ्या दिवशी त्याना संत्रस्त करून सोडणाऱ्या या प्रश्नाकडे ती पुन:पुन्हा वळत होती: अनंतता

म्हणजे काय? शाळेच्या संपूर्ण काळात त्यांच्या बाबतीत या प्रश्नाची नवलाई कधीच संपली नाही.

...आनंद विद्यालयातील मुलांच्या शिक्षणाच्या पहिल्या आठवड्या-पासून खेळांवर मी पुष्कळ भर दिला. मुलांसाठी क्रीडांगण बनविण्यासाठी आणि झोपाळा बांधण्यासाठी वडीलधाऱ्या मुलानी आम्हाला मदत केली. आमच्याकडे भरपूर चेंडू होते आणि मुले दुसऱ्या इयत्तेत गेल्यानंतर त्यानी टेबल टेनिस खेळायला सुरुवात केली. थाळीफेक, चेंडूफेक तसेच दोऱ्यांवर व खांबावर चढणे हे खेळही मुलाना तेवढेच आवडत असत.

संपूर्ण उन्हाळ्यात मुले अनवाणीच जात-येत; त्याना पावसाचीही भीती वाटत नसे. शारीरिक शिक्षणाचे एक विशेष महत्त्वाचे साधन म्हणून मी या गोष्टींकडे पाहात असे. पहिल्या आणि दुसऱ्या इयत्तांत फक्त तीन मुले सर्दीने आजारी झाली आणि तिसऱ्या व चवथ्या इयत्तेत कोणीही आजारी पडले नाही.

सर्दी-पडशापासून मुक्त असणे या गोष्टीला मी विशेष महत्त्व देत असे. अनेक वर्षे मला या गोष्टीची चिंता लागून राहिली होती. हवामानात फार जलद बदल घडत तेव्हा जवळ जवळ अर्धी मुले शिंकायला लागत. अशा प्रकारचे दुखणे असताना ताप नसला तरीही मूल सुरळीत काम करू शकत नाही. आणि सर्दी-पडशावर मूलग्राही असा उपाय नाही. अनेक प्रकारचे सर्दी-पडशाचे आजार हे सांसर्गिक आजार नसून परिसरातील जलद बदलाना संवेदनाक्षम शरीराकडून मिळालेली ती प्रतिक्रिया असते असे वैद्यकीय शास्त्राने सिद्ध केले आहे. अनेक वर्षांच्या अनुभवातून असे निदर्शनास आले आहे की पाय हे विशेष संवेदनाक्षम असतात. यत्किंचित गारठ्याचीही पायाला जर बाधा होत असेल तर अ-सांसर्गिक सर्दी-पडशाची माणसाला बाधा झाल्याशिवाय रहात नाही. आमच्या शैक्षणिक कार्यात शरीराच्या बळकटीच्या कामाला पाय कणखर बनविण्याच्या कामापासून सुरुवात झाली. तथापि हे करण्यापूर्वी मुलाची एकूण शरीरप्रकृती विचारात घेणे आवश्यक आहे. पाय कणखर बनविण्यासाठी विशिष्ट काळासाठी घेण्यात येणारे कोणतेही खास व्यायाम नाहीत. मुलाला "उबेच्या वातावरणा"ची सवय लावून देणे, शरीराची प्रतिकारक्षमता नष्ट करणाऱ्या निरर्थक काळज्या करीत न बसणे अशा प्रकारच्या एकूण परिपाठाचे त्यासाठी सातत्याने पालन करणे आवश्यक आहे. उन्हाळ्यात मूल अनवाणी न फिरले तर ओल्या टॉवेलने अंग पुसून काढण्याचा आणि स्नानाचा काही उपयोग होणार नाही.

...अशा रीतीने मुलांची प्राथमिक शाळा पुरी झाली. सुटीचा तो शेवटचा दिवस होता. सरोवरात पोहून आल्यानंतर मुले हिरवळीवर जमली होती – दणकट, रापट व सुंदर दिसत होती ती. ती अकरा वर्षांची होती पण वाटत होती बारा किंवा तेरा वर्षांची. ज्याला इतकी वर्षे "ठेंगू" म्हटले जात होते तो दान्कोही चांगला पाचव्या इयत्तेतील मुलांसारखा उंच पुरा दिसत होता.

वर्षातून अनेक वेळा मुलांची वैद्यकीय तपासणी होत असे. पहिल्या इयत्तेत चार मुलांची दृष्टी अधु असल्याचे आढळून आले होते, दुसऱ्या इयत्तेत अधु दृष्टीची दोन मुले राहिली आणि तिसऱ्या इयत्तेत कोणीही अधु दृष्टीचे राहिले नाही. जीवनातून असे निदर्शनास आले आहे की अधु दृष्टी हा एखादा नेत्रदोष नसतो तर शारीरिक व आत्मिक विकासातील विसंवादाचा तो परिणाम असतो. पहिल्या दोन वर्षांत हृदयवाहिन्यांच्या अशक्ततेची लक्षणे तीन मुलांत आढळून आली होती; दोघांमध्ये प्ल्यूरसीचे काही परिणाम राहिले होते; दोन मुलांमध्ये ब्रॉन्काइटिसची लक्षणे आढळली होती आणि एका मुलात क्षयाची सुप्त लक्षणे दिसून आली होती. मुलानी जेव्हा प्राथमिक शाळा पुरी केली तेव्हा फक्त एका मुलामध्ये हृदयवाहिन्यांच्या अशक्ततेची लक्षणे बाकी उरली होती; पण पहिल्या दोन वर्षांत ती जितकी ठळक होती त्यापेक्षा आता त्यांचे प्रमाण पुष्कळच कमी होते.

## अभ्यास – आत्मिक जीवनाचा एक भाग

मुलानी शाळा सुरू करण्यापूर्वी त्यांच्याभोवती पसरलेले निसर्गाचे, खेळांचे, सौंदर्याचे, संगीताचे, अद्‌भुतरम्यतेचे आणि निर्मितिक्षमतेचे स्तिमितकारक जग वर्गाबाहेर बंदिस्त करून ठेवता कामा नये ही गोष्ट महत्त्वाची आहे. शालेय जीवनाच्या पहिल्या महिन्यांतील आणि पहिल्या वर्षातील अभ्यासाचे रूपांतर एकाच एका कार्यप्रकारात करण्याची गरज नाही. मुलाच्या जीवनात पूर्वी जे आनंद असतात त्याच आनंदांचे दालन शिक्षक जेव्हा अनंत हस्ते मुलासमोर खुले करतो तेव्हाच मुलाला शाळेबद्दल आत्मीयता व प्रेम वाटू लागते. मुलाना कंटाळा येऊ नये म्हणन शिक्षकाने मुलांच्या आनंदांनुसार अभ्यासाचा गाडा हाकता कामा नये आणि मुद्दाम अभ्यासाचा भार हलका करता कामा नये. गंभीर, चिकाटीपूर्ण, कष्टप्रद

श्रम हे बौद्धिक परिश्रमाशिवाय अशक्यप्राय असतात ; आणि मानवी जीवनाचा हा जो सर्वात महत्त्वाचा पैलू आहे त्यासाठी मुलाची हळू हळू, टप्प्याटप्प्याने तयारी केली पाहिजे.

मेहनतपूर्ण श्रम-संवयी आणि सृजनशील बौद्धिक श्रम हळू हळू मुलांमध्ये भिनविणे हे एक महत्त्वाचे शैक्षणिक कार्य आहे असे मला दिसून आले आहे. प्राप्त क्षणी सभोवतालच्या जगापासून स्वतःला अलिप्त करून घेण्यास आणि शिक्षकाने किंवा स्वतः मुलाने आपल्यासमोर जे उद्दिष्ट ठेवले असेल त्या उद्दिष्टाच्या दिशेने आपल्या बौद्धिक परिश्रमांचा रोख वळविण्यास मुलाने समर्थ असले पाहिजे. अशा एकाग्रवृत्तीचा मुलांमध्ये सराव घडवून आणण्याचा मी प्रयत्न केला. असे केले तरच बौद्धिक श्रमाविषयी आवड निर्माण होऊ शकते.

केवळ शारीरिकच नव्हे तर बौद्धिक अडचणींवरही मात करण्यास हळू हळू मुलाना शिकविणे हे प्राथमिक शाळेचे कार्य आहे. वस्तू, वस्तुस्थिती आणि घटना यांची विविध जटिलता आणि बारकावे, तपशील व अंतर्विरोध यांत खोलवर शिरकाव करून घेण्यात आणि त्यासंबंधीच्या बौद्धिक प्रयत्नात बौद्धिक श्रम सामावले आहेत, आणि या श्रमाचा मूळ आशय मुलाना समजला पाहिजे. अभ्यासाचा भार हलका व्हावा म्हणून अशा अडचणींच्या ज्ञानापासून मुलाला कोणत्याही परिस्थितीत दूर ठेवता कामा नये. प्रतिपाद्य विषयाच्या ज्ञानावर प्रभुत्व मिळविण्याच्या प्रक्रियेबरोबरच स्वतंत्र बौद्धिक श्रमाची क्रियाही घडली पाहिजे. बौद्धिक शिक्षण हे आत्मिक जीवनाचे असे एक क्षेत्र आहे की जेथे शिक्षकाच्या प्रभावाचा स्वयंशिक्षणाशी जैव मिलाफ घडून आलेला असतो. स्वतःसमोर ठेवण्यात आलेल्या उद्दिष्टांचे बौद्धिक संघटन, बौद्धिक ताकदीची एकाग्रता, आकलनाचा प्रयत्न आणि आत्म-संयम येथून इच्छाशक्तीच्या शिक्षणाला सुरुवात होते. प्रत्यक्ष बौद्धिक श्रमातून अडचण या शब्दाचा अर्थ मुलाना कळावा अशी माझी इच्छा होती.

शाळेतल्या सर्व गोष्टी मुलाला जर सोप्या वाटल्या तर कालांतराने त्याच्या बौद्धिक क्रिया आळशी बनतील. जीवनाकडे थिल्लर वृत्तीने पहाणारा तो एक भ्रष्ट माणूस बनेल. ही गोष्ट कदाचित विचित्र वाटेल, पण बुद्धिमान मुलाना अभ्यासाच्या प्रक्रियेत काही आव्हान आढळले नाही तर त्यांची विचारक्रिया बहुधा आळशी बनते. आणि पहिल्या वर्गात, इतर मुलाना जेथे बौद्धिक परिश्रम खर्चावे लागतात तेथे बुद्धिमान मूल एखाद्या

गोष्टीवर जेव्हा सहजगत्या प्रभुत्व मिळविते तेव्हा बहुतकरून विचारक्रिया आळशी बनण्याकडे कल तयार होतो ; आणि मग अशा मुलाचे विचार आवश्यकतया उनाडक्या करू लागतात. विद्यार्थ्यांना निरुद्योग बसू न देणे हे एक अनन्य असे शैक्षणिक कार्य आहे.

आमचा पहिला वर्ग एका छोट्या स्वतंत्र इमारतीत भरत असे. आम्ही जेथे अभ्यास करीत होतो त्या प्रशस्त, प्रकाशित खोलीला पूर्वेच्या व दक्षिणेच्या बाजूला खिडक्या होत्या ; त्यामुळे वर्गात चांगला सूर्यप्रकाश खेळत असे. खिडक्यांबाहेर कवठी फळांची झाडे होती, त्यांच्या पलिकडे सफरचंदे, पिअर आणि जर्दाळूची झाडे होती आणि दूरवर ओक वृक्षांची राई होती. आमच्याच शाळेची इमारत नव्हे तर इतर इमारतीही हिरव्यागार वनस्पतीनी वेढलेल्या होत्या. झाडावरच्या पानांमुळे हवा प्राणवायूने समृद्ध बनली होती. शाळेच्या शेत-आवारामध्ये नेहमीच शांतता असे. आमच्या खोलीला लागूनच एक लांबलचक सज्जा होता आणि तेथून दुसऱ्या इमारतीकडे जाता येत असे : या इमारतीत परीकथांसाठी एक खोली तयार करण्याचे आमचे स्वप्न होते.

आमच्या इमारतीसमोरच काँक्रीटचा एक चौक होता. पावसाचे पाणी साठवून बूट धुण्यासाठी तेथे एक जागा तयार केली होती. त्या चौकातून अनेक रस्ते फुटत होते आणि त्यांच्या दुतर्फा पीच, लिंडन व आक्रोडाची झाडे होती. त्यांपैकी एक रस्ता शाळेच्या आवाराच्या मध्यभागी लावण्यात आलेल्या प्रशस्त द्राक्षमंडपाकडे जात होता. दुसरा रस्ता आमच्या शेजाऱ्यांकडे, पाचव्या इयत्तेतील मुलांच्या वर्गांकडे जात होता ; तिसरा हिरवळीच्या मैदानांकडे व रायांकडे व चवथा झुडुपाझुडुपानी माजलेल्या घळीकडे जात होता.

पहिल्या व दुसऱ्या वर्गांतील विद्यार्थ्यांनी स्वतंत्र इमारतींत शिकावे हे मला श्रेयस्कर वाटले. विशेषतः पहिल्या वर्गात अभ्यासाची, श्रमाची व मनोरंजनाची, त्यांची खास दिनचर्या होती. मोठ्या सामूहिकात आढळणारा आरडाओरडा आणि गोंगाट लहान शाळकरी मुलांच्या बाबतीत वर्ज्य मानला पाहिजे. संपूर्ण बौद्धिक विकासाला शांततेची आवश्यकता असते आणि या शांततेच्या वरदानाचा लहान शाळकरी मुलाना जितका दीर्घ काळ उपयोग करता येईल तेवढा करू दिला पाहिजे. अनेक वर्षांच्या अवलोकनातून मी असा निष्कर्ष काढला आहे की मुलाभोवती जी परिस्थिती निर्माण होते त्या परिस्थितीत शाळेच्या पहिल्या काही दिवसांत मूल

दिङ्मूढ होऊन जाते. मुले थकून जातात ती फारशी बौद्धिक श्रमामुळे नव्हे, तर वर्ग सुरू होण्यापूर्वी आणि मधल्या सुटीत सतत चालणाऱ्या मुलांच्या आरडयाओरडयामुळे, धावण्यापळण्यामुळे आणि गोंगाटामुळे त्यांच्या चित्तवृत्ती ज्या सतत चेतविल्या जातात त्यामुळे. पाच वर्षांच्या काळात पहिल्या इयत्तेतील विद्यार्थ्यांचे मधल्या दीर्घ सुटीच्या काळातले मी अवलोकन केले. शाळेतल्या एकूण विद्यार्थीसमहात आरडाओरडा, गदारोळ, ढकलाढकली, गोंगाट असे जे प्रकार चालत त्या वातावरणात मुलांचा अर्धा तास जात असे. सुटी संपताच विद्यार्थी आपापल्या वर्गात परतत. अनुभवी शिक्षकांच्या बाबतीतही तासाची पहिली दहा मिनिटे मुलांचा गोंगाट कमी करण्यात वाया जात असत. आपल्या स्वतःच्या छोटया सामूहिकात पहिल्या इयत्तेतील विद्यार्थी जेव्हा आपली मधली सुटी घालवितात तेव्हा चित्र अगदी पालटलेले दिसते. मुलांची चेतलेली मने शांत करण्यासाठी दोन मिनिटेही लागत नाहीत.

अनिर्बंध गोंगाट आणि इकडेतिकडे उगाच धावणे पळणे हे कोणत्याही शाळेचे उत्कृष्ट लक्षण होऊ शकत नाही. मुलांचा आनंद ही अशी एक सखोल नदी आहे की जिच्या लहरीपणाला आणि मनमानीपणाला बांध घालणारा एखादा किनारा असणे आवश्यक आहे.

सध्या आपले पहिले व दुसरे वर्ग हिरव्यागार वनस्पतींनी वेढलेल्या आरामशीर, स्वतंत्र इमारतींमध्ये भरतात. मुलांसाठी निर्माण करण्यात आलेल्या या वातावरणामुळे काम आणि खेळ यांची आलटूनपालटून सांगड घालण्यास मदत होते.

पहिल्या काही आठवडयांत मुलाना मी त्यांच्या नव्या जीवनात क्रमाक्रमाने घेऊन गेलो. अभ्यासात आणि आनंद विद्यालयात मूलतःच फारसा फरक ठेवण्यात आला नाही आणि माझ्या प्रयत्नांचा रोखही तोच होता. सप्टेंबरमध्ये दिवसाला चाळीस मिनिटांपेक्षा आणि ऑक्टोबरमध्ये दोन तासांपेक्षा जास्त आम्ही वर्गात बसत नसू. तो वेळ आम्ही लिहिण्याच्या आणि अंकगणिताच्या तासांसाठी राखून ठेवला होता. राहिलेले दोन तास आम्ही वर्गाबाहेर काढीत असू. आम्ही वर्गात ज्या गोष्टी करीत असू त्याला मुले म्हणत खरे पाठ आणि त्या पाठांची ती आतूरतेने वाट पहात असत. त्यांच्या या मनीषेचा मला आनंद वाटत होता आणि माझ्या मनात विचार आला: "कोंदट वर्गात थकूनभागून बसलेले तुमचे शाळासोबती सुटीच्या

घंटेची किती उत्सुकतेने वाट पहात असतात याची तुम्हाला नुसती कल्पना आली तरी पुरे, मुलानो..."

वर्गातल्या पाठांसाठी मुलांची क्रमाक्रमाने तयारी करणे ही सर्वांगीण व्यावसायिक, नैतिक, शारीरिक व बौद्धिक शिक्षणाची एक अत्यावश्यक अट आहे. माणसाला विविध परिस्थितींत काम करण्यास शिकविणे हे त्याचे अंतिम उद्दिष्ट आहे. वर्गातील पाठ म्हणजे इच्छा असो वा नसो नाइलाजास्तव जिच्याशी जुळवून घेतलेच पाहिजे अशी एखादी आपत्ती नव्हे. या पाठांद्वारे बौद्धिक श्रमासाठी अत्यंत अनुकूल अशी परिस्थिती निर्माण होते, पण त्या पाठांसाठी मुलाला क्रमाक्रमाने तयार केले पाहिजे. आणि लहान शाळकरी मुलांच्या पाठांची विशिष्टता त्यातच सामावली आहे. सुरुवातीपासूनच मुलाना वर्गात दिवसाला चार चार तास काम करायला लावलेत तर एरव्ही जी परिस्थिती अभ्यासासाठी अनुकल बनली असती तीच परिस्थिती त्याच्या प्रकृतीवर प्रतिकूल परिणाम घडण्यास कारणीभूत ठरते.

वर्गामध्ये आम्ही प्राथमिक पाठ्यपुस्तके वाचीत असू, वर्तुळे, रेषा आणि अक्षरे गिरवीत असू, स्वतःच उदाहरणे तयार करीत असू आणि ती सोडवीत असू. मुलाना एकसुरीपणाचा थकवा आणू न देता मुलांच्या बहुमुखी आत्मिक जीवनात या सर्व गोष्टींनी हळू हळू प्रवेश केला. सर्व मुलाना मुळाक्षरे ठाऊक असल्यामुळे प्राथमिक पाठ्यपुस्तकातील तेच तेच धडे आम्हाला पुनःपुन्हा वाचावे लागत नव्हते. वाचनकौशल्य निर्माण करण्यासाठी मी विविध उपक्रमांचा आधार घेतला. निसर्गाविषयी मुले छोटी छोटी शब्दांकने तयार करीत असत व लिहीत असत, आणि एकच एक धडा पुनःपुन्हा वाचण्यापेक्षा त्यांच्या वाचनकलेच्या विकासाला ते अतुलनीयरित्या अधिक साहाय्यभूत ठरले.

प्रत्येक मुलाने आवश्यक ते वाचन-कौशल्य विकसित केले पाहिजे यावर मी साक्षेपाने भर दिला: विशिष्ट पाठ्यव्यवसाय किंवा निश्चित नियम ठरवून दिल्याशिवाय वाचन शिकविण्याच्या बाबतीत तुमच्या पदरात कोणत्याही फलश्रुती पडणार नाहीत. केवळ अक्षरओळख असणे, शब्दावयवांचे व शब्दांचे वाचन करता येणे हे त्यासाठी पुरेसे नाही: पण वाचन हे जगाचे दर्शन घडविणारे गवाक्ष आहे आणि हे वाचन अस्खलितपणे व जलद करता आले पाहिजे. मगच हे साधन कृतीसाठी सिद्ध बनते. दुसऱ्या इयत्तेत गेल्यानंतर बहु-अवयवी शब्दांचा मुलाना एकाच एका पूर्णाकारात

बोध व्हावा या दृष्टीने वाचनाचे रूपांतर निम-स्वयंचलित प्रक्रियेमध्ये करण्यासाठी आविष्कारयुक्त वाचन, लेखन व चित्रकला अशा विविध उपक्रमांत मुलाना आणण्याचा मी प्रयत्न केला. आणि निसर्गाविषयी छोटचा गोष्टी रचण्याच्या साधनाचा मी जर आधार घेतला असेल, या प्रकारच्या कामात मुलांमध्ये जिवंत रस निर्माण करण्याचा मी जर प्रयत्न केला असेल तर मुलाना उत्तम तऱ्हेने वाचण्यास शिकविण्याचे उद्दिष्ट गाठण्यासाठी आवश्यक असलेली ती मूलतःच एक "शैक्षणिक पद्धत" होती हे निःसंशय.

पाठांच्या काळात वापरण्यात येणारे कामाचे विविध प्रकार ही अशी एक पद्धत म्हणून विचारात घेता येईल. वर्गात घालविलेले पहिले तास हे वाचन, लेखन व अंकगणित या प्राथमिक विषयानाच वाहिलेले असले पाहिजेत असे नाही. एकसुरीपणामुळे विद्यार्थ्याना फार लवकर शीण येईल. मुलाना शीण चढायला सुरुवात झाल्याचे दिसतात मी कामाच्या दुसऱ्या एखाद्या नव्या प्रकाराकडे वळायचा प्रयत्न करीत असे. चित्रकला हे वैविध्याचे एक सामर्थ्यशाली असे साधन आहे. वाचनाचा मुलाना शीण आला आहे असे माझ्या नजरेत येत असे तेव्हा मी मुलाना म्हणत असे, "मुलानो, तुमच्या चित्रकलेच्या वह्या उघडा; आता आपण जी गोष्ट वाचीत होतो त्या गोष्टीसंबंधीचे आपण चित्र काढू या." त्याबरोबर मुलांच्या नजरेतल्या थकव्याच्या पहिल्या खुणा अदृश्य होत असत व त्यांचे डोळे आनंदाने चमकू लागत. एकसुरी कृतीचे रूपांतर ताबडतोब सृजनशीलतेत होई... अंकगणिताच्या तासालाही मी हीच गोष्ट करीत असे. स्वतंत्रपणे सोडविण्यास मी दिलेले उदाहरण समजण्यास त्याना कठीण जात आहे असे नजरेस येताच त्यातून सुटका करण्यासाठी मी चित्रकलेच्या सृजनशीलतेला आवाहन करीत असे. मुले पुन्हा उदाहरण वाचीत आणि त्याचे चित्र काढीत. त्या क्षणापर्यंत संपूर्णपणे अनाकलनीच वाटणारे उदाहरणातील अन्योन्याश्रयी संबंध चटकन स्पष्ट होत असत... सतत कानात रिधणाऱ्या श्रवणाचाही मुलाना कंटाळा येतो. मुलांच्या डोळयात शीण आल्यासारखे मला दिसताच मी गोष्ट थांबवीत असे, "ती आटोपती घेऊन तिचा शेवट करीत असे" आणि आम्ही चित्रकलेकडे वळत असू.

शालेय वर्ष सुरू होऊन तीन आठवडे लोटल्यानंतर माझ्या विद्यार्थ्यांनी निसर्गाविषयीचे एक चित्रमय पुस्तक जुळवायला सुरुवात केली. वरच्या वर्गातल्या विद्यार्थ्यांनी प्रत्येक मुलासाठी जाड कागदांची एक वीस पानी वही तयार केली, तिच्यावर पुठ्ठ्याचे वेष्टन चढविले आणि त्या वेष्टनाला

एक एक पेन्सिल बांधली. आठवड्यातून एकदा आम्ही विचारांच्या व भाषेच्या उगमस्थानांकडे जात असू आणि एक एक चित्र काढत असू— भोवतालच्या जगाविषयीची ती एक गोष्ट असे. आम्ही पहिली "सफर" काढली ती फळबागेची. सफरचंद हे एक उशिरा तयार होणारे फळ आहे. अशा सफरचंदाची ती बाग होती. मुलानी तेथे ज्या गोष्टी तयार केल्या त्यांमध्ये त्यांच्या बोधनाचे व कल्पनांचे व्यक्तिगत विश्वप्रकट झाले होते.

"सफरचंदे धरतीला अभिवादन करीत आहेत", "सफरचंदे सूर्यस्नान करीत आहेत", "हिरव्या पानांतील लाल सफरचंदे", "सूर्य सफरचंदाला गोंजारीत आहे आणि फांदी त्याला आंदुळत आहे", "वसंतातील शुभ्र फुले आणि शरदातील लाल सफरचंदे", "आम्ही सफरचंदांच्या भेटीसाठी आलो आहोत", असे मुलानी आपल्या चित्रमय पुस्तकात निसर्गाचे शब्दांकन केले होते. मुलानी वर्गामध्ये आपली ही छोटी शब्दचित्रे वाचली आणि त्यांची मने आनंदून गेली. उद्यानातील अभ्यासाचे उद्दिष्ट तेथेच संपत नव्हते. ही छोटी छोटी शब्दांकने म्हणजे भाविकालातील कष्टप्रद, गांभीर्यपूर्ण बौद्धिक श्रमासाठी मुलाना तयार करण्याचे एक उत्कृष्ट साधन होते. पहिल्या वर्गात, आणि विशेषतः दुसऱ्या वर्गात, प्रत्येक विद्यार्थ्याला एक व्यक्तिगत कामगिरी नेमून देण्याचा आणि त्याने ती शेवटपर्यंत पार पाडली आहे की नाही ते पहाण्याचा मी प्रयत्न केला. बौद्धिक श्रमाच्या क्षेत्रात शिस्तीची शिकवण देण्याच्या दृष्टीने ही फार महत्त्वाची गोष्ट होती.

पहिल्या अध्ययन-वर्षात सर्व चित्रमय पुस्तके चित्रबद्ध शब्दांकनानी भरून गेली. गारगोटचांसारख्या बेरी फळांचे लाल झुबके, सुगीचे दिवस, निद्रिस्त सरोवर (आम्ही ज्या ज्या वेळी सरोवरावर येत असू त्या त्या वेळी सरोवराचे पाणी आरशासारखे नितळ व शांत दिसत असे आणि म्हणून मुले कदाचित त्याला निद्रिस्त म्हणत असावीत), शाळेच्या बागेत काम करणारी मुले, पहाटेचे लाल आभाळ, शरदातले पहिले हिम, पावसाळी, अभ्राच्छादित शारदीय दिवस, महान ऑक्टोबर समाजसत्तावादी क्रांतीच्या (१९१७) वर्धापनदिनाचा उत्सव सोहळा, आमच्या खेड्यातले जीवन, पहिली हिमवृष्टी, जानेवारीतले झंझावाती वादळ, नद्याना व सरोवराना बंदिस्त करून ठेवणारे परीकथेतील फ्रॉस्ट आजोबा, फेब्रुवारीत वितळणारे बर्फ, मार्चमध्ये बर्फावर पडणाऱ्या निळ्या छाया, क्रोकसची पहिली फुले, ऊबदार प्रदेशांतून फार लवकर परतलेले आणि मार्चमधल्या हिमवादळानी चकित झालेले स्टार्लिंग पक्षी, स्थलांतर करणाऱ्या पक्ष्यांचे

आनंदी वासंतिक थवे ("आनंदी वासंतिक थवे" हे मुलांचेच शब्द आहेत), आणि डेझीना निरोप देत कडक उन्हाळयाच्या सूर्यप्रकाशित दिवशी इतस्ततः उडणारे भ्रमर हे मुलांच्या लेखनाचे विषय होते.

निसर्गाविषयीची ही चित्रमय पुस्तके म्हणजे आमच्या सामूहिकाची एक अनन्य अशी काव्यमय वाचनमाला बनली. आमच्या नैसर्गिक परिसरातील नाजूक रंगच्छटा, पृथ्वीचे आणि आकाशाचे संगीत, शब्दांचा परिसर त्यांत व्यक्त झाला होता. मुलांच्या दृष्टीने तो असा एक आनंद होता की ज्याच्याशिवाय त्यांच्या आंतरिक जीवनात अभ्यासाला स्थान मिळाले नसते.

मुलानी वर्गात घालविलेल्या वेळेची जर पाठांत विभागणी केली तर शालेय वर्षाच्या पहिल्या दोन महिन्यांत आमचा दिवसाला एक पाठ होत असे, तिसऱ्या व चवथ्या महिन्यांत दोन, पाचव्या व सहाव्या महिन्यांत अडीच आणि सातव्या व आठव्या महिन्यांत तीन पाठ होत असत. पहिल्या दोन महिन्यांत पाठ अर्धा तास चालत असे व त्यानंतर पंचेचाळीस मिनिटे. मधल्या सुटीपूर्वी मुलाला वर्गातून बाहेर जावयाचे असेल तर मूल परवानगी मागून बाहेर जात असे. शिक्षकाच्या पाठात व्यत्यय आणणे अशक्य असल्यास मूल नुसतेच उभे रहात असे आणि मुलाला वर्गाबाहेर जावयाचे आहे हे उमजून शिक्षक मानेनेच त्याला संमती देत असे. काहीही अडचण न येता बहुतेक मुलाना आता दिनचर्येचा सराव झाला होता; पण काही मुले अशी होती की या दिनचर्येला जुळवून घेणे त्याना कठीण जात होते. तोल्या, कात्या, कोस्त्या व शूरा फार लवकर थकून जात. पाठांच्या वेळी हालचाल न करता शांत बसून रहाण्यासाठी जो प्रयास करावा लागे त्या प्रयासाचा इतर कोणत्याही गोष्टीपेक्षा त्यांच्यावर अधिक ताण पडे; कारण विशिष्ट दिनचर्येमुळे आपल्या कृतीस्वातंत्र्यावर फार मोठे बंधन पडले आहे असे त्याना वाटे. अर्थात त्यांची प्रत्येक इच्छा मी जोमाळू शकत नव्हतो. प्रत्येक विद्यार्थ्याने आपापल्या बाकावर बसून अभ्यास करण्याचा सराव अंगी बाणवणे आवश्यकच होते; पण अत्यंत कठोरपणे मुलांच्या इच्छा व संवयीही मी तोडू शकत नव्हतो. पाठांच्या दरम्यान वर्गाबाहेर जाण्याची मी कित्येक आठवडे मुलाना सवलत दिली आणि हळू हळू आपल्या बाकावर बसून काम करण्याचा सराव त्यांच्या अंगवळणी पाडला. शालेय वर्षारंभानंतर तीन-चार महिन्यानी सर्व विद्यार्थी शाळेचा दिनक्रम व्यवस्थित पार पाडू लागली.

शरदातल्या सूर्यप्रकाशित दिवशी सफरचंदाच्या उंच झाडांमध्ये असलेल्या हिरवळीवरील एका "हिरव्या वर्गमंडपा"त आम्ही शिकत असू. काही वर्षांपूर्वी आमच्या हिरव्या वर्गमंडपांसाठी तारा व लोखंडी कांबींच्या चौकटी तयार करण्यास वरच्या वर्गातल्या विद्यार्थ्यांनी मला मदत केली होती. तदनंतर आम्ही त्यांच्या सभोवती रानद्राक्षांच्या आणि हॉपच्या वेली लावल्या. दोन वर्षांत आमचे हिरवे वर्गमंडप तयार झाले—वेलींनी अगदी छप्परही आच्छादिले गेले होते. त्या मंडपाना अनेक छोटया छोटया "खिडक्या" होत्या व त्यातून नित्यासारखा प्रकाश आत येत होता. उन्हाळयाच्या दिवसांत तेथे अगदी गार वाटत असे आणि शरत्कालात ऊबदार वाटत असे. हिरव्या वर्गमंडपात नेहमीच स्तब्ध शांतता नांदत असे. द्राक्षांच्या आणि हॉपच्या वेलींनी "खिडक्या" झाकून घेता येत असत; त्यामुळे मंडपात अंधुक अंधार दाटत असे आणि वेलींच्या झरोक्यांतून आत येणाऱ्या सूर्यकिरणांमुळे छाया-प्रकाशाचा एक चित्रविचित्र खेळ तेथे रंगत असे. "परीकथांसाठी खिडक्या बंद करून घेणे" असे मुले त्याला म्हणत. हिरव्या वर्गमंडपात वाचण्यासाठी, लिहिण्यासाठी आणि उदाहरणे सोडविण्यासाठी छोटी छोटी टेबले व घडवंच्या होत्या.

तीन बाजूंनी एका प्रकारच्या हिम-प्रतिबंधक द्राक्षवेलींनी वेढलेले एक हिरळयुक्त प्रांगण हा आमचा दुसरा "हिरवा वर्गमंडप" होता. दिवस फार तापलेला असताना तेथे अगदी थंड वाटत असे आणि आमच्या या भागात शरदात आणि वसंतात असे तापलेले दिवस विरळा नसतात.

घळीला लागूनच असलेल्या एका दूरवरच्या वृक्षराईत हिरव्या झाडांमधील गवतावर आमचा आणखी एक "हिरवा वर्गमंडप" होता. शाळेत आम्हाला परत जावयाचे नसे अशा वेळी आमचा शेवटचा तास आम्ही कधी कधी तेथे घेत असू. त्या वर्षाच्या दरम्यान ४० टक्के पाठ आम्ही शाळेच्या इमारतीत न घेता या "हिरव्या वर्गमंडपां"त घेतले आणि उर्वरित ६० टक्के पाठांपैकी बव्हंश पाठ "हिरव्या प्रयोगशाळे"त व शाळेच्या उष्णतागृहात घेतले. आमची ही "हिरवी प्रयोगशाळा" म्हणजे झाडांनी आणि वेलींनी वेढलेली एक स्वतंत्र इमारत होती. वनस्पतींनी आणि फुलांनी भरलेली येथे एक अभ्यासिका होती.

आमच्या पाठांपैकी बव्हंश पाठ हे निसर्गाच्या सान्निध्यात, मोकळया हवेत, निळया आकाशाच्या चांदण्याखाली घेतले जात होते या वस्तुस्थितीला मुलांच्या दृष्टीने अनन्यसाधारण असा अर्थ होता. अभ्यासाच्या वेळात त्यांची

वृत्ती अत्यंत आनंदी असे आणि डोकेदुखी घेऊन ती कधीच घरी जात नसत.

शाळा सुटल्यानंतर मुले घरी विश्रांती घेत. मुलांवर शाळेत कामाचा जादा भार न पडावा म्हणून कोणतेही खास उपाय योजले तरी मुलाना थकवा जाणवत असे आणि अभ्यासानंतर त्याना विश्रांतीची आवश्यकता असे. शाळेत मुलांवर बौद्धिक श्रमाचा जेवढा तीव्र तर ताण पडतो तेवढे श्रम दिवसाच्या उत्तरार्धात त्याना घ्यायला लागू नयेत याबद्दल अनेक वर्षांच्या अनुभवातून माझी खात्री पटली आहे. लहान मुलाच्या शिरावर जादा भार लादणे योग्य नसल्यामुळे तर ही गोष्ट अधिकच आवश्यक बनते. शाळेतील तीन-चार तासांच्या बौद्धिक श्रमानंतर घरीही मुलाला तितकेच श्रम ओतून काम करावे लागले तर लवकरच त्याच्यावर त्याच्या ताकदी-बाहेर ताण पडेल.

गृहपाठ ही एक अटळ गोष्ट आहे. आपल्या बौद्धिक शक्ती केंद्रित करण्यास, ध्यान देण्यास मुलाने शिकलेच पाहिजे पण प्रथमतः आणि मुख्यतः तासांच्या वेळीच ही गोष्ट साध्य करण्यात आली पाहिजे आणि स्वतंत्र बौद्धिक श्रमाच्या संवयी क्रमाक्रमाने अंगवळणी पाडल्या पाहिजेत. ध्यान देऊन आणि लक्ष केंद्रित करून शिकणे मुलाच्या दृष्टीने सोपे नसते. कोणत्याही खास क्लृप्त्यांचा वापर न करता केवळ पाठ्य-सामुग्रीच्या बळावर अनुभवी शिक्षक आपल्या गोष्टींकडे किंवा स्पष्टीकरणांकडे मुलांचे लक्ष "बांधून ठेवतो". शिक्षक काय सांगत आहेत हे मुलाने लक्षपूर्वक ऐकणे, जे सांगितले असेल ते ध्यानात ठेवणे व त्याचा विचार करणे यातच लहान वयातील बौद्धिक श्रमाच्या संघटनाबाबतचे प्रभुत्व सामावले आहे. असे करीत असताना आपण काही शक्ती खर्च करीत आहोत हे प्रथम मुलाच्या लक्षातही येत नाही.

हे साध्य करण्यात शिक्षकाला जर यश आले तर मुलामध्ये स्वारस्य निर्माण करणारी प्रत्येक गोष्ट मूल लक्षात ठेवते; आणि ही गोष्ट अधिकच विस्मय निर्माण करणारी असेल तर वरील गोष्टीचा अधिकच ठळक प्रत्यय येतो. मुळाक्षरे आत्मसात करणे आणि वाचायला व लिहायला शिकणे माझ्या मुलाना इतके सोपे का गेले? कारण ती गोष्ट त्याना गरजेपोटी करावी लागली नव्हती. त्याचे दुसरे कारण असे आहे की मुलाच्या दृष्टीने प्रत्येक अक्षर हे कौतुकाची भावना प्रकट करणाऱ्या एका स्पष्ट प्रतिमेचे एक मूर्तिमंत रूप होते. माझ्या या छोट्या शालेयपूर्व बालकाना एक एक अक्षर दाखवून आणि त्यानी ते शिकले पाहिजे अशी मागणी करून दर

दिवशी मी जर "ज्ञानाचा डोस" पाजला असता तर मी काहीही साध्य करू शकलो नसतो. अर्थात याचा अर्थ असा नव्हे की आपले उद्दिष्ट आपण मुलापासून दडवून ठेवले पाहिजे. आपण फक्त अशा रीतीने शिकविले पाहिजे की उद्दिष्टाबद्दल मुलांच्या मनात विचारही येता कामा नये; त्यामुळे बौद्धिक श्रम हलके होतात. प्रथमदर्शनी वाटते तेवढे हे सोपे नाही. मुलांच्या बौद्धिक विकासाच्या एक विशिष्ट टप्प्याविषयी, विद्वज्जन ज्याला मज्जातंतूसंस्थेचे बालपण म्हणतात नेमक्या त्या काळाविषयी आपण बोलत आहोत. या काळात शालेय वयाची लहान मुले, विशेषत: अभ्यासाच्या पहिल्या वर्षात, एकाग्रता साधूच शकत नाहीत. शिक्षकाने मुलाचे लक्ष जिंकून घेतले पाहिजे, मानसशास्त्रात ज्याला सहजस्फूर्त अवधान म्हणतात ते त्याने मुलांत जागृत केले पाहिजे.

लहान मुलाचे अवधान हा एक लहरी प्राणी आहे. सहजगत्या घाबरलेल्या पाखरासारखे ते मला वाटते. जेव्हा जेव्हा तुम्ही या पाखराच्या निकट जायचा प्रयत्न करता त्या त्या वेळी ते आपल्या घरट्यापासून अधिकाधिकच दूर उडून जातो. अखेरीस तुम्ही जेव्हा त्या पाखरापाशी जाऊन पोहोचता तेव्हा त्याला हातात किंवा पिंजऱ्यातच पकडून ठेवावे लागते. आपण जाळयात पकडले गेलो आहोत असे जर पाखराला वाटले तर त्याच्याकडून गाण्याची कोणती अपेक्षा करता येईल? लहान मुलाचे अवधान हे असे असते. बंदिस्त केलेल्या पाखरासारखे त्याला जर पकडून ठेवले तर त्याच्याकडून फारशी मदत मिळणार नाही.

पाठांच्या वेळी मुलांमध्ये आपण "अखंड बौद्धिक श्रमाचे वातावरण" निर्माण करू शकतो हे आपले यश असल्याचे काही शिक्षक मानतात. अनेक वेळा या बाबतीत असा एक बाह्य घटक असतो की मुलाचे लक्ष खेचून धरण्यासाठी त्याचा लगाम म्हणून उपयोग होतो: मुलाने लक्षपूर्वक ऐकावे म्हणून सतत देण्यात येणारी ताकीद, एका विषयातून दुसऱ्या विषयात करण्यात येणारा जलद बदल, विशदीकरण केल्यानंतर दिलेल्या माहितीचे आकलन आहे की नाही याची ताबडतोब घेण्यात येणारी चाचणी (अधिक नेमकेपणाने सांगावयाचे म्हणजे वर्गात जे सांगितले जात आहे ते नीट ऐकले नाही तर विद्यार्थ्याला नापास करण्यात येईल अशी त्याला मिळणारी धमकी), आणि एखाद्या सैद्धान्तिक प्रमेयाचे विशदीकरण केल्यानंतर अनिवार्यपणे ताबडतोब सोडवायला देण्यात येणारा एखादा व्यवसाय हाच तो बाह्य घटक होय.

प्रथमदर्शनी असे वाटते की या सर्व पद्धती म्हणजेच क्रियाशील बौद्धिक श्रम होत. एखाद्या शोभादर्शक यंत्रातल्या आकृत्या जितक्या झपाट्याने बदलतात त्याच पद्धतीने करण्यात येणाऱ्या विषयांतरांमुळे मुले एकाग्रचित्त होऊन शिक्षकाचा प्रत्येक शब्द ऐकत असतात आणि वर्गात एक प्रकारची तंग शांतता पसरते. पण यासाठी आवश्यक असलेल्या श्रमांचे काय? आणि त्याची फलश्रुती कोणती? तर सतत ध्यान रहावे आणि एकही शब्द चुकू नये म्हणून खर्ची करावे लागणारे अविरत श्रम. पण त्या वयात ध्यान केंद्रित करण्याइतके मूल तयार झालेले नसते; त्यामुळे ते अगदी थकून जाते, त्याच्यावर जादा ताण पडतो आणि त्याच्यातले त्राण निघून जातात. त्याचे मज्जातंतू शुष्क बनतात. पाठाच्या वेळी एकही क्षण वाया न घालविणे, क्रियाशील बौद्धिक श्रमाशिवाय एकही क्षण रिकामा न दवडणे – माणसाच्या शिक्षणासारख्या नाजूक व्यापारात यासारखा दुसरा मूर्खपणा तो कोणता असेल? शिक्षकाच्या कामातली अशाच प्रकारची एकच एक हेतुपुरस्सरता, मुलाला संभाव्यत: जे काही देता येईल ते त्याच्याकडून पिळून काढण्याची वृत्ती हीही तेवढीच मूर्खपणाची आहे. अशा प्रकारच्या "परिणामकारक" पाठानंतर मुले अत्यंत थकूनभागून घरी जातात. त्यांच्यात चीडखोरपणा येतो व ती सहज प्रक्षुब्ध बनतात. त्याना विश्रांतीची व खेळाची आवश्यकता असते, पण त्याना अजून गृहपाठ करावयाचा असतो आणि पिशवीतून आपल्या वह्या व पुस्तके बाहेर काढताना त्याना अगदी उबग आल्यासारखे वाटत असते.

विद्यार्थ्यांमध्ये मोठ्या प्रमाणात आढळून येणारे गैरवर्तन, आपल्या शिक्षकांबद्दलची व आपापसातली त्यांची उद्धट वागणूक, कानउघडणीबद्दल व्यक्त होणारी त्यांची उर्मट प्रतिक्रिया या काही योगायोगाच्या गोष्टी नव्हेत. कारण मुलाच्या मज्जाशक्तीवर पराकोटीचा ताण पडतो, आणि शिक्षकसुद्धा एखादे गणकयंत्र नसते. परिणामी अनेक संघर्ष निर्माण होतात. "उच्च परिणामकारकते"च्या पातळीवर संपूर्ण पाठात वर्गाचे लक्ष खेचून धरणे शोभायंत्राप्रमाणे प्रतिपाद्य विषयात सारखे बदल करणे फार कठीण आहे. पाठ संपल्यानंतर अनेक वेळा मुले उदासवाण्या, उद्विग्न मन:स्थितीत घरी जातात, प्रत्येक गोष्टीचा त्याना उबग आलेला असतो, किंवा त्या-च्याही उलट, ती अत्यंत चिडलेल्या मन:स्थितीत असतात हाही काही योगायोगाचा भाग नव्हे.

अशी किंमत मोजून मुलांचे लक्ष, त्यांची एकाग्रता, त्यांचे बौद्धिक व्यवहार प्राप्त करून घेण्याचे कोणी प्रयत्न करू नयेत. विद्यार्थ्यांची

( विशेषत: छोटया मुलांची ) मानसिक शक्ती आणि मज्जाशक्ती ही काही एखादी बिनतळाची विहीर नव्हे की जिच्यातून तुम्ही अखंड पाणी काढू शकाल. या विहीरीतून तुम्हाला जे आवश्यक आहे ते तुम्ही अत्यंत हुशारीने व सावधानपणे काढून घेतले पाहिजे, आणि सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे मुलाच्या मज्जाशक्तीच्या स्रोतांची तुम्ही सातत्याने पुन:पुन्हा भर केली पाहिजे. सभोवतालच्या जगातील वस्तूचे व घटनांचे अवलोकन, निसर्गाने वेढलेले जीवन, वाचन – पण तेही वर्गात कानपिचक्या मिळण्याच्या भीतीतून नव्हे तर काहीतरी शोधून काढण्यामधले स्वारस्य, काहीतरी शोधून काढण्याची इच्छा निर्माण करणारे वाचन, आणि जित्याजगत्या विचारांच्या आणि भाषेच्या उगमस्थानांकडील "सफरी" हेच ते स्रोत होत.

शालेय सामूहिकाच्या जीवनात असे काहीतरी असते की जे चटकन ध्यानात येत नाही; त्याला आत्मिक समतोल असे म्हणता येईल. मुलाना जाणवणारी जीवनाच्या परिपूर्णतेची भावना, विचारांची स्पष्टता, स्वत:च्या ताकदीवरचा विश्वास, अडचणींवर मात करता येणे शक्य आहे या बाबतची श्रद्धा यांचा मी या संकल्पनेत अंतर्भाव करतो. हेतुपूर्ण श्रमाची समधात वृत्ती, समतापूर्ण, बंधुभावात्मक परस्पर संबंध, आणि उद्विग्नतेचा अभाव ही आत्मिक समतोलाची खास वैशिष्टये आहेत. आत्मिक समतोलाशिवाय सुरळीतपणे काम करणे अशक्य आहे. हा समतोल जेव्हा ढळतो तेव्हा सामूहिक जीवन म्हणजे एक नरक बनतो: विद्यार्थी एकमेकांचा अपमान करतात, एकमेकाना प्रक्षुब्ध करतात, आणि शाळेत एक प्रकारचे वैफल्यग्रस्त वातावरण पसरते. कोणत्या मार्गाने आत्मिक समतोल निर्माण केला पाहिजे, आणि विशेष म्हणजे तो जतन केला पाहिजे? सर्वोत्कृष्ट शिक्षणतज्ज्ञांच्या अनुभवाने माझी खात्री पटवून दिली आहे की येथे मुख्य गोष्ट आहे ती शिक्षणाचे एक अत्यंत नाजूक क्षेत्र – आत्मिक बळाला धक्के न देता, त्वरा न करता, किंवा अतिताण न जाणवता सातत्याने पार पडणारी विचारक्रिया.

आत्मिक समतोलासाठी सदिच्छेच्या, परस्परांविषयीच्या मदतभावनेच्या, प्रत्येक विद्यार्थ्याच्या बौद्धिक कुवती आणि जे काम करण्यास तो सक्षम आहे ते काम यांच्या सुसंवादित्वाच्या विशिष्टतापूर्ण वातावरणाची आवश्यकता असते. आत्मिक समतोलाच्या क्षेत्रातील असामान्य सिद्धहस्त व्यक्तींच्या आणि अनेक प्राथमिक शाळा-शिक्षकांच्या शिक्षणकलेचा मी काळजीपूर्वक अभ्यास केला. माझ्या मते सर्वात सुज्ञ आणि त्याच वेळी

सर्वात स्वाभाविक असलेल्या गोष्टींची "रहस्ये" उलगडण्याचा मी प्रयत्न केला; आणि ती गोष्ट म्हणजे आपली सर्व क्षमता पणाला लावून या शिक्षकांचे विद्यार्थी अभ्यास करीत असत. मुलाला उत्कृष्ट विद्यार्थी बनण्याची शक्यता असेल तर ते मूल सरासरी विद्यार्थी उरणार नाही. अशा वर्गांत जे सरासरी विद्यार्थी असतात तेही स्वतःला दैवाचे दुर्दैवी बळी मानीत नाहीत आणि त्यांचे मित्रही त्याना तुच्छतेने वागवीत नाहीत.

सर्वोच्च गुणांच्या मागे धावण्याच्या मनोगंडाविषयी मला नेहमीच चिंता वाटत आलेली आहे—हा मनोगंड घरी उदय पावतो आणि शिक्षक त्याला आपल्या कैचीत पकडतो. विद्यार्थ्यांच्या बालमनावर त्याचा अतिशय अवजड बोजा पडतो, त्या मनाला तो बोजा पिरगळून टाकतो. त्या क्षणाला सर्वोच्च गुण मिळविण्याची क्षमता मुलाच्या अंगी नसते, पण सर्वोत्कृष्ट गुण मिळविलेच पाहिजेत अशी पालकांची मागणी असते किंवा अगदीच नाही तर निदान दुसऱ्या क्रमांकाचे तरी गुण मिळालेच पाहिजेत अशी ते मागणी करतात. त्या दुर्दैवी मुलाला सरासरी गुण पडले तर न्यूनत्वाच्या भावनेने त्याचे मन ग्रासले जाते. अनुभवी शिक्षकांच्या बाबतीत हे घडत नाही. तेथे उत्कृष्ट विद्यार्थ्यांना लाडावलेपणाची बाधा होत नाही आणि अपुरेपणाच्या भावनेने सरासरी विद्यार्थ्यांना वैफल्य येत नाही. सुजाण, एकाग्रतापूर्ण बौद्धिक श्रमावरील खरेखुरे प्रभुत्व मी या खऱ्याखुऱ्या शिक्षणतज्ज्ञांकडून शिकलो. शैक्षणिक कलेतील एक अत्यंत तरल धागा मला त्यांच्यामध्ये आढळला. हा धागा म्हणजे मुलांच्या मनात व हृदयात ज्ञानानदाची बुद्धिनिष्ठ भावना जागृत करण्याची क्षमता. या सर्व शिक्षकांच्या विद्यार्थ्यांमध्ये कोणतेही यश, ते अगदी नेमस्त असले तरी, सत्याच्या दर्शनाशी आणि संशोधनाशी संबंधित असलेला आनंदमय आत्मिक उद्रेक घडवून आणल्याशिवाय रहात नसे. या अनुभवी शिक्षकांच्या सुज्ञविचार-मौक्तिकांचे सार काढताना श्रेणींसाठी नव्हे तर उन्मेषयुक्त बुद्धिनिष्ठ भावनांची अनुभूती घेण्याच्या इच्छेतून मुलाना कामाला प्रवृत्त करण्याचा मी प्रयत्न केला. आमच्या बालसामूहिकात उत्कृष्ट गुणांबद्दल अवाजवी हव्यास नव्हता किंवा सरासरी गुणांमुळे मुलांची मने बेचैनही होत नव्हती या गोष्टीचा मला अतिशय आनंद वाटत होता.

...दर आठवड्याला आमचे अनेक पाठ विचाराच्या आणि आमच्या मायभाषेच्या उगमस्थानांकडील "सफरी" ना, अवलोकनाला वाहिलेले असत. निसर्गाबरोबरची ती प्रत्यक्ष सायुज्यता असे. त्याच्याशिवाय मुलांच्या बौद्धिक

कुवतींची आणि मज्जाशक्तीची विहीर फार झपाट्याने आटून जाते. शरदातल्या, वसंतातल्या व ग्रीष्मातल्या ऊबदार हवेच्या दिवशी सूर्योदया-पूर्वी पुष्कळ आधी आम्ही सफरीना निघत असू. खेड्यातली मुले खूप लवकर उठू शकतात. निसर्गाविषयीच्या कथानी, सभोवतालच्या जगातल्या वस्तूंविषयीच्या आणि घटनांविषयीच्या कथानी मुलांची जिज्ञासावृत्ती यापूर्वीच जागी केली होती, आणि अनेक प्रश्नांची मला उत्तरे द्यावी लागत होती. त्यांपैकी काही प्रश्न मी येथे देत आहे: "उदयकाली सूर्य लाल का दिसतो आणि मध्यान्ही तो अग्नीच्या गोळ्यासारखा का भासतो? ढग कुठून येतात? डॅन्डेलियनची फुले सकाळी का उमलतात आणि दुपारी का मिटतात? विजा का कडाडतात आणि ढग का गडगडतात? पश्चिमेकडचा वारा पाऊस आणतो आणि पूर्वेकडचा वारा अवर्षण आणतो असे का? सूर्यफूल सूर्याच्या दिशेने का वळते? – ते माणसासारखे पाहू शकते का? लोखंड का गंजते? कबुतरे झाडांवर का उतरत नाहीत? ग्रीष्मात झाडांवर जेव्हा पाने असतात तेव्हा तुम्ही ती एका जागेतून दुसऱ्या जागी का लावू शकत नाही? उल्का कुठे पडतात? कोणीतरी कागदातून कोरून काढावीत इतकी हिमपिसे सुंदर का भासतात? स्थलांतर करताना पक्ष्याना खूप दूर जावे लागते. मग त्याना रस्ता कसा सापडतो? चंद्राचे शुभ्र खळे कोठून येते? पाऊस पडण्यापूर्वी सूर्यास्ताच्या वेळी आकाश लाल का दिसते? मधासाठी उडून जाण्यापूर्वी मधमाश्या "नाच का करतात"? झाडाना मोहोर येत असताना बागेमध्ये लोक पेंढा का जाळतात? रानामध्ये तुम्हाला प्रतिध्वनी का ऐकू येतो? इंद्रधनुष्य म्हणजे काय? हिंवाळ्यात मेघगर्जना आणि विजा का नसतात? अति कडाक्याच्या थंडीतच खारे पाणी का गोठते? रानससे बिळे खणतात पण साधे ससे तसे करीत नाहीत असे का? उन्हाळ्यात दुधाच्या चरवीला तुम्ही ओला टॉवेल गुंडाळता आणि अगदी रणरणत्या दिवसांतही ते गरम होत नाही, असे कसे घडते? पाऊस पडण्यापूर्वी पाकोळ्या जमिनीलगत का उडतात? चंडोल पक्षी आपले घरटे शेतात बांधतो, पण स्टार्लिंग व टिटमाऊस पक्षी आपली घरटी झाडांवर बांधतात असे का? बदकाना पोहोता येते पण कोंबड्याना पोहोता येत नाही असे का? आजकाल विमाने उडताना पाठीमागे धुराचा पट्टा उमटतो, पूर्वीच्या विमानांच्या बाबतीत तसे घडत नव्हते असे का? तारे आकाशातून का निखळतात आणि ते कुठे पडतात? वाऱ्यामुळे भोवऱ्यासारखे धुळीचे स्तंभ का तयार होतात? विलो वृक्ष का "रडतात"? फक्त

वसंताच्या सुरुवातीलाच क्रोकसची फुले का फुलतात? हिंवाळी गहू तुम्ही शरदात पेरता आणि वसंतातली पिके वसंतात, असे का? काजवे का चमकतात? गाईला फक्त एकच वासरू होते आणि डुकराना मात्र पिलावळ-च्या पिलावळ, असे का? उन्हाळयात सूर्य उंचावर येतो व हिंवाळयात तो खाली असतो, असे का? खिडक्यांच्या गोठलेल्या तावदानांवर सुंदर सुंदर आकृत्या कशा उमटतात? शरदात पाने पिंगट का पडतात?"

मुलांसमोर नैसर्गिक घटनाचे केवळ मर्मच उलगडावे म्हणून नव्हे तर त्यांची जिज्ञासा आणि कुतूहल अधिक जागृत व्हावे या दृष्टीने मी त्यांच्या प्रत्येक प्रश्नाचे उत्तर देण्याचा प्रयत्न करीत होतो. मुलांच्या प्रश्नाना दिलेली उत्तरे, सभोवतालच्या जगाविषयीची संभाषणात्मक चर्चा या विचाराच्या पहिल्या पाठशाळा होत्या. त्यांच्या काही प्रश्नांची उत्तरे कशी द्यावीत हे मला कळत नसे. वरपांगी प्रश्न जितका सोपा तेवढे त्याचे उत्तर अधिक कठीण असे मला दिसून येत असे. विशेषतः मुलांच्या "तत्त्वज्ञानात्मक" प्रश्नाना कसे उत्तर द्यावयाचे याचा सल्ला विचारण्या-साठी मी प्राथमिक शाळा-शिक्षकाना भेटत असे. मुलांचे विचार म्हणजे गुंतागुंतीचे एक प्रचंड जाळे असते आणि संध्याकाळी एकत्र बसून आम्ही त्याची चर्चा करीत असू. प्राथमिक शिक्षकांच्या अनुभवातून – मुलांच्या विचारपद्धतीच्या तज्ज्ञांच्या अनुभवातून – मी अशा निष्कर्षाप्रत पोहोचलो की, जे जे वर अगदी साधे आणि उघड दिसते तेथेच अनेक वेळा मोठ्या अडचणी छुपेपणाने वावरत असतात. "हिवाळी गहू तुम्ही शरदात पेरता आणि वसंतातील पिके वसंतात, असे का?" या प्रश्नाचे उत्तर निखळत्या ताऱ्यांविषयीच्या आणि उल्कापातांविषयीच्या प्रश्नांच्या उत्तराहून निरतिशयत्वाने अधिक कठोण आहे. निसर्गजगतातील "सफरी" मी अशा रीतीने घडवून आणल्या की वस्तू आणि घटनांमधील कार्यकारणभावाचे मुलाना दर्शन व्हावे आणि एक महत्त्वाचे शैक्षणिक कार्य म्हणून अन्योन्यभाव पहाण्यास त्यानी शिकावे.

निसर्गातील "सफरी" शेवटच्या तासाला असल्या तर या "सफरीं"-नंतर आम्ही खेळत असू. गटागटानी खेळण्यात येणारे खेळ मुलानी स्वतःच शोधून काढले होते. नैसर्गिक घटनांचे विश्व आणि परीकथा यांचा तेथे मिलाफ घातला जात होता. मुले ज्यात अगदी देहभान हरपून विशेषत्वाने रमून गेली तो एक खेळ मी पुढे देत आहे. त्या खेळाचे नाव होते "रहस्यमय बेटाचा शोध." आम्ही सर्वानी दोन गट पाडले. एक गट जंगलाच्या अगदी

दूरच्या कोपऱ्यात गेला. खेळाच्या जागेभोवती आम्ही खुणांचे एक कडे तयार केले. या खुणा फक्त आम्हालाच ठाऊक होत्या – तो होता अनेक श्वापदांचा संचार असलेल्या, आणि खडकानी भरलेल्या बेटाचा किनारा. रहस्यमय बेटावरली मुले म्हणजे जहाज फुटल्यामुळे त्या बेटावर आलेले प्रवासी होते. काही ठिकाणी एका चिंचोळया पट्ट्याच्या अंगाने अत्यंत गुप्त अशा खुणा त्यानी ठेवल्या होत्या. बेटावर जाण्याचे ते मार्ग होते. (या खुणांबाबत दोन्ही गटांचे पूर्वीच एकमत झाले होते). फुटलेल्या जहाजावरच्या त्या प्रवाशाना आम्ही वाचवावयाचे होते. बेटावर कसे व कुठून जाता येईल हे पहाण्यासाठी "किनाऱ्या"च्या अंगाने अनेक किलोमीटरपर्यंत मुलानी टप्प्याटप्प्याने जंगलाची पहाणी केली. येथे केवळ तीक्ष्ण नजरेची आणि शौर्याचीच आवश्यकता नव्हती तर नैसर्गिक घटनांचा शोध घेण्याची आणि तर्कशुद्ध पद्धतीने विचार करण्याचीही आवश्यकता होती. या खेळामुळे प्रामाणिकपणाची आणि सत्यवादीपणाचीही मुलाना शिकवण मिळाली. मुलानी बेटावर जाणारे ते गुप्त मार्ग शोधून काढले आणि ती प्रवाशांच्या मदतीला गेली. आजारी प्रवाशाना त्यानी रुग्णालयात पाठविले. खेळात पायलट व डॉक्टरही अवतीर्ण झाले. मग फुटलेल्या जहाजावरच्या प्रवाशानी आणि त्यांच्या मदतनिसानी मिळून पेज बनवली आणि अशा रीतीने खेळ संपला. आम्ही शेकोटीभोवती बसत असू आणि मी परीकथा सांगत असे. आपल्या अद्भुतरम्य प्रतिमांविषयीच्या कल्पना कागदावर उतरवून अनेक मुले मी सांगितलेली गोष्ट चितारीत असत.

निसर्गाकडील या "सफरीं"त पक्ष्यांच्या व प्राण्यांच्या जीवनावलोकना-कडे आम्ही पुष्कळ ध्यान देत असू. एक संपूर्ण, स्तिमितकारक जग आमच्या-समोर उभे राहिले. प्रशांत शरत्कालीन दिवशी साळची पिलावळ आपल्या बिळातून बाहेर पडून आपल्या आईच्या मागून पाणी पिण्यासाठी कशी धावते आणि ती त्यांचे कसे संरक्षण करते ते आम्ही पाहिले. वसंतामध्ये आम्ही छोटचा छोटचा सशांचे अवलोकन केले. सशाची एक आई आपल्या नुकत्याच जन्मलेल्या पिलाला त्याच्याच जिवावर सोडून कशी निघून गेली आणि योगायोगाने दुसऱ्या सशाची एखादी आई आलीच तर आपल्या मुखात अन्न भरवील याची वाट पहात ते कसे पडून राहिले हेही मुलाना पहायला मिळाले. जुलैमध्ये मुलानी झाडावरच्या बेडकांचे निरीक्षण केले. एके दिवशी एका दूरच्या जागेत आम्हाला कोल्ह्याचे एक विवर आढळले. कोल्हीण आपल्या पिलाना घेऊन कशी फिरायला बाहेर पडली, तिने त्याना

धावायला कसे शिकविले आणि ती त्यांच्याबरोबर कशी खेळली हेही मुलानी पाहिले. जंगलाच्या एका दूरच्या कोपऱ्यात आम्ही बीव्हर प्राण्यांचे अवलोकन केले.

आमच्या सफरींमुळे आणि अवलोकनामुळे विचाराना समृद्धता आली आणि भाषेचा व भाषाविष्काराचा विकास झाला. फेरफटक्यांमध्ये आणि सहलींमध्ये मुलांच्या मनात जितके अधिक प्रश्न प्रादुर्भूत होत असत तितकी नैसर्गिक घटनांविषयी, कामाविषयी आणि दूरवरच्या भूमींविषयी वर्गात आम्ही बोलत असताना त्यांची जिज्ञासा व त्यांचे कुतूहल अधिक स्पष्टरूप धारण करीत असे. निसर्गाकडील "सफरीं"नंतर मुलांच्या भावस्थितीचे मी जे अवलोकन केले त्यातून "आश्चर्य हे ज्ञानविषयक प्रेमाचे उगमस्थान आहे" या प्राचीन सुज्ञवचनातील न्याय्यतेबद्दल माझी अधिकच खात्री पटली.

मुलाना जागृत करण्यासाठी, त्याना क्रियाशील बनविण्यासाठी निसर्गाच्या रहस्याविषयीच्या या विस्मयवृत्तीचा, शोधामुळे मिळणाऱ्या आनंदानुभवाचा उपयोग करण्याचा मी प्रयत्न केला. आमच्या वर्गात असे काही विद्यार्थी होते की ज्याना साध्या, सोप्या प्रश्नांबाबतही विचार करायला फार वेळ लागत असे (वाल्या, पेत्रिक आणि नीना). प्रत्येकाच्या बाबतीत त्याची कारणे निरनिराळी होती, पण परिणाम मात्र एकच होता. या मुलांच्या मज्जापेशीना एक प्रकारचे मांद्य आले होते. वर्गामध्ये मी जे काही विशद करून सांगत असे त्याबद्दल त्याना काहीही सोयरेसुतक वाटत नसे.

या मुलांच्या विचारक्रियेत काहीतरी कमतरता होती; त्याची कारण-परंपरा पहाताना मज्जापेशींच्या जडतेविषयीच्या आणि सुस्तपणाविषयीच्या माझ्या निष्कर्षाना बळकटीच आली. विविध वस्तूंमधील किंवा घटनांमधील संबंध निश्चित करणे, आणि विशेषत: ते लक्षात ठेवणे त्याना कठीण जात होते आणि त्यातच ही कमतरता सामावली होती. वानगीदाखल सांगावयाचे झाल्यास सफरचंदें, टोपल्या आणि मुले यांविषयीचे एक उदाहरण मी त्याना सोडवायला दिले. पण सफरचंदांचा आणि टोपल्यांचा विचार करतात उदाहरण सोडविणाऱ्या त्या मुलाला मुलांचा विसर पडायचा. मुलांची त्याला आठवण होताच सफरचंदे आणि टोपल्या त्याच्या स्मरणातून नाहीशा व्हायच्या. पण सभोवतालच्या जगातील वस्तू आणि घटना यांमधील कार्यकारणभावाच्या विचाराना लाभलेली सखोलता, छोटे छोटे, शोध, सत्याच्या दर्शनामुळे प्रादुर्भूत होणारी विस्मयभावना — या सर्वांमुळे वाल्या, पेत्रिक आणि नीनाला अतिशय आनंद वाटत होता. मुलाना त्यामुळे फार

मोठ्या आत्मिक उन्नततेचा अनुभव मिळत होता. आनंदमय उन्मेषाचे किरण त्यांच्या डोळ्यात चमकू लागले. त्यांच्यामधील औदासिन्याचा लोप झाला आणि अभ्यासाच्या उद्दिष्टात त्याना वैयक्तिक स्वारस्य निर्माण झाले. ज्यात भावनिक रंगच्छटांचा आढळ होत होता असा एखादा प्रश्न मुलाच्या मनात जागृत करण्यात मी यशस्वी झालो तर त्याच वेळी मुलाच्या डोक्यात एक गतिशील प्रक्रिया सुरू होत असे; जणू काही जडशील झालेल्या शक्ती कृतीच्या प्रांगणात खेचल्या जात असत. मानसिक विकासाच्या दृष्टीने ज्या मुलांच्या मनाची घडण गुंतागुंतीची होती ती मुलेही अधिकाधिक जागृत होत असल्याची मला सानंद खात्री पटत होती. ती मुले उदाहरण अधिक चांगल्या रीतीने ग्रहण करू लागली, उत्सुकतेने गोष्टी ऐकू लागली. मी केलेले हे अवलोकन मी प्राथमिक वर्गातील अनुभवी शिक्षकाना सांगितले आणि या कामाला आम्ही नाव दिले: **विचारशक्तीचे भावनिक प्रबोधन.**

चालू विषयामध्ये वाल्या, पेत्रिक व नीना यांच्यासारख्या मुलांत शिक्षक जेव्हा रस निर्माण करण्यात यशस्वी होतो तेव्हा या मुलांचे मनोव्यापार कसे चाललेले असतात हे जाणून घेण्याचा मी प्रयत्न केला. शरीरशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ आणि मनोरुग्णतज्ज्ञांचे ग्रंथ मी वाचून काढले. प्रख्यात विद्वत्पंडित सिगमंड फ्रॉईड (१८५६-१९३९) यांच्या ग्रंथांत बाह्यपटल मज्जापेशी आणि अंत:पटल केंद्रे यांच्या क्रियाप्रतिक्रियेविषयीची एक उद्‌बोधक कल्पना मला आढळली. अंत:पटल केंद्रे ही विचारक्रियेत निर्णायक भूमिका बजावतात असे फ्रॉईड यांचे म्हणणे आहे आणि अनेक संशोधकानी दाखवून दिल्याप्रमाणे ही केंद्रे मानवी मनोव्यापारांच्या भावनिक प्रक्रियांवर हुकूमत गाजवतात. भावना आणि विचार यांची फ्रॉईड यानी घोडा आणि घोडेस्वाराशी तुलना केली आहे. त्यांच्या मते मार्ग ठरविण्याचे काम घोडा करतो (म्हणजेच भावना – अंत:पटल केंद्रे). घोड्याला जेथे जावयाचे असेल तेथेच घोडा स्वाराला घेऊन जातो; पण तो हे काम इतक्या चलाखीने व चातुर्याने करतो की स्वाराला वाटते आपणच घोड्यावर हुकूमत चालवीत आहोत. तेव्हा फ्रॉईडच्या मते बाह्य मज्जापटल ही मुख्य गोष्ट नसून अंत:पटल हीच मुख्य गोष्ट आहे.

फ्रॉईड यांचे अनेक ठाम दावे अमान्य करीत असताना महान रशियन मानसशास्त्रज्ञ पावलोव (१८४९-१९३६) यानाही अंत:पटल हे अतिशय महत्त्वाचे आहे असे वाटत होते. त्यानी असे म्हटले आहे की, बाह्य मज्जापटलक्रियेची मुख्य प्रेरणा अंत:पटलाकडूनच येते आणि आपण भावना

बाद केल्या तर बाह्य मज्जापटलाच्या ताकदीचा मुख्य स्रोतच त्याच्याकडून काढून घेतल्यासारखे होईल. पण पावलोव यांच्या मते बाह्य मज्जापटल हाच मानवी विचारांचा व आचारांचा मुख्य नियमनकर्ता आहे (स्वार घोड्याला थांबवू शकतो आणि वळवू शकतो).

मुलांमधील बौद्धिक श्रमाच्या अवलोकनानंतर माझी आणखी खात्री पटली की, अंत:पटलाकडून बाह्य पटलाकडे येणाऱ्या भावनिक प्रेरणा (आनंदोर्मी, विस्मय, आश्चर्य) बाह्य पटलातील सुप्त पेशीना जागे करीत असाव्यात, त्याना क्रियाप्रवृत्त करीत असाव्यात. कुतूहल आणि जिज्ञासा हा मुलांमध्ये ज्ञानाची गरज विकसित करण्याचा मार्ग आहे आणि लहान मुलांच्या बौद्धिक शिक्षणाचा हाच मार्ग असला पाहिजे असे अनुभवाने दाखवून दिले आहे.

प्राथमिक वर्गांमध्ये निसर्गाकडील "सफरी" ही एक परंपराच बनली. जंगले, शेते, तळी येथे काढण्यात येणाऱ्या सहलींची मुले अगदी अधीरतेने वाट पहात असत, आणि खेळांचाही ती आधीच विचार करून ठेवीत असत. अडचणींवर मात करण्याशी संबंधित असलेले खेळ, ज्या खेळांत खेळकऱ्याना खरेखुरे किंवा लोककथांतले वीरपुरुष बनता येत असे असे खेळ मुलांचे आवडते खेळ बनले होते. मुले दुसऱ्या इयत्तेत असताना मी त्याना रॉबिन्सन क्रूसोची गोष्ट सांगितली; आणि त्यातून एक अत्यंत उद्‌बोधक खेळ तयार झाला आणि तो कितीतरी महिने चालला होता. स्पार्टाकसच्या गोष्टीनंतर घळीच्या कड्याजवळच्या एका उंच टेकडीवर मुलानी बंडखोर गुलामांची एक काल्पनिक छावणी तयार केली. प्राचीन काळी आमच्या प्रदेशात रहाणाऱ्या स्कायथियन पशुपाळांच्या, शिकाऱ्यांच्या आणि मच्छिमारांच्या गोष्टीने तर मुले इतकी भारावून गेली की आपण त्या प्राचीन श्रमिकांप्रमाणेच रहात आहोत आणि काम करीत आहोत अशी कल्पना करणारा त्यानी एक खेळही तयार केला.

खेळांमुळे स्पष्ट, उन्मेषयुक्त भावना जागृत होतील आणि सभोवतालचे जग एखाद्या उद्‌बोधक ग्रंथांप्रमाणे मुलांसमोर उलगडले जाईल आणि तो ग्रंथ वाचण्याची त्याना इच्छा निर्माण होईल अशा रीतीने अभ्यासाची सामर्थ्ययुक्त अशा बहुमुखी बौद्धिक व शारीरिक खेळांशी भक्कम सांगड घातली पाहिजे. निसर्गाकडील "सफरीं"च्या व खेळांच्या जोडीलाच शारीरिक श्रम हेही बौद्धिक आणि शारीरिक सामर्थ्याच्या विकासाचे एक व्यापक क्षेत्र बनले. श्रमक्रियेच्या आनंदमय, रोमांचक भावनांशिवाय खऱ्या-

खऱ्या सुखी बालपणाची कल्पना करणे अशक्यप्राय आहे. लहान मुलाच्या दृष्टीने शारीरिक श्रमाचा अर्थ प्राविण्ये व संवयी संपादन करणे एवढाच नसतो, ते एक केवळ नैतिक शिक्षण नसते तर अमर्याद, आश्चर्यकारकरित्या समृद्ध असे ते एक विचारविश्व असते असे अनुभवावरून दिसून आले आहे. या विश्वामुळे नैतिक, बौद्धिक व सौंदर्यात्मक भावना जागृत होतात; त्याशिवाय जगाचे ज्ञान ही अशक्य कोटीतली गोष्ट आहे; आणि त्याचा अर्थ अभ्यास असाही होतो. शारीरिक श्रम आणि अभ्यास यांची आलटून पालटून जी सांगड घालण्यात आली त्यामुळे मुलाचा स्वप्नांच्या आणि सृजनशीलतेच्या दुनियेतील एक रोमांचक प्रवास घडविला गेला. शारीरिक श्रमाच्या नेमक्या याच प्रक्रियेमध्ये जिज्ञासा, कुतूहल, विचारांचा लवचिकपणा आणि आविष्काराची सुस्पष्टता हे महत्त्वाचे मनोगुण माझ्या विद्यार्थ्यांत निर्माण झाले.

मुलाच्या जीवनात शारीरिक श्रमामध्ये प्रेरणादायक विचार असेल तर पाठांच्या काळात, बौद्धिक श्रम ही विकासगामी व समृद्ध अशी श्रेयस्कर व उद्‌बोधक गोष्ट बनते. दुसऱ्या इयत्तेच्या सुमारास आठवड्यातून एकदा आम्ही आमचे आवडते काम करीत असू आणि विचारांच्या व भावनांच्या जोरावर ज्यांवर प्रभुत्व मिळविता येईल अशा गोष्टींमध्ये मुले रममाण होत असत. तिसऱ्या व चवथ्या इयत्तांत आम्ही आमचे आवडते काम आठवड्यातून दोनदा करीत असू.

आवडते काम... याचा अर्थ असा नव्हे की मुलाला कशाततरी गोडी निर्माण होईपर्यंत शिक्षकाने हात जोडून वाट पहात बसले पाहिजे.

व्यावसायिक शिक्षणक्षेत्रात तसेच एकूणच शैक्षणिक कार्यात गोष्टी जशा घडतील तशा घडू देण्यास कोणत्याही गोष्टीला वाव देता कामा नये. करण्याजोग्या अशा स्वारस्यपूर्ण गोष्टींचे वातावरण मुलांभोवती उभे केले पाहिजे. माझ्या विद्यार्थ्यांभोवती सर्वत्र किशोरवयीन मुले-मुली आणि तरुण स्त्री-पुरुष काम करीत असत. अनेक स्वारस्यपूर्ण गोष्टींत सर्व विद्यार्थी तन्मयतेने मग्न झालेले असत. ते झाडांची व पिकांची लागवड करीत, यंत्रांच्या व उपकरणांच्या प्रतिकृती तयार करीत, मातींची मिश्रणे तयार करीत, पशूंची निगा राखीत, नव्या उष्णतागृहांत किंवा यंत्रशाळांत काम करीत किंवा पाणीपुरवठ्याच्या नळांचे जोडणीकाम करीत.

संशोधन, जिज्ञासा व कुतुहलवृत्तीमुळे मुलांचे कामातील स्वारस्य जागृत होते. केवळ काम हेच कामाचे उद्दिष्ट नसून शैक्षणिक प्रक्रियेत

सामाजिक, वैचारिक, नैतिक, बौद्धिक, सृजनात्मक, सौंदर्यात्मक आणि भावनिक अशी अनेक प्रकारची विविध उद्दिष्टे साध्य करण्याचे ते एक साधन आहे हेच ब्रीद मी नेहमी माझ्यासमोर ठेवले आहे.

विचार, भावना, सृजनशीलता, सौंदर्य आणि खेळ यांच्या तेजस्वी प्रकाशाने अभ्यासाचे प्रांगण उजळून निघाल्यास मुलांच्या दृष्टीने अभ्यास ही एक स्वारस्यपूर्ण, आणि अत्यंत चित्ताकर्षक गोष्ट होऊ शकते. अभ्यासातील यशाविषयीच्या माझ्या चिंतेला मुलाचे पोषण कसे होते आणि ते झोपते कसे, त्याची शरीरप्रकृती कशी आहे, ते खेळते कसे, ते दिवसातले किती तास बाहेर असते, ते कोणती पुस्तके वाचते आणि कोणत्या परीकथा ऐकते; ते कोणती चित्रे काढते आणि चित्रांतून आपले विचार आणि भावना कसे व्यक्त करते, निसर्गातील संगीत व लोकसंगीताच्या आणि शास्त्रीय संगीताच्या स्वररचना त्याच्या मनात कोणत्या भावना प्रादुर्भूत करतात, त्याची आवडती कामे कोणती, इतरांचे आनंद आणि विपदा त्याला कोणत्या मर्यादेपर्यंत जाणवतात, त्याने इतरांसाठी काय निर्माण केले आणि त्या संबंधात त्याने अनुभवलेल्या भावना कोणत्या यांविषयीच्या चिंतेने सुरुवात झाली.

ज्ञानाची क्रियाशील कामांपासून जेव्हा फारकत केली जात नाही तेव्हा अभ्यास हा मुलांच्या आंतरिक जीवनाचा एक भाग बनातो. पाढ्यांमध्ये किंवा चौरसाचे क्षेत्रफळ काढण्यात स्वतःहून गोडी घेण्यास मुलाला प्रवृत्त करणे कठीण आहे. ज्ञान हे जेव्हा श्रमाशी संबंधित असलेली सृजनशील उद्दिष्टे साध्य करण्याचे एक साधन बनते तेव्हा मुलाला ज्ञानाची इच्छा निर्माण होते. चातुर्य आणि कल्पकता यांच्या शक्यता प्रकट व्हाव्यात या हेतूने अगदी लहान वयापासून मुलांच्या दृष्टीने शारीरिक श्रम रोमहर्षक बनावेत असा मी प्रयत्न केला. आपल्या ज्ञानाचा उपयोग कसा करावा हे मुलाना शिकविणे हे शाळेचे एक महत्त्वाचे कार्य आहे. ज्ञानाचे एखाद्या निर्जीव, अचेतन गोळ्यात रूपांतर होणे हे अतिशय धोक्याचे आहे; आणि पहिल्या वर्गामध्ये, नेमक्या आपल्या स्वभाववैशिष्ट्यांमुळे, बौद्धिक श्रम हे इतर कशाहीपेक्षा, नवी नवी प्राविण्ये व संवयी संपादन करण्याशी निगडित केले जातो तेव्हा ही गोष्ट घडते. या प्राविण्यांचे व संवयींचे नुसते ज्ञान मिळविले पण त्या कधीच उपयोगात आणल्या गेल्या नाहीत तर मुलाच्या आवडीपासून जणू काही फारकत घडून अभ्यासाचा मुलाच्या आंतरिक जीवनातून हळू हळू लोप होतो. या गोष्टीवर मात करण्याचा

प्रयत्न करताना प्रत्येक मूल आपल्या प्राविण्यांचा व संवयींचा सृजनशीलरित्या उपयोग करीत आहे की नाही याची शिक्षकाने दक्षता घेतली पाहिजे.

## ‘निसर्गग्रंथा’ ची तीनशे पाने

प्रख्यात जर्मन गणितशास्त्रज्ञ फेलिक्स क्लैन (१८४९-१९२५) यानी माध्यमिक शाळेच्या विद्यार्थ्यांची तुलना दहा वर्षेपर्यंत ज्ञानाचा दारूगोळा ठासून भरलेल्या तोफेशी केली आहे. ती तोफ डागण्यात आल्यानंतर आत काहीच उरत नाही. ज्या मुलावर त्याला न आकलणाऱ्या, त्याच्यावर स्पष्ट ठसा न उमटविणाऱ्या, प्रतिमांची व साहचर्यांची सृष्टी त्याच्यासमोर उभ्या न करणाऱ्या गोष्टी लक्षात ठेवण्याची सक्ती केली जाते अशा मुलाच्या बौद्धिक श्रमाचे अवलोकन करीत असताना मला हा अत्यंत कठोर विनोद आठवत असे. विचारांची जागा स्मरणशक्तीने भरून काढणे, सुस्पष्ट बोधन आणि स्मृतिबद्ध केलेल्या गोष्टींच्या मर्माचे अवलोकन यांची जागा घोकंपट्टीने भरून काढणे हा एक फार मोठा दोष असून त्यामुळे मुलाला बधिरता येते व अखेरीस अभ्यासाची त्याची इच्छा मरून जाते.

शालेयपूर्व मुलाची तीक्ष्ण व चिवट स्मरणशक्ती पाहून आपल्यापैकी कोणाला विस्मय वाटलेला नाही? पाच वर्षाचे मूल आपल्या आईबरोबर आणि वडिलांबरोबर शेतात किंवा रानात जाते. सुस्पष्ट प्रतिमांचे, देखाव्यांचे आणि घटनांचे ठसे त्याच्या मनावर शिगोशिग उमटले जातात. असाच एक महिना किंवा एक वर्ष जाते. आई आणि वडील पुन्हा फेरफटक्याला जाण्याचे ठरवितात. त्या शांत, सूर्यप्रकाशित सकाळची मूल उत्सुकतेने वाट पहात असते. एके काळी, फार फार पूर्वी केव्हातरी, आपण आपल्या आईवडिलांबरोबर रानात कसे गेलो होतो हे त्याला आठवते. मुलाच्या आठवणीत चमकणारे सुस्पष्ट, जिवंत तपशील पाहून आईवडील थक्क होतात दुरंगी पाकळ्या असलेले एक नवलपूर्ण फुल मुलाला आठवते. फुलात रूपांतर झालेल्या भावा-बहिणीची एक अप्रतिम कथा मुलाच्या तोंडून जेव्हा पुन्हा बाहेर पडते तेव्हा वडील विस्मयचकित होतात. रानाच्या वेशीवर वर्षापूर्वी त्यानी ही कथा आपल्या पत्नीला सांगितलेली असते. आपले वडील काय बोलताहेत याकडे मुलाचे कान असल्यासारखे वाटत नव्हते—ते एका फुलपाखराच्या मागे धावत होते. असे असताना

भोवतालच्या जगातील हा एक अत्यंत छोटासा तपशील त्याच्या कसा लक्षात राहिला ?

रंगांचे सुस्पष्ट, रोमांचक विलसा, प्रतिमांचे तपशील व नाद यांसंबंधीची मुलांची स्मरणशक्ती आश्चर्यजनकरित्या तीक्ष्ण असते ही खरी वस्तुस्थिती आहे. या सर्व गोष्टी त्यांच्या स्मरणशक्तीत खोलवर रुजलेल्या असतात. सभोवतालच्या जगातील प्रतिमावलोकनाच्या प्रक्रियेत मुलाच्या जाणिवेत उद्‌भूत झालेले अनपेक्षित प्रश्न विचारून मूल आपल्या वडीलधाऱ्या माणसाना आश्चर्यचकित करून सोडते. आणि ते नवलपूर्ण फुल आठवताच मूल आपल्या वडिलाना विचारते, "पण ते भाऊ-बहीण एकमेकाना पाहू शकतात का? तुम्ही म्हणाला होता की झाडे जिवंत असतात – त्याचा अर्थ ती ऐकूही शकतात आणि पाहूही शकतात, होय की नाही? आणि ती एकमेकांशी बोलतात का? आणि ती बोलतात तेव्हा त्यांचे बोलणे आपण ऐकू शकतो का?" वडिलाना विस्मयचकित करणारा एक संपूर्ण-च्या संपूर्ण विचारप्रवाह तेथे प्रकट झाला होता; पण वर्षापूर्वी मुलाने हे प्रश्न का विचारले नव्हते? इतक्या समयापर्यंत त्याने आपली आठवणच जतन करून ठेवली नव्हती तर त्या प्रसंगांच्या भावनिक रंगच्छटाही जतन करून ठेवल्या होत्या. हे कसे? चित्रविचित्र फुलानी आच्छादिलेला मोकळा परिसर, निळे आकाश, आणि विमानाची दूरवरून येणारी घरघर यांची हे मूल स्वतःशीच स्पष्ट कल्पना करू शकते याची वडिलाना खात्री पटते.

या सर्वाचा विचार करताना मी स्वतःशीच प्रश्न केला : जिवंत, सुस्पष्ट कल्पनाशक्ती असलेले हे मूल, तीव्र स्मरणशक्ती असलेले हे मूल, सभोवतालच्या जगातील घटनाबाबत संवेदनाक्षम भावनिक प्रतिक्रिया व्यक्त करणारे हे मूल शाळेतील दोन-तीन वर्षांच्या अभ्यासानंतर व्याकरणाचे साधे नियमही लक्षात ठेवू शकत नाही असे का घडते? "स्टेप" हा शब्द कसा लिहावयाचा किंवा नऊ गुणिले सहा किती हे लक्षात ठेवणेही त्याला कठीण का जाते? जर्मन पंडितापेक्षा मी काढलेला निष्कर्ष कमी कठोर नव्हता: शालेय वर्षांत ज्ञान आत्मसात करण्याच्या प्रक्रियेची अनेक वेळा मुलाच्या आंतरिक जीवनाशी फारकत झालेली असते. सुस्पष्ट प्रतिमा, चित्रे, बोधन आणि कल्पना यांचा एक विशुद्ध प्रवाह मुलाच्या स्मरणशक्तीत ओसंडत असतो आणि नेमक्या याच कारणामुळे मुलाची स्मरणशक्ती तीव्र व चिवट बनते. या प्रवाहाच्या जीवनदायी स्रोतानी परिपुष्ट झाल्यामुळेच आपल्या तरल, अनपेक्षित "तत्त्वज्ञानात्मक" प्रश्नानी मुलांची विचारक्रिया आपल्याला

थक्क करून सोडते. वर्गाचे दरवाजे बंद करून सभोवतालचे जग मुलाच्या जाणिवेबाहेर न ठेवणे हे महत्त्वाचे आहे. बालपणाच्या संपूर्ण काळात सुस्पष्ट कल्पना, चित्रे, बोधन आणि कल्पना यांच्या साहाय्याने माझ्या विद्यार्थ्यांच्या मनाचे सभोवतालच्या जगातून व निसर्गातून सतत भरणपोषण होईल, जिच्या वास्तुरचनेची प्रेरणा अधिक चांगल्या प्रकारे बांधलेल्या वास्तूतून – निसर्गातून – मिळाली आहे अशा अत्यंत प्रमाणबद्ध इमारतीप्रमाणे विचारक्रियेचे नियम मुलाना प्रतीत होतील अशा रीतीने मी माझ्या प्रयत्नांची दिशा ठेवली. मूल म्हणजे केवळ ज्ञानाचे कोठार बनू नये म्हणून, सत्ये, नियम आणि सूत्रे यांचे केवळ खजिनाभांडार बनू नये म्हणून त्याला विचार करायला शिकविले पाहिजे. मुलाच्या मनाचा व स्मरणशक्तीचा पिंडच असा आहे की मुलाच्या भोवती पसरलेले सुस्पष्ट नियमबद्ध जग एक क्षणभरही त्याला बंद न होणे ही त्याची गरज असते. मूल ज्या परिसरात विचार करायला शिकते, गोष्टी स्मृतिबद्ध करायला शिकते, साधकबाधकतेची मीमांसा करायला शिकते तो परिसर हा त्याच्या भोवती पसरलेल्या जगाचा बनलेला असेल तर शाळाप्रदेशानंतर मुलांची स्मरणशक्ती, त्यांच्या विचारांची सुस्पष्टता क्षीण होण्याची काही जरूरी तर नाहीच; उलट ती अधिकच मजबूत बनू शकेल.

बौद्धिक शिक्षणात निसर्गाच्या भूमिकेला आपण अतिशयोक्तरूप देता कामा नये. मुलाना निसर्गाने वेढून टाकले तर त्यातच बौद्धिक विकासाची एक बलशाली प्रेरणा दडलेली असते असे जो शिक्षक समजतो ती त्याची एक गंभीर चूक असते. विचारशक्तीवर, भावनांवर किंवा इच्छाशक्तीवर प्रत्यक्ष क्रिया घडवून आणणाऱ्या अशा कोणत्याही जादूच्या शक्ती निसर्गात नाहीत. माणूस जेव्हा निसर्गाचे ज्ञान मिळवितो, कार्यकारणभावाचे विचार जेव्हा त्याच्या अंगी मुरतात तेव्हाच निसर्ग हे शिक्षणाचे एक स्रोतस्थान बनते. ज्ञानग्रहणक्रिया दृग्गोचराच्या पातळीवर आणणे यातच मुलांच्या विचारक्रियेच्या अलग वैशिष्टयांचे सर्वस्व सामावले आहे आणि जे उघड आहे, स्पष्ट आहे त्याच्या पुनर्मुल्यांकनाचा अर्थ तोच आहे. विशेषत: प्रतिमा, रंग व नाद यांच्या रूपात मुले विचार करीत असल्यामुळे मुलांच्या विचारक्रियेच्या वैशिष्टयाना एखाद्या मंत्रबळाचे स्थान देता उपयोगी नाही. ही बाब म्हणजे एक वस्तुनिष्ठ सत्य आहे आणि उशिन्स्की यानी त्याचे महत्त्व निर्विवादपणे निदर्शनास आणून दिले आहे. परंतु मुले प्रतिमा, रंग आणि नाद यांच्या रूपात विचार करतात याचा अर्थ असा नव्हे की त्याना अमूर्त, तात्त्विक विचार करण्यास शिकविता कामा नये. दृक्साधनांच्या

वापराच्या महत्त्वावर, बौद्धिक शिक्षणामधील निसर्गाच्या व्यापक भूमिकेवर भर देताना अमूर्त, तात्त्विक विचाराच्या आणि हेतुपूर्ण शिक्षणाच्या विकासाची साधने म्हणूनच अनुभवी शिक्षणतज्ज्ञ या पद्धतींकडे पहातात.

माझ्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीने जे विचाराचे उगमस्थान बनले पाहिजे अशा प्रत्येक गोष्टीचा मी विचार केला आणि चार वर्षांच्या काळात मुलानी सभोवतालच्या जगातील अशा घटनांचे निरीक्षण करावे की ज्या घटना त्यांच्या विचारांची उगमस्थाने बनतील असे मी माझ्या मनाशी ठरविले. 'निसर्गग्रंथा'ची तीनशे पाने अशा रीतीने उदयास आली. मुलांच्या मनावर कायम ठसे उमटवितील अशी तीनशे निरीक्षणे, सुस्पष्ट अशी तीनशे चित्रे त्यात सामावली होती. विचार कसा करावा हे शिकण्यासाठी आठवडयातून दोनदा आम्ही निसर्गाचा फेरफटका करीत असू; केवळ निरीक्षण करणे नव्हे तर विचार करण्यास शिकणे हा त्याचा हेतू होता. हे फेरफटके म्हणजे केवळ मनोरंजनासाठी केलेल्या सहली नव्हत्या तर मूलतःच ते विचारक्रियेच्या क्षेत्रातील पाठ होते. परंतु पाठ मन अगदी गुंतवून ठेवू शकणारे असतात, अत्यंत स्वारस्यपूर्ण असू शकतात ही वस्तुस्थितीच अशी होती की त्या वस्तुस्थितीने मुलाचे आंतरिक विश्व अधिकच संपन्न बनविले.

सभोवतालच्या जगाचे निरीक्षण करीत असताना घटनांचा कार्यकारण-भाव मुलाना निश्चित करता आला पाहिजे, वस्तूंचे गुणधर्म आणि लक्षणे यांची त्याना तुलना करता आली पाहिजे या दृष्टीने मुलांच्या मनावर वास्तवाची सुस्पष्ट चित्रे ठसविणे, जेथे विचारप्रक्रिया चरसृष्टीच्या मूळ अधिष्ठानालाच जाऊन भिडते असा बिंदू गाठणे हे मी माझे उद्दिष्ट ठेवले. पाठांमध्ये सारांशभूत बनलेली सत्ये जेवढी अधिक अमूर्त तेवढी बौद्धिक परिश्रमाची गरज अधिक; आणि तेवढयाच अधिक प्रमाणात विद्यार्थ्याने ज्ञानाच्या उगमस्थानांकडे – निसर्गाकडे – जाणे आवश्यक. अशा वेळी सभोवतालच्या जगातील प्रतिमा आणि चित्रे त्याच्या जाणीवपटलावर अधिक सुस्पष्ट ठसे उमटवितात. मुलाच्या बौद्धिक विकासाचा हा एक अत्यंत महत्त्वाचा नियम आहे; आणि निरीक्षणाच्या योगे या नियमाला अधिक बळकटी प्राप्त झाली. परंतु सुस्पष्ट प्रतिमा मुलाच्या जाणिवेत प्रतिबिंबित होतात त्या छायाचित्राच्या अभ्रकी पट्टयावर उमटणाऱ्या चित्राप्रमाणे नव्हेत. संकल्पना कितीही स्पष्ट असोत त्यांचे कार्य तेथेच संपत नाही किंवा अभ्यासाचे उद्दिष्ट त्याना प्राप्त होत नाही. जेथे तात्त्विक विचारक्रिया अस्तित्वात असते, जेथे सजीव चिंतन हे स्वतःचे साध्य म्हणून नव्हे तर एक साधन म्हणून उपयोगात येते तेथे बौद्धिक शिक्षणाला सुरुवात होते. विविध

आकार, रंग व नाद धारण केलेली सभोवतालच्या जगातील सुस्पष्ट प्रतिमा ही हजार प्रश्नांची जननी असते. या प्रश्नांचा आशय उलगडताना शिक्षक 'निसर्गग्रंथा'ची पाने चाळू लागतो.

'निसर्गग्रंथा'च्या पहिल्या पानाचे नाव आहे 'चर व अचर सृष्टी.' शरद ऋतूच्या एका ऊबदार सूर्यप्रकाशित दिवशी दुपारच्या वेळी आम्ही नदीकाठावर गेलो आणि तेथल्या गवतावर बसलो. शारदीय फुलांची पखरण झालेले एक कुरण आमच्यासमोर पसरले होते. नदीच्या नितळ पाण्याच्या तळाशी मासे पोहोत होते, आणि फुलपाखरे इतस्ततः फिरत होती. आमच्या माथ्यावर निळ्या आकाशात पाकोळ्या उडत होत्या. आम्ही एका उंच काठावर चालत गेलो. तेथे जमिनीचा काही भाग वर्षानुवर्षे अनावृत राहिला होता. तेथील चिकणमातीचे आणि वाळूचे पिवळे, लाल, शेंदरी आणि सफेद असे विविधरंगी थर मुलानी न्याहाळले. तेथे सफेद चिकणमातीचा एक बारीक थर होता, त्यानंतर सोनेरी वाळूचा थर, त्यानंतर सुंदर चौकोनी स्फटिकांचा थर होता. वरच्या काळ्या मातीच्या थरांची आणि त्याहून अधिक खोलवर पसरलेल्या थरांची मुलानी तुलना केली.

"मातीच्या वरच्या थरांत तुम्हाला काय दिसते?" मी मुलाना विचारले.

"वनस्पतीची मुळे," मुलानी उत्तर दिले. "अधिक खालच्या थरांत तशी मुळे नाहीत."

"काठाच्या अगदी कडेला उगवलेल्या गवताच्या त्या हिरव्या पात्यांकडे पहा आणि सोनेरी वाळूच्या पट्ट्याकडे पहा. काय फरक दिसतो तुम्हाला गवतामध्ये आणि वाळूमध्ये?"

"उन्हाळ्यात गवत उगवते, शरदात ते कोमेजून नष्ट होते आणि वसंतात पुन्हा ते सजीव होते..." मुले म्हणाली. "आणि गवताला छोटे छोटे बी असते, ते बी जमिनीवर इतस्ततः पसरते आणि त्यातून पुन्हा नवीन गवत उगवते..."

"आणि वाळूचे काय?" मी विचारले. सर्व मुलानी विशेषतः पेत्रिक, वाल्या व नीना या मंद विचारांच्या मुलानी सभोवतालच्या जगातील वस्तूंची तुलना करावी अशी माझी इच्छा होती. वर्गात अजूनही काही अशी मुले होती की ज्यांच्या विचारप्रवाहाची तुलना मंद पण पूर्णपणे भरलेल्या नदीशी करता येईल — मिशा आणि साशा. वर्गात अजून अशीही एक मुलगी होती — ल्यूदा — की जिची विचारक्रिया सात पट्ट्यानी वंद

केलेल्या पिंपातल्या साठ्याइतकीच मला गूढ वाटत होती. तिच्या बौद्धिक विकासाची प्रक्रिया अत्यंत मंद आहे आणि इतर मुलाना जे सहजगत्या उमगते त्याची उमज पडायला तिला अवघड जाते असेच मला वाटत होते. पण त्या छोट्या बालिकेचे डोळे अतिशय सजीव आणि प्रतिबिंबनशील होते. विचार तिला जाणवत होते; पण कोणत्यातरी आंतरिक शक्तीने ती ते खेचून धरीत होती. जणू काही तिला जे चांगले ठाऊक असे ते उच्चारण्याची ती बुद्ध्याच घाई करीत नव्हती.

"मुलानो, ती सोनेरी वाळू पहा आणि ते हिरवे गवत पहा. किंवा फारतर असं म्हणू या की ती हिरवी वाळू पहा आणि ते हिरवे गवत पहा. यांत तुम्हाला कोणते साम्य आढळते आणि कोणता भेद आढळतो?"

हिरव्या कुरणाकडे आणि त्या उघड्या काठाकडे पहात मुले विचार करू लागली. ल्यूदाची नजर अंतर्मुख बनली होती तर पेत्रिकच्या भुंवया आकुंचल्या होत्या. वाल्या एका हातातून दुसऱ्या हातात वाळू ओतीत होती.

"वाळूला फुले नसतात तर गवताला फुले असतात," ल्यूदा म्हणाली.

"गाई गवतात चरतात; पण वाळूत चरण्याचा नुसता प्रयत्न करा आणि बघा काय होते ते!" पेत्रिकने स्पष्टीकरण दिले.

"पावसात गवत वाढते", विचारमग्न मिशा म्हणाला, "पण पावसा-पासून वाळू कशी वाढेल?"

"वाळू जमिनीत खोलवर असते, पण गवत पृष्ठभागावर असते," युराने जाहीर केले.

पण सिऱ्योझाने त्याला हरकत घेतली, "पण समुद्रकिनाऱ्यावर वाळू नसते? गवत सूर्यप्रकाश पकडण्याचा प्रयत्न करते, पण वाळू सूर्यप्रकाशात फक्त तापते..."

नंतर आम्ही कोणीतरी उचललेले छोटे छोटे गोटे, मेपलची हिरवी पाने, लाल काचेचा एक तुकडा, डेझीचे फूल, तळ्यामध्ये पोहोणारे मासे, कलहंसाचे पीस, पुलाचा लोखंडी कठडा आणि झाडांमध्ये एकमेकीना गुरफटलेल्या हॉपच्या वेली यांची तुलना केली. मुलांच्या विचाराना आता पूर्ण उधाण आले होते. सभोवतालच्या जगातील वस्तू आणि घटना यांमधील दृष्टिगोचर परस्परावलंबन त्या छोट्या मुला-मुलींच्या नजरेस आले आणि ताबडतोब दृश्यमान न होणारे संबंध त्यानी शोधून काढले. चर आणि अचर यांच्या पहिल्या संकल्पनानी मुलांच्या मनात आकार घेतला. काही गोष्टी चर असतात आणि काही गोष्टी अचर असतात—बहुविध

वस्तुस्थितींतून ही गोष्ट मुलांच्या प्रत्ययास आली; पण मी जेव्हा त्याना विचारले, "चर आणि अचर यांमध्ये काय भेद असतो?" तेव्हा त्याना त्याचे उत्तर देता आले नाही. ती हळूहळू निष्कर्षाप्रत येत होती आणि हा निष्कर्ष काढीत असताना मुलानी जे नजरेने पाहिले होते त्याकडेच मुले पुन्हा वळली. मुलानी लक्षणे बरोबर टिपली होती; पण त्याबरोबरच मुलानी काही चुका केल्या होत्या. त्या चुका आम्ही तेथे जे जिवंत निरीक्षण केले त्या प्रक्रियेत दुरुस्त करण्यात आल्या. "चर वस्तू हलतात तर अचर वस्तू हलू शकत नाहीत," असे कोस्त्या म्हणताच जवळ जवळ सर्व मुले त्याच्याशी सहमत झाली; पण नंतर सर्वचजण स्तब्ध झाले, मुलानी आजूबाजूला पाहिले आणि मला पुढील चर्चा ऐकू आली:

"नदीत तरंगत जात असताना काठीही हलते, पण ती सजीव नसते."

"ट्रॅक्टरही हलतो पण तोही सजीव नसतो."

"कोळ्याचे जाळे हवेत तरंगत जाते पण ते सजीव नसते."

"जुन्या छपरावर साचलेले शेवाळ हलत नाही, पण ते तर सजीव असते—की शेवाळ सजीव नसते?"

"आणि वाळूही हलते. आम्ही वाळूच्या खड्डयात उभे होतो आणि वाळू एखाद्या ओहळासारखी कशी धावत होती ते आम्ही पाहिले आहे."

तेव्हा भेद गतीत सामावला नव्हता. मग अचरापासून चराला वेगळेपण देणारे विभागणारे असे आहे तरी काय? आपल्या भोवतालच्या जगातील विविध वस्तूंची मुलानी पुनःपुन्हा तुलना केली. मग शूरा एकदम आनंदाने ओरडला:

"चर वस्तू वाढतात, अचर वस्तू वाढत नाहीत."

मुलानी या शब्दांवर विचार केला आणि पुन्हा त्यानी आपली नजर सभोवतालच्या जगाकडे वळविली. त्यानी केलेला प्रकट युक्तिवाद असा: गवत चर आहे—गवत वाढते; झाड चर आहे—झाड वाढतो; रासबेरीची झुडुपे चर आहेत—ती वाढतात दगड अचर आहे—तो वाढत नाही; वाळू अचर आहे कारण ती वाढत नाही. तेव्हा गोष्ट होती ती अशी—जे जे चर आहे ते वाढते जे जे अचर आहे ते वाढत नाही. मिशा दुसऱ्याच कशाचातरी विचार करीत होता आणि दूरवर पहात होता. आपले मित्र काय बोलताहेत हे त्याने ऐकले होते का? आपल्या भोवतालच्या सर्व चर व अचर वस्तूंची मुलानी नावे घेतल्यानंतर मिशा म्हणाला:

"चर वस्तू सूर्यप्रकाशाशिवाय जिवंत राहू शकत नाही," आणि त्याने रानाकडे, कुरणाकडे, शेताकडे आपले बोट दाखविले.

या शब्दानी माझी पुन्हा एकदा खात्री पटली की संथ विचार करणाऱ्या मुलांच्या निरीक्षणातील बोधनशक्ती, अवधानपूर्णता आणि तीक्ष्णता अनेक वेळा लक्षणीय अशी असते. मिशाच्या शब्दानी मुलांची कल्पनाशक्ती प्रज्वलित केली. "यापूर्वीच माझ्या हे डोक्यात कसे आले नाही?" असा मुला-मुलीनी स्वत:लाच प्रश्न केला. हा चिवट विचार सभोवतालच्या जगातील वस्तूना पुन:पुन्हा स्पर्श करू लागला आणि मुलांचे पुन्हा प्रकट विचारमंथन सुरू झाले: "गवत, फुले, झाडे आणि गहू सूर्याशिवाय राहू शकत नाहीत. लोकही सूर्यप्रकाशाशिवाय राहू शकणार नाहीत... की ते राहू शकतात? नाही, माणसे कुठेतरी खोलवर पृथ्वीच्या गर्भात रहात आहेत अशी तुम्ही कल्पनाच करू शकत नाही. झाडांच्या फांद्यांमुळे छाया पडते व त्या छायेमुळे गवत कोमेजून नष्ट होते हे आपल्याला ठाऊक आहे. माझ्या वडिलानी मला सांगितले की पावसानंतर जमीन तापवायला सूर्य असला तरच हिंवाळयात पिके हिरवी बनतील पण सूर्याशिवाय परिस्थिती मोठी बिकट होईल..." पण दगड सूर्याशिवायही तसेच राहू शकतात. नाही, ते तसेच रहात नाहीत; तळघरामध्ये त्यांच्यावर भुरी चढते... भुरी चर आहे की अचर? सूर्यामुळे केवळ उपयुक्त गोष्टीच घडतात असे नाही; फार काळ पाऊस झाला नाही तर सूर्यामुळे पिके करपू शकतात. याचा अर्थ असा की चर वस्तूना फक्त सूर्याचीच नव्हे तर पाण्याचीही गरज असते.

मुलांच्या विचारांचे छोटे छोटे झरे हे असे होते आणि ते झरे एकत्र येऊन त्यांचा एकच एक प्रवाह तयार झाला, आणि आपल्याला अजून स्पष्ट न झालेल्या अशा काहीतरी घटना चर वस्तूंत घडत असतात, तसेच या घटना सूर्य, पाणी व निसर्गात आपल्या भोवती जे जे आहे त्यांवर अवलंबून असतात याचा त्याना बोध झाला... 'निसर्गग्रंथा'च्या पहिल्या पानावरची पहिली ओळ मुले वाचू लागली होती. हे संपूर्ण जग चर व अचर या दोन घटकांचे मिळून बनलेले आहे हे त्याना समजले. चर व अचर यांविषयी त्यांच्या मनावर उमटलेल्या पहिल्या ठशांतून अनेक प्रश्नांचा जन्म झाला. घरी जाताना, आपल्याला जे परिचित आहे असे त्याना वाटत होते त्या प्रत्येक गोष्टीचे त्यानी जवळून निरीक्षण केले आणि आपण पूर्वी काहीच पाहिलेले नव्हते असे त्याना कळून चुकले. अधिक

अधिक गोष्टी जितक्या त्यांच्या नजरेस येत होत्या तितके अधिक प्रश्न त्यांच्या मनात उद्‌भवत होते : ओक वृक्षाच्या बीजामधून बाहेर आलेल्या छोट्याशा कोंबांतून प्रचंड ओकवृक्ष कसा तयार होतो? पाने, फांद्या आणि दणदाकट खोड कोठून येते? शरत्कालात पाने झाडांवरून का गळतात? हिंवाळयात झाडे वाढतात की नाहीत? एकाच वेळी या सर्व प्रश्नांची उत्तरे देणे अशक्य होते, आणि कोणी तसा प्रयत्नही करू नये. मुलांच्या मनात हे प्रश्न निर्माण झाले होते हीच मुळात चांगली गोष्ट होती. विचार करताना मूल उत्तरासाठी ज्ञानाच्या व विचाराच्या उगमस्थानांकडे जावयास शिकले ही एक चांगली गोष्ट होती. आपले विचार दुसऱ्यापर्यंत पोहोचवताना त्याने नेमके, अचूक शब्द पकडले ही गोष्ट चांगली होती. विचाराची स्पष्टता ही सभोवतालच्या जगाबरोबर साधलेल्या थेट संवादाच्या प्रक्रियेतून संपादन केलेली विचारक्रियेतील एक महत्त्वाची बाब असते.

मूल प्रतिमा, रंग व नाद यांच्या रूपात विचार करते याचा अर्थ असा नव्हे की त्याने वस्तुरूप विचारक्रियेच्या प्रांगणाच्या चौकटीतच राहिले पाहिजे. प्रतिमारूप विचारक्रिया ही कल्पनांचा बोध होण्याच्या प्रक्रियेतील एक आवश्यक पायरी आहे. हळू हळू पुढील क्रियाव्यापारात्मक संकल्पना मी मुलांपर्यंत पोहोचविण्याचा प्रयत्न केला: **घटना, कारण, कार्य, घडामोडी, सशर्तता, अवलंबन, भेद, साम्य, समवाय-ऐक्य, सुसंगतता, असंगतता, शक्यता, अशक्यता,** इत्यादी. अमूर्त विचारक्रियेच्या घडणीमध्ये या संकल्पना फार मोठी भूमिका बजावतात अशी अनेक वर्षांच्या अनुभवातून माझी खात्री पटली आहे. सजीव वस्तुस्थितींचे आणि घटनांचे अन्वेषण केल्याशिवाय, स्वतःच्या डोळयानी जे पाहिले असेल त्यावर विचार केल्याशिवाय, मूर्तरूप वस्तू, वस्तुस्थिती आणि घटनांकडून सर्वसाधारण अमूर्त निष्कर्षांकडे क्रमशः संसरण केल्याशिवाय या संकल्पनांवर प्रभुत्व मिळविणे अशक्यप्राय आहे. निसर्गाचा अभ्यास करताना मुलांच्या मनात उद्‌भवलेल्या प्रश्नांमुळे या संसरणाला चालना मिळते. निसर्गातील मूर्त घटनांचे निरीक्षण करण्यास व त्यांचा कार्यकारणभाव शोधून काढण्यास मी माझ्या विद्यार्थ्यांना शिकविले. विचारक्रिया आणि मूर्त प्रतिमा यांमधील घनिष्ट संबंधामुळे अमूर्त संकल्पनांचा वापर करण्याची संवय मूल हळू हळू संपादन करते. अर्थात ही फार प्रदीर्घ अशी प्रक्रिया आहे आणि ती अनेक वर्षे चालत असते.

मुलांच्या दृष्टीने 'निसर्गग्रंथा'चे वाचन अत्यंत स्वारस्यपूर्ण होते. पण

केवळ स्वारस्य हेच त्याचे उद्दिष्ट नव्हते. अभ्यासामधील अवाजवी वृद्धीने ग्रासलेले मुलाचे प्रत्यक्ष व्यक्तिगत स्वारस्य सोविएत शिक्षणतज्ज्ञाना अमान्य आहे, मुलांच्या विविध क्रिया हे शिक्षणप्रक्रियेचे ध्येय आहे हे त्याना अमान्य आहे. फार पूर्वी उशिन्स्कीनी लिहून ठेवले आहे: "मुलाला ज्यात स्वारस्य आहे तेवढेच त्याला करण्यास शिकवू नका, तर त्याला ज्यात स्वारस्य नाही तेही त्याला करायला शिकवा, आणि आपली कर्तव्ये पार पाडण्यातला जो आनंद आहे त्या आनंदाच्या दृष्टीने ते त्याला करायला शिकवा: जीवनासाठी तुम्ही मुलांची तयारी करीत आहात, आणि जीवनात सर्वच कर्तव्ये विनोदनात्मक नसतात."* अभ्याससामुग्रीची, प्रकारांची व पद्धतींची विद्यार्थ्यांच्या व्यक्तिगत गरजा भागविण्याच्या दृष्टिकोनातून मीमांसा करण्याची भांडवलदारी विद्वानांची प्रवृत्ती सोविएत शिक्षणशास्त्राला परकी आहे.

शास्त्रीय ज्ञानाचे क्षेत्र संपादन करणे आणि द्वंद्वात्मक-भौतिकवादावरील दृढविश्वासाची घडण करणे ही शैक्षणिक व संगोपनाची ध्येये शाळेच्या क्षेत्रात साध्य करण्याचे एक साधन या नात्याने सोविएत शिक्षणामध्ये मुलाच्या व्यक्तिगत स्वारस्यांकडे पाहिले जाते. 'निसर्गग्रंथा'ची पाने वाचीत असताना स्वारस्यपूर्ण खेळांत स्वतःला गुंतवून घेऊन आम्ही दिवसाचा केवळ वेळ घालवीत नव्हतो तर शास्त्रीय ज्ञानाच्या जगाकडे घेऊन जाणाऱ्या मार्गाने आम्ही वाटचाल करीत होतो. सभोवतालच्या जगातील ज्या घटनांमध्ये निसर्गनियमांचा गाभा प्रकट होत होता अशा घटनांचा मुले विचार करीत होती. प्रत्येक मुलाच्या व्यक्तिगत स्वारस्याची परिपूर्ती करण्याच्या दृष्टीने नव्हे तर जगाच्या द्वंद्वात्मक, शास्त्रीय ज्ञानग्रहणाच्या दृष्टीने मी 'निसर्गग्रंथा'-तील साहित्य निश्चित केले. सोविएत शिक्षणसिद्धांतामधील शालेय विद्यार्थ्यांच्या विविध क्रियांची उद्दिष्टे स्पष्ट करणारी तत्त्वे आणि "कृतीतून शिका" हे व्यवहारवाद्यांचे सुप्रसिद्ध प्रमेय यांमध्ये भेद आहे तो येथेच.

सोविएत शिक्षणसिद्धांतामध्ये मुलांच्या विविध क्रिया या पद्धतशीर स्त्रीय शिक्षणाची जागा घेऊ शकत नाहीत. शैक्षणिक व सर्वसाधारण संगोपनाची उद्दिष्टे साध्य करण्याचे ते एक साधन आहे. अर्थात ज्ञानप्रभुत्वाचे संवर्धन करणाऱ्या विविध क्रिया मुलाच्या व्यक्तिगत स्वारस्याशिवाय

---

*के. डी. उशिन्स्की, 'निबंध', खंड ६, मॉस्को, रशियन फेडरेशन शिक्षणशास्त्र प्रबोधिनी प्रकाशन, १९४९, पृ. २५२ (रशियनमध्ये).

अर्थशून्य ठरतात. सोविएत शिक्षणसिद्धांतामध्ये तर्कसंगत विचारक्रिया आणि अन्वेषण यांच्या प्रक्रियेतील शालेय विद्यार्थ्याच्या सृजनशील आंतरिक शक्तीचा एक क्रियाशील भाग म्हणून स्वारस्याकडे पाहिले जाते. घडते असे की, विद्यार्थ्याने आत्मसात केलेली सत्ये ही त्याची व्यक्तिगत दृढ मते बनतात आणि त्या मर्यादेपर्यंत कोणत्या गोष्टी अभ्यासणे शक्य आहेत आणि कोणत्या गोष्टींचे ज्ञान मिळविणे शक्य आहे या बाबतच्या त्याच्या स्वारस्याला अधिक सखोलता प्राप्त होते. सोविएत शिक्षणसिद्धांतामध्ये स्वारस्य हे तत्त्वप्रणालीशी, शास्त्रीय-भौतिकवादी शिक्षणाशी अविभाज्यरित्या जोडले गेले आहे.

'निसर्गग्रंथा'चे एकएक पान आम्ही वाचीत होतो, अभ्यासीत होतो व त्यावर विचार करीत होतो. मुलांच्या ज्ञानचक्षूंसमोर जे दुसरे पान उलगडले गेले त्या पानाचे नाव होते: "अचर हे चराशी बांधलेले आहे". आम्ही उष्णतागृहात गेलो. जमिनीच्या अंतर्भागातून येणारी तीच सोनेरी वाळू तेथे विटकरांच्या थरावर पसरली होती आणि वडीलधारे विद्यार्थी त्या वाळूत काकडचा, टोमॅटो, बार्ली व ओटची लागवड करीत होते. आम्ही ती क्रिया पाहिली. वाळूने आणि विटकरानी धातूचे व लाकडाचे खोके कसे भरण्यात आले होते आणि रासायनिक द्रव्यांचे मिश्रण त्यांत कसे ओतण्यात येत होते याचे मुलानी अवलोकन केले. वाढीसाठी आणि पक्व होण्यासाठी जे काही आवश्यक होते ते काकडचांची व टोमॅटोची मुळे या माध्यमातून शोषून घेत होती. तेथे होते दगडाचे निर्जीव गोटे आणि पाण्यात विरघळविलेली सफेद भुकटीपण जणू काही ते सर्व जीवनाला आवश्यक आहे असेच दिसत होते. आणि काही सपाट भांडयांमध्ये वाळूशिवाय आणि दगडगोटयांशिवायच बार्लीची हिरवी पेरे वाढत होती. सफेद भुकटीच्या द्रवणातून त्यांची मुळे पोषक द्रव्ये शोषून घेत होतो. पण फुलांकडे आणि पक्व होणाऱ्या फळांकडे अगदी जवळून पाहिल्यानंतर मुलाना असे दिसून आले की जेथे पाणी आणि सूर्यप्रकाश असतो तेथेच अचर हा चराच्या दृष्टीने एक परिसर बनतो. प्रकाश, ऊब आणि पाणी यांशिवाय जीवन अशक्य आहे. त्या दिवशी आभाळ अभ्राच्छादित होते आणि उष्णतागृहात विजेचे दिवे लावलेले होते. बाहेर गारठा होता, पण उष्णतागृहात मध्यवर्ती उष्णतावाहक नळांमुळे हवा ऊबदार बनली होती.

मी मुलाना म्हटले, "मुलानो तुम्हाला जे आजूबाजूला दिसते ते अगदी काळजीपूर्वक पहा आणि अचराशिवाय चर अस्तित्वात राहू शकेल की

नाही याचा विचार करा. तुम्हाला तुमच्यासमोर एक मोठे भांडे दिसत आहे. त्या भांड्यात पुष्कळशी छोटी छोटी भांडी आहेत आणि त्या भांड्यांत निरनिराळी रासायनिक खते भरून ठेवली आहेत. वेगवेगळ्या भांड्यांतून तुमचे वडीलधारे मित्र सफेद, पिवळी व करडी भुकटी घेऊन त्यांचे कसे मिश्रण करीत आहेत ते पहा आणि पाण्यात ते मिश्रण कसे विरघळवीत आहेत ते पहा. खडबडीत वाळू आणि वनस्पती कुजवून तयार केलेली माती यांचे मिश्रण करून ते सुपीक भूमी तयार करीत आहेत. या मिश्रणातून कशी रसाळ टोमॅटो तयार झाली आहेत पहा. रोपाला त्याच्या पानांसाठी, देठांसाठी आणि फळांसाठी आवश्यक असलेले द्रव्य ते कोठून घेते? हे द्रव्य ते अचरापासून मिळविते. अचर सृष्टी चरासाठी परिसर तयार करते. "या सत्यांच्या दर्शनामुळे निसर्गाच्या रहस्यांविषयीची एक आश्चर्यभावना मुलांच्या मनात जागृत झाली.

येथे आपल्याला ॲरिस्टॉटलचे (ख्रि. पू. ३८४-३२२) म्हणून गणल्या जाणाऱ्या त्या प्राचीन वचनाची आठवण होते: आश्चर्य हे विचारक्रियेचे उगमस्थान आहे. निसर्गरहस्यांची उकल झाल्यामुळे आत्मीयतेने जाणवणारी विस्मयभावना ही विचारप्रवाहाला दिशा देणारी एक शक्तिशाली प्रेरणा आहे. अगदी वेगवेगळ्या प्रकारची रोपे – टोमॅटो, काकड्या, बार्ली – रासायनिक द्रव्यांच्या मिश्रणातून कशी तयार होतात हे जेव्हा मुलानी पाहिले तेव्हा त्यानी माझ्यावर प्रश्नांच्या फैरी झाडल्या: "नितळ मिश्रणाचे रूपांतर जाड देठांत, मधमाश्यांच्या फेरात सापडलेल्या तेजस्वी रंगीबेरंगी फुलांत आणि रसाळ फळांत कसे होते?" "चर सृष्टी कोठून येते? सूर्या-मुळे रोपाना हिरवेपणा येत नाही, तो फक्त त्याना ऊब आणि प्रकाश देतो?" "हिरव्या काकड्या आणि लाल टोमॅटो एकाच मिश्रणातून उगवतात हे कसे? काकड्या आणि टोमॅटो अगदी शेजारी शेजारी उगवूनही काकड्या हिरव्या का आणि टोमॅटो लाल का?" "या निरनिराळ्या रंगांच्या भुकटींमध्ये काय आहे?" "कुजलेल्या पदार्थांपासून तयार केलेली माती आणि भूमी यांच्या मिश्रणापासून रोपे हिरवी कशी बनतात?"

चर आणि अचर यांच्या संबंधांविषयीच्या पहिल्या दृक्कल्पना या मुलाच्या अधिकतर बौद्धिक विकासाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाच्या आहेत. "चर सृष्टी कोठून येते?" आणि "अचर सृष्टीपासून सूर्य चर सृष्टी कशी 'घडवितो?" या प्रश्नांचा विचार करीत असताना मूल जीवनाचा

महान ग्रंथ वाचण्याची आणि अत्यंत गुंतागुंतीच्या प्रक्रियांच्या रहस्यांविषयीचे ज्ञान मिळविण्याची सिद्धता करीत असते.

बौद्धिक क्रियाव्यापार घडवून आणण्याचे एक साधन म्हणून मी 'निसर्गग्रंथा'च्या वाचनाकडे पाहिले. कल्पना, चित्र आणि प्रतिमा हा क्रियाशील विचाराचा केवळ प्रारंभ आहे. "विद्यार्थ्याला साध्या बोधनाचे किंवा निष्क्रियतेचे शिक्षण देणारी कोणतीही पद्धत निकृष्ट असते आणि विद्यार्थ्यामध्ये क्रियाशीलता जागी करणारी कोणतीही पद्धत चांगली असते,"* असे एफ्. ए. दिस्तेरवेग यानी लिहिले आहे. 'निसर्गग्रंथा'चे वाचन हे निसर्गातील चित्रांचे व प्रतिमांचे साधे बोधन ठरू नये तर क्रियाशील विचार, जगाचे तात्त्विक ज्ञानग्रहण आणि पद्धतशीर शास्त्रीय ज्ञान यांचा तो प्रारंभ ठरावा असा मी प्रयत्न केला.

विख्यात सोविएत मानसशास्त्रज्ञ जी. कोस्त्युक यानी म्हटले आहे: "अत्यंत उत्कृष्ट साहित्याचा विद्यार्थ्यांच्या व्यक्तिगत क्रियेत अंतर्भाव केला जातो तेव्हाच ते त्यांच्या जाणिवेपर्यंत जाऊन पोहोचते." क्रियेसाठी क्रिया नव्हे, व्यक्तिगत स्वारस्यांची परिपूर्ती करण्यासाठी क्रिया नव्हे तर शास्त्रीय ज्ञानाचे साहित्य प्रकट करणारी क्रिया हा आहे सोविएत शिक्षणशास्त्रातील क्रियात्मक आणि शास्त्रीय घटकांच्या ऐक्याचा गाभा.

'निसर्गग्रंथा'च्या पुढील पानाचे नाव होते: "निसर्गातील प्रत्येक वस्तू बदलत असते". अनेक वेळा आम्ही या पानाकडे पुनःपुन्हा वळलो. शरदातल्या एका लखलखीत दिवशी दुपारच्या भोजनवेळेच्या सुमारास आम्ही फळबागेत गेलो. सफरचंदाच्या व पिअरच्या फांद्या फळभाराने खाली वाकल्या होत्या. "हिंवाळ्यात आपली बाग कशी दिसते आठवते तुम्हाला, मुलानो," मी मुलाना विचारले. "किती उजाड दिसते ती— धवल हिमाने आच्छादिलेल्या फांद्या—खोडांभोवती साचलेला बर्फ... पण आता फांद्या कशा गर्द हिरव्या पानानी भरलेल्या आहेत, आणि धरतीच्या रसानी सफरचंदाची व पिअरची फळे कशी नुसती रसरशीत बनली आहेत."

दोन महिन्यांतर आम्ही पुन्हा फळबागेत गेलो. कशी दिसत होती ती आता? पिवळ्या पानांचा जमिनीवर एक मुलायम गालिचा पसरला होता

---

*एफ्. ए. दिस्तेरवेग, 'निवडक शैक्षणिक निबंध', मॉस्को, उचपेद्गिझ प्रकाशन, १९५६, पृ. १२८ (रशियनमध्ये).

आणि फांद्या निमउजाड झाल्या होत्या. सफरचंदाचे एक जुने, पोकळ झालेले झाड तेथे उभे होते आणि त्याच्याच बाजूला एक रान-सफरचंदाचे झाड वाढत होते. ते मोठे सफरचंदाचे झाड आमच्या आज्या-पणज्यानी लावले होते. त्याच्या अर्ध्याअधिक फांद्या सुकून गेल्या होत्या. फक्त काही फांद्या हिरव्या होत्या आणि त्यांच्यावर गोल, रसाळ फळे लटकत होती. दोन वर्षानी हे जुने सफरचंदाचे झाड तोडून टाकावे लागणार होते. पण त्या दुसऱ्या रोपाच्या नाजूक डेरवावर एक कोमल धुमारा हिरवा बनत होता. जुन्या सफरचंदाच्या झाडाच्या डोळ्याचे विद्यार्थ्यानी त्यावर कलम केले होते. कालप्रवाहाबरोबर त्या डोळ्याचे एक झाड बनणार होते, ते बहरणार होते आणि सोनेरी फळानी ते डंवरणार होते.

"सभोवताली अगदी काळजीपूर्वक पहा मुलानो—सर्वकाळ त्याच स्थितीत राहिलेले असे एक तरी रोप दिसते का तुम्हाला?"

मुलांचा जीवनानुभव फारसा मोठा नव्हता; परठय अगदी लहान वया-पासून ती श्रमाच्या आणि निसर्गाच्या जगात रहात होती आणि रोपे वाढतात, बहरतात आणि त्याना फळे येतात हे त्याना ठाऊक होते... जमिनीतून नाजूक कोंब कसे बाहेर येतात, त्यांचे रोपाच्या जाड देठात रूपांतर कसे होते, फांद्याना बारीक बारीक कळे कसे फुटतात आणि पाने कशी दिसू लागतात यांचे त्यानी वर्णन केले... चरसृष्टीत घडणाऱ्या जलद, झेपावत्या बदलांचा मुलाना मोठा विस्मय वाटला. आदल्या दिवशी आम्ही पीचच्या बागेत होतो; तेथे उघड्या फांद्या आणि फांद्यांवर प्रकट झालेले काळे कळे आम्ही पाहिले होते. आज अगदी भल्या सकाळी आम्ही तेथे गेलो आणि आमच्यासमोर एक नवे दृश्य उमटले होते: फांद्यांवर छोटी छोटी गुलाबी रंगाची फुले उमलत होती... इतक्या लवकर—एका रात्रीत—कळे कसे उमलले आणि झाडे बहरली कशी? ती रात्री झोपली होती का नाही? एकूणच झाडे झोपतात की नाही? फांद्या तोडताना झाडाना वेदना होतात का? झाडे जीर्ण का होतात आणि मरतात का? या प्रश्नांची उत्तरे शोधून काढण्यासाठी मला फार काळ विचार करावा लागला. पण त्या उत्तरांतून प्रश्नांचा नवा ओघ निर्माण झाला.

तळ्याच्या काठी बसून, घळीत बसून, दाट झुडुपांत बसून आणि शेतांत बसून आम्ही 'निसर्गग्रंथा'चे हे प्रकरण वाचले. उथळ पाणथळीत बेडकांची छोटी छोटी पिले पोहोत होती. पुढे त्यांचे मोठे बेडूक बनतील हे मुलाना ठाऊक होते पण असे कसे घडते? मत्स्यालयातील अगदी

छोटयातला छोटा मासाही माशासारखाच दिसतो पण बेडकाचे पिलू अजिबात बेडकासारखे दिसत नाही हे कसे? सामुदायिक शेतकरी रेशमाच्या किडयाना खाद्य देत असताना आम्ही पाहिले. छोटे छोटे आधाशी किडे पॉपीच्या बियांप्रमाणे छोटया छोटया अंडयांतून बाहेर आले. ते किडे फक्त तुतीचीच पाने का खातात? रेशमाचे किडे आपल्या मूळ आकारापेक्षा कितीतरी पटीने मोठे होतात; जणू काही आपली जुनी कातडी ते फेकून देतात – असे का? हा किडा आपल्या भोवती रेशमाचा कोश विणतो आणि आपल्या त्या चिमुकल्या सोनेरी घरात दडून बसतो – मग आत काय घडते? आम्ही रेशमाचे अनेक कोश घेतले आणि ते खिडकीत ठेवले. काही वेळाने त्यांतून सुंदर, टपोरी फूलपाखरे बाहेर पडलेली आम्ही पाहिली. ही फूलपाखरे अंडी घालतात आणि पुन्हा त्याच क्रियेची प्रारंभापासून पुनरावृत्ती होते. हे किडे इतके नाजूक रेशमी धागे कसे बनवतात? कोश विणायला सुरुवात करण्यापूर्वी तुतीची ते इतकी पाने का खातात?

निसर्गाच्या क्रियाशील ज्ञानग्रहणाशी जितक्या अधिक क्रिया निगडित होतात तितक्या सभोवतालच्या जगातील विचारगत गोष्टी अधिक सखोलतेने व बोधपूर्णतेने दृश्यमान होतात. आपल्या भोवतालच्या ज्या घटनांकडे मुलांचे पूर्वी लक्ष गेले नव्हते त्या घटना महिन्यांगणिक त्यांच्या अधिकाधिक नजरेस येऊ लागल्या. अशा रीतीने पूर्वी जे मुलाना परिचित होते त्यांपेक्षा अगदी निराळे असे जीवनप्रकार त्याना पहायला मिळाले: काळोख्या, दमट तळघरात बटाटयावरचे सफेद डोळे त्यानी पाहिले. ती मुळे होती की पुढे वाढणाऱ्या रोपाचे देठ होते? झाडांच्या खोडावर उत्तरेकडील काळोख्या बाजूला हिरवे शेवाळ उगवले होते. सूर्यापासून ते बाजूला का लपले होते? शेवाळाना बी का नसते? ते पसरते कसे? शेवाळाव्यतिरिक्त सर्व वनस्पती फुलतात. शेवाळ ही कोणत्या प्रकारची वनस्पती आहे?

'निसर्गग्रंथा'तील काही ओळीनी मुलांची खात्री पटली की फक्त चर वस्तूच बदलतात असे नाही. आम्ही नदीच्या काठावर गेलो. तेथे असलेले करडया रंगाचे दगड मुलानी तपासले आणि त्याना पडलेल्या छोटया छोटया भेगा त्यानी पाहिल्या. दगडाचे छोटे छिलके तुटून त्यांच्या हातात आले. त्याचा अर्थ दगडही चिरकाल दगडच रहात नाहीत. "सूर्यप्रकाशात काय किंवा तळघरात काय दगड सारखेच असतात" असे काही महिन्यांपूर्वी आपण म्हटल्याचे मुलाना आठवले. दिवसा दगड तापतात आणि रात्री थंड

होतात. त्याना भेगा पडतात व त्यांत पाणी झिरपते. असे दिसत होते की दगडही चिरंतन नाहीत.

"निसर्गातील प्रत्येक वस्तू बदलत असते" या विषयाला वाहिलेल्या विचारक्रियेच्या पाठांचे विश्लेषण केल्यानंतर माझी खात्री पटली की, पूर्वी मुलाच्या नजरेस न आलेल्या दैनंदिन जीवनाचे नियम मुलाच्या जेवढे अधिक निदर्शनास येतात, त्यांचा त्याला जेवढा अधिक शोध लागतो तेवढी त्याची ज्ञानाची तृष्णा अधिक वाढते, सभोवतालच्या जगातील घटनांबाबत त्याची ज्ञानेंद्रिये अधिक ग्रहणशील बनतात आणि विचारप्रक्रियेशी ती अधिक घनिष्टरित्या निगडित होतात. सोविएत मानवशास्त्रज्ञ एम्. एफ्. नेस्तुर्ख यांच्या ग्रंथांत असे एक वाक्य आहे की जे मुलाच्या बौद्धिक विकासाची प्रक्रिया समजून घेण्याच्या दृष्टीने उपयोगी पडू शकेल असे मला वाटते. ते वाक्य असे : बालपणाच्या काळात नव्या नव्या माहितीचा अनिरुद्ध ओघ मुलासमोर वहात असतो आणि नेमक्या त्याच वयात माणूस **ज्ञानाविषयीची वाढती तृष्णा** संपादन करतो.

नव्या नव्या माहितीचा ओघ ही बौद्धिक विकासाची एक सर्वात महत्त्वाची अट आहे. काही कारणामुळे हा ओघ क्षीण झाला आणि तो रुंदावता आला नाही तर काय घडते? मूल जे स्वत: पहाते तो अजून माहितीचा ओघ नसतो. सभोवतालच्या जगाचे आपले ज्ञान वडीलधारी माणसे मुलाला देतात आणि त्यांच्या विचारांच्या ताकदीमुळे मुलावर परिणाम करणारा माहितीचा ओघ हळू हळू पुष्ट बनतो; माणसाचे शिक्षण त्यातच सामावलेले असते.

मुलाच्या जन्मापासून ते शाळेत प्रवेश करीपर्यंत प्रत्येक मुलाच्या घरच्या वातावरणाचा अत्यंत काळजीपूर्वक अभ्यास करण्यास मी सुरुवात केली. त्यातून अत्यंत उद्‌बोधक असे सर्वसाधारण निष्कर्ष निघू लागले. शाळा-प्रवेशापूर्वीच्या काळात मुलाला स्वत:वरच सोडून देण्यात आले, सुरळीत मानवी परिसराचा ज्याच्याशिवाय आपण विचारही करू शकत नाही तो माहितीचा ओघ वडीलधाऱ्या माणसानी जर निर्माण केला नाही तर मुलाचा मेंदू सुस्त बनेल. अशा वेळी जिज्ञासा व कुतूहलवृत्तीचा लय होतो आणि औदासिन्याचा प्रादुर्भाव होतो. अशा परिस्थितीत असे दिसते की ज्ञानाची वाढती तृष्णा हीच मुलाचा बौद्धिक विकास प्रचंड प्रमाणात निर्धारित करणारी विचारक्रियेची महत्त्वपूर्ण ताकद बनते.

बालपणाच्या काळात पेत्रिकला स्वत:वरच सोडून देण्यात आले होते.

त्याची आई आणि आजोबा सकाळीच कामावर जात आणि हा छोटा मुलगा घरी एकटाच रहात असे. धान्यकोठाराच्या पडवीत किंवा कुंपणाने वेढलेल्या आवाराच्या हिरवळीवर त्याला सोडून देण्यात आलेले असे. मधून मधून त्यांची शेजारीण त्याची खबरबात घेऊन जाई. वयाच्या दुसऱ्या वर्षापासून पाचव्या वर्षापर्यंत पेत्रिकला अशा रीतीने "वाढविण्यात" आले. हे "उद्‌भिज्ज संगोपन होते. मुलाचे भरणपोषण चांगले होत होते, त्याला पुरेसा कपडालत्ता मिळत होता, बूट मिळत होते – पण अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीला – मानवी वातावरणाला – तो मुकला होता. वयाच्या पाचव्या वर्षापासून पेत्रिक इतर मुलांबरोबर, बव्हंशी आपल्या वयाच्या मुलांबरोबर रस्त्यावर खेळत असे. तो शाळेत आला तेव्हा मायभाषेतील अत्यंत साध्या साध्या शब्दांचाही अर्थ त्याला ठाऊक नव्हता. त्याच्या चेहऱ्यावरील अलिप्त भाव, आपल्या भोवतालच्या वस्तूंवरून निसटून जाणारी नजर हे मला एखाद्या बालवृद्धाचेच आविष्कार वाटत होते. याचा अर्थ असा होता की, विचारांची जिवंत सामुग्री, मज्जापटलातील त्याच्या पेशी सुस्त बनल्या होत्या; कारण मज्जातंतूसंस्थेच्या घडणीच्या सर्वात महत्त्वाच्या काळात, मेंदूच्या शैशवकाळात, सभोवतालच्या जगातील माहितीच्या वेगवान ओघाला ते मूल मुकले होते. म्हणूनच या छोटया मुलाच्या शिक्षणामध्ये 'निसर्ग-ग्रंथा'च्या वाचनाला फार मोठी भूमिका बजावावी लागणार होती.

...आम्ही 'निसर्गग्रंथा'च्या पुढच्या पानाकडे वळलो: "जीवनाची बीजे." शरदामध्ये, शाळेच्या फळबागेत लावण्यासाठी मुलानी पिअर, सफरचंदे, पीच आणि आलुबुखार यांच्या बिया गोळा केल्या. झाडे बियां-पासून उगवतात हे त्याना यापूर्वीच अनुभवावरून ठाऊक झाले होते. वसंता-मध्ये आणि ग्रीष्मामध्ये ज्यावेळी स्टेप प्रदेशात, जंगलात आणि वनरायांत जीवन ऐन बहराला आलेले असते तेव्हा झाडांवर बिया तयार होतात आणि त्यांतून तीच जात पुन्हा निर्माण होते. आम्ही एका सहलीला गेलो. वसंतातील वाऱ्याच्या झुळुकांमुळे कापसासारखे छोटे छोटे पुंजके पॉप्लरच्या झाडांपासून व डॅन्डेलिअनपासून अलग होत होते. त्या कापसासारख्या पुंजक्यां-मध्ये मुलाना छोटया छोटया बिया आढळून आल्या. निसर्गाने त्या बियांची किती काळजी घेतली होती हे पाहून मुले विस्मित झाली. हे पुंजके सुक्या जमिनीवर पडतात, आणि जमिनीला जरा ओलावा येताच नांगरासारखे ते जमिनीला चिकटतात आणि त्या छोटया बिया अंकुरायला लागतात. अत्यंत रस घेऊन मुले 'निसर्गग्रंथा'च्या ओळीमागून ओळी वाचीत होती.

**अनेक** झाडांतून बिया कशा "गोळीसारख्या" बाहेर पडतात आणि जीवनाची बीजे चोहीकडे कशी पसरतात, वाऱ्याबरोबर झुलणाऱ्या पॉपीच्या फुलांच्या "छोटया झरोक्यां"तून अधिक लवकर तयार झालेल्या बिया कशा बाहेर उडतात हे मुलानी पाहिले. ज्यांच्या साहाय्याने बिया माणसांच्या कपडयाना किंवा जनावरांच्या कातडयाना चिकटून रहातात ते बियांवरचे खुबीदार आकडे, नख्या आणि "वर चढणाऱ्या साखळया" आम्ही काचे-च्या भिंगातून पाहिल्या. धान्याच्या विविध जातींचे बी आम्ही जमा केले. एका छोटया बीमधून एवढे मोठे झाड कसे तयार होते यावर मुले विचार करू लागली. बिया चर आहेत की अचर? हिंवाळयामध्ये त्या प्रकरणाच्या अनेक मनोवेधक ओळी मुलानी आपल्या नजरेखालून घातल्या. काही झाडांच्या बिया बर्फावर पडतात आणि अंकुर फुटण्यापूर्वी कितीतरी आठवडे त्याना बर्फातच पडून रहावे लागते.

ज्ञान संपादन करण्याचा मुले जितका तीव्रतेने प्रयत्न करतात तेवढा आपल्या कामात मुले अधिक रस घेतात आणि कामाचे अन्वेषक स्वरूप तेवढया अधिक सखोलतेने प्रकट होते. विचार करणाऱ्या व्यक्तीला काम करणाऱ्या हाताची जेव्हा मदत मिळते, मुलाचे मन रोमांचित करणाऱ्या प्रश्नाचे उत्तर श्रमाच्या द्वारे मिळविण्याचा मूल जेव्हा प्रयत्न करते, एखादा कूटप्रश्न सोडविण्याचा जेव्हा ते प्रयत्न करते, तत्कालापुरते गृहीततत्त्व असलेले सत्य निश्चित करण्याचा जेव्हा ते प्रयत्न करते तेव्हा सभोवतालच्या जगातील माहितीचा ओघ ही ज्ञान संपादन करण्याच्या दृष्टीने खास अशी एक शक्तिशाली प्रेरणा बनते. काम करणारे मूल ही एक खरीखुरी विचार करणारी व्यक्ती बनते ती सक्तीतून नव्हे तर अत्यंत प्रामाणिक अशा इच्छेतून. काम करण्याच्या मुलाच्या इच्छेचा उगम हा प्रथमतः **अन्वेषणाच्या इच्छेतून** प्रकट होतो. या इच्छेचा विकास केला तर श्रमामध्ये मुलाला वाटणाऱ्या स्वारस्याला अधिक बळकटी येते. शिक्षणसिद्धांतामध्ये ज्याला श्रमविषयक प्रेम म्हणतात ते कुतूहल, जिज्ञासा आणि मानवी प्रतिष्ठेच्या जोडीनेच मुलामध्ये प्रकट होते.

"सूर्य – जीवनाचा मूलस्रोत" हे 'निसर्गग्रंथा'चे एक अत्यंत रोमांचकारक पान होते आणि त्याच्या वाचनाला वाहिलेल्या "सफरी"नी मुलांच्या जाणिवेवर व भावनिक स्मृतिपटलावर फार खोल ठसे उमटविले. सूर्यप्रकाशाने लखलखणाऱ्या ग्रीष्मातल्या एके दिवशी आम्ही शेतावर, बागेत व द्राक्षांच्या एका मळयात गेलो. गव्हाची व सूर्यफुलांची शेते, द्राक्षांचे घड, सोनेरी

पिअर आणि तयार होत चाललेले टोमॅटो आमच्यासमोर दिसत होते. सुपीक भूमीच्या या देणग्यांमध्ये सूर्याचा प्रकाश आणि ऊब मुलाना दृग्गोचर होत होती. माणसाना आवश्यक असलेल्या सर्व गोष्टी धरतीकडून माणसाना मिळत होत्या त्या सूर्यामुळेच. अनेक निरीक्षणे, तुलना आणि कार्यकारण-भावाचे निश्चितीकरण यांच्या परिणामी निघालेल्या या निष्कर्षाचा मुलाना अतिशय विस्मय वाटला आणि त्यांच्या विचारांच्या भरारीला त्यामुळे एक नवी प्रेरणा मिळाली. आपल्या भोवतालच्या जगाचे मुलानी अगदी जवळून समीक्षण केले, या सर्व वस्तुमात्राची उत्पत्ती कशी होते याविषयीचे विचार त्यांच्या मनात फेर धरू लागले. आणि सूर्य हाच जीवनाचा एकमेव मूलस्रोत आहे याची जेव्हा त्याना खात्री पटली तेव्हा त्यांची विस्मयवृत्ती अधिकच सखोल बनली.

गहू असोत, बटाटे असोत, सूर्यफुले असोत कोणतीही गोष्ट सूर्याशिवाय अस्तित्वात राहू शकणार नाही. तीच गत मांस, दूध आणि लोण्याचीही आहे; कारण धरतीपासून निर्माण झालेल्या वनस्पती खाऊनच जनावरे जगतात आणि या वनस्पती वाढतात त्या सूर्याच्या प्रकाशामुळे आणि ऊबेमुळेच. या विस्मयातूनच मुलांचे पुढील प्रश्न निर्माण झाले: "सूर्य म्हणजे काय? तो आपल्याला जी ऊब देतो ती त्याच्याजवळ कुठून येते? हिंवाळयात धरतीला सूर्याची ऊब इतकी कमी का मिळते? सूर्य जळून गेला तर काय होईल?"

'निसर्गग्रंथा'च्या वाचनाच्या काळात जे प्रश्न निर्माण झाले ते प्रश्न म्हणजे उच्चतर ज्ञानाच्या दिशेने मारलेल्या विचारांच्या भरारींचा प्रारंभ होता आणि त्या ज्ञानाच्या जोरावरच काही वर्षांच्या काळात मुले जीवनाची जटिल गूढे शोधून काढणार होती. शिक्षकानी पदरात टाकलेला एक तयार निष्कर्ष म्हणून सत्य मुलांसमोर उभे राहू नये तर बेफामपणे धडधडत्या काळजाने अनुभवलेले भोवतालच्या जगाचे एक सुस्पष्ट चित्र म्हणून त्याना ते प्रतीत व्हावे या हेतूने मुलानी जिज्ञासू अन्वेषक आणि संशोधक बनावे असा मी प्रयत्न केला. शोधाने मुलाचे मन जर रोमांचित झाले तर सत्यावर त्याचा व्यक्तिगत दृढविश्वास बसतो आणि ते सत्य ते मूल जन्मभर उरी बाळगते. बौद्धिक भावना, ज्ञानाचा आनंदानुभव, निसर्गाची महानता आणि त्याच्या नियमांचा नेटकेपणा पाहून वाटणारे आश्चर्य हे भक्कम स्मरणशक्तीचे उगमस्थान आहे.

बौद्धिक भावना ही काही मुलांच्या स्मरणशक्तीचा विकास घडवून आणण्याची आणि ती अधिक बळकट करण्याची मुख्य पद्धत आहे असे मला

दिसून आले. वाल्याची स्मरणशक्ती अतिशय क्षीण होती. तिच्या बाबतीत एका कानाने ऐकलेली गोष्ट दुसऱ्या कानाने निघून जात असे. सभोवतालच्या जगातील विविध दृश्ये पाहून विस्मयाने त्या छोटया बालिकेचे काळीज धडधडावे असा मला प्रयत्न करावा लागला. "प्रत्येक चर वस्तू स्वतःला आपल्या परिसराशी जुळवून घेते" हे 'निसर्गग्रंथा'चे पान वाचण्यासाठी कित्येक दिवस आम्ही शेतातून, जंगलातून, नदीच्या काठावर, बागेतून आणि मधुमक्षिकापालनकेंद्रातून फेरफटके काढीत होतो. उन्ह तापलेले असताना काही फुले आपल्या पाकळ्या मिटून घेतात आणि संध्याकाळच्या शीतल वेळी पुन्हा उघडतात याकडे मी मुलांचे लक्ष वेधले. स्नोड्रॉपचा नाजूक देठ जमिनीवर पडलेल्या पाचोळयाच्या जाड थरातून बाणासारखा घुसून कसा वर येतो, मधमाश्या पोळी कशी तयार करतात आणि त्या मोहोळात मध कशी भरतात, द्राक्षवेलीची मुळे ओलावा शोषून घेण्यासाठी तीन मीटर खोलवर कशी पसरतात आणि विलोवृक्षाची फांदी गाळ साचलेल्या जमिनीत कशी पडते आणि तिला मुळे फुटून तिच्यातून नवा वृक्ष कसा तयार होतो हे मुलाना मी दाखविले... या शोधांमुळे त्या छोटया बालिकेचे हृदय रोमांचक आनंदोर्मींनी भरून गेले. त्या मुलीच्या डोळयातले अलिप्ततेचे भाव लुप्त होऊन त्या जागी जिवंत व्यक्तिगत स्वारस्याचे भाव झळकू लागले. आतापर्यंत शांत रहाणारी ती वाल्या बोलू लागली आणि प्रश्न करू लागली: "पण मधमाशीला परत घरी कसे यायचे हे कसे समजते? तिचे पोळे ती कशी शोधून काढते? जमिनीवर अजून बर्फ असताना स्नोड्रॉपचे फूल उमलताना गारठत नाही का?" जेथे प्रश्न असतात तेथे विचार असतात आणि जेथे विचार असतात तेथे स्मृती सभोवतालच्या जगातील दृश्ये आणि निसर्गाचे नियम जतन करून ठेवीत असते.

'निसर्गग्रंथा'ची एकामागून एक आम्ही जी पाने वाचली त्यांची नावे अशी होती: "वनस्पतीविश्व आणि प्राणीविश्व", "जलबिंदूचा प्रवास", "माणूस निसर्गशक्तींचा उपयोग करतो", "निसर्गाला वसंतात जाग येते", "ग्रीष्मातील सर्वात मोठे दिवस", "रानातील, शेतातील आणि कुरणातील वासंतिक फुले", "ग्रीष्मातील फुले", "लिली-ऑफ-द-व्हॅली आणि व्हायोलेटची फुले", "क्रिसॅन्थेमम – शरदाची मुले", "तलावातील जीवन", "भारतासारख्या कडक उन्हाळयाचे शेवटचे दिवस", "हिंवाळयाची प्रतीक्षा करीत असलेला निसर्ग", "हिंवाळयातील पहिली सकाळ", "हिंवाळी अरण्यातील पक्ष्यांचे जीवन", "गव्हाची कणसे", "मधुमक्षिका-

च्या-परिवाराचे जीवन", "पाकोळया आपली घरटी बांधतात", "जवळ येणारे मेघगर्जित वादळ", "शरदातील पावसाळी हवा", "भर हिंवाळयातील पुष्पविश्व", "रान आर्द्रता जतन करते", "करकोच्यांचे आगमन", "हिंवाळयासाठी दक्षिणेकडील प्रयाणाची पक्ष्यांची तयारी", "ग्रीष्मातील जलवृष्टीनंतरचा सूर्य", "नदीवरील इंद्रधनुष्य", "हिंवाळी आणि वासंतिक पिके", "सूर्यफुले उमलू लागली आहेत", "आकाशातील तारे", "भूमीतील जीवन", "हिरवे पान – सूर्यप्रकाशाचे कोठार", "अळंबी आणि शेवाळ", "ओकवृक्षाच्या फळापासून ओकवृक्ष कसा तयार होतो" आणि अशीच अनेक.

"निकृष्ट शिक्षक सत्ये सादर करतो, उत्कृष्ट शिक्षक ती कशी शोधून काढायची ते शिकवितो," असे दिस्तेरवेग* यानी म्हटले आहे. आपल्या काळात सभोवतालच्या जगातील घटनांकडे पहाण्याच्या चौकस दृष्टिकोनाला खास महत्त्व प्राप्त झाले आहे. माहितीचे एकत्रीकरण, पृथक्करण, आणि तुलना यांपासून शास्त्रीय सत्याची प्रतीती यावी या दृष्टीने विद्यार्थ्यांची विचारपद्धती अन्वेषणाच्या आणि संशोधनाच्या पायावर उभी असणे हे अत्यंत महत्त्वाचे होते. निसर्गातील घटनांचे व दृश्यांचे अवलोकन करताना मूल विचारांचे प्रकार व प्रक्रिया आत्मसात करते आणि आपले आकलन संपन्न बनविते; आणि या सर्व गोष्टी दक्ष नजरेने टिपून घेतलेल्या कार्यकारणभावातील खऱ्याखुऱ्या विचारावगाहनाने परिप्लुत बनतात. अनुभवातून हेच सिद्ध झाले की 'निसर्गग्रंथ' वाचीत असताना मुलांचे विचार महत्त्वपूर्ण अशा वैशिष्टयांच्या वेगळेपणाने उठून दिसत होते: अमूर्त आकलनांचा वापर करीत असताना ती आकलने ज्यांवर आधारलेली होती त्या कल्पनाना, प्रतिमाना आणि दृश्याना मुले विचारपूर्वक आवाहन करीत होती.

बालपणाच्या संपूर्ण काळात 'निसर्गग्रंथा'चे वाचन केल्यानंतर माझ्या विद्यार्थ्यांनी जेव्हा किशोरवयात पदार्पण केले आणि त्यानंतर ते जेव्हा तरुण स्त्री-पुरुष बनले तेव्हा भोवतालच्या जगाचे क्रियाशील ज्ञानग्रहण हे त्यांच्या सर्वसाधारण बौद्धिक विकासात, त्यांच्या बौद्धिक श्रमाच्या स्वरूपात आणि शैलीत आणि बहुमुखी बौद्धिक स्वारस्यांत कसे प्रतिबिंबित झाले हे

---

*एफ्. ए. दिस्तेरवेग, 'निवडक शैक्षणिक निबंध', मॉस्को, उच्पेद्गिझ प्रकाशन, १९५६, पृ. १५८ (रशियनमध्ये).

मला विशेषत्वाने जाणून घ्यावयाचे होते. माझ्या विद्यार्थ्यांच्या बौद्धिक जीवनात त्यांची महान जिज्ञासाबुद्धी विशेष उठून दिसत होती याबद्दल माझी खात्री पटली. त्यांच्या सर्व व्यवहारात भोवतालची प्रत्येक गोष्ट त्यांच्या भावनांवर व विचारांवर परिणाम करीत होती. निसर्गातील वस्तू व घटना यांचा परस्परसंबंध पहाण्याची क्षमता हा माझ्या विद्यार्थ्यांच्या पौगंडावस्थेच्या व त्यांच्या प्रारंभिक प्रौढावस्थेच्या काळातील त्यांच्या बौद्धिक जीवनाचा एक विशेष गुण होता. जे त्याना स्पष्ट झाले नव्हते किंवा ज्याचा त्याना बोध झाला नव्हता अशा प्रत्येक गोष्टीची पुस्तकावरून उकल करण्याचा त्यानी प्रयत्न केला. ग्रंथ हे त्यांच्या ज्ञानाचे स्रोत बनले आणि त्यांच्या आत्मिक जीवनालाही ते आवश्यक होते.

## वस्तुविश्वाकडून समाजाकडे. प्रत्येक गोष्ट कोठून येते?

निसर्ग हा शिक्षणाचा एक सुबत्तापूर्ण स्रोत आहे; पण निसर्गाच्या आकलनानेच मनाच्या, भावनांच्या, विविध दृष्टिकोनांच्या आणि दृढ मतांच्या घडणीला सुरुवात होते. माणूस समाजात रहातो आणि इतर लोकांबरोबर तो जे संबंध प्रस्थापित करतो त्या संबंधांच्या स्वरूपात त्याचे संपूर्ण जीवन व्यक्त होते. प्राथमिक शाळेच्या संपूर्ण चार वर्षांच्या काळात विद्यार्थ्यांना एका महत्त्वपूर्ण सत्याविषयीच्या विचाराकडे वळविण्याचा मी प्रयत्न केला: माणसाच्या भौतिक व आत्मिक गरजा भागविण्याचे काम इतर लोक करीत असतात आणि अशा शेकडो आणि हजारो लोकांमुळेच माणूस जिवंत रहातो. शेकडो-हजारो लोकांसाठी भौतिक व आत्मिक मूल्ये निर्माण केल्याशिवाय समाजात रहाणे अशक्य आहे. कार्यात आणि समाजांतर्गत परस्पर संबंधांच्या प्रक्रियेत माणसाची आत्मिक मूल्ये, जीवनाकडे पहाण्याची दृष्टी आणि जागतिक दृष्टिकोन यांच्या समवेतच माणसाच्या नैतिक चेहेऱ्याची घडण होत असते. भौतिक आणि आत्मिक सृष्टतेच्या निर्मितीतून आपल्या समाजात व्यक्तिगत परस्पर संबंध निर्माण होत असतात व तोच नागरिकाचा सामाजिक चेहेरा असतो याचे मुलाना आकलन व जाणीव करून देणे हे शिक्षकाचे एक महत्त्वाचे शैक्षणिक कार्य आहे.

वस्तूंविषयीच्या आकलनाच्या मार्गे, या सर्व वस्तू कोठून येतात

याविषयीच्या प्रकटीकरणाच्या मार्गे मुलाला सामाजिक संबंधांचे आकलन घडून येत असते अशी अनुभवावरून माझी खात्री पटली आहे.

शाळेच्या भोजनगृहात आम्ही आमचे दुपारचे जेवण घेतले आणि बश्या विसळल्या. थांबा मुलानो, भोजनगृहातून बाहेर जाऊ नका; अर्धा तास आपण जरा या टेबलाशीच बसू या असे मी मुलाना सांगितले. आपण ज्यांचा आज उपयोग केला त्या सर्व गोष्टी कोठून आल्या याचा आपण विचार करू या. लोकानी या सर्व वस्तू आपल्याला कोठून दिल्या? मुलानी जे खाल्ले होते त्याची त्यानी उजळणी केली: पाव, मांस, बटाटे, दूध, लोणी, अंडी... अलिकडेच नव्या विटानी बांधून काढलेल्या चुल्यावर ते अन्न शिजविले होते. खाणीतून आलेला कोळसा त्या चुल्यात जळत होता. ज्या खुर्च्यांवर व टेबलांवर मुले बसली होती त्या खुर्च्या व टेबले धातूची आणि प्लास्टिकची बनवली होती...

"संपलं सगळं सांगून?" मी विचारले.

"होय", मुले म्हणाली.

"नीट पहा. तुमच्या नजरेतून सुटलेले अजून काहीतरी आहे..."

कोपऱ्यात एक शीतपेटिका होती. ती विजेशिवाय चालू शकली नसती. भिंतीवर काही विजेचे दिवे होते. मुलांच्या या गोष्टी नजरेस येतील की नाही याविषयी मला शंका होती.

या गोष्टी त्यांच्या नजरेस आल्या. वीज नसेल तर घरात रहाणे किंवा शाळेत अभ्यास करणे कठीण जाईल याचा त्याना बोध झाला व त्याना विस्मय वाटला.

ज्यांच्याशिवाय आपल्याला जगता येणार नाही त्या या सर्व गोष्टी कोठून आल्या?

सामाजिक उत्पादनक्षेत्रातील आणि श्रमसंबंधांच्या गुंतागुंतीच्या जगातील आमच्या "सफरी" त्या प्रश्नाने सुरू झाल्या. आमच्या प्रत्येक पावलागणिक आम्हाला नवे शोध लागत होते. आपल्या टेबलापर्यंत पाव पोहोचविण्यासाठी जवळ जवळ आपल्या सर्व पालकांचे श्रम आवश्यक आहेत हे सत्य शोधून काढताना श्रमजीवी जनतेबद्दलच्या थोर आदरभावनेचा अशा रीतीने मुलानी अनुभव घेतला. पण सर्वच गोष्टी येथे संपत नव्हत्या. ट्रॅक्टर, नांगर आणि कापणीमळणी यंत्रे तयार करणाऱ्या लोकांचे कामही आवश्यक होते; कारण यंत्रांशिवाय पिकाची लागवड-कापणी-मळणी करता येणे शक्य नव्हते. खाणका-

मगारांचे श्रमही त्यासाठी आवश्यक होते ; कारण यंत्रे बनविण्यासाठी आवश्यक असलेला धातू वितळविणे कोळशाशिवाय अशक्य होते.

इतर गोष्टींबरोबर अधिक जवळून परिचय होत असताना आम्हाला तेवढेच आश्चर्यकारक शोध लागत होते. खाणीच्या पोटातला कोळसा आमच्या शाळेच्या स्वयंपाकघरापर्यंत येऊन पोहोचावा म्हणून आमच्या मायभूमीतल्या जवळच्या-दूरच्या शहरांतल्या व खेडयांतल्या अगदी विविध पेशांच्या शेकडो लोकांचे श्रम खर्ची पडत होते. आमची टेबले बनविण्यासाठी धातू वितळ-विण्याच्या कामात, वाळू आणि चिकणमातीपासून विटा बनविण्याच्या कामात शेकडो लोकांचे श्रम कारणी लागत होते.

नंतर त्याच पद्धतीने सामाजिक उत्पादनाच्या क्षेत्रात, श्रमक्षेत्रातील परस्पर संबंधांच्या जगात आम्ही आमचे पहिले पाऊल टाकले आणि आमचे कपडे कोठून येतात, कागद कसा बनविला जातो, आमच्यासाठी पुस्तके व चित्रपट कोण तयार करतात आणि संगीत कोण रचतात हे आम्ही शोधून काढले. आठवडयामागून आठवडे, महिन्यामागून महिने सामाजिक संबंधांची गुंतागुंत समजावून घेण्याचा आम्ही प्रयत्न केला. वस्तुविश्वाच्या द्वारे माणसाची ओळख आम्हाला करून घ्यावयाची होती. माणसाची ओळख करून घेण्यास, त्याचे आकलन करून घेण्यास, आणि त्याची जाणीव करून घेण्यास वस्तूंची, भौतिक व आत्मिक मूल्यांची आम्हाला मदत झाली. पाव तयार करणारे भटारी स्तेपान माक्सिमोविच यांची त्यांच्या कामाच्या जागी आमची भेट झाली. मुलांच्या दृष्टीने पाव तयार करण्याचे आपले माफक काम पार पाडणारा तो एक केवळ माणूस नव्हता तर ज्याच्यामुळे शेकडो-हजारो लोक जिवंत राहू शकतात असा तो जीवनाचा एक निर्माता होता. प्रत्येक आठव-डयाला कामगाराना, शेकडो-हजारो लोकांसाठी भौतिक व आत्मिक सुसंपदेची निर्मिती करणाऱ्या त्या निर्मात्याना, कापणी-मळणी यंत्रांच्या व ट्रॅक्टरांच्या चालकाना, धातु-कारागिराना आणि टर्नरना आम्ही भेटत होतो. मुलांची तिसरी इयत्ता पूर्ण झाल्यानंतर अशाच एका वासंतिक दिवशी आम्ही क्रेमेन्चुग जलविद्युत्केंद्राला भेट दिली आणि वीज कशी निर्माण होते ते पाहिले. आम्ही विद्युत्तज्ज्ञानाही भेटलो.

ज्या कामगाराना मुले भेटली त्या कामगारांची आपल्या कामाकडे पहाण्याची दृष्टी हा मुलांचा नैतिक दृष्टिकोन घडविण्याच्या बाबतीतील एक महत्त्वाचा घटक होता. इतरांसाठी लोक ज्या गोष्टी निर्माण करतात त्या इतक्या साध्या व नित्याच्या वाटतात की पाव, मांस, दूध, साखर इत्यादी

गोष्टींसारख्या भौतिक वरदानांमध्ये खास काही उल्लेखनीय आहे असे प्रथमदर्शनी भासतच नाही. पण लोकाना स्वतःच्या श्रमाबद्दल अभिमान वाटत होता आणि समाजाची आपण बजावीत असलेली ही सेवाच आहे असेच ते समजत होते; आणि मुलानी जेव्हा हे पाहिले तेव्हा त्यांच्यावर फार मोठा प्रभाव पडला. श्रम माणसाला उच्च पातळीवर नेतात आणि माणसाला त्यामुळे संपूर्ण सुखाचा आनंद मिळतो हे सत्य म्हणजे मुलांच्या दृष्टीने केवळ एक अमूर्त कल्पना नव्हती तर त्यांच्या दृष्टीने तो जीवनाचा खरा आशय होता. समाजाच्या भल्यासाठी केलेले प्रामाणिक काम हाच आपल्या शक्ती व सृजनशील क्षमता ज्यामध्ये प्रकट होऊ शकतात असा सर्वात महत्त्वाचा जीवनपेशा आहे अशी त्यातूनच माणसाची बालपणापासून खात्री पटत असते.

## जीवनाच्या गणितग्रंथातील एक हजार उदाहरणे

माणसाला सृजनशील पद्धतीने विचार करावयास शिकविणे आणि त्याला शोधक वृत्तीचा, जिज्ञासू वृत्तीचा माणूस बनविणे हे शाळेचे एक महत्त्वाचे कार्य आहे. बालपणाची वर्षे म्हणजे विचारक्रियेची पाठशाळा असते आणि शिक्षक म्हणजे विद्यार्थ्यांच्या शरीराच्या व अंतर्विश्वाच्या घडणीची काळजी वहाणारा माणूस असतो अशी मी कल्पना केली होती. मुलाचा मेंदू हा जगाचे प्रतिबिंब उमटविणारा आरसा असतो आणि हा आरसा नेहमी संवेदनाक्षम व ग्रहणशील रहावा या दृष्टीने या मेंदूच्या विकासाची व तो अधिक शक्तिशाली बनविण्याची काळजी वहाणे हे शिक्षणतज्ज्ञाचे एक मुख्य कर्तव्य असते. शारीरिक व्यायामामुळे आणि अडचणी उल्लंघण्यासाठी केलेल्या श्रमांमुळे स्नायू जसे संवर्धित व बळकट होतात त्याचप्रमाणे मेंदूच्या घडणीसाठी व विकासासाठी प्रयत्नांची व परिश्रमांची आवश्यकता असते.

सभोवतालच्या जगातील वस्तू आणि घटना यांमधील बहुमुखी संबंधानी – कारण आणि कार्य, कालात्मक व क्रियात्मक संबंधानी – निर्धारित क्षणी पेशींची ताकद जागृत करण्याची गुंतागुंतीची अंतर्गत प्रक्रिया घडते आणि या प्रक्रियेमुळे मुलाचा मेंदू विकसित होतो व बळकट बनतो. विद्यार्थी कशावर-तरी विचार करीत असतो, शोध घेत असतो, त्याला जे समजलेले नसते त्याच्या गाभ्यापर्यंत जाण्याचा प्रयत्न करीत असतो त्यावेळी मज्जापटलातील पेशींकडून असे प्रयत्न केले जातात की ज्यांमुळे या अतिसूक्ष्म स्नायूंच्या ताकदीचे रूपांतर विचारशक्तीत होते आणि ते स्नायू कृतीच्या प्रांगणात

उतरतात. सभोवतालच्या जगातील घटनांच्या परस्पर संबंधांचे मुलाना आकलन व्हावे आणि प्रत्येक वेळी या अतिसूक्ष्म स्नायूंच्या प्रयत्नांमध्ये नवी ताकद कार्यान्वित व्हावी या दृष्टीने मुलाना मदत करणे हे मी माझे कार्य मानले. जिज्ञासू, कुशाग्र व निरीक्षक बुद्धी हे मेंदूचे सर्वात महत्त्वाचे गुणधर्म आहेत आणि मेंदूची व या त्याच्या गुणधर्मांची घडण, त्यांचे बळकटीकरण व त्यांचा विकास यांची प्रक्रिया वर निर्दिष्ट केलेल्या गुंतागुंतीच्या घटनेत सामावली आहे.

मानवी मेंदूची क्रिया ही अंतराअंतराने घडणारी अशी क्रिया आहे. सभोवतालच्या जगातील माहितीच्या प्रवाहाची चेतना प्रथम मज्जापेशींच्या एका गटात, नंतर दुसऱ्या गटात निर्माण होते. विचार क्षणार्धात एका वस्तूकडून दुसऱ्या वस्तूकडे वळतो आणि हे वळणे हा विचारप्रक्रियेतील एक महत्त्वाचा घटक आहे. विचारप्रवाह झपाट्याने बदलण्याची क्षमता ही एका पेशीगटाकडून दुसऱ्या पेशीगटाकडे होणाऱ्या विचारांच्या स्थित्यंतराला अनुरूप अशी असते. पुरेशा बौद्धिक क्षमतेची ती मुख्य पूर्वअट आहे. मूल विचार करू शकते – याचा अर्थ एका विशिष्ट कालाच्या अंतरात (उदाहरणार्थ, एका सेकंदात) त्याचे विचार एका वस्तूकडून दुसऱ्या वस्तूकडे अनेक वेळा बदलू शकतात. ही प्रक्रिया इतकी जलद घडते की विचार करणाऱ्या व्यक्ती-च्या ती लक्षातही येत नाही आणि असे वाटते की पोहोण्याच्या तलावाचे क्षेत्रफळ, विशिष्ट वेळात विषम गतीने विशिष्ट पाणी वाहून आणणारा पहिला नळ व दुसरा नळ यांचा ती व्यक्ती एकाच वेळी विचार करीत आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे विद्यार्थ्याला विविध वस्तूंचा व घटनांचा एकाच वेळी बोध होतो आणि तो त्यांचे पृथक्करण करतो व तुलना करतो. प्रत्येक मुलात या महत्त्वाच्या बौद्धिक क्षमतेचा विकास घडवून आणणे हे आपले कार्य आहे.

मेंदूची अंतर्गत शक्ती जागृत करण्याच्या व "बौद्धिक स्नायूं"च्या ताकदीच्या क्रियाशीलतेला चालना देण्याच्या दृष्टीने बुद्धीचा धारदारपणा व चापल्य वाढीला लावणाऱ्या उदाहरणांमध्ये अशा प्रकारचे परिणामकारक व्यवसाय आपल्याला आढळून येतात. सभोवतालच्या जगामधील अनेकविध गोष्टींमध्ये, वस्तूंमध्ये आणि घटनांमध्येच प्रत्यक्ष या उदाहरणांचा आढळ होतो. या परस्पर संबंधांचा गाभा शोधून काढण्याचा, सत्य कोठे आहे ते शोधून काढण्याचा मुलानी प्रयत्न करावा या दृष्टीने या ना त्या घटनेकडे मुलांचे लक्ष वेधून आतापर्यंत त्याना न उमगलेली रहस्ये त्यानी पहावीत

असा मी प्रयत्न केला. हे प्रश्न सोडविण्याची गुरुकिल्ली मानवी क्रियाशीलतेत व श्रमात सामावलेली दिसते. बौद्धिक ताकदीला ताण देणे, वस्तू आणि घटना यांमधील संबंध निश्चित करण्याचा प्रयत्न करणे यामुळे एक विशिष्ट कार्य तडीस नेणे मुलाच्या दृष्टीने प्राप्त ठरले. आपल्या भोवतालच्या जगात अशा प्रकारची हजारो उदाहरणे आहेत. लोकानीच ही उदाहरणे तयार केली आहेत आणि मनोरंजक गोष्टींच्या आणि कोडयांच्या रूपांत लोककथांच्या सृजनात्मक क्षेत्रात त्यांचा नेहमी आढळ होतो. मनोरंजनाच्या तासाला मी मुलाना सोडवायला दिलेले पहिले उदाहरण पुढीलप्रमाणे होते :

"एक लांडगा, एक शेळी आणि कोबीचा एक गड्डा तुम्हाला नदीच्या एका तीरावरून दुसऱ्या तीरावर न्यावयाचा आहे. त्या सर्वांना तुम्हाला एकाच वेळी नेता येणार नाही किंवा लांडगा व शेळी आणि शेळी व कोबीचा गड्डा तुम्हाला एकत्र सोडता येणार नाही. तुम्हाला कितीही फेऱ्या मारता येतील. पण तुम्हाला फक्त लांडगा व कोबीचा गड्डा एकत्र नेता येईल किंवा प्रत्येक वस्तू अलग अलग नेता येईल. तेव्हा काहीही विपरीत न घडता लांडगा, शेळी व कोबीचा गड्डा तुम्ही दुसऱ्या तीरावर कसा घेऊन जाल?"

लोकज्ञानाच्या क्षेत्रात अशी कोडी खच्चून भरलेली आहेत, आणि मुलाना त्यांत अतिशय गोडी वाटते. लांडगा शेळी खाणार नाही आणि शेळी कोबी खाणार नाही अशा रीतीने या तीन "उतारू"ना नदीपार कसे घेऊन जाता येईल याचा ती छोटी मुले विचार करू लागली. आम्ही तलावाच्या काठावर बसलो होतो. मुलानी वाळूमध्ये नदी काढली आणि छोटे गोटे जमा केले. प्रत्येकालाच ते कोडे सोडविता आले असते असे नाही, पण सर्व मुले अगदी कसून विचार करीत होती. बौद्धिक ताकदीचा विकास करण्याचे ते एक उत्कृष्ट साधन होते.

बुद्धिबळाच्या बाबतीत जे परिश्रम लागतात अगदी तशाच प्रकारचे परिश्रम अशा प्रकारची कोडी सोडविण्यासाठी आवश्यक असतात : पुढच्या अनेक पावलांचा तुम्हाला आधीच विचार करता आला पाहिजे. पहिली इयत्ता सुरू झाल्यानंतर लवकरच माझ्या सात वर्षांच्या मुलाना मी हे उदाहरण सोडवायला दिले. शूरा, सिऱ्योझा आणि युराने ते दहा मिनिटांत सोडविले. या मुलांच्या जलद विचार प्रवाहाने पुढे झेप घेतली आणि चिवट, तीक्ष्ण स्मरणशक्तीची त्याला जोड मिळाली. पंधरा मिनिटांत जवळ जवळ सर्व मुलानी ते कोडे सोडविले; पण वाल्या, नीना, पेत्रिक आणि स्लावा याना पुन्हा एकदा नन्नाचा पाढा मोजावा लागला. त्यांचा विचारप्रवाह एकदम

खंडित झाल्याचे मला दिसले. या समस्येमागचा विचार त्याना कळला होता, आम्ही ज्यांविषयी बोलत होतो त्या स्पष्टपणे उलगडण्यात आलेल्या दाखल्यांचा व घटनांचा त्याना बोध झाला होता; पण त्याना जाणवलेल्या पहिल्या सूचनेतून ती मुले पार होतात न होतात तोच जी कल्पना त्याना स्पष्ट झाली होती ती अंधुक बनली. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे अगदी क्षणापूर्वी त्या मुलाला जे आठवले होते ते त्याच्या स्मरणातून निघून गेले.

लोकशिक्षणकलेच्या समृद्ध भांडारातून मी अधिकाधिक कोडी उचलली. मंद गतीने विचार करणाऱ्या माझ्या या मुलाना या कोडयांच्या रचनेत आणि विषयात गोडी निर्माण होईल ही माझी पहिली आशा होती. काही दिवसानी त्याना मी पुढील समस्या सोडवायला दिली: "सैनिकांची एक छोटीशी तुकडी एका नदीवर आली. त्याना ती नदी ओलांडावयाची होती. नदीवरचा पूल निकामी झाला होता. नदीचे पाणी खोल होते. काय करावे हा त्यांच्यापुढे मोठा प्रश्न होता. इतक्यात किनाऱ्यावर एका छोटया होडीशी खेळत असलेली दोन मुले त्यांच्या अधिकाऱ्याच्या नजरेस पडली. पण ती होडी इतकी लहान होती की एका वेळी दोन मुले किंवा एक सैनिकच फक्त त्या होडीतून पलिकडे जाऊ शकले असते. सर्व सैनिकानी त्या होडीतून नदी पार केली. त्यानी ते कसे केले असावे?"

मुले कशी विचार करीत होती त्याचे मी पुन्हा अवलोकन केले. एकाच वेळी अनेक "चाली" डोक्यात ठेवण्याचा प्रयत्न करीत मुलानी पुन्हा वाळूत रेघोटया काढल्या. नीना, स्लावा आणि पेत्रिकच्या मनावर पुन्हा विफलतेची छाया उमटलेली मी पाहिली. वाल्याचे डोळे आनंदाने चमकले: तिने ते कोडे सोडविले होते.

मंद गतीने विचार करणाऱ्या या मुलाना अलग घेऊन मी कामाला सुरुवात केली. साध्या आकडयांबाबत त्यांची आकलनशक्ती अधिक सखोल व्हावी आणि आकडयांमधील अन्योन्याश्रय त्याना निश्चित करता यावा या हेतूने मी त्याना अगदी साधे लोकप्रचलित कूटप्रश्न सोडवायला दिले. अशा प्रकारचे पाच कूटप्रश्न पुढीलप्रमाणे होते:

१. "ससाणे आणि ओकवृक्ष": काही ससाणे उडता उडता ओकवृक्षांवर येऊन बसले. प्रत्येक वृक्षावर एक एक ससाणा बसला असता तर एक ससाणा बाकी राहिला असता. प्रत्येक वृक्षावर दोन दोन ससाणे बसले असते तर एक वृक्ष बाकी राहिला असता. तर तेथे एकूण किती ससाणे आणि किती ओकवृक्ष होते?

२. "माळरानावर": माळरानावर दोन मेंढपाळ मुले मेंढ्या चारीत होती. पहिल्याने दुसऱ्याला एक मेंढी दिली असती तर दोघांकडे सारख्या मेंढ्या झाल्या असत्या. दुसऱ्याने पहिल्याला एक मेंढी दिली असती तर पहिल्याकडे दुसऱ्यापेक्षा दुप्पट मेंढ्या झाल्या असत्या. तर प्रत्येक मेंढपाळाकडे किती मेंढ्या होत्या?

३. "किती कलहंस?": कलहंसांचा एक थवा आकाशातून उडत होता. त्याना दुसरा एक कलहंस भेटला." कसं काय, शत कलहंसानो!" तो म्हणाला.

"नाही, नाही, आमची संख्या शंभर नाही", कलहंसानी उत्तर दिले. "आम्ही किती आहोत हे जर तुला पहायचं असेल तर आमच्या संख्येची दुप्पट कर, त्यात आमच्या संख्येची निमपट मिळव, त्यात पुन्हा आमच्या संख्येची पावपट मिळव आणि भल्या हंसा त्यात तुझीही एक भर घाल, अन् मग आम्ही शंभर होऊ". तर त्या थव्यात किती कलहंस होते?

४. "डोकी आणि पाय": कोंबड्यांची पिले दाणे टिपीत होती आणि आवारात ससे उड्या मारीत होते. त्या सर्वांची मिळून एकूण दहा डोकी व चोवीस पाय होत होते. तर तेथे एकूण ससे किती होते आणि कोंबड्यांची पिले किती होती?

५. "किती चेंडू?": एका थैलीमध्ये दहा पिवळे, दहा लाल, पाच हिरवे आणि पाच काळे चेंडू आहेत. आता डोळे मिटा आणि त्यातील जितके कमीत कमी चेंडू उचलता येतील तेवढे उचला. पण त्याच वेळी तुमच्याकडे एकाच रंगाचे सात चेंडू असले पाहिजेत हे लक्षात ठेवा. तर तुम्ही किती चेंडू उचलले पाहिजेत?"

हे कूटप्रश्न म्हणजे बौद्धिक शिक्षणाचे एक अप्रतिम साधन होते. त्यातील प्रत्येक प्रश्न सोडविण्यासाठी मुलाना दोन ते चार "चाली" लक्षात ठेवणे भाग होते. सहा महिन्यांत वाल्याला आणि स्लावाला अशा प्रकारचे प्रश्न सोडविता येऊ लागले; पण पेत्रिक व नीनाच्या वाट्याला मात्र अजून ते यश आले नव्हते. कोणतीही गोष्ट लक्षात ठेवणे त्याना जमत नव्हते आणि अनेक "चाली" करणे स्मरणशक्तीशिवाय अशक्यप्राय आहे.

या गोष्टीचे स्पष्टीकरण कसे देता येईल? क्षणकालात आपले विचार एका वस्तूकडून दुसऱ्या वस्तूकडे वळविण्याची क्षमता काही मुलांकडे नव्हती ही गोष्ट अगदी उघड आहे. प्रश्नाचे सर्व घटक एकाच वेळी त्यांच्या स्मरणात रहात नव्हते व त्यांच्या आकलनाच्या कक्षेत येत नव्हते. त्यांच्या

मज्जापेशींत ती क्षमता का तयार झाली नव्हती हा वेगळा प्रश्न आहे. उपजत क्षमतेचा अभाव हे केवळ त्याचे स्पष्टीकरण होऊ शकत नाही; पण ती गोष्टही सर्वथैव बाद ठरविता येत नाही. विचारप्रवाह एकाएकी खंडित झाला आणि त्याच क्षणाला जे त्या घडीला अस्तित्वात आहे आणि जे काही क्षणांपूर्वी अस्तित्वात होते त्यावर मुलाला आपली बौद्धिक नजर फिरवता आली नाही तर त्याला विचार करता येणार नाही; अशा परिस्थितीत अनेक विविध वस्तू आणि घटना यांमधील संबंध मुलाला निश्चित करता येणे कठीण जाईल असे निरीक्षणातून दिसून आले आहे.

काही खास सैद्धांतिक उद्दिष्टे साध्य करण्याच्या दृष्टीने नव्हे तर मुलांचे बौद्धिक श्रम सुकर करण्याच्या दृष्टीने—त्याना अभ्यास करण्यास शिकविण्याच्या दृष्टीने मुलांच्या विचारक्रियेचा, विशेषतः वाल्या, पेत्रिक आणि नीना यांसारख्या मंद गतीने विचार करणाऱ्या मुलांचा मी अभ्यास केला. एका पाठोपाठ उभ्या असलेल्या वस्तू, घटना आणि घडामोडींचे विचार मनात ठेवण्यास आणि त्यांच्यामधील संबंधांची उकल करण्यास आपण प्रथमतः मुलांस शिकविले पाहिजे हे निरीक्षणातून सिद्ध झाले आहे. वस्तूचा गाभा आणि वस्तूची नियमितता यांचे परीक्षण अधिक सखोल करून आपल्यापासून दूर असलेल्या वस्तुमालिकेपर्यंत या परीक्षणाची कक्षा मुलाने हळू हळू विस्तारीत नेली पाहिजे. उदाहरणार्थ, एखाद्या प्रश्नाची उकल करण्याची अक्षमता हा अमूर्त रूपात विचार करण्याच्या अक्षमतेचा, मूर्तापासून बाजूला जाण्याच्या अक्षमतेचा परिपाक असतो अशी माझी तर अधिकच खात्री पटली आहे. अमूर्त कल्पनांच्या रूपात मुलाना विचार करावयास शिकविले पाहिजे. आपल्या कल्पनाशक्तीत वाल्याने लांडग्याचे मूर्त चित्र रेखाटता कामा नये. शेळी कोबीपर्यंत कशी जाते येथेच तिची विचारक्रिया थांबता कामा नये. मुलाच्या बाबतीत या सर्व प्रतिमा अमूर्त कल्पना बनल्या पाहिजेत. पण मूर्ताचे सखोल आकलन हाच अमूर्ताकडे जाण्याचा मार्ग आहे. मूल जेव्हा विचार करते तेव्हा त्याच्या डोक्यात काय चाललेले असते याची आपण कल्पना केली पाहिजे. विचार करण्याच्या क्षमतेची शिकवणच दिली गेली पाहिजे; नाहीतर मुले आपल्या स्मरणशक्तीला नाहक ताण देतील आणि घोकंपट्टी करतील व त्यामुळे त्यांचे विचार अधिकच सुस्त बनतील. माझ्या विद्यार्थ्यांच्या डोक्यात काय चालले असावे याची कल्पना करण्याचा मी प्रयत्न केला. कदाचित ते फक्त एक रेखाटण असेल; पण माझी खात्री आहे की, काही प्रमाणात, विचारक्रियेचे चित्र त्यात अचूकरित्या उमटले आहे. मुलाचे विचार जेव्हा

एका कल्पनेकडून दुसऱ्या कल्पनेकडे वळतात तेव्हा मज्जापेशींचा एक नवा गट क्रियाप्रवण होतो. या प्रक्रियेत निर्माण होणारे नवे चेतनाकेंद्र आणि हे चेतनाकेंद्र निर्माण होण्यापूर्वी प्रतिमा आणि बोधन यांच्या प्रभावाखाली जे चेतनाकेंद्र निर्माण झालेले असते ते चेतनाकेंद्र याना जोडणारे दुवे (माहिती आणि संदेश यांचे एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे होणारे चलनवलन याच दुव्यांमार्फत होते) जेव्हा क्षीण बनत नाहीत तेव्हाच मुलाचे विचार पुढे झेपावतात: नवी कल्पना जुन्या कल्पनेला स्वत:विषयी माहिती करून देते आणि जुनी कल्पना नव्या कल्पनेला स्वत:विषयीचे स्मरण करून देते. ही अत्यंत वेगाने होणारी अदलाबदल एका क्षणात अनेक वेळा घडते. याच प्रक्रियेविषयी आपण बोलत आहोत: मूल विचार करते आणि गोष्टी नीट ध्यानात घेते. चेतनाकेंद्रांच्या दरम्यान निर्माण झालेल्या विचारप्रवाहाची दृढता जेवढी अधिक, विचारांची सखोलता जेवढी अधिक तेवढी मुलानी आपल्या तर्कबुद्धीत धारण केलेल्या वस्तू व घटनाकक्षेची व्यापकता अधिक.

या विचारप्रवाहांच्या दृढतेचा उगम, उघडच, जिवंत मेंदूच्या मूळ प्रकृतिधर्मातच, त्या माणसाच्या मेंदूत घडणाऱ्या अत्यंत नाजूक जैवरासायनिक प्रक्रियांतच दडलेला असतो, आणि शालेयपूर्व मुलांच्या निरीक्षणातून दिसून येते त्याप्रमाणे, ज्यावर मज्जातंतूसंस्थेच्या शैशवकाळात बौद्धिक क्षमतांची घडण फार मोठ्या प्रमाणावर अवलंबून असते त्या परिसराच्या स्वरूपात दडलेला असतो. विचारक्रियेच्या विविध जिवंत बेटांच्या संबंधांमधील विचार-प्रवाहाच्या दृढतेचे उगमस्थान असलेल्या या मज्जाशक्तीच्या अपुऱ्या विकासाची वाल्या, नीना व पेत्रिक यांच्या मज्जापेशीना बाधा झाली होती हे नि:संशय. अशा वेळी चैतन्यकेंद्राना जोडणारे दुवे क्षीण बनतात आणि फार झपाट्याने नष्ट होतात. अनेक प्रतिमांचा विचार मूल एकाच वेळी ग्रहण करू शकत नाही. काही सेकंदांपूर्वीच पेत्रिकला जे स्पष्ट झाले होते ते आठवण्याचा तो प्रयत्न करू लागताच उघडच त्याचा विचारप्रवाह लुप्त झाल्याचे मला दिसले.

विविध मुलांच्या विचारक्रियेच्या या वैशिष्ट्यांची कारणे विविध आहेत. बालपणाच्या प्रारंभकाळात, ज्यावेळी बोधनप्रवाह विशेष विविधरंगी व विविधांगी असतो त्यावेळी, आपल्या भोवतालच्या जगातील वस्तू व घटना यांमधील संबंधांचा त्या मुलाने फारसा विचार केला नव्हता आणि त्याच्या मेंदूतील विचारक्रियेच्या जिवंत बेटांत माहितीच्या ओघासाठी दुतर्फी संबंध विकसित झाले नव्हते हे उघडच त्याचे मुख्य कारण आहे. मुलाच्या विचार-क्रियेच्या विकासाकडे प्रौढांकडून जे दुर्लक्ष केले जाते आणि जी उदासीनवृत्ती

दाखविली जाते त्याचा हा सर्व परिपाक आहे. एखाद्या प्रौढाला त्या मुलाने प्रथमच "का?" हा प्रश्न विचारला आणि त्याला काहीच उत्तर मिळाले नसावे. दुसऱ्यांदा त्याने प्रश्न विचारला असावा आणि त्यातून काहीच निष्पन्न झाले नसावे. नेमक्या याच काळात, ज्यावेळी मेंदूतील अत्यंत नाजूक दुवे पुन:पुन्हा बळकट करावे लागतात त्यावेळी प्रौढांकडून दाखविण्यात येणाऱ्या या उदासीनवृत्तीमुळे (आणि कधी कधी "जा पाहू इथून; मला त्रास देऊ नकोस" अशा प्रकारे देण्यात येणाऱ्या तुसड्या उत्तरामुळे) हे दुवे क्षीण होतात.

सभोवतालच्या जगातील घटनांबाबत मुलांमध्ये वास करीत असलेली भावनिक प्रतिक्रियांची न्यूनता विचारक्रियेच्या या वैगुण्यपूर्ण स्वभावधर्माचे एक कारण आहे; त्यांच्या परिणामी मेंदूच्या अंत:पटलक्षेत्राकडून येणाऱ्या भावनिक चेतना क्षीण बनतात.

अभ्यासाचा प्रत्येक महिना जसजसा उलटत होता तसतसे शालेयपूर्व मुलांच्या पालकानाही शिक्षण देण्याचे महत्त्व मला अधिकाधिक पटत चालले होते. मुलाने शाळेत प्रवेश करण्यापूर्वी, मूल अजूनही जेव्हा आपल्या आई-वडिलांबरोबर घरी असते तेव्हा पालकाना शिक्षणाविषयी पुष्कळ काही सांगणे आवश्यक असते. शालेय मुलांच्या भावी पिढ्यांची नीट तरतूद करण्यासाठी ज्याना दोन ते सहा वर्षे वयाची मुले होती अशा पालकांसाठी आम्ही एक पाठशाळा निर्माण केली. आम्ही त्यासाठी अभ्यासाचा एक कार्यक्रम तयार केला; मुलाच्या शारीरिक, मानसिक, बौद्धिक, नैतिक आणि सौंदर्यात्मक विकासाचे प्रश्न आणि भावी विद्यार्थ्याना विचार करण्यास शिकविण्याचे काम पालक कसे पार पाडू शकतील यासंबंधीच्या प्रश्नांचा त्या कार्यक्रमात अंतर्भाव होता. आता या पाठशाळेला कायम स्वरूप प्राप्त झाले आहे.

शालेयपूर्व काळात – ज्या काळात आई-वडील हे मुलाचे एकमेव शिक्षक असतात त्या काळात – शिक्षणविषयक ज्ञान हे विशेष महत्त्वाचे असते. दोन ते सहा वयाच्या मुलाचे आत्मिक जीवन हे आईवडिलाना असलेल्या या प्राथमिक ज्ञानावर फार मोठ्या प्रमाणावर अवलंबून असते आणि विकसित होणाऱ्या माणसाच्या अत्यंत गुंतागुंतीच्या आत्मिक चलनवलनाच्या सुज्ञ आकलनातून ते व्यक्त होते. काही विशिष्ट ज्ञानाच्या आणि संवयींच्या द्वारे पालकाना सुसज्ज बनविण्याचा आम्ही प्रयत्न केला. पालक-पाठशाळेत, मुलाला विचार करण्यास कसे शिकवावे आणि कोणत्या मार्गाने त्याच्या बौद्धिक क्षमतांचा विकास घडवून आणावा या प्रश्नावर आम्ही पुष्कळ वेळ खर्च

केला. अनेक वर्षांच्या अनुभवातून निष्पन्न झालेले सभोवतालच्या जगाविषयीचे एक हजार प्रश्न आम्ही पायाभूत धरले. अनेक वेळा हे प्रश्न मुले आपल्या पालकाना विचारीत असतात. मुलाची जिज्ञासाबुद्धी व कुतूहल वाढीस लावण्याच्या दृष्टीने लहान मुलांच्या प्रश्नाला कसे उत्तर द्यावयाचे ते आम्ही पालकाना स्पष्ट केले. शालेयपूर्व मुलांसाठी निसर्गाच्या फेरफटक्यांचा एक कार्यक्रम आम्ही पालकांसमवेत तयार केला आणि मुलानी कोणत्या वस्तूंचे निरीक्षण केले पाहिजे ते निश्चित केले. शालेयपूर्व मुले असलेल्या प्रत्येक कुटुंबामध्ये ग्रंथविषयक आदरभावनेचे वातावरण पसरलेले असले पाहिजे या गोष्टीकडे आम्ही खास लक्ष दिले.

बौद्धिक शिक्षणात अडचणी निर्माण करण्यास काही आनुवंशिक घटकही कारणीभूत होतात अशी माझी अनेक वर्षांच्या निरीक्षणातून खात्री पटली आहे. पालकांमधील मद्यपानव्यसन हा मुलाच्या संपूर्ण शरीराला ग्रासणारा एक भयानक शत्रू आहे आणि मुलाच्या मेंदूला तर त्यामुळे विशेषच हानी पोहोचते.

मेंदूचा व्यायाम म्हणून प्रश्न किंवा उदाहरणे सोडविण्यासाठी ज्या ज्या वेळी अनुकूल असे वातावरण निर्माण केले जात असे त्या त्या वेळी मंद गतीने विचार करणाऱ्या आणि कोणतीही गोष्ट आठवणीत ठेवणे ज्याना कठीण जात असे अशा मुलाना मी अधिक जवळ करीत असे. सभोवतालच्या जगातील प्रतिबिंबे आणि प्रतिमा याना जोडणाऱ्या नीनाच्या डोक्यातील विचारांच्या जिवंत बेटांमधील पहिले संबंध साध्य करण्यात अखेरीस मी यशस्वी झालो, पण तोपर्यंत अनेक कोडी आणि कूटप्रश्न मला शोधून काढावे लागले.

हिंवाळ्यातला तो दिवस मला आठवतो. आम्ही मत्स्यालयापाशी बसलो होतो. मुले मासे मोजीत होती. काहींची संख्या जास्त येत होती, काहींची कमी भरत होती. मी त्याना एक कोडे सोडवायला दिले: "भाऊ, बहीण व त्यांची आई मत्स्यालयात गेली होती. भावाला तेथे दोन मोठे व चार लहान मासे दिसले. बहिणीला दोन मोठे व तीन लहान मासे दिसले. आईला तीन मोठे व पाच लहान मासे दिसले. आईने मत्स्यालयातले सर्व मासे पाहिले होते. तर तेथे एकूण किती मासे होते?" पुष्कळशा मुलाना हा प्रश्न सोडविण्यात काहीही अडचण आली नाही. पण नीना पुष्कळ वेळ विचार करीत होती. शेवटी तिने आनंदाने टाळ्या पिटल्या: "हां, बरोबर! भावाला आणि बहिणीला सर्व मासे दिसले नव्हते; पण आईला मात्र सर्व

मासे दिसले होते. तेव्हा मत्स्यालयात तीन मोठे व पाच लहान मासे होते. ते गवतात नजरेआड लपले होते... पण आईने ते पाहिले होते." वाल्या आणि पेत्रिकने आता केवळ असलेच नव्हेत तर काही वेळा याहूनही काहीसे कठीण प्रश्न सोडवायला सुरुवात केली होती.

मुलानी जे यश मिळविले होते ते अधिक दृढतर करण्यासाठी मी त्याना अधिक कठीण प्रश्न द्यायला सुरुवात केली. तिसऱ्या इयत्तेत असताना आम्ही सामुदायिक शेतावर सफरचंदे गोळा करीत होतो. त्यावेळी नीनाने असेच एक कोडे सोडविले. ते कोडे असे होते: "तीन भाऊ कुरणात गवत कापीत होते. दुपारी एका ओकवृक्षाखाली ते विश्रांतीसाठी पडले आणि तेथेच त्याना झोप लागली. त्यांची बहीण त्यांच्यासाठी सूप, पाव व काही सफरचंदे असे दुपारचे जेवण घेऊन आली. तिने त्याना उठवले नाही; पण जेवणाची करंडी तिने तेथेच ठेवली आणि ती घरी गेली. सर्वात मोठा भाऊ जागा झाला आणि त्याने ती सफरचंदे पाहिली. त्याने त्यांचे तीन वाटे केले; पण आपल्या वाटचाची सर्व सफरचंदे त्याने खाल्ली नाहीत. आपल्या सर्वात धाकटचा लाडक्या भावासाठी त्याने आपल्या वाटचातले एक सफरचंद ठेवून दिले आणि तो पून्हा झोपी गेला. मधला भाऊ उठला; पण आपल्या मोठचा भावाने काही सफरचंदे खाल्ली आहेत हे त्याला ठाऊक नव्हते. उरलेल्या सफरचंदाचे त्याने तीन वाटे केले; पण त्यानेही आपल्या वाटचाची सर्व सफरचंदे खाल्ली नाहीत. आपल्या सर्वात धाकटचा भावाला गोड पदार्थांची आवड आहे म्हणून त्याने आपल्या वाटचातले एक सफरचंद त्याच्यासाठी ठेवून दिले आणि तो पुन्हा झोपी गेला. शेवटी सर्वात धाकटा भाऊ उठला. करंडीत त्याने सात सफरचंदे पाहिली. त्यांचे तीन वाटे कसे करावयाचे हे त्याला कळेना. त्याने पुष्कळ विचार केला पण त्याला काहीच ठरविता येईना. नंतर बाकीचे ते दोघे भाऊ जागे झाले आणि गोष्टींचा त्यानी खुलासा केला. तर बहिणीने तिच्या भावांसाठी किती सफरचंदे आणली होती?"

अंकगणिताची आमची अनेक उदाहरणे कामाशी संबंधित होती. या विषयाचा मुलाना चांगला परिचय होता. हे प्रश्न सोडविताना आपली वडीलधारी माणसे जमीन कशी नांगरतात, बी-बियाणे कसे साफ करतात, झाडे कशी लावतात, त्याना खत कसे घालतात, पिके कशी गोळा करतात, किराणा माल कसा साठवून ठेवतात, घरे कशी बांधतात आणि रस्ते कसे दुरुस्त करतात यांचे मुले पुन:पुन्हा निरीक्षण करीत होती. मनावर उमटलेल्या ठशांमधील संबंध प्रत्यक्ष जीवनात प्रस्थापित झाल्यामुळे त्या संबंधाना अधिक

बळकटी आली. एका अविभाज्य एकत्वरूपात विचार आणि स्मरणशक्ती यांचा विकास झाला. बहुतेक प्रश्न सोडविताना मुले चित्रकलेचा आधार घेत किंवा ज्यांविषयी चर्चा चालू असेल त्या उदाहरणांची रचनात्मक आकृती तयार करीत. तिसऱ्या इयत्तेच्या उत्तरार्धात मुलानी भित्तीपत्रे काढावयास सुरुवात केली ; या भित्तीपत्रांमध्ये मुले कोडी, कूटप्रश्न आणि बुद्धीला चकविणारे प्रश्न अशी सदरे देत असत. प्रश्न सोडविण्याच्या या उपक्रमाला चिकाटी, दीर्घोद्योग आणि कठोर परिश्रम यांच्या एका मौलिक प्रकारच्या स्पर्धेचे स्वरूप प्राप्त झाले. तिसऱ्या इयत्तेत असताना आम्ही आमचे पहिले गणितशास्त्रीय ऑलिम्पिक भरविले. तेथे काही कमी कठीण, काही अधिक कठीण असे प्रश्न मुलाना देण्यात येत असत ; निदान त्यातले काही प्रश्न सोडविण्यात प्रत्येक मुलाला यश येईल हा त्यामागचा हेतू होता. हळू हळू इतर प्राथमिक वर्गांचेही लक्ष या गणितशास्त्रीय ऑलिम्पिक्सनी वेधून घेतले आणि अशा प्रकारची ऑलिम्पिक्स संपूर्ण शाळाभर सुरू झाली.

"आपल्या भोवतालच्या जगाच्या गणितग्रंथा" तील उदाहरणे सोडविताना मुलांच्या विचाराना जागृती प्राप्त झाली आणि ती विचार करण्यास शिकली. मुलाना विचार करण्यास शिकविले गेले नसेल, विचारप्रक्रियेमुळे त्यांच्या मेंदूला बळकटी आली नसेल तर गणितविषयात काय किंवा इतर विषयात काय त्याना उत्तम ज्ञान आहे असे आपल्याला म्हणता येणार नाही.

"अंकगणिताच्या सर्व व्याख्या आणि नियम बाजूला ठेवा, पण जितक्या क्रिया पार पाडता येतील तितक्या पार पाडण्याची स्वतःवर सक्ती करा ; आणि एखादी गोष्ट सुधारताना ती नियमानुसार नव्हती म्हणून सुधारू नका तर तिच्या पाठीमागे विचार नव्हता म्हणून ती सुधारा", * असा लेव तोलस्तोय यानी सल्ला दिला आहे. प्रथमदर्शनी असे वाटण्याची शक्यता आहे की या सल्ल्यात सैद्धांतिक सर्वसाधारणीकरण, व्याख्या आणि नियम बाद ठरविण्यात आले आहेत. पण ते तसे नाही. गोष्ट अगदी उलट आहे. व्याख्यांच्या व नियमांच्या मूळ आशयाची विद्यार्थ्यानी उकल करावी आणि एखाद्या प्रकारची अबोध सत्यता म्हणून नव्हे तर नियमांतर्गत वस्तूच्या मूळ प्रकृतिधर्मातूनच उद्भवणारी एक गोष्ट म्हणून सर्वसाधारणीकरणाकडे त्यानी पहावे ही तोलस्तोय यांची इच्छा आहे. सत्याकडे जाण्याचा हा मार्ग जर

---

* लेव, तोलस्तोय, 'शैक्षणिक निबंध', मॉस्को, उच्पेद्‌गिझ प्रकाशन, १९५३, पृ. ३३९ (रशियनमध्ये).

शिक्षकाने स्वीकारला तर मूल स्वतःच व्याख्या "शोधून काढते". या शोधामुळे होणारा आनंद ही एक फार माठी भावनिक चेतना ठरते आणि विचार-क्रियेच्या विकासात ती फार मोठी भूमिका बजावते. तोलस्तोय यांचा सल्ला फक्त लहान मुलानाच लागू आहे हे कोणी विसरता कामा नये.

"आपल्या भोवतालच्या जगाच्या गणितग्रंथा"तील प्रश्न सोडविणे हे गणितामध्ये अधिक मोठ्या प्रमाणात यश मिळविण्याचे एकमेव साधन आहे असे समजता कामा नये. विचारक्रिया विकसित करण्याची त्यामध्ये क्षमता असली तरी त्याची भूमिका ही साहाय्यक स्वरूपाची आहे आणि पाठांच्या काळातील शैक्षणिक प्रक्रियेच्या गरजांशी तुलना करता त्याचे स्थान दुय्यम आहे. बौद्धिक, नैतिक, सौंदर्यात्मक आणि व्यावसायिक शिक्षणाच्या पद्धतीं-च्या व साधनांच्या एकूण संकुलातच ते साधन परिणामकारक ठरते. अलंकारिक भाषेत बोलावयाचे झाल्यास प्राथमिक शाळेच्या मुख्य उद्दिष्टाच्या सिद्धीकडे जाणारा एक पूल या दृष्टीनेच मी त्याच्याकडे पहातो आणि सखोल ज्ञान व व्यावहारिक प्राविण्ये यांची एक भक्कम रूपरेषा मुलांसमोर उभी करणे हेच ते मुख्य उद्दिष्ट होय. गणिताच्या अभ्यासात गरजा व उद्दिष्टे यांचा अचूक काटेकोरपणा आणि निश्चितपणा या गोष्टी विशेष महत्त्वाची भूमिका बजावीत असतात. विद्यार्थ्यांना निश्चितपणे सांगोपांगरित्या काय ठाऊक असले पाहिजे आणि त्यानी काय स्मरणात ठेवले पाहिजे हे दर शालेय वर्षाला मी निश्चित करीत असे. पूर्णांकांच्या तत्त्वांचे ज्ञान हा गणितशास्त्रीय ज्ञानाचा मूलाधार असून त्यावरच पुढील गणितशास्त्रीय शिक्षणाचा भक्कमपणा अवलंबून असतो. मी असा एक बिंदू गाठण्याचा प्रयत्न केला की अगदी पहि-ल्या इयत्तेतच विचारासाठी न थांबता शंभर संख्येपर्यंतच्या बेरजा-वजाबाक्यांशी संबंधित असलेल्या कोणत्याही प्रश्नाचे प्रत्येक विद्यार्थ्याला झटकन उत्तर देता येऊ लागले होते. हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी संख्या-रचनेच्या विश्लेषणाबाबत विविध व्यवसायांची एक जुळणी तयार करण्यात आली. पाढे नीट ठाऊक असल्याशिवाय प्राथमिक इयत्तांतील किंवा पुढील काळातीलही सृजनशील कार्याची मी कल्पनाच करू शकत नाही. ज्ञानाची आवश्यक क्षेत्रे लक्षात ठेवणे हे सृजनशील विचारक्रियेचे एक महत्त्वाचे साधन आहे.

दुबळ्या स्मरणशक्तीच्या मुलाला विचार करणे किंवा कल्पनाशक्ती लढविणे कठीण जाते. सत्यांविषयीचे आणि सर्वसाधरणीकरणाविषयीचे मुलांचे आकलन अधिक समृद्ध व्हावे आणि त्यांच्या विचारक्रियेला सुसज्जता आणण्या-च्या दृष्टीने त्याचा नेहमीच उपयोग व्हावा म्हणून मुलांची स्मरणशक्ती अधिक

बळकट कशी होईल व तिचा विकास कसा होईल याचा मी फार पूर्वीपासून विचार करीत होतो. "अंकगणित-मंजुषा" हे स्मरणशक्तीचा विकास करण्याचे एक साधन होते. हे एक दृक्साधन होते आणि त्याच्या मदतीने मुले आपल्या अंकगणिताच्या ज्ञानाची चाचणी घेत असत. मुलानी स्वतःच बनविलेल्या गणिती चौरसांच्या साहाय्याने त्यांवर अंकमोजणी केली जात असे. त्या चौरसाच्या बाजू लाकडी ठोकळयांच्या बनविल्या होत्या आणि त्यांवर लिहिलेल्या आकडयांतून सर्व बाजूनी समान संख्येने बेरीज येत असे. या "अंकगणित-मंजुषे" मध्ये पाढयांच्या उजळणीसाठी खास उदाहरणे तयार करण्यात आली होती.

अंकगणित "इलेक्ट्रिना" हे स्मरणशक्ती विकसित व बळकट करण्याचे एक उत्कृष्ट साधन होते. हे उपकरण विद्युत्प्रवाहमंडलावर चालत असे. प्रत्येक विद्यार्थी या उपकरणावर पाढयांची उजळणी करीत असे आणि अंकसंख्या ओळखीत असे. तिसऱ्या इयत्तेत आम्ही स्वतःची गणिती "इलेक्ट्रिना" उपकरणे बनवायला सुरुवात केली आणि चवथी इयत्ता पूर्ण करण्यापूर्वी आम्ही अशी चार उपकरणे बनविली. हे काम पार पाडीत असताना विद्यार्थ्यांच्या बौद्धिक विकासाच्या दृष्टीने विचारक्रिया आणि स्वतः-च्या हाताने केलेले काम यांचा संयोग किती महत्त्वाचा आहे याची मला पुन्हा एकदा खात्री पटली. दृक्साधने बनविण्याच्या कामात भाग घेतल्यामुळे अस्थिर स्मरणशक्तीच्या मुलानाही आपल्या स्मरणशक्तीला बळकटी आणता आली. (अर्थात, विचारप्रक्रियेवर प्रभाव घडवून आणणाऱ्या इतर साधनां-बरोबरच्या संयोगाच्या द्वारे त्यातून निश्चित फलश्रुती निष्पन्न झाल्या).

मुलाना विचार करण्यास शिकविण्याच्या बाबतीत बुद्धिबळाने फार मोठे स्थान प्राप्त केले होते. शूरा, गाल्या, सिऱ्योझा, युरा, वान्या, मिशा व इतर काही मुलानी आनंद विद्यालयात असल्यापासूनच बुद्धिबळे खेळण्यास सुरुवात केली होती. ही छोटी मुले-मुली अनेक वेळा बुद्धिबळाच्या पटाशी बसलेली दिसत. बुद्धिबळामुळे मुलांच्या विचारक्रियेला शिस्त आली आणि त्याना एकाग्रतेची शिकवण मिळाली. पण येथे मुख्य गोष्ट होती ती म्हणजे स्मरणशक्तीचा विकास. या बाल बुद्धिबळपटूंचे अवलोकन करताना मुले आधी काय परिस्थिती होती याची विचारपूर्वक पुनर्मांडणी कशी करीत आणि पुढील परिस्थितीचा कल्पनेने कसा वेध घेत हे मला पहायला मिळाले. वाल्या, नीना व पेत्रिकने बुद्धिबळे खेळण्यास शिकावे अशी माझी फार इच्छा होती. मी त्याना हा खेळ शिकवला आणि ती मुले आता पुढच्या चालीविषयी

विचार करू लागली. ल्यूबा आणि पावेल गणिती पद्धतीने विचार करू शकतात ही गोष्ट बुद्धिबळावरून माझ्या प्रत्ययास आली. तिसऱ्या इयत्तेत ही मुले बुद्धिबळे खेळण्यास शिकेपर्यंत त्यांच्या विचारक्रियेत काही धारदार-पणा किंवा चिवटपणा आहे हे माझ्या निदर्शनास आले नव्हते.

बुद्धिबळाशिवाय बौद्धिक क्षमतांच्या आणि स्मरणशक्तीच्या पूर्ण विकासाची कल्पना करता येणे अशक्य आहे. बौद्धिक विकासाचा एक घटक म्हणून बुद्धिबळाचा प्राथमिक शाळेच्या जीवनात प्रवेश झाला पाहिजे. येथे आपण विशेषतः प्राथमिक शाळेविषयी बोलत आहोत. आणि येथेच बौद्धिक शिक्षणाला एक विशेष स्थान असते व त्यासाठी कामाच्या खास प्रकारांची व खास पद्धतींची आवश्यकता असते.

## आमच्या जगाच्या "सफरी"

आपल्या स्वतःच्या गावातील शेते आणि रानेवने यांपासून प्राथमिक वर्गांच्या शिक्षकाने मुलाची बौद्धिक नजर आपल्या मायभूमीच्या व सर्व जगाच्या निसर्गचित्रापर्यंत आणि जीवनचित्रापर्यंत हळू हळू रुंदावत नेली पाहिजे

पृथ्वी हा सूर्याभोवती फिरणारा एक अजस्र गोल आहे आणि एकाच वेळी पृथ्वीच्या काही भागात कडक उन्हाळा असतो तर काही भागात थंडीचा कडाका असतो; काही भागात रात्र असते तर काही भागात दिवस असतो हे पहिल्या इयत्तेतच माझ्या मुलाना चांगले ठाऊक झाले होते. दुसऱ्या इयत्तेपासून आम्ही जगाच्या "**सफरी**" ना सुरुवात केली. मुले "हरित वर्गमंडपा" त बसत आणि त्यांच्यासमोर पृथ्वीचा एक मोठा कृत्रिम सूर्यप्रका-शित गोल असे. "पृथ्वी" चे सूर्याभोवती परिभ्रमण चाललेले असे आणि "चंद्र" "पृथ्वी" भोवती परिभ्रमण करीत असे. आमच्या देशाकडे बोट दाखवून मी मुलाना म्हटले, "हे पहा मुलानो, आपण येथे रहातो. ही आपली पश्चिमेकडची सरहद्द. आपण तेथून फार दूरवर रहात नाही. तेव्हा शहराना व गावाना भेटी देत, लोक कसे रहातात ते पहात आपण पूर्वेकडच्या प्रदीर्घ प्रवासाला सुरुवात करू या." मग मी त्याना शेतांविषयी व नद्यांविषयी, प्रवासाच्या मार्गावर आम्हाला दिसलेल्या लोकवस्तीच्या ठिकाणांविषयी माहिती दिली. ही माहिती देत असतानाच मी त्याना चित्रे व छोटे छोटे चित्रपट दाखवीत होतो.

आता संध्याकाळ होत होती. प्रवासाचे दोन तास कसे गेले हे आम्हाला

कळलेही नाही. आम्ही अजून शंभर किलोमीटरही प्रवास केला नव्हता. आमची "सफर" पुढे चालू होण्यासाठी मुले अत्यंत अधीरतेने थांबली होती.

...पुन्हा आम्ही शहरे, गावे, अरण्ये, नद्या, उभारणी स्थळे आणि प्राचीन स्मारके पाहिले, पण पुनःपुन्हा तेच पहात आहोत असे आम्हाला वाटले नाही. कारण आमच्या मायदेशाच्या प्रत्येक कोनाकोपऱ्यात मुलाना काहीतरी नवीन, काहीतरी मौलिक असे पहायला मिळत असे. कितीतरी दिवस आमचा हा "प्रवास" चालला होता आणि आम्ही आता वोल्गाच्या जवळ जवळ येत होतो. आम्ही येथे जलविद्युत्केंद्रे पाहिली आणि वोल्गाच्या अंगाने पसरलेल्या विस्तीर्ण स्टेप प्रदेशातल्या मेंढपाळाना भेटलो. स्तालिनग्राद-च्या महान संग्रामाची * कथा मुले अगदी श्वास रोधून ऐकत होती. मानवजा-तीचे भवितव्य या संग्रामातून ठरले. हजारो आणि लाखो वीरपुरुष प्राणप-णाने येथे पाय रोवून उभे राहिले नसते, त्या पाशवी, बलवान शत्रूचा हल्ला त्यानी परतवून लावला नसता, त्या शत्रूचे कंबरडे त्यानी मोडले नसते तर आम्ही आज या ऊबदार वर्गमंडपात बसायला शिल्लकही राहिलो नसतो. अगदी लहान वयापासून मानवजातीच्या भवितव्याविषयीच्या जोपासनेच्या व चिंतेच्या विशाल जगात आपण मुलाना घेऊन गेले पाहिजे. या पृथ्वीतलावर एक नवे, रक्तरंजित युद्ध पेटविण्याची अजूनही काही शक्ती तयारी करीत आहेत हे मुलाना जाणवले पाहिजे. मुलाच्या हृदयात शांततेच्या शत्रूबद्दल द्वेषाची भावना उफाळून उठली पाहिजे आणि ही भावना त्याच्या मनात खोलवर जाऊन रुजली पाहिजे. माणूस हा प्रारब्धाच्या भोवऱ्यातला एखादा धुळीचा कण नसून ती एक महान शक्ती आहे याची आपल्या पितामहांच्या व प्रपितामहांच्या शौर्यशाली पराक्रमातून मुलांची खात्री पटू द्या.

आपल्या मायभूमीच्या अधिक अधिक अंतर्भागात मुलानी प्रवेश केला आणि त्यांच्या नजरेसमोर नवी नवी चित्रे उलगडू लागली: अक्षय खाणींचा समृद्ध उराल प्रदेश, रहस्यमय तैगा, सैबेरियाच्या विशाल नद्या... खनिज संपत्तीचा शोध घेणाऱ्या भूगर्भशास्त्रज्ञांबरोबर "प्रवास करीत" उरालचा

---

* स्तालिनग्रादजवळ (आता वोल्गोग्राद) १९४२-४३ साली झालेली लष्करी लढाई – नाझी आक्रमकांबरोबर झालेल्या सोविएत संघाच्या महान देशाभिमानी युद्धाला आणि एकूणच दुसऱ्या जागतिक महायुद्धातील घटनाक्र-माला मिळालेल्या आमूलाग्र कलाटणीला स्तालिनग्रादजवळ सोविएत फौजानी मिळविलेल्या विजयाने सुरुवात झाली.

सुंदर पाषाणप्रदेश पहाण्यात आम्ही कितीतरी दिवस घालविले. नंतर पर्वतांचे व अरण्यांचे सौंदर्य नजरेने टिपीत, रात्रीचा शेकोटींपाशी मुक्काम करीत आम्ही बैकल सरोवराच्या अंगाने बोटीने सहल केली... आणखी पुढे जाताच सुदूर पूर्वेचा संपन्न प्रदेश मुलांच्या नजरेच्या टापूत आला... आणि नंतर सागरच सागर. सागरगामी बोटीतून आम्ही सखालीनवर गेलो आणि मग जेथे आमच्या मायभूमीला सूर्याची पहिली किरणे स्पर्श करतात त्या कुरिल बेटांवर आम्ही गेलो. आमचा "प्रवास" जवळ जवळ तीन महिने चालला होता आणि चाळीसहून अधिक राष्ट्रगटांच्या प्रतिनिधीना भेटत, धान्य-उत्पादक, उभारणीकार, खाणकामगार, मच्छिमार, आणि भूगर्भशास्त्रज्ञ यांसारख्या उत्कृष्ट लोकांचा परिचय करून घेत आम्ही दररोज १०० किलोमीटर प्रवास करीत होतो. आम्हाला जगता यावे म्हणून ही सर्व माणसे काम करीत होती. मुलांची मने अभिमानाच्या भावनेने फुलून आली: खरोखरच आपला देश किती प्रचंड, समृद्ध आणि स्नेहशील आहे.

एका पाठोपाठ एक आमच्या मायभूमीच्या आम्ही आणखी काही "सफरी" केल्या. उत्तरेला आम्ही उग्र-सुंदर तुंद्रा प्रदेशात आणि भव्य, प्रचंड आर्क्टिक महासागरावर गेलो; तेथे आम्ही साहसी व धाडसी ध्रुवप्रदेशीय संशोधकाना, रेनडियर धनगराना आणि लाकूडतोडयाना भेटलो. पश्चिमेकडे आमच्या गुत्सल बांधवांचे जीवन आम्ही समजावून घेतले. पहाडी कुरणांचे सौंदर्य आम्ही नजरेत साठवले आणि दक्षिणेकडे आम्ही कॉकेशस पर्वतांतून आणि मध्य आशियाच्या पठारांवरून "प्रवास" केला.

विविध मार्गांवर प्रवास करीत आम्ही एक वर्ष घालविले. मुलांच्या मनात "मायभूमी" हा तेजस्वी चित्रानी परिप्लुत असा एक शब्द बनला आणि सोविएत लोकांच्या शौर्यशाली कामगिरींविषयीची एक अभिमानाची भावना त्यांच्या मनात उदित झाली. आमचा कित्ता गिरवून इतर प्राथमिक वर्गांच्या शिक्षकानीही मायभूमीच्या "सफरी" सुरू केल्या. सोविएत लोकांचे महान विजय, जबरदस्त किंमत देऊन त्यानी जे प्राप्त केले होते ते आणि त्यांच्या दृष्टीने जे प्राणप्रिय बनले होते ते सर्व "मायभूमी" या शब्दाच्या अर्थातच अनुस्यूत व्हावे हाच आमचा प्रयत्न होता.

सोविएत संघराज्याच्या बांधव प्रजासत्ताकांच्या आम्ही केलेल्या "सफरी" शैक्षणिक दृष्टीने अत्यंत उद्‌बोधक होत्या. आम्ही नीपरच्या अंगाने प्रवासाला सुरुवात केली. नीपर ही रशियन, उक्रेनियन व बिलोरशियन अशा तीन बांधव जनतेची नदी आहे. या महान नदीतून जलपर्यटन करीत बांधव

जनतेची शहरे आणि खेडी, तिचा शौर्यशाली भूतकाळ आणि वर्तमानकाळ यांची आम्ही ओळख करून घेतली. स्मोलेन्स्क आणि लोएव, कीएव आणि कानेव, चेर्कास्सी आणि क्रेमेन्चुग, झपोरोझ्ये आणि कखोवका ही शहरे पहाताना गुलामगिरीच्या जोखडात अडकविणाऱ्या जुलूमशहांविरुद्ध केलेल्या लढ्यात, शोषकांपासून स्वतःचे विमोचन करण्यासाठी केलेल्या लढ्यात, यादवी युद्धाच्या व महान देशाभिमानी युद्धाच्या काळात स्वातंत्र्यासाठी आणि स्वाधीनतेसाठी केलेल्या लढ्यात जनतेने जे रक्त सांडले या रक्तसिंचनाने वज्रलेप झालेल्या महान बंधुतापूर्ण नात्यांचे या प्रत्येक शहराने मुलाना स्मरण करून दिले. नीपरच्या अंगाने "सफर" करीत असताना या महान नदीच्या सौंदर्याचे व थोरवीचे, जनतेजनतेमधील बंधुत्वाचे व मैत्रीचे पवाडे गाणारी उक्रेनियन, रशियन व बिलोरशियन गाणी मुलानी ऐकली. सोविएत सत्तेच्या काळात आपल्या प्रजासत्ताकात जे जे काही उभारण्यात आले त्याची कथा ऐकताना मुलांच्या मनात आपल्या समाजसत्तावादी मायभूमीविषयीच्या अभिमानाची एक प्रगाढ भावना निर्माण झाली.

मैत्रीची स्मारके असलेल्या स्थळांच्या "सफरी" करण्यात आम्ही अनेक दिवस व्यतीत केले. जेथे उक्रेनियन जनतेने रशियन लोकांबरोबरच्या आपल्या चिरंतन संघऐक्याचा निर्धार व्यक्त केला त्या पेरेयास्लाव-ख्मेलनित्स्कीपासून आम्ही सुरुवात केली. आपल्या मायदेशांच्या स्वातंत्र्यासाठी व स्वाधीनतेसाठी, यादवी युद्धात* व फॅसिस्ट आक्रमणाच्या काळात उध्वस्त झालेल्या उद्योगधंद्यांची पुनर्उभारणी करण्यासाठी उक्रेनियन व रशियन लोकानी लढविलेल्या एकूण लढ्याशी ज्या शहरांचे भवितव्य निबद्ध झाले होते अशा शेकडो शहरांमधून आम्ही मनाने फिरून आलो.

रशियन फेडरेशनमधून आम्ही जो अनेक दिवस प्रवास केला त्याचे मुलांच्या मनावर अविस्मरणीय असे ठसे उमटले. आमच्या जनतेजनतेमधील महान मैत्रीचे त्याना एक भव्य दर्शन घडले. रशियन भूमीत शंभराहून अधिक राष्ट्रगटांचे लोक रहातात. पवोलझ्ये, उत्तर कॉकेशस, उराल, सैबेरिया,

---

*सोविएत संघराज्यातील यादवी युद्ध (१९१८-१९२२) – महान ऑक्टोबर समाजसत्तावादी क्रांतीच्या (१९१७) सिद्धींचे रक्षण करण्यासाठी परकीय व प्रतिक्रांतिकारक शक्तींशी सोविएत रशियाच्या कामगारानी व श्रमिक शेतकऱ्यानी लढविलेले युद्ध.

अति पूर्व व अति उत्तरेकडील लोकांच्या जीवनाची आणि कार्याची मुलानी ओळख करून घेतली.

आमच्या मायभूमीच्या नकाशावरील लेनिन यांच्याशी निगडित असलेल्या अनेक स्थळांच्या आम्ही "सफरी" केल्या. उल्यानोव्स्क, कुइबिशेव, कझान, लेनिनग्राद, मॉस्को व शुशेन्स्कोये – नकाशावरील ही ठिकाणे पहाताना मुलांच्या मनावर अनेक सुस्पष्ट अशी चित्रे उमटली. कम्युनिस्ट पक्षाचे आणि सोविएत राज्याचे निर्माते व्लादीमिर इल्यिच लेनिन यांचे बालपण, यौवनकाल व प्रौढकाल यांविषयी मी मुलाना माहिती दिली.

बिलोरशिया आणि मोल्दाविया, मध्य आशियातील, बाल्टिक प्रदेशातील व कॉकेशसच्या पलिकडील बांधव प्रजासत्ताकांमधून आम्ही केलेल्या "सफरीं"-मुळे मुलांच्या मनश्चक्षूंसमोर आमच्या जनतेच्या महान मैत्रीची नवी नवी चित्रे उलगडू लागली. आमच्या काल्पनिक "सफरी" अधिकच सुस्पष्ट व अधिकच उद्‌बोधक ठरल्या; कारण अनेक रशियन व बिलोरशियन शाळा-विद्यार्थी आमच्या वर्गाचे पत्रमित्र होते.

आमच्या देशाच्या सरहद्दींच्या अंगानेही आम्ही आमच्या "सफरी" सुरू केल्या. पृथ्वीच्या विविध कोनाकोपऱ्यातील निसर्गाचे वैविध्य आणि सौंदर्य मला मुलाना दाखवावयाचे होते, जगाच्या जनतेच्या जीवनात व कार्यात चांगले म्हणून जे जे काही अस्तित्वात आहे त्याविषयी मुलाना मला सांगावयाचे होते, विविध भाषा बोलणाऱ्या लोकांच्या गतकालीन व विद्यमान संस्कृतीमध्ये व कलेमध्ये मुलांच्या मनात मला रस निर्माण करावयाचा होता. संपूर्ण पृथ्वीतलावर सुष्ट व दुष्ट शक्तींमध्ये चाललेला संघर्ष मला त्याना दाखवावयाचा होता. आमच्या मायभूमीच्या "सफरीं" पेक्षा या "सफरीं"-मध्ये दृक्‌साधनानी बजावलेली भूमिका अधिकच मोठी होती. मुलांच्या मनावर दूरदूरच्या भूमींचा ठसा उमटणे, आपल्या मायभूमीत ज्या निसर्ग-घटना मुलाना पहावयास मिळाल्या नव्हत्या अशा निसर्गघटनांचा ठसा त्यांच्या मनावर उमटणे आवश्यक होते.

जेथे नेहमीच उन्हाळा असतो अशा देशाना आम्ही प्रथम भेट दिली. ईजिप्त, भारत, सिलोन आणि इन्डोनेशिया येथील लोकांची संस्कृती, त्यांची जीवनपद्धती, त्यांचे काम, तेथील निसर्ग यांचा दिवसागणिक मुलाना परिचय होत होता. या देशांच्या कथा त्यानी ऐकल्या व त्या देशांसंबंधीचे चित्रपट पाहिले. उंच तालवृक्षांच्या शेंडयांवरच आपण चढून जात आहोत असे मुलाना भासत होते, उष्णकटिबंधीय सूर्याची दाहक धग आणि कोसळत्या

जलधारा त्याना जाणवत होत्या ; तेथील कामगारांच्या जीवनाचेही त्यानी अवलोकन केले. पिरॅमिडस्‌च्या भूमीची, ईजिप्तची, "सफर" त्याना अगदी रोमांचक वाटली.

त्यानंतर आम्ही शेजारच्या देशांच्या "सफरी"ना निघालो. आम्ही बाल्टिक देशाना व स्कन्डिनेव्हियाला भेट दिली, नंतर मध्य युरोप व टर्की, इराण, अफगाणिस्तान आणि जपानची "सफर" केली. अशाच पद्धतीने आम्ही आफ्रिका व दक्षिण अमेरिका, कॅनडा, अमेरिकेची संयुक्त संस्थाने, ऑस्ट्रेलिया व अंटार्क्टिकाचा प्रवास केला.

पृथ्वीच्या विविध भागांतील लोकांच्या कामाच्या पद्धती मुलाना अगदी मनोरंजक वाटल्या. लोक कोठेही रहात असोत, त्यांचा वर्ण कोणताही असो, ते कोणतीही भाषा बोलोत, ते नेहमीच काम करीत असतात, मुलाबाळांचे संगोपन करीत असतात आणि सुखाची स्वप्ने पहात असतात. आमचे बांधव–समाजसत्तावादी देशांतील लोक–कसे काम करतात व कसे रहातात हे मुलाना जितक्या स्पष्टपणे दाखविता येईल तितक्या स्पष्टपणे दाखविण्याचा आणि मुलांच्या मनात कामगारांविषयी मैत्रीभावना जागृत करण्याचा मी प्रयत्न केला.

मी मुलाना जर्मन लोकशाही प्रजासत्ताकाविषयी माहिती दिली. नाझीवाद आणि जर्मन लोक या गोष्टी एकच नव्हेत याची मुलाना अगदी स्पष्ट कल्पना होती आणि ज्या शत्रूविरुद्ध सोविएत लोक लढले त्याच शत्रूचा–नाझीवादाचा–धिक्कार करण्यासाठी हिटलरी प्रतिगामित्वाच्या काळयाकुट्ट दिवसांत जर्मन कामगारवर्गाच्या सर्वोत्तम सुपुत्रानी आणि सुपुत्रीनी आपल्या प्राणांची आहुती दिली हेही त्याना ठाऊक होते.

पृथ्वीची "सफर" करीत असताना सर्वच लोक सुखात रहात नाहीत असे मुलाना दिसून आले. जगामध्ये अजूनही असे देश आहेत की जेथे एक माणूस दुसऱ्या माणसाची पिळवणूक करतो, जेथे दारिद्र्य व उपासमार यांचे राज्य चालू आहे. या दुष्टतेच्या कारणाचा एक ठसा मुलांच्या मनात निर्माण झाला. ते कारण म्हणजे–अन्याय्य सामाजिक व्यवस्था. जगामध्ये शोषक व शोषित यांच्यामध्ये एक तीव्र, निग्रही संघर्ष चालू आहे याची मुलाना हळू हळू खात्री पटली. शोषकानी ज्याना अजून गुलामगिरीत ठेवले आहे अशा कामगारांबद्दल आणि दास्याच्या शृंखलांत अडकलेल्या लोकांबद्दल माझ्या विद्यार्थ्याना हृदयाची वेदना जाणवावी अशी त्याना शिकवण देण्याचा मी प्रयत्न केला. मुलांच्या मनाला वेदनेची एक तीव्र कळ जाणवली. एका

आगळ्या प्रकारे त्याना आपल्या देशबांधवांच्या मुक्त श्रमाची प्रचिती आली आणि आपल्या मायभूमीच्या कल्याणासाठी, आपल्या कुटुंबाच्या व आपल्या जनतेच्या कल्याणासाठी श्रम वेचणे यातच फार मोठे सुख सामावले आहे ही भावना त्यांच्या मनात फुलून आली.

माणसाचे माणसाकडून होणारे शोषण जगामध्ये जोपर्यंत अस्तित्वात आहे तोपर्यंत सर्व मानवांबद्दलचे प्रेम आपल्याला शिकविता येणार नाही; कारण अमूर्त मानवजाती अशी काही चीज नसते. शोषित आणि त्यांचा चिरवैरी शत्रू शोषक अशा वर्गीय भूमिकेतूनच बंधुत्वाचे नाते निर्माण होते. क्रांतिकारक, कम्युनिस्ट कल्पना म्हणजे काय याचे मुलाना अगदी लहान वयापासून आकलन होणे आणि अंतःकरणाने त्याना त्या कल्पना जाणवणे हे अत्यंत महत्त्वाचे आहे. आमच्या मायभूमीच्या नजीकच्या गतकाळात छोटया छोटया सहली काढून, स्वातंत्र्यासाठी व स्वाधीनतेसाठी या देशाच्या जनतेने दिलेल्या लढयाची माहिती सांगून, वासाहतिक व भांडवलदारी देशांतील कामगार आज आपल्या हक्कांचे कसे संरक्षण करीत आहेत याची सुस्पष्ट उदाहरणे देऊन लोक नेमक्या याच कल्पनांच्या पूर्ततेसाठी आपले प्राण अर्पण करीत असतात, वर्गविरोधाच्या गाभ्यातून अत्यंत स्पष्टपणे व्यक्त होणाऱ्या विचारसंघर्षाच्या रणक्षेत्रात आपल्या प्राणांची कुरवंडी करीत असतात या निष्कर्षापर्यंत मी मुलाना हळू हळू आणून सोडले. उच्च, उदात्त ध्येयांसाठी ज्या लोकानी आपल्या प्राणांचे बलिदान केले त्या लोकांचा आदर्श आमच्या विद्यार्थ्यानी आपल्या नजरेसमोर ठेवणे हे अत्यंत महत्त्वाचे आहे. आणि त्याच वेळी तोंड बंद करून मुकाटपणे दडपशाहीला शरण जाणाऱ्या लोकांबद्दल त्यांच्या मनांत तिरस्काराची भावना निर्माण होणे हेही महत्त्वाचे आहे. म्हणूनच प्रथमतः लोकांचे जीवन, लोकांचे कार्य आणि सुखी भाविकालासाठी त्यानी चालविलेला झगडा या नात्याने मुलाना जगाचे दर्शन घडणे आवश्यक आहे.

कम्युनिस्ट कल्पनांच्या आकलनापासून कम्युनिस्ट पक्षाच्या आकलनापर्यंत मी हळू हळू मुलांचे मार्गक्रमण घडवून आणले. माणसाचे माणसाकडून शोषण होऊ नये म्हणून, कामगाराना सुखी जीवनाचा लाभ व्हावा म्हणून, संपत्ती निर्माण करणारे लोकच त्या संपत्तीचे स्वामी बनावेत म्हणून कामगारवर्गाच्या सर्वोत्कृष्ट प्रतिनिधीनी जो लढा दिला त्या स्वार्थत्यागपूर्ण लढयाचे, आमच्या मायभूमीच्या गतकाळाविषयी बोलताना, सुस्पष्ट उदाहरणांच्या द्वारे, मी मुलाना दर्शन घडविले. एकतंत्री राज्यसत्ता उलथून टाकण्यासाठी आणि

सोविएत सत्ता प्रस्थापित करण्यासाठी लेनिनने आणि कम्युनिस्ट पक्षाने कामगारवर्गाची कशी तयारी केली याची मी माझ्या कथनात चित्तवेधक चित्रे रंगविली. आमच्या मायभूमीच्या जनतेच्या स्वातंत्र्याचा व सुखाचा उज्ज्वल मार्ग ज्या महान ऑक्टोबर समाजसत्तावादी क्रांतीने तयार केला आणि भांडवलदारी देशांतील लाखो-करोडो दास्यांकित लोकाना ज्या क्रांतीने स्वाधीनतेचा मार्ग दाखविला ती क्रांती कोणत्या कठीण परिस्थितीत पार पडली आणि कम्युनिस्टानी, लेनिनच्या सहकाऱ्यानी त्यासाठी किती स्वार्थत्यागपूर्ण लढा दिला याचे मी मुलाना दर्शन घडविले.

आमच्या मायभूमीची "सफर" करताना सोविएत सत्तेच्या काळात आपल्या मायदेशाचे रूप किती न ओळखू येण्याइतके पालटले आहे, मोकळ्या जमिनींवर किती अजस्र कारखाने उभे राहिले आहेत, अद्भुतविलक्षण सामुदायिक शेतानी या देशाला किती सौंदर्यसंपन्न बनविले आहे, सोविएत लोकांची संस्कृती आणि जीवनपद्धती किती विकसित झाली आहे या गोष्टी मी मुलाना कथन केल्या. या संभाषणांमध्ये आमच्या मुलांच्या जीवनावर, त्यांच्या सुखी बालपणावर मी पुष्कळसे ध्यान केंद्रित केले. आमची संपूर्ण जनता या सुखी बालजगताभोवती छातीचा कोट करून उभी आहे.

सोविएत भूमीमध्ये बहरणाऱ्या जीवनाशी तुलना करता भांडवलदारी देशांतील जीवनाची बिकटता ठळकपणे प्रत्ययास येत होती.

जपानमधून "प्रवास करीत" असता १९४५ साली हिरोशिमावर टाकण्यात आलेल्या अणुबॉम्बच्या काळात किरणोत्सर्गाची बाधा झालेल्या हजारो लोकांची मुलाना माहिती मिळाली आणि गंभीर आजाराने शय्येला खिळून असलेल्या सादाको सासाकी या छोट्या मुलीविषयीही त्यानी ऐकले. आपल्या या सुदूरस्थ भगिनीविषयी दुःखाची एक तीव्र वेदना त्याना जाणवली. आजारी असलेल्या या छोट्या मुलीला त्याना मदत करावयाची होती; पण कशी? जपानचा "प्रवास" करून आल्याला काही आठवडे लोटले होते. कागदाचे हजार क्रौंचपक्षी करण्याचा सादाको सासाकीने कसा संकल्प सोडला आहे त्याविषयी वृत्तपत्रात आलेला एक छोटा लेख मी मुलाना वाचून दाखविला. (आपल्या स्वतःच्या हातानी जो माणूस एक हजार क्रौंचपक्षी बनवितो तो सुखी होतो अशी जपानी लोकांमध्ये रूढ असलेली एक समजूत आहे). उक्रेनियन लोकांमध्ये अशाच प्रकारचा एक समज आहे: आपल्या आजारी मुलाची प्रकृती सुधारावी म्हणून त्याची ममताळू आई कागदाचे रुपेरी चंडोल बनविते. तेव्हा आमच्या या छोट्या मुलामुलीनी क्रौंचपक्षी

बनविले आणि त्यानी ते उगवत्या सूर्याच्या त्या सुदूरस्थ देशाला पाठविले... अशीच अनेक वर्षे लोटली; माझ्या विद्यार्थ्यांनी तारुण्यात पदार्पण केले; पण सादाको सासाकीच्या प्रकृतीविषयी कोणतीही बातमी आली तरी ते अधीरतेने वाचीत असत. आपल्या त्या दूरवरच्या मैत्रिणीच्या निधनाची दुःखद बातमी आली तेव्हा व्यक्तिशः कोणीतरी अगदी जवळचे माणूस हरपल्यासारखे दुःख त्यांच्या अंतःकरणाला जाणवले.

ज्या जगाचे क्षितिज मुलांच्या समोर सतत उलगडत असते ते जग म्हणजे केवळ समुद्र आणि महासागर नव्हेत, खंड आणि बेटे नव्हेत, न पाहिलेली वनस्पतीसृष्टी आणि प्राणिसृष्टी नव्हे, आर्क्टिकमधला उत्तरप्रकाश नव्हे आणि उष्णकटिबंधातले अखंड उन्हाळे नव्हेत; प्रथमतः ते जग म्हणजे त्या जगातले लोक, त्यांचे काम आणि सुखी भवितव्यासाठी त्यानी चालविलेला लढा, ज्या देशांत माणसाकडून माणसाची होणारी पिळवणूक नष्ट करण्यात आली आहे त्या देशांत समूर्त झालेले मानवजातीचे सुखाचे व न्यायाचे शतशतकांचे स्वप्न. कोठे काय घडले हे ज्याना ठाऊक आहे असे लोक म्हणून नव्हेत, अमक्या तमक्याची चर्चा करू शकणारे लोक म्हणून नव्हेत, अलिप्त निरीक्षक म्हणून नव्हेत तर मानवजातीच्या भवितव्याची काळजी वहाणारे लोक म्हणून मुलानी या जगात प्रवेश केला पाहिजे.

आपल्या मायभूमीच्या तसेच विदेशीच्याही "सफरी" करीत असताना एका धोक्याबद्दल आपण सतत जागरूक असले पाहिजे. तो धोका म्हणजे ज्ञान आणि मनावर उमटणारे ठसे यांचा मुलाना "अति रतीब पाजणे". "पृथ्वीचे किंवा सूर्याचे वजन किती, सूर्य कशाचा बनला आहे, कोणत्या प्रकारच्या पेशीनी झाडे आणि माणसे तयार झाली आहेत, आणि लोकानी कोणत्या प्रकारची असाधारण यंत्रे आपल्या डोक्यातून काढली आहेत अशा प्रकारची विज्ञानाने गाठलेल्या असाधारण निष्कर्षांची (विशेषतः शाळांसाठी असलेल्या परकीय पुस्तकांत आढळणारी) निवेदने टाळा"* असा लेव तोलस्तोय यानी लहान मुलांच्या शिक्षकाना सल्ला दिला आहे. रुक्ष फलनिष्पत्ती या विद्यार्थ्याला हानिकारक असतात आणि दिलेल्या आकड्यांवर विश्वास ठेवण्यास त्यामुळे विद्यार्थ्याच्या मनाला शिकवण मिळते असे या महान लेखकाने व शिक्षणतज्ज्ञाने म्हटले आहे. हे शब्द लिहिल्याला आता

---

*लेव तोलस्तोय, 'शैक्षणिक निबंध', मॉस्को, उच्पेदगिझ प्रकाशन, १९५३, पृ. ३३९-३४० (रशियनमध्ये).

दशके उलटून गेली आहेत ; विज्ञानाने मिळविलेल्या यशांमुळे जग ओळखू न येण्याइतके बदलले आहे आणि छोटचा मुलांचा दृष्टिकोनही बदलला आहे. पण तोलस्तोय यांच्या सल्ल्याचे मोल आजही कायम आहे. मुलांसाठी रचलेल्या गोष्टी त्याना कुंठित करणाऱ्या माहितीने आपण खचोखच भरता कामा नयेत.

## मुलाला बौद्धिक श्रमाचा आणि अभ्यासातील यशांचा आनंद द्या

विद्यार्थ्याचे बौद्धिक श्रम, अभ्यासातील त्याचे यश व अपयश हे त्याचे आत्मिक जीवन असते, ते त्याचे अंतर्विश्व असते आणि त्याकडे दुर्लक्ष केल्यास त्यातून दुष्परिणाम निष्पन्न होण्याचा संभव असतो. मूल नुसतेच काहीतरी शोधून काढीत नसते, नुसतेच काहीतरी आत्मसात करीत नसते तर यशाशी व अपयशाशी त्याचे एक अत्यंत प्रगाढ असे व्यक्तिगत नाते स्थापन झालेले असते व त्याच्या आविष्कारामार्फत ते स्वतःच्याच कामाची प्रतीती घेत असते.

लहान मुलाच्या दृष्टीने शिक्षक हे न्यायाचे एक जिवंत मूर्तरूप असते. अनुत्तीर्ण गुण मिळालेल्या पहिल्या इयत्तेतील मुलाच्या नजरेत पहा... मुलाला केवळ दुःखच झालेले नसते तर वैराची एक भावना, अनेक वेळा शिक्षकाविषयी शत्रुत्वाची एक भावना त्याला जाणवत असते. विद्यार्थ्याला एखादी गोष्ट समजण्यात यश आले नाही म्हणून त्याला निकृष्ट गुण देणारा शिक्षक हा मुलांच्या नजरेत एक अन्यायी माणूस ठरतो.

एका शाळेत एक पुढील घटना घडली : झाड स्वतःचे पोषण कसे करते, श्वासोच्छ्वास कसे करते, कोंबापासून पाने कशी तयार होतात, फुलांपासून फळे कशी तयार होतात हे एका विद्यार्थ्याच्या काही केल्या डोक्यात येईना. शिक्षक अनेक वेळा त्या छोटचा मुलाला धारेवर धरत असत आणि प्रत्येक वेळा त्यांच्या तोंडातून तेच तेच पालुपद बाहेर पडत असे : "या साध्या गोष्टीही तुला कळल्या नाहीत तर तुला कळणार तरी काय?" एकदा तासाच्या वेळी ते म्हणाले, "एक-दोन दिवसांत आक्रोडाच्या झाडाना कोंब फुटू लागतील ; मग आपण सारेजण आक्रोडाच्या बनात जाऊ. प्रत्येकाला जे कळते ते अल्योशाला सांगता आले नाही तर तो निव्वळ शंख आहे असेच म्हणावे लागेल". आपल्या या झाडांवर – मूळ फळापासून तयार झालेल्या आक्रोडाच्या या बनावर – त्या शिक्षकाचे फार प्रेम होते. पाठाच्या आदल्या

दिवशी काही विद्यार्थ्याना घेऊन ते त्या बनात गेले. झाडांवर फुटणाऱ्या कोंबानी त्या छोटया छोटया झाडांचे शेंडे अतिशय सुंदर दिसत होते. दुसऱ्या दिवशी पाठासाठी सारा वर्ग जेव्हा त्या आक्रोडाच्या बनात गेला तेव्हा शिक्षकाना धक्काच बसला. झाडांवरचे सारे कोंब कुणीतरी खुडून टाकले होते. मुलाना वाईट वाटले. अल्योशाच्या नजरेत मात्र शिक्षकाना एक क्रूर आनंद दिसला...

मुलाच्या अंत:सामर्थ्याचा जो एक वादळी क्षोभ झाला होता त्याचाच स्फोट म्हणजे हे कृत्य होते – हा क्षोभ म्हणजे त्याच्या अंत:करणाला झालेल्या अत्यंत खोलवर वेदना होत्या. त्या मुलाच्या कुवतीबद्दल जो अविश्वास व्यक्त करण्यात आला होता त्याचा त्या मुलाने केलेला तो निषेध होता. पण शैक्षणिक कार्याच्या क्षेत्रात अशा गोष्टी अनेक वेळा घडतात – मुलाना एका पाठोपाठ एक वाईट गुण मिळतात. जणू काही त्यांच्या दृष्टीने सगळे सारखेच. काही वेळा मुलाला मिळणारे वाईट गुण हा त्याच्या वर्गबंधूंच्या दृष्टीने उपहासाचा विषय बनतो. आणि हळू हळू वाऱ्या किंवा पेत्या ना – ते नापासच होणार ही गोष्ट सर्वच मुलांच्या सरावाची होते. ज्या व्यक्तीची अजून घडण होत आहे त्या व्यक्तीच्या आत्मिक जीवनाच्या दृष्टीने ही गोष्ट सर्वात भयानक आहे. ज्याची स्वत्वभावना बालपणापासूनच खच्ची करण्यात आली आहे अशा माणसाकडून काय अपेक्षा करता येणार?

ज्ञान आत्मसात करण्याच्या प्रक्रियेत मानवी प्रतिष्ठेची आणि अभिमानाची भावना प्रत्येक मुलाला जाणवली पाहिजे आणि या गोष्टीची दक्षता घेणे हे एक सर्वात महत्त्वाचे शैक्षणिक कार्य आहे. शिक्षक विद्यार्थ्यासमोर जगाची क्षितिजेच फक्त खुली करीत नाही तर ज्याला स्वत:च्या सिद्धींबद्दल अभिमानाच्या भावनेने स्पर्श केला आहे असा जगातील एक क्रियाशील निर्माता या नात्याने तो मुलाची जोपासना करीत असतो. अभ्यासाची क्रिया सामुदायिकामध्ये घडते, पण आकलनाच्या मार्गावर मुले स्वतंत्रपणे प्रत्येक पाऊल टाकीत असतात. बौद्धिक श्रम ही निरतिशय व्यक्तिगत अशी प्रक्रिया आहे आणि ती केवळ कुवतींवर अवलंबून नसून मुलाच्या स्वभावधर्मावर आणि अनेक वेळा त्या आपल्या लक्षातही येत नाहीत अशा इतर अनेक गोष्टींवर ती अवलंबून असते.

मुले अगदी खुल्या अंत:करणाने शाळेला येतात आणि उत्तम अभ्यास करण्याची त्यांची तळमळीची इच्छा असते. आपल्याला आळशी समजले जाईल किंवा अपेशी ठरविले जाईल या गोष्टीची त्याना अतिशय भीती वाटत

ी. उत्तम अभ्यास करण्याची इच्छा ही एक अतिशय निकोप अशी इच्छा
आणि मला तर वाटते, मुलाच्या जीवनाची संपूर्ण कल्पनाच उजळून
णारी, मुलांचे आनंदविश्व उजळून टाकणारी ती एक तेजस्वी ज्योत आहे.
शी अमर्याद श्रद्धा बाळगून ही ज्योत जेव्हा शिक्षकापर्यंत पोहोचविली
तेव्हा ती क्षीण व निराधार असते आणि मुलाची ही इच्छा जर
काला दिसली नाही तर त्याचा अर्थ आपल्या विद्यार्थ्याच्या वर्तमानकाळा-
व भविष्यकाळाबद्दल शिक्षकाला फारशी फिकीर नाही असाच होतो.
ध्या हृदयाला झालेल्या एखाद्या बेसावध स्पर्शामुळे — अपमान किंवा
ईला कारणीभूत होणाऱ्या एखाद्या निष्काळजी शब्दामुळे — ही ज्योत
विझली जाऊ शकते. ज्ञानतृष्णा हा या क्षीण ज्योतीला लाभणारा
वायू आहे आणि मुलाला अभ्यासात यश मिळाले, ज्ञानमार्गाची उंच
चढून जात असताना आपण प्रगतीच्या दिशेने पुढे जात आहोत या
णेने त्याच्या मनात अभिमानाची भावना फुलली तरच ही तृष्णा प्रकट
.

हाती काहीही न लागता व्यर्थपणे काम करणे ही गोष्ट प्रौढानाही
करणीय, बधिरतापूर्ण आणि निरर्थक वाटते; आणि येथे तर आपण
चा विचार करीत आहोत. आपल्या कामाची कोणतीही फलनिष्पत्ती
ध्या पदरात पडली नाही तर त्याची ज्ञानतृष्णा विरून जाते आणि मुलाचे
करण थंड व भावनाशून्य बनते; ती ज्योत पुन्हा प्रज्वलित केल्याशिवाय
ला कोणत्याही गोष्टीबद्दल रोमांचकता, थरारकता जाणवत नाही आणि
ज्योत पुन्हा प्रज्वलित करणे किती दुरापास्त असते! आपल्या स्वतःच्याच
र्थ्यावरचा मुलाचा विश्वास उडून जातो, अलंकारिक भाषेत बोलावयाचे
यास ते मूल "आपले ओठ शिवून टाकते", त्याची नजर अत्यंत सावध
, त्याच्यात ताठरपणा येतो आणि शिक्षकांचा सल्ला व शेरे याना
च्याकडून उद्धट प्रत्युत्तरे मिळू लागतात. किंवा त्याहूनही अधिक वाईट
घडते: त्याची आत्मप्रतिष्ठेची भावना मरून जाते आणि आपण काहीही
याच्या लायकीचे नाही हा विचार त्याच्या मनात दृढ होतो. शिक्षकाची
णगर प्रवचने संपूर्ण तासभर अगदी शांतपणे ऐकून घेण्यास ते तयार
; 'तू मागे पडत आहेस, पुढल्या वर्षी तुला पुन्हा याच वर्गात बसावे
ल' या त्याच्या बांधवमित्रांच्या शब्दांचा त्याच्या मनावर काडीइतकाही
णाम होत नाही. अशा निर्विकार, मख्ख मुलाला पाहिल्यानंतर कोणाच्या

मनात क्रोध व संताप दाटणार नाही? .. माणसाला स्वत्वभावनेपासून वंचित करण्यापेक्षा अधिक अनैतिक ते काय असू शकेल?

विद्यार्थी बालपणाच्या व पौगंडावस्थेच्या काळात स्वतःशीच जे संबंध प्रस्थापित करतो ते कसे करतो, श्रमविश्वात तो स्वतःला कशा रीतीने पहातो यावर त्याचा नैतिक दृष्टिकोन फार मोठ्या प्रमाणावर निर्धारित होतो. उशिन्स्कीनी म्हटले आहे, मुलामध्ये स्वभावतःच आत्मिक आळस नसतो; त्याला स्वतंत्रपणे काम करणे आवडते आणि प्रत्येक गोष्ट स्वतःच करण्याची त्याची इच्छा असते. मुलाना काम करण्यास, विचार करण्यास, बौद्धिक श्रम म्हणजे काय आणि उत्तम काम कशाला म्हणतात हे समजावून घेण्यास शिकविले पाहिजे – आणि त्यानंतरच यशाबद्दल तुम्ही त्याला गुण देऊ शकाल. अभ्यासात ज्याला कधीच श्रमाचा आनंद जाणवलेला नाही, अडचणी पार करताना जाणवणाऱ्या अभिमानाची ज्याने कधीच अनुभूती घेतलेली नाही असे मूल ही एक आनंदाला पारखी झालेली व्यक्ती असते. आपल्या समाजाचा विचार करता आनंदाला पारखी झालेली व्यक्ती, आणि त्याहूनही आनंदाला पारखे झालेले मूल ही एक घोर दुरापत्ती ठरेल. बालपणाला रोमांचवादाचे रूप देणारा मी माणूस नव्हे; पण अगदी बालपणाच्या काळात लोक अनेक वेळा आळशी बनतात, कामाचा त्याना तिटकारा वाटतो, इतकेच नव्हे तर आपल्या सर्व कुवती पणाला लावून काम करणे हा विचारच त्याना तिरस्करणीय वाटतो ही कल्पनाच मला स्वस्थ बसू देत नाही. पण मूल असे कामचुकार बनतेच का? त्याचे कारण हे आहे, माझ्या प्रिय शिक्षकबांधवानो, की **श्रमाचा आनंदच** त्याला ठाऊक नसतो. त्याला हा आनंद द्या, हा आनंद किती मौल्यवान आहे हे त्याला शिकवा आणि मग स्वतःच्या प्रतिष्ठेचे मोल त्याला समजतील आणि कामाची आवड त्याला निर्माण होईल.

अभ्यासामध्ये मुलाना श्रमाचा व यशाचा आनंद देणे, अभिमानाची व आत्मप्रतिष्ठेची भावना त्यांच्या हृदयात जागृत करणे ही पहिली शिक्षणाज्ञा आहे. आपल्या शाळांत दुःखपीडित मुले, आपल्यामध्ये काहीच कुवत नाही या विचाराने ज्यांची मने कुरतडली गेली आहेत अशी मुले असता कामा नयेत. अभ्यासातील यश हा मुलाच्या अंतःसामर्थ्याचा एकमेव मूलस्रोत आहे आणि अडचणी पार पाडण्याची शक्ती व अभ्यासाची आस याच स्रोतातून उगम पावते.

मुलाला अभ्यासाची आस नसेल तर आपल्या सर्व योजना, आपले सर्व

अन्वेषण, आपली सर्व उभारणी धुळीला मिळेल, त्यांचे निर्जीव पुतळे बनतील. अभ्यासाच्या यशाबरोबरच ही आस पल्लवित होते. हा एक विरोधाभास वाटतो: तो असा की, मुलाला यश मिळवावयाचे असेल तर त्याने मागे पडता कामा नये. पण हा विरोधाभास नाही तर बौद्धिक श्रमाच्या प्रक्रियेतील हा एक द्वंद्वात्मक मिथुनभाव आहे. ज्ञानप्रभुत्वातील यशाने मिळालेल्या प्रेरणेतूनच केवळ अभ्यासातील स्वारस्य उदयास येते. प्रेरणा नसेल तर अभ्यास हा मुलाना एक भार वाटतो. या उद्यमशीलतेलाच आपल्या यशाबद्दल मुलाला वाटणाऱ्या दृढविश्वासाने द्विगुणित झालेली मी प्रेरणा म्हणेन.

आपल्या ज्ञानाबद्दल मुलाला जे गुण मिळतात ती प्रथमदर्शनी एक अगदी साधी गोष्ट वाटते; पण प्रत्येक मुलाकडे जाणारा योग्य मार्ग शोधून काढण्याच्या शिक्षकाच्या क्षमतेची, मुलाच्या अंतःकरणात ज्ञानतृष्णेची ज्योत जोपासण्याच्या त्याच्या क्षमतेची ती खूण आहे. प्राथमिक वर्गांत मुले जेव्हा अभ्यास करीत होती त्या चार वर्षांच्या काळात लेखी उत्तराना काय किंवा तोंडी उत्तराना काय मी कधीच अनुत्तीर्ण गुण दिले नाहीत. या काळात मुले वाचायला शिकली, लिहायला शिकली व अंकगणित करायला शिकली. आपल्या बौद्धिक श्रमात एका मुलाला निश्चित यश मिळाले होते तर दुसऱ्याला अजून ते मिळाले नव्हते. मला काय शिकवावयाचे आहे ते एका मुलाला कळले होते तर दुसऱ्याला अजून ते कळले नव्हते. पण त्याचा अर्थ असा नव्हता की त्या मुलाला शिकण्याची इच्छा नव्हती. मुलाला निश्चित यश मिळाले तरच मी त्या बौद्धिक श्रमाला गुण देत होतो. आपल्या कामात जे यश मिळविण्यासाठी मूल धडपडत होते त्या मुलाला जर ते यश मिळाले नाही तर मी कोणतेही गुण देत नव्हतो. मुलाने विचार करावा, आपले विचार एकत्र करावेत आणि पुन्हा ते काम करावे ही माझी दृष्टी होती.

पहिल्या इयत्तेत शाळा सुरू होऊन चार महिने लोटल्यानंतर मी माझे पहिले गुण दिले. येथे प्रथमतः महत्त्वाची गोष्ट होती ती मेहनतपूर्ण काम म्हणजे काय, परिश्रमपूर्वक काम म्हणजे काय हे मुलाला समजण्याची. मूल आपले काम निकृष्टपणे करते ते तशी त्याची इच्छा असते म्हणून नव्हे तर चांगले काम आणि वाईट काम यातील भेद ओळखण्याचा मार्ग त्याच्याकडे नसतो म्हणून त्याबद्दल त्याला गुण का मिळावेत? मुलाने प्रथम जे काम केले त्यापेक्षा ते अधिक चांगले काम करू शकते याची व्यक्तिगत अनुभवातून मुलाची खात्री पटावी म्हणून तेच काम मुलाकडून अनेक वेळा घोटून घेण्याचा मी प्रयत्न केला. या गोष्टीला फार मोठे शैक्षणिक महत्त्व आहे: अशा मार्गे

आपल्या सृजनशील शक्ती विद्यार्थ्याच्या प्रत्ययास येतात; आपल्या व्यकि
यशाचा त्याला आनंद होतो आणि अधिक चांगले काम करण्याचा तो प्र
करतो. ज्या कामात चुका झाल्या होत्या त्या कामाशी आपले नंतरचे
ताडून पहाताना एक स्फूर्तीभावना त्या मुलाच्या मनाला स्पर्श करते.

पहिल्या वर्गाच्या कामाचे निरीक्षण करताना मला असे दिसले की
मुले एकाच तऱ्हेने विचार करीत नाहीत आणि आपल्या कामाचे मोल
विविध पद्धतीने जोखतात. उदाहरणार्थ, त्याना **गांधलमाशी** हा शब्द लिह
याचा होता. लीदा, सिऱ्योझा, कात्या, सान्या, आणि पावेल यांची अ
सुंदर आणि प्रमाणबद्ध होती. युराची अक्षरे रेघेच्या बाहेर गेली होती आ
ती वेडीवाकडी होती. कोल्या आणि तोल्याने अक्षरे लिहिलीच नाही
चित्र-पुस्तकात त्यानी निसर्गाचे जे पहिले शब्दांकन केले होते त्याचप्र
त्यानी अक्षरे काढली. पेत्रिकच्या वहीत कोणत्यातरी प्रकारचे वळलेले आ
होते. मी नंतरच्या व्यवसायाकडे वळलोच नाही. तोच शब्द मुलानी अ
वेळा गिरविला. त्याच गोष्टीची उजळणी ही ज्यांचे अक्षर वाईट होते आ
ज्यांचे अक्षर चांगले होते त्या दोघांच्याही दृष्टीने आरोहणाची एक
पायरी होती. आरंभापेक्षा आपण अधिक चांगले काम करू शकतो हा वि
मुलाला नेहमीच आनंददायक वाटतो.

या आनंदातून अभिमानाची व स्वत्वाची भावना उदयास येते.
मुलापाशी ही भावना असते ते बव्हंशी सुलभ मार्गाच्या मागे लागत ना
आणि दुसऱ्या कोणाच्या कामाची नक्कल करीत नाही. आपले काम पुन:
करण्यास मुले जेव्हा शिकली आणि त्याच्याशी निगडित असलेल्या आनंदा
अनुभव घेऊ लागली तेव्हाच मी गुण द्यावयास सुरुवात केली — अर्थात
गुण निश्चित यशासाठीच होते. शाळेत पाठाना प्रारंभ झाल्यानंतर का
मुलानी चार महिन्यानी तर काहीनी सहा महिन्यानी गुण मिळवाव
सुरुवात केली. पेत्रिकला व मिशाला केवळ दुसऱ्या शालेय वर्षाच्या मु
तीला आपले पहिले गुण मिळाले. प्रत्येक दिवसाला आपल्या कामात सुधा
होईपर्यंत आणि आपल्या ताकदीवरचा या मुलांचा विश्वास कायम रा
अशा रीतीने मी त्यांच्यासाठी जादा काम करीत असे.

अभ्यास म्हणजे शिक्षकाकडून मुलाकडे होणारे यांत्रिक ज्ञानांतर नव्हे तर अ
म्हणजे प्रथमत: मानवी संबंध. मुलाचे आपल्या शिक्षकाबरोबर कोणते संबंध प्र
पित होतात यावर बव्हंशी मुलाची ज्ञानाकडे व अभ्यासाकडे पहाण्याची
अवलंबून असते. मुलाला आपल्यावर अन्याय होत आहे असे वाटले तर त्या

धक्का बसतो. आणि अनुत्तीर्ण गुण हा अन्याय आहे असे लहान मुलाना नेहमीच वाटत असते आणि त्याच्या त्याना वेदना जाणवतात ; कारण मुलाला शिकण्याची इच्छा नसते असे कधीच घडत नाही. त्याला शिकायचे असते, पण त्याला ते जमत नाही. एकाग्रतेची क्षमता, स्वत:ला अभ्यासाला लावण्याची क्षमता अजून त्याच्या अंगी आलेली नसते.

वर्षभराच्या संपूर्ण काळात रोजच्या रोज अन्यायच मुलांच्या अनुभवाला आला तर प्रथम त्यांची मज्जातंतुसंस्था प्रक्षुब्ध होते ; पण नंतर वैफल्य, दुर्बलता आणि औदासिन्य त्यांच्या मनात मूळ धरते व त्यांच्या कोंडमाऱ्याला सुरुवात होते. मनाचा प्रक्षोभ आणि कोंडमारा यांच्यामधील तीव्र झेपा असा बिंदू गाठतात की त्या बिंदूला मूल आजारी पडते. प्रथमदर्शनी हा विचित्र आजार म्हणजे शाळेशी संबंधित असलेले मनोविकार किंवा नीतिपाठांच्या बाबतीत व्यक्त होणारी उदासीन प्रतिक्रिया असते. नीतिपाठाना मिळणाऱ्या या प्रतिक्रियेचे विरोधाभासात्मक स्वरूप असे आहे की ती प्रतिक्रिया शाळेच्या जगात घडते, जेथे मानवता हे विद्यार्थी आणि शिक्षक यांच्यामधील परस्पर संबंध ठरविणारे एक सर्वात महत्त्वाचे वैशिष्टच बनले पाहिजे अशा पवित्र ठिकाणी घडते. आपल्यावर अन्याय होत आहे या भावनेतून नीतिपाठाना मिळणारी ही प्रतिक्रिया निर्माण होते. पालकांचे किंवा शिक्षकांचे मुलाशी असलेले अन्याय्य संबंध अनेक सूक्ष्म छटा धारण करतात ; बेपर्वाई ही त्यातील पहिली छटा आहे. मुलाच्या प्रगतीबद्दल शिक्षकाकडून दाखविण्यात येणाऱ्या बेपर्वाईइतके मुलाच्या नैतिक सामर्थ्याच्या व स्वयंविचारशक्तीच्या घडणीला अधिक धोकादायक असे दुसरे काही नसेल. मग सुरू होतो तो आक्रस्ताळेपणा, धाकदपटशा आणि राग-संताप ; इतकेच नव्हे तर ज्यांच्या अंगात खऱ्याखुऱ्या शिक्षकाचे रक्त नसते अशा लोकांमध्ये मुलाला एखादी गोष्ट ठाऊक नाही या गोष्टीमुळे होणारा क्रूर आनंद, पालकाना "आपला बबड्या कसा आहे हे कळावे" म्हणून त्याला अनुत्तीर्ण गुण देण्यातला आनंद आढळून येतो...

अनेक वर्षांच्या काळात शाळेशी संबंधित असलेल्या बालमनोविकारांचा मी अभ्यास केला. शिक्षकाकडून होणाऱ्या अन्यायाला मुलांच्या मज्जातंतुसं-स्थेकडून विविध प्रकारच्या प्रतिक्रिया व्यक्त होतात : आडदांडपणा, छलप्रवृत्ती-युक्त मनोगंड, कटुता, कृतक किंवा अस्वाभाविक निष्काळजीपणा, औदासिन्य किंवा तीव्र वैफल्य, शिक्षकांकडून आणि कुटुंबियांकडून मिळणाऱ्या शिक्षेची धास्ती, टिवल्याबावल्या करीत फिरणे आणि दांड्या मारणे, किंवा

क्रौर्याची एक रोगट प्रवृत्ती (अशी प्रवृत्ती क्वचित आढळते, पण तिच्याकडे दुर्लक्ष करता येत नाही) या मुलांच्या प्रतिक्रिया असतात. नीतिपाठांच्या बाबतीत व्यक्त होणारी ही प्रतिक्रिया टाळणे हे पालकांच्या व शिक्षकांच्या शैक्षणिक कौशल्यावर अवलंबून असते. प्रत्येक मुलाचे आत्मिक विश्व **जाणवणे,** आपला कोणाला विसर पडलेला नाही, आपल्या दु:खात, अपमानात, व्यथांत कोणीतरी सहभागी आहे हे मुलाला जाणवण्यास जेवढ्या अवधानाची व आत्मिक सामर्थ्याची गरज आहे तेवढे त्याला देण्याची क्षमता अंगी असणे हे शैक्षणिक कौशल्याचे सर्वात महत्त्वाचे अंग असले पाहिजे.

अन्याय्यपणे मुलाला अनुत्तीर्ण गुण देणे आणि त्यासाठी पालकांकरवी त्याला शिक्षा घडवून आणणे हा मुलाच्या दृष्टीने शिक्षकाने त्याच्यावर केलेला सर्वात मोठा अन्याय असतो. आपल्याला मिळालेल्या निकृष्ट गुणांबद्दल पालकाना कळविलेच पाहिजे अशी आग्रही वृत्ती शिक्षक धारण करीत असतात असे जर मुलाला आढळले तर शिक्षकाबद्दल व शाळेबद्दल मुलाच्या मनात कटुता निर्माण होते. बौद्धिक श्रमाचा त्याला तिटकारा वाटू लागतो. भावनेचा हा भरडपणा इतर लोकांबरोबरच्या व प्रथमत:, आपल्या पालकां-बरोबरच्या संबंधांत व्यक्त होऊ लागतो.

या भावनिक निगरगट्टपणाइतकी मुलाचा आत्मा विद्रूप करणारी इतर कोणतीही गोष्ट कल्पनेत आणणेही कठीण आहे आणि अन्याय हा या निगरग-दृपणाचा जनक आहे. या बेपर्वाईच्या वृत्तीमुळे मुलाची सुष्ट-दुष्टतेबद्दलची संवेदनक्षमता नष्ट होते. आपल्या भोवती सुष्ट-दुष्ट लोक आहेत याचे त्याला आकलनच होत नाही. लोकांबद्दलचा संशय व अविश्वास त्याच्या हृदयात ठाण मांडून बसतो आणि कटुतेचे तेच मुख्य उगमस्थान आहे.

आजकाल शिक्षणतज्ज्ञांमध्ये उत्तेजन आणि शिक्षा यांविषयीची चर्चा अनेक वेळा ऐकावयास मिळते. हे अत्यंत आकर्षक सिद्धांत एका दिवसाचे आयुष्य असलेल्या पतंगांप्रमाणे जन्माला येतात व विरून जातात... शैक्षणिक क्षेत्रातील सर्वात महत्त्वाचे उत्तेजन व सर्वात कडक (पण नेहमीच क्रियात्मक नसलेली) शिक्षा म्हणजे गुण हा त्यातलाच एक सिद्धांत. गुण हे अत्यंत धारदार शस्त्र आहे आणि त्याचा उपयोग करण्यासाठी प्रचंड कौशल्याची व क्षमतेची गरज असते.

या शस्त्राचा योग्य उपयोग करण्यासाठी प्रथमत: तुमचे मुलावर प्रेम असले पाहिजे. त्याला तसे सांगू नका, पण त्याच्याबद्दलच्या आस्थेतून ते प्रेम तुम्ही व्यक्त करा. "शिक्षक आपल्या कामावर फक्त प्रेम करू शकला

तर तो उत्तम शिक्षक ठरेल. शिक्षकाचे, आईवडिलांप्रमाणेच, फक्त आपल्या विद्यार्थ्यांवर प्रेम असेल तर ज्याने सर्व पुस्तके वाचली आहेत, पण ज्याचे ना आपल्या कामावर ना आपल्या विद्यार्थ्यांवर प्रेम अशा शिक्षकापेक्षा तो अधिक उत्तम ठरेल. निर्दोष शिक्षक म्हणूनच त्याची गणना केली जाईल", असे तोलस्तोयनी * म्हटले आहे.

संवेदनक्षमता हा असा गुणधर्म आहे की जो केवळ अभ्यासातून साध्य होणे अशक्यप्राय आहे. शिक्षकामधील मानवी संवेदनक्षमतेचे अधिष्ठान हे सर्वसाधारण बौद्धिक, नैतिक, सौंदर्यात्मक व भावनिक विकासाच्या जैव ऐक्यात सामावले आहे आणि हे ऐक्य म्हणजे उच्च शैक्षणिक पातळी व सामुदायिकातील नैतिक संबंधांमधील सामाजिक अनुभव या दोघांचेही पर्यवसान असते. प्रत्येक मुलाचे भवितव्य हा आपल्या सदसद्विवेकबुद्धीचा प्रश्न आहे, ज्या माणसाला आपण शाळेत शिकवितो त्या माणसाची विचार-शक्ती, आरोग्य व सुख आपल्या आत्मिक व बौद्धिक संपन्नतेवर अवलंबून आहे हे शिक्षकाला ठाऊक असले पाहिजे व त्याला ते जाणवले पाहिजे.

...दुसऱ्या इयत्तेतील व्याकरणाचा पाठ. नियमांचा अभ्यास केल्यानंतर आणि पाठ्यव्यवसायांचे विश्लेषण केल्यानंतर मुलानी स्वतंत्रपणे कामाला सुरुवात केली. आपल्या ज्ञानाला अधिक दृढता प्राप्त करून देणे आणि ते पडताळून पहाणे हे त्याचे उद्दिष्ट होते. या व्यवसायासाठी गुण ठेवण्यात आले होते. मुलानी केलेला व्यवसाय तपासून पहाताना मला असे आढळून आले की मिशा आणि पेत्रिकच्या व्यवसायात फारच चुका झाल्या होत्या. मी त्याना अनुत्तीर्ण गुण दिले असते तर ज्याना शिकण्याची खरोखरच तळमळीची इच्छा आहे अशा मुलाना "तुझ्या वर्गबंधूनी एक पाऊल पुढे टाकले, पण तू टाकले नाहीस" असे म्हटल्यासारखे वाटले असते व ती त्याना शिक्षा वाटली असती. उत्तम लेखन कसे करावे याची उदाहरणे देऊन मी त्यांच्या चुका सुधारल्या, पण त्याना गुण दिले नाहीत. वह्या परत करताना मी मुलाना सांगितले: "मिशा व पेत्रिकला गुण मिळाले नाहीत. तुम्ही उत्तम अभ्यास केला पाहिजे मुलानो. आता दुसरा पाठ्यव्यवसाय तुम्ही स्वत:हून करा आणि गुण मिळविण्याचा प्रयत्न करा."

असमाधानकारक कामासाठी आपल्याला गुण मिळत नाहीत ही गोष्ट

---

* लेव तोलस्तोय, संपूर्ण साहित्य, खंड ४, मॉस्को, राज्य ललित-वाङ्मय प्रकाशन, पृ. २६ (रशियनमध्ये).

मुलांच्या आता सरावाची झाली होती. पूर्ण केलेले काम हे अनिवार्यपणे पुढचे पाऊल असतेच असे नाही आणि ते तसे नसते म्हणून शिक्षकाकडून निर्णायक "शिक्षा" फर्माविण्यात येतेच असे नाही ही खात्री मुलांच्या मनात हळू हळू घर करू लागली. मुलाना यशाचा मार्ग बंद झाला नव्हता: आज त्याना जे जमले नव्हते ते त्याना पुढे जमेल, कदाचित आजही जमेल कदाचित उद्या. अनुत्तीर्ण गुण मिळालेल्या मुलाला बरबादीची जी एक भावना जाणवते, आपण आपल्या वर्गबधूंच्या एक पाऊल मागे पडल्याची जी भावना जाणवते ती मिशाला आणि पेत्रिकला अजिबात जाणवली नाही येथे पाठाच्या वेळी मुले म्हणत: "आम्हाला काही व्यवसाय सोडवायला द्या ना!" आणि मी त्याना तसा व्यवसाय देत असे. शाळेच्या वेळात ता व्यवसाय सोडविण्यासाठी मुले अवसर काढीत असत (आमची शाळेची वेळ आम्ही अशीच आखली होती की आपल्याला सर्वात आवश्यक वाटणारे काम करण्यास प्रत्येक विद्यार्थ्याला दररोज अर्धा तास मिळत असे). गुण मिळविण्यासाठी, आपण इतरांपेक्षा कमी नाही हे दाखविण्यासाठी मुले आपले सारे प्रयत्न पणाला लावीत. मी त्यांचे काम तपासीत असे आणि अशा प्रसंगी जवळ जवळ नेहमीच घडत असे त्याप्रमाणे, त्यांचे काम उत्तम गुण मिळविण्याच्या पात्रतेचे असे.

नेमून दिलेल्या ज्या कामामध्ये सृजनशील बौद्धिक ताकद, तर्कविचार आणि संशोधन यांची गरज असते अशा कामाच्या बाबतीत एक प्रेरणा म्हणून गुणांचा सावधानतेने उपयोग करणे हे अभ्यासाची आच जागृत करण्याच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचे आहे. एका विद्यार्थ्यामध्ये विचारप्रक्रिया ही जलद व निर्णायक स्वरूपात घडते; दुसऱ्यामध्ये ती मंद गतीने घडते. पण त्याचा अर्थ असा नव्हे की एक मूल दुसऱ्यापेक्षा अधिक चलाख असते किंवा ते अधिक अभ्यास करते. प्राथमिक शाळेतील अंकगणिताचे धडे, उदाहरण सोडविण्याची क्रिया हा शिक्षणाच्या पहिल्या नियमतत्त्वांचा निकर्ष आहे. आणि हे नियमतत्त्व म्हणजे मुलाना बौद्धिक श्रमांतील यशाचा आनंद देणे. अभिमानाची आणि स्वत्वाची भावना त्यांच्या मनात जागृत करणे हे आहे. पहिल्या अडचणी या मुलाच्या मार्गातील अडथळे ठरणार नाहीत याची आपण खात्री करून घेतली पाहिजे. मुले जोपर्यंत स्वतंत्रपणे विचार करण्यास शिकली नव्हती, उदाहरणाची फोड करण्यास शिकली नव्हती, ते उदाहरण सोडविण्याचा मार्ग शोधून काढण्यास ती शिकली नव्हती – थोडक्यात अभ्यासातील यशाचा आनंद अनुभविण्यास जोपर्यंत ती शिकली नव्हती तोपर्यंत

उदाहरणे सोडविण्यासाठी मी त्याना गुण दिले नाहीत. येथे नेहमीचा रूढ दृष्टिकोन स्वीकारून चालणार नाही: एका महिन्यात एका मुलाला अंकगणितात तीन गुण मिळतील तर दुसऱ्याला एकही मिळणार नाही. पण त्याचा अर्थ असा नव्हे की त्या दुसऱ्या मुलाने काहीच केलेले नसते आणि काहीच प्रगती साधलेली नसते. ते उदाहरण समजावून घेण्यास ते मूल शिकलेले असते; आणि विद्यार्थी स्वतंत्रपणे अंकगणितातले तुलनात्मकरित्या जटिल असे जे पहिले उदाहरण सोडवितो ते त्या मुलाच्या विकासातले एक महत्त्वाचे पाऊल असते.

गणितात ज्याना यश मिळाले नव्हते अशा विद्यार्थ्यांचे अनेक वर्षे मी अवलोकन केले, आणि माझी खात्री पटली आहे की प्राथमिक व माध्यमिक शाळेत जी मुले मागे रहातात त्यानी एकही उदाहरण कधीही स्वतंत्रपणे सोडविलेले नसते. ती प्रवाहाबरोबर वहात असतात आणि आपल्या वर्गबंधूनी जेथे आधीच पाय टेकलेले असतील तेथे ती आपले पाय टेकतात: फळयावर सोडविलेली उदाहरणे किंवा आपल्या शेजारच्या मुलाच्या वहीतील उदाहरणे ती जशीच्या तशी उतरवून काढतात, पण स्वतः उदाहरण कसे सोडवायचे याचे त्याना मुळात सुतराम ज्ञान नसते.

निगमनात्मक प्रभुत्वप्रक्रियेत सुधारणा घडवून आणण्याची एखादी पद्धत शोधून काढून ही अडचण दूर करणे अशक्यप्राय आहे. गणिताच्या पाठातील बौद्धिक श्रम ही विचारक्रियेची कसोटी आहे. मूल विचार करायला शिकलेले नसते हे या समस्येचे कारण आहे. वस्तू, घटना, परस्परावलंबन व परस्पर संबंध यानी परिप्लुत असलेले सभोवतालचे जग हे त्याच्या विचारांचे उगमस्थान बनलेले नसते. निसर्गाच्या "सफरी" ही अगदी लहान वयापासून बौद्धिक श्रमाची खरीखुरी शाळा बनली तर एकही विद्यार्थी गणितात अपयशी ठरणार नाही असे अनुभवावरून दिसून येते. वस्तुमात्राने मुलाला विचार करावयास शिकविले पाहिजे: सुरळीत वाढ असलेली सर्व मुले हुशार, तरतरीत, जिज्ञासू व चौकस बनावीत याची हमी निर्माण करण्याच्या दृष्टीने ही एक असाधारणरित्या महत्त्वाची अशी अट आहे. एखाद्या विद्यार्थ्याला एखादी गोष्ट समजत नसेल, पाण्याबाहेर काढलेल्या माशाप्रमाणे त्याचे विचार असहायपणे इतस्ततः धडपडत असतील तर शिक्षकानी आपल्याच कामाकडे जरा नीट नजर टाकावी असा मी शिक्षकाना सल्ला देत असे. त्यांच्या विद्यार्थ्यांची मने वस्तुविश्वापासून, निसर्गघटनांपासून – विचारांच्या या महान, जीवनदायी स्रोतापासून – तोडली जाऊन आटत जाणाऱ्या एखाद्या छोटया

सरोवरासारखी तर बनलेली नाहीत ना याचा त्यानी विचार करावा. हे छोटे सरोवर निसर्ग, वस्तुमात्र आणि सभोवतालचे जग यांच्या महासागराला जोडा आणि मग पहा जिवंत विचारांचा झरा त्यातून कसा खळाळून पुढे झेपावतो ते.

पण सभोवतालचे जग स्वतः मुलाला विचार करावयास शिकविते अशी कल्पना करणे चुकीचे ठरेल. तात्त्विक विचारक्रियेशिवाय वस्तू मुलांच्या नजरेपासून एखाद्या अभेद्य भिंतीआड दडाव्यात तशा दडून रहातात. आपल्या सभोवतालच्या परिसरापासून मूल स्वतःला अलग करू शकले तरच निसर्ग ही बौद्धिक श्रमाची पाठशाळा बनते. वास्तवाच्या सुस्पष्ट प्रतिमा अंगी मुरविणे आणि क्रियाप्रतिक्रिया हे सभोवतालच्या जगाचे एक महत्त्वाचे वैशिष्टच आहे हे ओळखणे हे मुलाच्या दृष्टीने अत्यावश्यक आहे. क्रियाप्रतिक्रिया हे सर्व अस्तित्वाचे अंतिम कारण आहे या हेगेल यांच्या विचाराच्या अचूकतेवर भर देताना एंगल्सनी म्हटले आहे: "या क्रियाप्रतिक्रियेच्या ज्ञानाच्या आणखी पलिकडे आपण जाऊ शकत नाही आणि त्याचे एकमेव कारण हे आहे की त्याच्या पलिकडे ज्ञान होण्यासारखे असे काहीच नाही."* अमूर्त विचारक्रियेची थेट सिद्धता म्हणून क्रियाप्रतिक्रियेचे ज्ञानग्रहण ही गणिती विचारक्रियेच्या विकासाची एक महत्त्वाची अट आहे. वस्तू आणि घटना यांमधील क्रियाप्रतिक्रिया मुलाना दिसते की नाही यावर उदाहरणांची यशस्वी सोडवणूक अवलंबून असते.

ज्या सर्वसाधारणीकरणांशिवाय विचारक्रियाही निरर्थक ठरते (पाढे व अंकलिपी) ती सर्वसाधारणीकरणे मुलाच्या स्मृतिकोशात दृढपणे व कायमची साठवली जातात तेव्हाही उदाहरणे सोडविण्याच्या प्रक्रियेतील स्वतंत्र बौद्धिक श्रम हे फलद्रूप ठरतात.

अंकगणितातल्या एका उदाहरणात काय सांगितले आहे आणि काय विचारले आहे हे पेत्रिकच्या दीर्घ काळपर्यंत लक्षात रहात नव्हते. ते समजावून सांगण्याची मी घाई केली नाही. त्याच्या स्वतःच्या बौद्धिक प्रयत्नांच्या द्वारे वस्तू आणि घटना यांमधील परस्परावलंबनाचा गाभा त्या छोटया मुलाला समजणे ही मुख्य गोष्ट होती. पण तात्त्विकदृष्टया विचार करण्याची मुलाची सिद्धता नसेल, त्याला जर तुलना आणि पृथक्करण करता येत नसेल तर

---

*फ्रेडरिक एंगल्स, 'निसर्गाचा विरोधविकासवाद', प्रगती प्रकाशन, मॉस्को, १९७४, पृ. २३१-२३२ (इंग्रजीमध्ये).

जिवंत विचार उसळी मारून पुढे येणार नाही. मी मुलाना निसर्गाकडे घेऊन गेलो, त्याना पुनःपुन्हा निरीक्षण करण्यास शिकविले, वस्तू, गुणधर्म आणि घटना यांची तुलना करण्यास शिकविले – क्रियाप्रतिक्रिया पहाण्यास शिकविले. ज्यांद्वारे मुलाच्या जाणिवेत गुणकतत्त्वाचे ठसे उमटतात, एकूण वस्तूंचा एक महत्त्वाचा गुणधर्म म्हणून अंकांचे ठसे उमटतात अशा सभोवतालच्या जगातील घटनांकडे मी पेत्रिकचे लक्ष वेधले. मी असा एक बिंदू गाठला की जेथे त्या मुलाला संख्यात्मक परस्परावलंबनाची जाण आली, हे अंक कोणीतरी डोक्यातून काढले नसून ते प्रत्यक्ष अस्तित्वात आहेत याबद्दल त्याची खात्री पटली. येथे अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे ती विद्यार्थी ताबडतोब गणित करावयास शिकला की नाही, आकडेमोड करावयास शिकला की नाही ही नव्हे तर परस्परावलंबनाच्या प्रत्यक्ष आशयाचा त्याने विचार केला की नाही ही आहे.

आम्ही कलिंगडाच्या शेतातल्या एका कुटिरात बसलो होतो आणि गहू गोळा करणारी कापणीमळणी यंत्रे पहात होतो. मधून मधून एक लॉरी गहू भरून या यंत्राकडून निघून जात होती. यंत्राचा गाळा भरायला किती मिनिटे लागत होती? मुलानी उत्कंठेने घड्याळाकडे पाहिले आणि गाळा भरायला सतरा मिनिटे लागत असल्याचे त्याना दिसले. यंत्र थांबायला लागू नये म्हणून लोकानी कामाची आखणी कशी केली असेल? आता गाळा भरायला पाच मिनिटे राहिली होती, मग चार, मग तीन – मुले आता घाबरली: एकूण कापणीमळणी यंत्राला थांबावे लागणार हे निश्चित. इतक्यात, गाळा भरायला दोन मिनिटे उरली असता, रानाच्या झाडीतून एक ट्रक बाहेर पडला. परंतु धान्याच्या कोठारापर्यंत जायला तर एक संपूर्ण तास लागत होता. याचा अर्थ असा होता की अंतर आणि वेळ यांचे परस्परावलंबन लोकानी हिशेबात घेतले होते. न थांबता कापणीमळणी यंत्र चालू रहावे म्हणून धान्य भरून नेण्यासाठी जितक्या लॉऱ्यांची गरज होती तितक्या लॉऱ्या लोकानी कामाला लावल्या होत्या. पण धान्यकोठारापर्यंत पोहोचायला लॉरीला एका तासाऐवजी दोन तास लागले असते तर धान्य वाहून नेण्यासाठी अधिक लॉऱ्यांची गरज लागली असती का कमी?

"अर्थातच, अधिक लॉऱ्यांची", पेत्रिक म्हणाला आणि त्याचे डोळे आनंदाने चमकले. "आता तेथे तीन लॉऱ्या सतत काम करीत आहेत. एका लॉरीत धान्य भरले जात आहे, दुसरी लॉरी रिकामी केली जात आहे. रस्ता जर अधिक लांब असता तर त्याना अधिक लॉऱ्या लागल्या असत्या".

ते मूल आता आपले बौद्धिक बळ उपयोगात आणीत होते; आणि

रस्त्याची लांबी दुप्पट असती तर किती लॉऱ्या लागल्या असता याचा विचार करायला त्याने आधीच सुरुवात केल्याचे मला दिसून आले. पण सांप्रत ती गोष्ट महत्त्वाची नव्हती. महत्त्वाची गोष्ट होती ती ही की उदाहरणे म्हणजे कोणाच्यातरी कल्पनेतून निघालेल्या मिथ्या गोष्टी नव्हेत हे पेत्रिकला समजले. आपल्या भोवतालच्या जगात उदाहरणे अस्तित्वात आहेत त्याचे कारण गती, जीवन व मानवी श्रम यांचे अस्तित्व आहे म्हणून.

पेत्रिक आता तिसऱ्या इयत्तेत होता, पण उदाहरणे सोडविण्यात त्याला अजून यश आले नव्हते. एकही उदाहरण त्याने अजून स्वतंत्रपणे सोडविले नव्हते; आपल्या वर्गबंधूंची किंवा शिक्षकाची त्याला मदत घ्यावी लागत होती. आणि त्याचीच मला चिंता वाटत होती. तरीही पेत्रिक विचार करणार आहे याबद्दल माझी खात्री होती. अंकगणिताच्या उदाहरणांच्या मुळाशी असलेल्या गोष्टींच्या विचारपूर्वक विश्लेषणाच्या द्वारेच केवळ अमूर्त विचार-क्रियेसाठी मी त्याची तयारी करीत नव्हतो. विचार करणाऱ्या माणसाला अंक मोजता आले नाहीत तर त्याला ज्ञानही आत्मसात करता येणार नाही. ज्या प्राथमिक गोष्टींशिवाय विचारक्रिया अशक्यप्राय ठरते त्या प्राथमिक गोष्टींविषयीची आपली स्मरणशक्ती पेत्रिकने हळू हळू बळकट करणे अत्यंत महत्त्वाचे होते. "अंकगणित मंजुषे" पाशी बसून आपलेच काम तपासून पहात त्या मुलाने सराव सुरू केला. १२ – ८, १९ + १३, ४१ – १९ म्हणजे किती याची चिंता करण्यापेक्षा उदाहरणात काय सांगितले आहे आणि काय विचारले आहे हे त्याला समजावे असा मी प्रयत्न केला. (तिसऱ्या इयत्तेतील मुलगा वरील साध्या गोष्टीचा विचार करू लागला तर त्याला उदाहरणे कधीच सोडविता येणार नाहीत).

जेथे प्राथमिक गोष्टींचा अधिक विचार करण्याची आवश्यकता नसते, आणि अमूर्त विचारक्रियेकडे विद्यार्थ्यांचे संपूर्ण बळ वळविता येणे शक्य होते अशा बिंदूपर्यंत विद्यार्थ्यानी अंकलिपीचा विचार केलेला नसतो म्हणूनच केवळ बीजगणितात विद्यार्थी अनेक वेळा कच्चे रहातात अशी अनुभवाने माझी खात्री पटली आहे. शब्दांमध्ये जे अक्षरघटक असतात ते मुलाने जर हजार वेळा वाचले नसतील तर वाचन ही जशी निम-स्वयंचलित प्रक्रिया बनू शकत नाही त्याचप्रमाणे उत्तरे तोंडपाठ असल्यामुळे ज्या उदाहरणांचा लोक दैनंदिन व्यापारात विचारही करीत नाहीत अशी डझनावारी आणि शेकडोवारी उदाहरणे मुलाच्या लक्षात राहिली नाहीत तर अमूर्त गणिती विचारपद्धती ही सात मोहोरानी बंद केलेल्या पेटीसारखीच बंदिस्त रहाते. बेरीज,

ाबाकी, गुणाकार व भागाकार यांची उदाहरणे ही गणिती विचारपद्धती-
ो अगदी साधी अवजारे आहेत, आणि मंद गतीने विचार करणाऱ्या
ानी, व प्रथमत: पेत्रिकने, अधिकाधिक प्रमाणात अशा उदाहरणांवर
भुत्व मिळवावे असा मी प्रयत्न केला.

आम्ही निसर्गाकडे गेलो आणि काम करता करता लोक जी उदाहरणे
ाडवितात अशा खंडोगणती उदाहरणांकडे मी पेत्रिकचे लक्ष वेधले. पेत्रिक
ाता स्वत:हून उदाहरणे सोडवू शकेल याबद्दल माझी ठाम खात्री पटली
ाणि अखेरीस तो दिवस खरोखरच उजाडला. त्या छोटया मुलाचे डोळे
ाजळले. उदाहरण काय आहे हे तो समजावून देऊ लागला; त्याच्या
पष्टीकरणात काहीसा गोंधळ होता, पण आतापर्यंत जे धुक्यात गुरफटले
ले होते असे काहीतरी त्या मुलासमोर उलगडू लागल्याचे मला दिसून आले.
त्रिकला आनंद झाला होता. मलाही हायसे वाटले – शेवटी ते साधले होते.
ाळा सुटेपर्यंत पेत्रिकला धीर धरवेना; केव्हा एकदा धावत धावत घरी
ातो आणि आपल्या आईला सांगतो असे त्याला झाले होते. त्याची आई
री नव्हती, तेव्हा त्याने हर्षभराने आपल्या आजोबाना सांगितले, "मी
ाज अगदी स्वत: उदाहरण सोडविले." पेत्रिकला आपल्या यशाचा अभिमान
टत होता, आणि विशुद्ध नैतिक अभिमान हा मानवी स्वाभिमानाचा झरा
ाहे. आपल्या कामामध्ये ज्याला अभिमानाची भावना जाणवत नाही तो
ग माणूसच नव्हे.

या गोष्टीने आमच्या शैक्षणिक सामूहिकाच्या विचाराना खाद्य मिळाले.
भ्यास ज्याना अडचणीचा जात होता अशा मुलांकडे आम्ही नव्या नजरेने
हू लागलो. मुलाला काही समजूच शकणार नाही आणि ही वस्तुस्थिती
ान्य करून जगण्याशिवाय त्याला दुसरे गत्यंतर नाही अशा ठाम निष्कर्षाकडे
ीही उडी मारू नका. कदाचित एक वर्ष, कदाचित दोन वर्षे, कदाचित
ीन वर्षे त्याला नीट समजणार नाही; पण जसजसा काळ जाईल तसतसे
शिकू लागेल. विचार हा फुलासारखा आहे; हळू हळू ते जीवनरस गोळा
ीत असते. मुळाना जर आपण या रसांचा पुरवठा केला आणि फुलाला
प्रकाश दिला तर ते उमलू लागेल. विचारांचा मूलस्रोत – सभोवतालचे
ा – आपण मुलासमोर खुले करून आपण मुलाला विचार करायला शिकवू
. एक महान मानवी आनंद – ज्ञानग्रहणाचा आनंद – आपण त्याला देऊ
.

खास या अत्यंत अवघड, गंभीर शैक्षणिक प्रश्नांवर विचार करण्यासाठी

संध्याकाळी अनेक वेळा प्राथमिक शाळेचे शिक्षक एकत्र जमत असत. प्रत्यक्ष वस्तूंच्या द्वारे केलेल्या मोजणीपासून, घटनांमधील उघड, गोचर परस्परावलंबनापासून अमूर्त सर्वसाधारणीकरणापर्यंत – नियमांपर्यंत व सूत्रांपर्यंत – विद्यार्थ्याला कसे घेऊन जावयाचे? सर्व मुलांमध्ये हे स्थित्यंतर सहजतेने व विनासायास घडून येत नाही या अत्यंत उद्‌बोधक मुद्याबिषयी आम्ही बोललो. असेही काही विद्यार्थी आहेत की जे गणिताचे तंत्र उत्तम हाताळू शकतात – अतिशय जलद ते गणित करू शकतात – पण उदाहरणात काय सांगितले आहे आणि काय विचारले आहे हे काहीशा प्रयासानेच त्याना कळते. जी मुले सरळस्पष्ट, स्पर्शगोचर, वस्तुबद्ध रूपात विचार करतात अशा मुलांच्या बाबतीत विशिष्ट उदाहरणात दिलेल्या मूर्त आकड्यांपासून बाजूला सरकताना निश्चित अडचणी निर्माण होतात. दाखल्यादाखल सांगावयाचे झाल्यास काही मुले उदाहरण वाचतात आणि ताबडतोब उत्तर देण्याचा प्रयत्न करतात; आपण विशिष्ट आकडेमोड का करीत आहोत याचे कारण न उमजताच ती आकडेमोडीला सुरुवात करतात.

आपण सर्वांनी अशी मुले पाहिली आहेत. या मुलाना वस्तुबद्ध विचारक्रियेपासून अमूर्त विचारक्रियेकडे कसे नेता येईल याविषयी आम्ही परस्परांशी विचारविनिमय केला. आकड्यांचा किंवा अंकगणिताच्या विविध रीतींचा उपयोग न करता उदाहरणात काय सांगितले आहे आणि काय विचारले आहे याची फोड करून उदाहरण सोडविण्याच्या संपूर्ण टप्प्यातून त्यानी गेले पाहिजे असा आम्ही निष्कर्ष काढला. एका विशिष्ट हेतूने अंकगणिताचे खुले पाठ घेण्यास आम्ही सुरुवात केली. मुले उदाहरणाची फोड कशी करतात आणि आकड्यांशिवाय ती ते उदाहरण कसे सोडवितात हे दाखविणे हाच तो हेतू होता. एकमेकांच्या पाठाला हजर राहून ज्या मुलाना अडचणी होत्या अशा मुलांच्या बौद्धिक विकासाच्या मार्गांचा आम्ही शोध घेतला.

मुलांचे विचार शृंखलाबद्ध करणाऱ्या बेड्यांत आपण गुणांचे रूपांतर होऊ देता कामा नये. जे विद्यार्थी अतिशय कच्चे होते, ज्यांची बुद्धी विशिष्ट तात्पुरत्या काळापुरती अनिवार्यतया मंद वाटत होती अशा विद्यार्थ्यांना त्या समयी तरी त्याना न समजलेल्या गोष्टींविषयी विचार करण्याची मी संधी देत असे. त्यामुळे मुलांचे अभ्यासातले स्वारस्य कधीच नष्ट झाले नाही. मुलांच्या मनात अभिमानाची, आत्मप्रतिष्ठेची आणि स्वत्वाची भावना निर्माण करीत असताना मुलाना स्वतंत्रपणे काम करण्याची तळमळ होती असे मला आढळून आले.

**मुलाला विचार करू द्या...** प्रथमदर्शनी वाटते तेवढी ही साधी गोष्ट नाही. विद्यार्थ्यांच्या बौद्धिक श्रमाचे पहिल्या इयत्तेपासून चवथ्या इयत्तेपर्यंत अत्यंत काळजीपूर्वक निरीक्षण करा, आणि तुम्हाला असे आढळून येईल की बव्हंश बाबतीत (आणि जवळ जवळ नेहमी तसेच घडते) तुमच्या प्रश्नाला मुलाकडून उत्तर मिळत नाही (किंवा दिलेले काम ते पुरे करीत नाही); त्याचे अगदी साधे कारण असे आहे की मुलाला विचार करायला किंवा एकाग्रता साधायलाच वेळ मिळालेला नसतो (किंवा कधी कधी असे घडते की मुलाला अगदी अनपेक्षितपणे तो प्रश्न विचारला जातो व त्याची मती कुंठित होते). मुलाला विचार करायला वेळ कसा द्यावयाचा याची चर्चा करण्यासाठी आमच्या प्राथमिक शिक्षकांच्या खास बैठका भरत असत. आम्ही असा निष्कर्ष काढला की मुलाला उत्तर ठाऊक आहे की नाही हे ठरविण्याची आपण कधीही घाई करता कामा नये. अनेक वेळ असे घडते की उत्तर जिभेवर आलेले असतानाच शिक्षक मुलाला सांगतात, "बस, खाली बस. तुला उत्तर ठाऊक नाही." वास्तविक मुलाला उत्तर ठाऊक असते, आणि शिक्षकाच्या या कृत्यामुळे त्याला आपला अपमान झाल्यासारखे वाटते. असे का घडते? आम्हाला त्याचे उत्तर ताबडतोब शोधून काढता आले नाही. पुनःपुन्हा आम्हाला अवलोकन करावे लागले होते आणि अनेकविध गोष्टींचा अभ्यास करावा लागला होता.

मनाच्या व विचारांच्या एकाग्रतेने ज्याने आपले ध्येय साध्य केले आहे अशा मुलाला कुणीतरी हळूच उत्तर सुचविणे किंवा लबाडी करणे या गोष्टींचा तिटकारा वाटतो. माझ्यामध्ये व मुलांमध्ये नेहमीच परस्पर विश्वासाचे व सदिच्छेचे एक वातावरण वसत होते. प्रयत्नांची पराकाष्ठा करूनही आपल्याला एखादी गोष्ट समजली नाही किंवा आपण दिलेले काम पुरे केले नाही तर माझ्याजवळ तसे उघड करायला माझ्या विद्यार्थ्यांना कधीच भीती वाटत नसे. आपला सारा आनंद व आपली सारी दुःखे विद्यार्थी मला सांगत असत. मुलांच्या मनावर मी कधीच दुःखाची ओझी ठेवली नाहीत; आणि अनुत्तीर्ण गुण हे मुलांच्या दृष्टीने सर्वात मोठे दुःख असते. "बघ, पुन्हा तू नापास झालास", असा शिक्षकाकडून जेव्हा जवळ जवळ दररोज मुलावर भडिमार केला जातो तेव्हा मुलाचे मन विकृत बनते. मूल आनंदाला पारखे होण्यासाठी फारशा दुःखाची गरज नसते. आणि हा छोटा माणूस दुःखाला जेव्हा सरावतो आणि आपल्या भोवतालच्या सर्व गोष्टींबद्दल उदासीन बनतो तेव्हा ही शोकांतिका अधिकच दुणावते; मुलाचे अंतःकरण मुर्दाड बनते. आणि मुर्दाड हृदय

ही क्रौर्याची अत्यंत सुपीक अशी भूमी आहे. वर्गात आनंदाला पारखी झालेली मुले असतील आणि त्याना त्या व्यथेतून बरे करण्यासाठी त्याच्या वर्गबंधूनी प्रयत्न केले नाहीत तर सामूहिक हे कधीही एक चांगले, स्नेहशील, सदिच्छापूर्ण सामूहिक बनणार नाही.

उत्तम गुणानी आपण विद्यार्थ्याला कधीही बिघडवू देता कामा नये. शाळेमध्ये अनेक वेळा असे घडते. मुलाने नुसता एक शब्द उच्चारायची खोटी की त्याला सर्वोच्च गुण दिले जातात. अनेक वेळा असेही घडते की तोच प्रश्न अनेक विद्यार्थ्यांना विचारला जातो आणि प्रत्येकाला त्याच्या उत्तरासाठी गुण मिळतात. परिणामी, मुले अभ्यासाचा गंभीरपणे विचारच करीनाशी होतात. बौद्धिक श्रमाची फलश्रुती म्हणूनच मुलाला नेहमी गुण मिळाले पाहिजेत.

बौद्धिक कार्य हे असे कार्य आहे की ज्याच्यासाठी फार मोठ्या ताकदीची, मनाच्या एकाग्रतेची आणि अनेक प्रकारच्या आनंदांचा स्वतःहून त्याग करण्याच्या क्षमतेची गरज असते हे मुलाला पटवून दिले पहिजे. मनोबल व चिकाटी आकार धारण करते ती नेमक्या श्रमाच्या वातावरणात. जे मूल साध्य केलेल्या फलश्रुतींकडे चिकित्सकबुद्धीने पहायला शिकते व आपल्या कामामध्ये अपयशाचा अनुभव घेते ते मूल अधिक मेहनतीने व अधिक चांगले काम करण्याचा प्रयत्न करते व अशा मुलाला आळस कधीही शिवत नाही.

बौद्धिक श्रमात यशस्वी कसे व्हावयाचे याची व्यक्तिगत अनुभवातून ओळख पटल्यामुळे मुलाना आत्मसंयमाची शिकवण मिळते. मेहनतीने काम करण्याच्या व उत्कृष्ट फलश्रुती संपादन करण्याच्या संवयीमुळे निष्काळजीपणे पुरे करण्यात आलेले काम, ऐदीपणा आणि हेळसांडवृत्ती सहन न करण्याचे मुलाना शिक्षण मिळते.

कामाचा आनंद आणि अभ्यासातील यश ही जेव्हा अभ्यासाची मुख्य प्रेरणा बनते तेव्हा वर्गात एकही आळशी मूल रहात नाही. खरेखुरे शिक्षणक-लामहर्षि प्रत्येक विद्यार्थ्यातील आळशीपणाशी स्वतंत्रपणे झगडण्याचा क्वचितच प्रयत्न करतात; आळशीपणा हा मनाच्या झोपाळू वृत्तीचा परिणाम आहे असे ते मानतात.

बौद्धिक श्रमाच्या निश्चित फलश्रुतींसाठी गुण हे अधिष्ठान मानून त्या अधिष्ठानावर उभारण्यात आलेल्या पद्धतीने संपूर्ण शाळेत मूळ धरले; माध्यमिक इयत्तांच्या व वरच्या इयत्तांच्या शिक्षकानीही या पद्धतीचा अंगिकार केला. तिमाहीनंतर किंवा शाळेच्या संपूर्ण वर्षभरानंतर एखाद्या विद्यार्थ्याला

या ना त्या विषयात अजून एकही गुण मिळाला नाही तर त्याचे काय असे कदाचित काही वाचक विचारतील. वस्तुस्थिती अशी आहे की गुण न मिळणे या गोष्टीची अनुत्तीर्ण गुण मिळाल्यामुळे मुलावर जी महान आपत्ती ओढवते त्याच्याशी तुलना करता येणार नाही. आपल्याला अजून गुण मिळालेले नाहीत यावरून विद्यार्थ्यांची फक्त खात्री पटत होती की आपण जसे काम करायला हवे होते तसे अजून केलेले नाही. म्हणूनच वर्षअखेरी विद्यार्थ्याला गुण मिळाले नाहीत असे सहसा कधी घडले नाही. तिमाहीनंतर मी गुण दिले नाहीत असे चार वर्षांत फक्त सहादा घडले. आपल्या मुलाला किंवा मुलीला गुण मिळाले नाहीत याचा अर्थ कुठेतरी उणीव आहे हे पालकाना ठाऊक होते. त्याना हेही ठाऊक होते की गुण न मिळणे हा मुलाचा दोष नसून ते त्याचे कमनशीब आहे. आणि अशा बाबतीत आपण मदतीसाठी पुढे सरसावले पाहिजे; म्हणून आम्ही सर्व मिळून त्या विद्यार्थ्याला मदत करीत असू. पालकानी आपल्या मुलांकडून सर्वोच्च गुणांची कधीही मागणी करू नये किंवा अनुत्तीर्ण गुण म्हणजे आळसाचे, हेळसांडवृत्तीचे किंवा अपुऱ्या मेहनतीचे लक्षण आहे असे कधीही मानू नये असे मी पालकाना पटवून दिले.

गुण हे नाजूक शैक्षणिक हत्यार असून काही शिक्षक ते अविचारीपण हाताळतात. अनेक शाळांमध्ये सरासरी गुण हे दूषणास्पद ठरविले जातात. "आम्ही अभ्यास करताना सरासरी गुण मिळविणार नाही!" अशी आवाहने केवळ बालवीरांच्या सभांमध्येच ऐकायला मिळतात असे नाही; मुलांच्या नियतकालिकांतूनही आपल्याला ही आवाहने वाचायला मिळतात. विद्यार्थ्यांनी समाधानकारक अभ्यास करावा म्हणून विद्यार्थ्यांमध्ये अशा वृत्तीला खतपाणी घालताना स्वतःच्या हाताने शिक्षक मूलतः स्वतःचेच नाक कापून घेत असतो; त्यान्वये मुलाना तो वरपांगीपणाची व उथळपणाचीच शिकवण देत असतो.

दुसऱ्या इयत्तेला सुरुवात झाल्यानंतर काही आठवड्यानी मुलानी स्वतः-साठी छोटी पुस्तके तयार केली. पाठाच्या वेळी त्याना मिळालेले गुण मुलानी त्यांत लिहावयाचे होते. मुलानी आपल्या पालकांपासून गुण लपविण्याचा प्रयत्न केला आहे असे एकदाही घडले नाही. गुणांमध्ये यशाचा आनंद प्रतिबिं-बित झाला असेल तर यापेक्षा दुसरे काही घडणेच शक्य नसते. प्रगति-पुस्तकावर सह्या असल्याच पाहिजेत याची शिक्षकाना वास्तविक काहीही आवश्यकता नाही. शाळेमध्ये ज्या काळी शिक्षक व विद्यार्थी यांच्यामध्ये परस्पर अविश्वासाचे व संशयाचे वातावरण होते त्या जुन्या जमान्याचा तो अवशेष आहे. वर्गामध्ये जर परस्पर विश्वासाचे वातावरण नसेल, मूल शिक्षकाशी

खोटे बोलण्याचा प्रयत्न करीत असेल, प्रौढानी मुलाला झोडपण्यासाठी उगारलेला एक चाबूक म्हणून गुणांचा वापर केला जात असेल तर खऱ्या शिक्षणाचा मूळ पायाच जमीनदोस्त होऊन जाईल.

मुलामधील अन्यायाची भावना आणि शिक्षकांशी व पालकांशी खोटा व्यवहार ही शालेय जीवनात घडणारी एक सर्वात मोठी अनिष्ट गोष्ट आहे; आणि अन्याय्यपणे दिलेल्या अनुत्तीर्ण गुणांबरोबर त्या गोष्टीला प्रारंभ होतो. आपल्या पालकांपासून आपले अपयश लपवून ठेवण्यासाठी आणि आपल्या शिक्षकांपासून आपली हेळसांडवृत्ती दडवून ठेवण्यासाठी मुले अशा युक्त्याप्रयुक्त्यांचा अवलंब करतात. विद्यार्थ्यांवर तुम्ही जेवढा कमी विश्वास ठेवाल तेवढ्या अधिक थापा तो शोधून काढील आणि आळशीपणाला व हयगयीला तेवढी अधिक भूमी अनुकूल होईल. आळस हे अविश्वासाचे अपत्य आहे. माझे विद्यार्थी ही प्रथम जिवंत माणसे आहेत, मुले आहेत, मग विद्यार्थी आहेत. मी त्याना दिलेले गुण हे केवळ त्यांच्या ज्ञानाचे मोजमाप नाही, तर प्रथमतः, माणसे म्हणून त्यांच्याशी मी निर्माण केलेले ते संबंध आहेत.

मुलामधील जिज्ञासेची व कुतूहलाची अग्निज्योत, त्यांची ज्ञानतृष्णा बहुमोलाने जतन करून ठेवा असा मी शिक्षकाना सल्ला देत असे. या ज्योतीचे पोषण करणारे एकमेव साधन कोणते असेल तर ते आहे श्रमातील यशाचा आनंद, श्रमिकाबाबत वाटणारी अभिमानाची भावना. यशाचे फळ, अडचणींवर मात करण्याच्या प्रयत्नांचे फळ योग्य गुणांच्या द्वारे मुलाच्या पदरात टाका, पण गुणांचा दुरुपयोग करू नका; ज्या भूमीवर आपल्या शैक्षणिक कौशल्याची उभारणी होत आहे ती भूमी आहे प्रत्यक्ष मूल, आणि ज्ञानाकडे व शिक्षकाकडे पहाण्याची त्याची दृष्टी हे विसरू नका असे मी शिक्षकाना सांगत असे. ही आहे तळमळ – शिकण्याची, प्रेरणा घेण्याची आणि अडचणींवर मात करणाऱ्या सिद्धतेची. ही भूमी अत्यंत दक्षतापूर्वक समृद्ध केली पाहिजे; कारण तिच्याशिवाय पाठशाळा ही चीजच असू शकत नाही.

## परीकथांची कोठी

परीकथा, खेळ, अद्भुतरम्यता ही मुलांच्या विचारक्रियेची, सहृदय भावनांची आणि सद्भावपूर्ण हेतूंची जीवनदायी उगमस्थाने आहेत. मुलांच्या विचारक्रियेतील जिवंत बेटांमध्ये विचारप्रवाहांचे धागे जोडून परीकथात्मक प्रतिमा विचारांच्या ओघाला चालना देतात आणि मेंदूला जाग आणतात.

या परीकथात्मक प्रतिमांच्या प्रभावाखाली मुलाच्या मनात सौंदर्यात्मक, नैतिक आणि बौद्धिक भावना उदय पावतात असे अनेक वर्षांच्या अनुभवातून दिसून आले आहे. मुलांच्या मनातील परीकथात्मक प्रतिमांच्या द्वारे शब्दांच्या नाजूक छटा प्रकट होतात आणि त्या मुलाच्या आत्मिक जीवनाचे क्षेत्र बनतात, विचार आणि भावना व्यक्त करणारी साधने बनतात, विचारक्रियेची ती एक वास्तवता बनते. परीकथात्मक प्रतिमांच्या द्वारे प्रकट झालेल्या भावनांच्या प्रभावाखाली मूल शब्दांतून विचार करायला शिकते. मुलाच्या मनाची आणि भावनांची पकड घेणाऱ्या सुस्पष्ट व जिवंत परीकथांशिवाय मानवी विचार-क्रियेचा व वाचेचा एक निश्चित टप्पा म्हणून मुलांच्या विचारक्रियेची व वाचेची कल्पना करणेही अशक्यप्राय आहे.

परीकथात्मक प्रतिमांच्या विश्वात मुलांचे विचार वास करीत असतात आणि या गोष्टीचा मुलाना अत्यंत आल्हाद वाटत असतो. एकच एक परीकथा मूल पुनःपुन्हा अनेकवार ऐकू शकते आणि प्रत्येक वेळी त्याला त्या परीकथेत काहीतरी नवीन नवीन आढळते. सुस्पष्ट, जिवंत व मूर्त गोष्टीपासून अमूर्ताकडे जाणारी पहिली पायरी परीकथात्मक प्रतिमांत निबद्ध झाली आहे. माझ्या विद्यार्थ्यांच्या आत्मिक जीवनात परीकथांचा एक संपूर्णच्या संपूर्ण कालखंड नसता तर त्याना अमूर्तामध्ये विचार करणे शक्य झाले नसते. या दुनियेत बाबा-यागा चेटकीण, मंडुक राजकन्या, किंवा अमर भुजंग असले काही नाही हे मुलाला चांगले ठाऊक असते; पण मुलाच्या सुष्ट-दुष्टतेच्या कल्पना या प्रतिमांत साकार झालेल्या असतात आणि ज्या ज्या वेळी मूल तीच ती गोष्ट सांगते त्या त्या वेळी सुष्ट-दुष्टतेकडे पहाण्याचा त्याचा व्यक्तिगत दृष्टिकोन त्या कथनातून व्यक्त होतो.

परीकथा आणि सौंदर्य यांचे अविभाज्य नाते आहे. परीकथांमुळे सौंदर्य-भावनेच्या विकासाला मदत होते आणि अशा भावनेशिवाय मनाच्या उदात्ततेचा व मानवी दुःख, व्यथा व वेदना यांविषयीच्या संवेदनक्षमतेचा विचारही करता येत नाही. परीकथांमुळेच मुलाला केवळ मनानेच नव्हे तर हृदयाने जगाचे ज्ञान होत. आपल्या सभोवतालच्या जगातील घडामोडींचे व घटनांचे केवळ त्याला ज्ञानच होत नाही तर सुष्ट-दुष्टतेबद्दलचा आपला दृष्टिकोन प्रकट करून ते या घडामोडीना व घटनाना प्रतिसाद देते. न्याय व अन्यायाबद्दलचे पहिले ठसे मुलाच्या मनावर परीकथांतून उमटतात. वैचारिक शिक्षणाच्या पहिल्या पायऱ्यांची घडणही परीकथांच्या साहाय्यानेच होते. कल्पना जेव्हा

सुस्पष्ट प्रतिमांमध्ये मूर्तिमंत रूपात साकार होते तेव्हाच ती मुलांच्या आकलनात येते.

आपल्या मायभूमीविषयीच्या प्रेमाची शिकवण देण्याच्या दृष्टीने परीकथा अतिशय उपकारक ठरतात व या स्रोताची जागा दुसऱ्या कशानेही भरून काढता येत नाही. देशभक्तीच्या कल्पना परीकथांमध्ये त्यांच्या आशयातच खूप खोलवर रुजलेल्या असतात; लोकानी निर्माण केलेल्या परीकथात्मक प्रतिमा हजारो वर्षे चालत आलेल्या आहेत आणि श्रमजीवी जनतेची सामर्थ्य-शाली सृजनशील वृत्ती, जीवनाकडे, ध्येयांकडे आणि आशाआकांक्षाकडे पहाण्याचा तिचा दृष्टिकोन या प्रतिमांतूनच मुलाच्या हृदयाला व मनाला प्रतीत होतो. परीकथांतून आपल्या मायभूमीविषयीच्या प्रेमाची शिकवण मिळते, कारण या परीकथा ही लोकांची निर्मिती आहे. कीवच्या सेंट सोफिया चर्चची अप्रतिम भित्तीचित्रे जेव्हा आपण पहातो तेव्हा लोकांच्या जीवनाचा एक भाग, लोकांच्या प्रज्ञाप्रतिभेतून निर्माण झालेल्या कलाकृती म्हणून आपण त्यांच्याकडे पहात असतो आणि लोकांच्या सृजनशील वृत्तीविषयीची, विचारांविषयीची व कौशल्याविषयीची अभिमानाची एक भावना आपल्या मनात जागृत होते. लोककथांचा मुलाच्या मनावर अगदी असाच प्रभाव पडतो. असे दिसते की लोककथा या साध्या, "दैनंदिन" जीवनातील संविधानके घेऊन त्यावर रचलेल्या असतात: आजोबा आणि आजी एक सलगम लावतात; आजोबाना लांडग्याला फसवायचे असते; म्हणून ते पेंढ्याचा एक बैल करतात असे हे साधे कथानक असते. पण त्या चिरंतन भित्तीचित्रांतील कुंचल्याच्या नाजूक फटकाऱ्यासारखा या कथांतील प्रत्येक शब्द असतो – लोकांचे सृजनशील भावसामर्थ्य या प्रत्येक शब्दाशब्दातून व प्रतिमांतून खेळत असते. परीकथा हा लोकसंस्कृतीचा एक आत्मिक खजिना आहे आणि त्याच्या आकलनातून मुलाला आपल्या मायभूमीच्या लोकांचे आकलन घडत असते.

आनंद विद्यालयाला सुरुवात होऊन तीन महिने लोटले आणि आम्ही आमची परीकथांची कोठी तयार केली. वडीलधाऱ्या विद्यार्थ्यांनी असे एक वातावरण तयार करण्यास आम्हाला मदत केली की आपण परीकथात्मक प्रतिमांच्याच जगात आहोत असे मुलाना वाटू लागले. अगदी लहान वयात मुलांच्या आईनी मुलाना ज्या गोष्टी सांगितल्या होत्या त्या गोष्टींचे मोहिनी-युक्त वातावरण आमच्याभोवती उभे रहावे म्हणून आम्हाला खूप प्रयास करावे लागले. तेथे होती संध्यासमयीच्या संधिप्रकाशाची भावाकुलता आणि चुल्यामध्ये आनंदाने लहरणारी ज्वाला. एका कोपऱ्यात होती उंच झाडानी

व तोडलेल्या झाडांच्या बुंध्यानी वेढलेल्या व कोंबडीच्या पायांवर उभारलेल्या जादूच्या झोपडीत रहाणारी दुष्ट बाबा-यागा चेटकीण. झोपडीच्या बाजूलाच होत्या परीकथांतील प्राण्यांसारख्या दिसणाऱ्या आकृत्या : धूर्त कोल्हीण, भुरा लांडगा व चतुर घुबड. दुसऱ्या एका कोपऱ्यात होती आजीची व आजोबांची झोपडी; तेथे आकाशात कलहंस उडत होते आणि त्यांच्या पंखांवर होता उक्रेनियन लोककथेचा चिमुकला नायक इवासिक-तेलेसिक. तिसऱ्या कोपऱ्यात होता निळा सागर आणि त्याच्या काठावर होती त्या सद्‌गुणी म्हाताऱ्याची आणि दुष्ट म्हातारीची चंद्रमौळी झोपडी. दरवाज्यापाशीच एक जुनी डोण होती आणि घराच्या किनारीच मातीच्या एका उंचवटयावर म्हातारा व म्हातारी बसली होती. समुद्रात सोनेरी मासा पोहोत होता. चवथ्या कोपऱ्यात बर्फाचे ढिगारे असलेले हिंवाळी रान होते व त्यांच्यामधून बर्फाने आच्छादून गेलेली एक छोटी मुलगी बाहेर पडत होती – त्या तशा गोठविणाऱ्या थंडीत तिच्या सावत्र आईने तिला बेरी फळे गोळा करून आणण्यासाठी पाठविलेले असते... एका झोपडीच्या खिडकीतून एक लहानगे करडू बाहेर डोकावून पहात होते. आणि तेथे एक भलामोठा हातमोजाही होता आणि त्यात एक छोटीशी उंदीरमावशी रहात होती; तिला अचानक कोणीतरी भेटणार होते. तेथे व्हिनीअरमध्ये बनविलेला एक मोठा बुंधा होता आणि त्यावर काही बाहुल्या होत्या – एक छोटी मुलगी, भुरा ससा, कोल्हीण बहिणाबाई, अस्वल, लांडगा, एक लहानगे करडू, पेंढयाचा एक बैल आणि लिटल रेड राइडिंग हूड.

आम्ही या सर्व वस्तू स्वतःच तयार केल्या होत्या. अर्थात त्याला काही काळ लागला होता. आकृत्या काढण्याचे, कापण्याचे व चिकटविण्याचे काम मी केले आणि त्यात मुलानी मला मदत केली. ज्या वातावरणात मुले परीकथा ऐकणार होती त्या वातावरणाच्या सौंदर्यात्मक स्वरूपाला मी महत्त्व देत होतो. प्रत्येक चित्रामुळे, प्रत्येक दृक्‌प्रतिमेमुळे कलात्मक विश्वाविषयीची मुलांची ग्रहणशीलता अधिक धारदार बनली आणि परीकथेतील कल्पना अधिक सखोलतेने त्यातून व्यक्त झाली. खोलीतील प्रकाशयोजनेनेही फार मोठे काम बजावले. जेव्हा मी मंडुक राजकन्येची गोष्ट सांगितली तेव्हा जंगलातल्या दाट झाडीतले छोटे छोटे दिवे पेटले, खोलीभर एक प्रकारचे हिरवे धुके पसरले व अशा रीतीने ज्या वातावरणात ती गोष्ट घडते त्या वातावरणाची अत्यंत ठळक पुनर्निर्मिती साधण्यात आली.

परीकथांच्या कोठीत मी मुलाना फार वेळा घेऊन जात नसे – आठवडया-

तून एकदा किंवा – प्रत्येक दोन आठवडयांनंतर मी त्याना तेथे नेत असे. सौंदर्यात्मक गरजा तृप्तीचा ढेकर येईपर्यंत कधीही भागवता कामा नयेत. अतितृप्तता आली की मध्यमवर्गीय नैराश्य, कंटाळवाणेपणा, "वेळ घालविण्याचे" मार्ग शोधून काढण्याची वृत्ती अशा प्रकारच्या अतिशिष्टपणाच्या थेराना सुरुवात होते... शरदामध्ये आणि हिंवाळयामध्ये संध्यासमयीचा संधिप्रकाश दाटला असताना आम्ही त्या कोठीत जात असू – अशा वेळी परीकथांचे शब्द मुलांच्या कानात अशा रीतीने झंकारतात की त्याचे स्थान केवळ अनन्य असे असते आणि एखाद्या स्वच्छ सूर्यप्रकाशित दिवसापेक्षाही त्या परीकथा अगदी निराळया भासतात. आवारात हळू हळू अंधार दाटू लागला आणि दिवे मालवून आम्ही संधिप्रकाशात बसलो. इतक्यात जादूच्या झोपडीत प्रकाश मिणमिणू लागला आणि आकाशात तारे चमकू लागले. जंगलांच्या झाडांपलिकडून चंद्र वर आला. ती कोठी अंधुक प्रकाशाने उजळण्यात आली होती आणि कोठीच्या कोपऱ्यांत अंधार दाटला होता. बाबायागाविषयी मी मुलाना एक लोककथा सांगितली. मी जे सांगत होतो ते मुलाना नवीन नव्हते; आणि तरीही त्यांचे डोळे उत्कंठेने चमकत होते. कथेतील नायकांच्या वाटयाला आलेल्या भोगाने मुलांची मने कळवळत होती, त्यांची मने दुष्प्रवृत्तीविषयीच्या द्वेषाग्नीने पेटत होती आणि सुष्टत्वाबद्दलच्या अत्युत्कट भावना त्यांच्या मनात दाटत होत्या. त्या दुष्ट बाईची, मूर्ती, विश्वासू मुलीची – अल्योन्काची – मूर्ती आणि दयाळू कलहंसांच्या मूर्ती मुलांच्या कल्पनाचक्षूंसमोर जिवंत होऊन उभ्या राहिल्या. आणि त्या मूर्ती जिवंत होऊन समोर उभ्या रहात असताना मुलांची मने विवेकशक्तीने आणि भावनानी भारून जात होती. मुलांच्या दृष्टीने परीकथा या केवळ अद्‌भुत घटनांवर आधारलेल्या गोष्टी नसतात; ज्या जगात मुले जगतात, संघर्ष करतात आणि आपल्या सद्‌भावनेच्या जोरावर दुष्टतेशी सामना देतात असे ते एक संपूर्ण जग असते. खेळ हे जसे गतीचे प्रकटीकरण असते, संगीत हे जसे मधुर स्वरांचे प्रकटीकरण असते त्याचप्रमाणे परीकथेतील शब्द हे मुलाच्या आत्मिक सामर्थ्याच्या प्रकटीकरणाचे खरेखुरे स्वरूप असते. मुलाला जसे गाणे म्हणायलाही आवडते आणि ते ऐकायलाही आवडते, त्याला जसे खेळ खेळायलाही आवडतात आणि पहायलाही आवडतात त्याचप्रमाणे परीकथा त्याला केवळ ऐकायलाच आवडत नाहीत तर स्वतः सांगायलाही आवडतात.

असेच काही दिवस गेले आणि मुलानी विचारले, "आपण परीकथांच्या कोठीत पुन्हा केव्हा जायचं?" त्या आनंददायक क्षणांच्या उत्कंठित विचारानेच

मुलांची मने रोमांचित झाली आणि आम्ही संध्यासमयीच्या संधिप्रकाशात पुन्हा एकदा त्या कोठीत जमलो. मी पुन्हा एक गोष्ट सांगितली आणि मुलानी तिचे पुनर्कथन केले. अशा क्षणाला सर्वात लाजाळू मुलेही धीट आणि निर्णायक वृत्तीची बनली. इतर परिस्थितीत व्यामिश्रपूर्ण व असंबद्ध असणारी भाषा त्या परिस्थितीत अत्यंत सहजसुलभ माधुर्यपूर्ण व आविष्कार-युक्त बनली. वाचेच्या व विचारांच्या विकासात ज्याना अडचणी भासत होत्या अशा नीना, पेत्रिक, ल्यूदा, स्लावा आणि वाल्यासारख्या मुलानीही गोष्टी सांगितल्या.

ज्या ज्या वेळी आम्ही परीकथांच्या कोठीत येत असू त्या त्या वेळी मुलाना खेळावेसे वाटे. मुलां-मुलींसकट अगदी प्रत्येकाचे आवडते असे खेळणे होते किंवा एखादी बाहुली होती. खेळाना निर्मितीचे रूप आले. मूल एखाद्या परीकथेचे नायक बनत असे आणि आपले विचार आणि भावना अधिक स्पष्टतेने व्यक्त करण्याच्या दृष्टीने मुलाला त्याच्या हातातल्या बाहुलीची मदत होत असे. एका मुलाकडे पेंढ्याचा एक बैल होता (एका सुप्रसिद्ध उक्रेनियन बालकथेचा नायक), दुसऱ्या मुलाकडे बाहुलीच्या रूपातली आजी होती, तर तिसऱ्या मुलाकडे आजोबा होते. अशा रीतीने मुलानी अद्भुतरम्य कल्पनाविश्वात जगायला सुरुवात केली होती. कथेच्या पात्रांचे शब्दच मुले केवळ पुनरुद्धृत करीत नव्हती तर आपल्या स्वतःच्या कल्पनाशक्तीचा विलास ती त्या परीकथेत ओतीत होती. काही मुलीना बाहुल्यांशी खूप खेळावेसे वाटते. एका मुलीने एका छोटया दिवाणावर आपली बाहुली ठेवली आणि ती अत्यंत माधुर्ययुक्त स्वरात तिच्याशी प्रेमाने, वात्सल्याने बोलू लागली. एका छोटया मुलीची बाहुली आजारी पडली आणि तिचा आजार बरा व्हावा म्हणून ती त्या बाहुलीची खूप काळजी घेऊ लागली.

अनेक वर्षे मुले आपल्या बाहुल्यांशी खेळत होती; पण त्या गोष्टीने मी अजिबात अस्वस्थ झालो नाही. काही शिक्षकाना असे वाटते की हा सारा एक प्रकारचा "पोरकटपणा" आहे; पण तो पोरकटपणा नसून परीकथा ऐकण्याच्या व रचण्याच्या निर्मितीक्षम प्रक्रियेतून वाहणाऱ्या त्याच गोष्टींच्या धाग्याचा, वस्तूंमध्ये तोच जिवंत आत्मा भरण्याचा तो प्रकार आहे. फ्रेंच लेखक अन्तुआन सेंट-एक्झ्युपेरी (१९००-१९४४) यांच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे वस्तूना **माणसाळविण्याचा** मुलांचा जो प्रयत्न चाललेला असतो त्या वस्तूंच्या अद्भुतरम्य प्रतिमा बाहुल्यांच्या रूपाने अस्तित्वात येतात. प्रत्येक मुलाला आपले अगदी जिवलग असे काहीतरी, आपले स्वतःचे असे

काहीतरी हवे असते. मुले आणि त्यांच्या आवडत्या बाहुल्या यांच्यामध्ये जे नाते विकसित झाले त्याचे मी अत्यंत लक्षपूर्वक निरीक्षण केले. त्या प्रदीर्घ काळात मुलांची बाहुल्यांशी जी मैत्री जमली ती पाहून मला आनंद झाला होता. कोस्त्याच्या बाहुलीत असाधारण असे काही नव्हते – मासे पकडण्याचा गळ घेतलेला तो एक म्हातारा कोळी होता. त्या बाहुलीचा पाय अनेक वेळा मोडला; तेव्हा अखेरीस कोस्त्याने त्या बाहुलीसाठी लाकडी पाय बनवला; तसेच त्या कोळयाला नदीवर जाता यावे म्हणून कोस्त्याने त्याच्यासाठी गाठीगाठीची एक काठी बनवली. या आपल्या म्हाताऱ्या मित्राबरोबर बोलायला त्या छोटया मुलाला खूप आवडायचे: क्रुशियन आणि ब्रीम मासे कुठे मिळतील हे कोस्त्याने त्याला सांगितले... आजी आणि तिची नात या लारिसाच्या आवडत्या बाहुल्या होत्या. त्या छोटया मुलीने आजीसाठी एक चष्मा बनवला, तिच्या पायाखाली तिने एक ऊबदार गालिचा ठेवला आणि तिच्या खांद्याभोवती तिने एक शाल गुंडाळली. वाल्याकडेही दोन बाहुल्या होत्या – एक मांजराचे पिलू आणि एक उंदीर. दर आठवडयाला पिलाच्या मानेभोवतीची छोटी फीत ती बदलत असे आणि का कोण जाणे पण उंदरासाठी हिरवा गालिचा घेऊन येत असे...

परीकथेच्या कोठीत मुलांच्या अद्‌भुतरम्य कल्पनाविलासाचा झरा अक्षयतेने वहात होता. मुलाच्या नजरेस एखादी नवी वस्तू येत असे, आपल्या मनातल्या वस्तूंशी ते त्या वस्तूचा ताबडतोब संबंध जोडायला सुरुवात करीत असे आणि त्यातून एक नवे अद्‌भुतरम्य चित्र उदयास येत असे. मुलाच्या कल्पनाशक्तीचा विलास सुरू होत असे, त्याचे विचार लहरू लागत, त्याचे डोळे चमकून उठत आणि वाणीचा सहज ओघ सुरू होई. ही गोष्ट लक्षात घेऊन ज्या वस्तूंमध्ये काहीतरी खरे किंवा अद्‌भुतरम्य दुवे अस्तित्वात असतील अशा अत्यंत नानाविध वस्तूनी कोठीच्या विविध कोपऱ्यातील वातावरण भरून काढण्याचा मी प्रयत्न केला. मुलानी अद्‌भुतरम्य कल्पनाविलासात रममाण व्हावे, निर्मिती करावी आणि नव्या गोष्टी रचाव्यात ही माझी तळमळ होती. एका पायावर उभ्या असलेल्या एका बगळयाच्या शेजारी मांजराचे एक चिमणे, घाबरलेले पिलू होते. त्यातून मुलाच्या कल्पनाशक्तीला अनेक मनोवेधक गोष्टी रचता आल्या असत्या आणि बगळा व मांजराचे पिलू हे त्या गोष्टींचे नायक ठरले असते. तसेच वल्हे असलेली तेथे एक छोटी होडी होती आणि तिच्या शेजारी एक बेडूक होता; आणि आमच्यावर गोष्ट रचा अशी त्याची आर्जवी नजर सांगत होती. त्याशिवाय गुहेतून डोकावून

पहाणारे अस्वलाचे पिलू, माशा आणि डास (अस्वलाच्या पिलाशी तुलना करता त्या माशा व डास पुष्कळच अजस्त्र वाटत होत्या. परीकथेत अशा गोष्टीना मुभा असते), डुकराचे छोटे पिलू आणि हात आणि तोंड धुण्याचा डोण व त्यावर ठेवलेली साबणाची वडी – या सर्व गोष्टीनी मुलांच्या चेहेऱ्यावर केवळ स्मितच झळकते असे नाही तर त्यांच्या कल्पनाशक्तीलाही चालना मिळते.

जेथे आपल्या मार्गात गंभीर अडचणी उभ्या रहातात अशा विचारक्रियेच्या विकासात सभोवतालच्या जगातील अनेक वस्तूंशी संबंधित असलेली कथा रचण्याच्या दिशेने मुलाची पावले वळविण्यास या सर्वांतून मार्ग काढण्यात मी जर यशस्वी ठरलो असेन तर मूल विचार करावयास शिकणार आहे असे मी खात्रीपूर्वक म्हणू शकतो. वाल्याचे विचार जागृत करण्यासाठी आणि तिची स्मरणशक्ती बळकट करण्यासाठी किती कष्ट घ्यावे लागले हे मी पूर्वीच निवेदन केले आहे. सभोवतालच्या जगातील वस्तू आणि घटना यांमधील अनपेक्षित दुव्यांचे तिला जे दर्शन घडले त्या दुव्यांमुळे निर्माण झालेली विस्मयभावना हे तिचे विचार जागृत करण्याचे एक साधन होते. कथा हे तेवढेच महत्त्वाचे दुसरे साधन होते. कितीतरी काळ लोटला पण वाल्या एकही गोष्ट रचू शकली नव्हती; आणि त्यामुळे मी अस्वस्थ होतो. शेवटी तिसऱ्या इयत्तेत अखेरीस तिने बेडूक, होडी व माशाची एक गोष्ट तयार केली. तिने रचलेली गोष्ट अशी होती: "नदीच्या तीरावर एका बेडकाने एक होडी पाहिली. कोळी आजोबानी ती होडी तेथे सोडली आणि ते पाव आणायला गावात गेले होते. बेडकाला होडीतून भटकायचे होते. तो डबक्यातून बाहेर आला आणि त्याने होडीत उडी मारली. त्याने वल्हे हातात घेतले. इतक्यात एक मासा पोहोत पोहोत तेथे आला व तो बेडकाला म्हणाला, 'तुझा विचार तरी काय आहे? तू तर फक्त डबक्यात पोहोतोस, पण होडीला खोल पाण्यात जायला आवडते'. पण बेडकाने त्याचा सल्ला मानला नाही आणि तो होडी घेऊन आपल्या छोट्या डबक्याकडे जायला निघाला. बेडूक पोहायला लागला, तशी होडी म्हणाली, "बेडका, बेडका, तू मला कुठे ओढून नेत आहेस?" तसा बेडूक म्हणाला, 'मी तुला माझ्या डबक्याकडे घेऊन जात आहे. म्हणजे मी होडी कशी वल्हवतो हे माझ्या सगळ्या नातेवाईकाना पहायला मिळेल.' होडी हसली आणि स्वतःशीच म्हणाली, 'आजोबा येतील तेव्हा होडी कशी वल्हवायची ते तुला शिकवतील हं!' बेडकाला होडी काही डबक्याकडे न्यायला जमेना. ती चिखलात रुतून बसली.

तिथून ती मुळी पुढेच जाईना. कण्हत, कुथत बेडकाने खूप जोर केला, पण होडी मुळी हलायलाच तयार होईना. मग सगळे बेडूक डबक्यातून बाहेर आले आणि ते त्या बेडकाकडे पाहू लागले. तसा तो बेडूक डबक्यातल्या सर्व बेडकाना उद्देशून ओरडला, 'बघा मी कशी मस्त होडी वल्हवू शकतो ते!' आणि मग तो गांगरला आणि त्याने डबक्यात उडी मारली. तसे डबक्यातल्या चिखलाचे गोळे सर्वत्र उडाले आणि बेडकांचे ते सारेच्या सारे कुटुंब हसू लागले, 'हा, हा, हा!' मग कोळी आजोबा आले आणि त्यानी होडी डबक्यातून बाहेर खेचून काढली. बेडूक घाबरले आणि ते हिरव्या शेवाळात लपून बसले. संध्याकाळी ते थोडे धीट बनले आणि सरपटत बाहेर पडले — आणि ते सारे कसे हसले! तेव्हापासून रात्रभर ते हसतात आणि संध्याकाळपासून सकाळपर्यंत त्यांचा डरांव, डरांव असा आवाज ऐकू येतो. त्या बढाईखोर बेडकालाच ते हसत असतात."

कथा रचणे ही मुलांच्या दृष्टीने एक सर्वात उद्बोधक अशी काव्यात्म निर्मिती आहे. त्याच जोडीला ते बौद्धिक विकासाचे एक महत्त्वाचे साधन आहे. मुलानी निर्मिती करावी, कलात्मक प्रतिमा तयार कराव्यात असे जर तुम्हाला वाटत असेल तर तुमच्या स्वतःच्या निर्मितीक्षमतेच्या ज्योतीचा अगदी एक सूक्ष्मसा तेजोकणही तुम्हाला मुलाच्या मनात प्रवर्तित करता आला पाहिजे. तुम्हाला स्वतःलाच निर्मिती साधत नसेल, किंवा मुलांच्या स्वारस्यविश्वाबद्दल तुम्हाला तुच्छताभाव वाटत असेल, ती एक रिकामटेकडी करमणूक आहे असे वाटत असेल तर तुम्हाला काहीही साध्य होणार नाही.

परीकथांच्या कोठीत तिनाची स्वतःची एक आवडती बाहुली होती. ती बाहुली म्हणजे धातू वितळविताना त्या वितळणाऱ्या धातूमुळे उजळून निघालेल्या चेहेऱ्याच्या धातूकामगाराची एक मूर्ती होती. ओतशाळेत धातूकामगारांबरोबर झालेली भेट तिच्या स्मरणात होती आणि आता, तीन वर्षांनंतर, तिने अग्नि-सरितेविषयी एक गोष्ट रचली होती:

"अजस्र भट्टीजवळ एक वीरयोद्धा उभा होता. तो लोखंड वितळवीत होता. लोखंड खदखदत होते आणि उकळत होते. तो वीरयोद्धा भट्टीपाशी आला आणि त्याने भट्टीचे दार उघडले — त्याबरोबर अग्नि-सरिता उसळत बाहेर पडली. वाहता वाहता ती म्हणाली: 'त्वरा करा लोकानो, हे तप्त लोखंड घ्या आणि त्यातून तुम्हाला आवश्यक असेल ती वस्तू बनवा.' ज्ञानी तज्ज्ञपुरुष त्या अग्नि-सरितेपाशी आले, त्यानी डावातून वितळलेले लोखंड

काढले, ते वाळूत ओतले आणि लोकांच्या गरजेच्या सर्व वस्तू त्यानी त्यातून तयार केल्या."

मुलांच्या मनात समकालीन योद्धयांच्या – सोविएत मायभूमीच्या संरक्षकांच्या – प्रतिमा आकार धारण करीत असतात. नाझींच्या विरुद्ध लढविलेले युद्ध (१९४१-१९४५), सोविएत लोकानी मिळविलेला शौर्यशाली विजय यानी आपल्या लोकांच्या स्मृतिपटलावर आणि संपूर्ण आत्मिक जीवनावर अविनाशी ठसे उमटविले आहेत. आपल्या मायभूमीचे संरक्षण करणारे वीरपुरुष हे मुलांच्या कल्पनाशक्तीत त्यांच्या परीकथांचे नायक बनले. त्यांच्याविषयी त्यानी सुस्पष्ट, चित्तथरारक गोष्टी रचल्या. आपल्या लोकांमधील योद्धयांविषयीच्या मुलानी ज्या गोष्टी तयार केल्या त्यांत सोविएत माणसाचे धैर्य, अजिंक्यता, आणि उदात्तता हे मुख्य कल्पनासूत्र होते. दान्कोने रचलेली गोष्ट अशी होती :

"मुलगा सैन्यात भरती होण्यासाठी निघाला होता. त्याला निरोप देताना आई म्हणाली, 'तुझ्याबरोबर आपल्या मायभूमीची मूठभर माती घेऊन जा. तू या मातीचा रक्षणकर्ता आहेस हे लक्षात ठेव!' मुलाने मूठभर माती घेतली; ती त्याने लाल रेशमाच्या एक पिशवीत ओतली; आणि त्या मातीला त्याने कधीही अंतर दिले नाही. आमच्या मायभूमीविरुद्ध शत्रूने लढाई सुरू केली. सरहद्दीवर मुलाची शत्रूच्या सैनिकांबरोबर गाठ पडली. त्याने आपल्या मशिनगनमधून त्यांच्यावर गोळ्यांचा वर्षाव केला. शत्रूसैनिक नदीत पडले. मुलगा एक पाऊलही मागे हटला नाही. इतक्यात शत्रूच्या एका गोळीने त्याच्या डोक्याला जखम झाली आणि रक्त त्याच्या डोळ्यांवर ओघळू लागले. त्याच्या हातातले बळ कमी होऊ लागले. शत्रू जवळ आला आणि त्याने विचार केला: याला आपण कैद करून नेऊ या. मुलाला आपल्या मायभूमीच्या मातीची आठवण झाली आणि त्याने त्या लाल पिशवीला स्पर्श केला. त्याबरोबर एक प्रचंड शक्ती त्याच्या हातांत संचरली. त्या तरुण योद्धयाने पुन्हा गोळीबार सुरू केला आणि शत्रू नदीत बुडून गेले; त्याच क्षणाला मदत येऊन पोहोचली – वेगवान विमाने आणि शक्तिशाली रणगाडे!"

संध्यासमयीच्या संधिप्रकाशात मुलानी रचलेल्या गोष्टी मी लिहून ठेवीत असे. मुलांमध्ये सुस्पष्ट विचारज्योती मी प्रज्वलित करू शकलो होतो व त्या ज्योतींचे प्रतीक म्हणून त्या गोष्टी मला प्रिय होत्या. निर्मितीक्षमतेशिवाय, गोष्टी रचल्याशिवाय अनेक मुलांच्या भाषेत गुंता निर्माण होतो, शब्द एकमेकांत गुरफटले जातात आणि विचारांत अनागोंदी माजते. सौंदर्यात्मक भावना

[ आणि मुलांच्या भाषेची समृद्धता यांच्यात थेट संबंध आहेत याची मला खात्री पटली आहे. सौंदर्यात्मक भावनेमुळे शब्दाला भावनात्मक रंग चढतो. गोष्टी जेवढ्या अधिक चित्तवेधक असतात व मुलांभोवती पसरलेले वातावरण जितके अधिक अनन्यसाधारण असते तितका मुलाच्या कल्पनाशक्तीचा विलास अधिक बलशाली बनतो, त्यानी निर्माण केलेल्या प्रतिमाना अधिक अनपेक्षित स्वरूप प्राप्त होत. संधिप्रकाशाच्या समयी मुलानी अनेक गोष्टी रचल्या आणि आम्ही त्यांचे एक हस्तलिखित बनविले व त्याला नाव दिले 'संधिप्रकाशातल्या गोष्टी'.

या 'संधिप्रकाशातल्या गोष्टीं'त प्राण्यांच्या व पक्ष्यांच्या, झाडांच्या व फुलांच्या चित्तवेधक कथा आहेत. फुलांविषयीच्या गोष्टी रचणे ही माझ्या दृष्टीने व मुलांच्या दृष्टीने एक खास आनंददायक घटना होती. माणसाच्या भावजीवनाविषयी, फुलांविषयीच्या गाण्यांमध्ये व कथांमध्ये मूर्तिमंत झालेल्या भावनांविषयी मी मुलाना सांगत असे. मी गोष्टीची सुरुवात मुलाना सांगत असे आणि मुलांची अद्‌भुतरम्य कल्पनाभरारी त्यातून जिवंत प्रतिमा निर्माण करीत असे.

दोन-तीन महिन्यांतून एकदा आम्ही परीकथेच्या कोठीच्या प्रत्येक कोना-कोपऱ्यातील सामानसुमान बदलीत असू. व्हिनीअरमधून आम्ही नव्या नव्या आकृत्या, झाडे, झुडपे तयार करीत असू, घरे, परीकथेतील राजवाडे, मच्छिमारांच्या झोपड्या बनवीत असू. पेपिअर मॅशमधून परीकथेतील व्यक्ति-चित्र तयार करण्यास मुले आता शिकली होती. यामुळे परीकथांचे विश्व पुष्कळच समृद्ध बनले.

अशा रीतीने अनेक परीकथांसाठी आम्ही "चित्रे" तयार केली. "इवासिक-तेलेसिक" (उक्रेनियन लोक-परीकथा), झुकोवस्की यांची "निद्रिस्त राजकन्या", अक्साकोव यांची "किरमिजी फूल", व्ही. दाल यांची "माऊस टीथी आणि स्पॅरो रिच", गारशिन यांची "प्रवासी बेडूक" या रशियन लेखकांच्या परीकथा, डॅनिश परीकथा लेखक अँडरसन यांची "हिमराणी", ग्रिमबंधूंची "ब्रेमेन स्ट्रीट म्युझिशियन्स", पेरो यांची "निद्रिस्त सुंदरी" अशा विविध परीकथांचा त्यात अंतर्भाव होता.

आपल्याला आनंद व सुख देणाऱ्या एखाद्या प्रियतम व्यक्तीची प्रतिमा आपल्या हृदयात व मनात शिरावी तद्वत या परीकथानी मुलांच्या आत्मिक विश्वात कायमचा प्रवेश केला. मुलाना या परीकथा कुणीच मुखोदत करायला सांगितल्या नव्हत्या. पण त्यांच्या मनात त्या जवळ जवळ कायमच्या स्मृतिबद्ध

झाल्या. आपल्या अनिर्वचनीय सौंदर्याने शब्द जेव्हा मुलाचे मन चेतनायुक्त बनवितो तेव्हा तो शब्द मुलाच्या स्मृतिकोशात कायमचा निबद्ध होतो; आणि त्यामुळे स्मरणशक्तीवर भार तर पडत नाहीच उलट त्याद्वारे स्मरणशक्तीला अधिकच धार चढते.

नव्या गोष्टीचे पहिले कथन ही मुलांच्या जीवनातील एक मोठी घटना असे. 'हिमराणी' या हन्स ख्रिश्चन अँडरसनच्या गोष्टीसाठी आम्ही जो रंगमंच तयार केला तो मी कधीही विसरणार नाही. ते शाळेचे दुसरे वर्ष होते. हिंवाळयात लवकर संधिप्रकाश पडतो. त्या संधिप्रकाशात आम्ही परीकथांच्या कोठीत गेलो. उंच उतरती छपरे असलेली छोटी छोटी घरे, एका उत्तुंग खडकावरचा परीकथेतील राजवाडा, एक अत्यंत चपळ हरीण, आणि बर्फाचे ढिगारे अशा वातावरणात ही कथा घडते. मुलानी या सर्व वस्तू स्वतःच्या हातानी बनविल्या होत्या, पण सर्वानीच ती गोष्ट ऐकली नव्हती. त्या छोटचा छोटचा घरांच्या खिडक्या छोटचा छोटचा दिव्यानी उजळल्या आणि आकाशातून हिमपिसे पडायला सुरुवात झाली. संध्याकाळचा कातर अंधार आमच्याभोवती पसरला होता. मी गोष्ट सांगत असताना मुले ती श्वास रोधून ऐकत होती... गोष्ट संपली, पण मुलाना ती पुन्हा ऐकायची होती. शब्दांची ही मोहिनी मला अतिशय प्रिय आहे. मुलानी जितक्या वेळा सांगितले तितक्या वेळा मी ती गोष्ट पुनःपुन्हा कथन केली. आणि हिमराणीची कथा ती मला पुनःपुन्हा सांगायला सांगत होते याचे कारण त्याना त्या कथेतील शब्द लक्षात ठेवायचे होते म्हणून नव्हे तर त्यांच्या श्रवणेंद्रियाना ते शब्द संगीतासारखे भासत होते म्हणून.

आपल्या मायभाषेतील शब्द मुलांच्या आत्मिक जीवनात प्रविष्ट व्हावेत म्हणून, अणकुचीदार छिन्न्यांमध्ये आणि मनोहर रंगफळयांमध्ये त्यांचे रूपांतर व्हावे म्हणून व ती सत्याकलनाची नेमकी साधने बनावीत म्हणून मुलांच्या मायभाषेचे सखोल ज्ञान मुलाना कसे घडवावे याचा शिक्षक नेहमीच विचार करीत असतो. भाषा हा विचाराचा भौतिक आविष्कार आहे आणि विचार-क्रियेबरोबरच मूल जेव्हा आपल्या मायभाषेच्या सुस्पष्ट भावनिक रंगच्छटा पहाते, त्या भाषेचे जिवंत लहरते संगीत जेव्हा पहाते तेव्हाच मुलाला ती भाषा उमजते. शब्दांच्या सौंदर्याची अनुभूती घेतल्याशिवाय त्या शब्दांच्या अर्थाचे बाह्य कंगोरे मुलाच्या मनाला प्रतीत होत नाहीत. आणि अद्‌भुतरम्य कल्पनाविलासाशिवाय, निर्मितीतील व्यक्तिगत सहभागाशिवाय सौंदर्यानुभूतीचा विचारच करता येत नाही. आणि याच निर्मितीचे नाव आहे परीकथा. कथा

ही मुलाच्या आत्मिक जीवनाची सर्व क्षेत्रे – मुलाचे मन, त्याच्या भावना, त्याची कल्पनाशक्ती, त्याची इच्छाशक्ती – उत्तेजित करणारी एक क्रियाशील सौंदर्यात्मक निर्मिती आहे. कथाकथनाबरोबरच ती सुरू होते पण नाटयरूपात ती कथा सादर करणे ही अधिक वरची पातळी आहे.

परीकथांच्या कोठीत एका कठपुतळीच्या रंगमंचाचा व एका नाटयमंडळाचा उदय झाला. तेथे 'रुकाविच्का' ( छोटा हातमोजा ) ही उक्रेनियन लोककथा मुलानी प्रथम रंगभूमीवर आणली. हा हातमोजा म्हणजे शूर प्राण्यांचे घर होते. त्यानंतर त्यानी अत्यंत स्वारस्यपूर्णरीतीने 'मंडुक राजकन्या' ही कथा नाटयरूपात सादर केली आणि 'छोटी कुबडी चिमणी' ही जपानी लोक-कथाही रंगभूमीवर आणली. चवथ्या इयत्तेत त्यानी सामूहिकरित्या 'पतंग संगीतकार' ही कथा, त्यातील सर्व भूमिकांसहित, सादर केली.

परीकथांच्या कोठीत 'रॉबिन्सन क्रूसो', 'बॅरॉन मुंचाउसेनची साहसे', 'गलिव्हरचे प्रवास', 'झार सुलतानची कथा', आणि 'संगीतकार यान्को' या कथा मी मुलाना प्रथम वाचून दाखविल्या. खिडकीबाहेर हिमवादळ घोंगावत असताना हिंवाळयातल्या त्या संध्याकाळच्या वेळची मोहिनी मुले कधीही विसरली नाहीत. अशा वेळी फुटलेल्या जहाजातून मुले रॉबिन्सन क्रूसोबरोबर वाळवंटी बेटावर उतरत असत आणि रॉबिन्सन क्रूसोबरोबरच निसर्गाबरोबर-च्या खडतर लढयाचा अनुभव घेत असत. हान्स ख्रिश्चन अँडरसन, लेव तोलस्तोय, उशिन्स्की, ग्रिमबंधू, आणि सोविएत बालकथालेखक चुकोव्स्की व मार्शाक यांच्या सर्व कथा आम्ही परीकथांच्या कोठीत बसून वाचल्या. सुष्ट व दुष्ट, सत्यपरायणता व अप्रामाणिकपणा, प्रतिष्ठा आणि लांच्छनास्पदता यांविषयीच्या वाङमयकृती बालपणाच्या काळात वाचण्यात आल्या तर त्या वाङमयकृतींत ग्रंथित झालेल्या नैतिक कल्पना ही माणसाची संपदा बनते असे अनेक वर्षांच्या अनुभवावरून दिसून आले आहे.

आमच्या वाचनात विविधता होती: मी ज्या परीकथांचा व गोष्टींचा येथे उल्लेख केला आहे त्या मला तोंडपाठ येत होत्या. मुलाना फक्त चित्रे दाखविण्यासाठी मी पुस्तकाला स्पर्श करीत होतो. आणि अशा रीतीने कथा-कथन हे विचाशक्तीची व सहृदय, मानवी भावनांची शिकवण देणारे एक बलशाली साधन बनले.

कोणतीही अतिशयोक्ती न करता असे सांगता येईल की बालपणाच्या काळात केलेले वाचन हे प्रथमतः हृदयाचे शिक्षण असते, बालमनाच्या अंतर्गा-भ्याच्या सर्वात अंतःस्थित कप्प्याना मानवी उदात्ततेचा केलेला तो स्पर्श

असतो. सदसद्विवेकबुद्धीची घडण ज्या मानवतेच्या बीजाने झाली आहे त्या मानवतेच्या बीजाच्या रूपात उदात्त कल्पना व्यक्त करणारा शब्द मुलाच्या हृदयात नेहमीच कायम वास करून रहातो.

## परीकथा पुढे चालू – आमचे "जादूचे बेट"

असाधारण गोष्टींकडे, रोमांचक सफरींकडे व साहसांकडे, निसर्गाच्या आदिम शक्तींविरुद्धच्या झगडयाकडे मुलांची मने आकर्षित होतात. रॉबिन्सन क्रूसोच्या साहसांविषयी मी जेव्हा प्रथम मुलाना सांगितले तेव्हा प्रवासी बनून खेळ खेळावा, सागरांच्या लाटांचा ध्वनी ऐकावा, कोसळत्या धबधब्याचा आवाज घ्यावा अशी इच्छा त्यांच्या मनात प्रादुर्भूत झाली. जादूचे एक "बेट" – जेथे खेळांच्या जगात त्याना विहार करता येईल असा एक गुप्त सांदीकोपरा तयार करण्याचे मुलानी ठरविले. ब्लॅकथॉर्नच्या व ॲकेशियाच्या दाट झाडीत आम्ही आमचे "बेट" तयार केले. आम्ही रॉबिन्सन क्रूसोचे घर बनविले. त्यात रॉबिन्सन क्रूसोचा जसा शेकोटीचा चुला होता तसाच चुला तयार केला आणि श्वापदांपासून घराचे संरक्षण व्हावे म्हणून घराभोवती कांबींचे कुंपण उभे केले. "सागरा"चा अमर्याद विस्तार नजरेस पडावा म्हणून आम्ही त्या घराला एक छोटी खिडकी ठेवली. आम्ही जमिनीचा एक छोटा तुकडा उखळला आणि त्यात गव्हाचे व बार्लीचे बी पेरले. कोल्याने तर घरातून एक करडूही आणले; कारण रॉबिन्सन क्रूसोकडे एक शेळी होती. आम्ही जुनी पिंपे, दोरखंड आणि वीटा जमा केल्या. पिंपाना बसविलेल्या लोखंडी कडयांपासून आम्ही चाकू तयार केले आणि मासे धरण्याची जाळीही बनविली. दोन सुक्या काठ्या एकमेकींव घासून आम्ही अग्नी पेटविला; कारण शक्यता अशी होती की रॉबिन्सन क्रूसोकडे आग तयार करण्याचे दुसरे कोणतेही साधन नव्हते.

घर तयार करण्यासाठी जेथून आम्ही माती खणली होती तेथे एक खड्डा तयार झाला होता. पावसाच्या सरींमुळे तो खड्डा पाण्याने भरला आणि त्याचे एक छोटे तळे तयार झाले. मुले त्या पाण्यात डुबकू लागली; ते तळे म्हणजे एक अमर्याद विस्ताराचा महासागर आहे अशी त्यानी कल्पना केली. आणि जेथे महासागर आहे तेथे जहाजे असलीच पाहिजेत. मुलाना पुसी-विलो झाडाचा एक ओंडका आढळला आणि त्यातून त्यानी होडी तयार करायला

घेतली. हे फार कष्टाचे काम होते; पण अखेरीत त्यात त्याना यश आले. त्यानी त्या होडीला एक शीड बसविले व ती होडी सागरात सोडली.

एका छोटया टेकडीमागे आम्ही लिलीपुटांचा देश तयार केला. मुलांच्या कल्पनेत त्या टेकडीने एका उत्तुंग पर्वताचे रूप धारण केले होते. व्हिनीअरचा व वेताचा उपयोग करून आम्ही त्या देशाची राजधानी वसविली. मातीतून आम्ही घोडे, गाई आणि मेंढया बनविल्या. महाकाव्याचा नायक इल्या मुरो-मेत्स व त्याचा शत्रू दरवडेखोर सोलोवेय यांच्याही आम्ही मूर्ती तयार केल्या. या मूर्ती आम्ही दाट झुडुपांत ठेवल्या. प्राचीन रशियाचे ते दाट जंगल होते. ग्रीष्मातल्या शांत संध्याकाळी आम्ही तेथे जात असू आणि तेथे शूर, धाडसी योद्धयांच्या गोष्टी सांगण्याची प्रत्येकाला ओढ निर्माण होई.

त्या दुर्गम झुडुपांच्या खूप आत घळीच्या उतरणीवर आम्हाला एक विवर आढळले—ही होती त्या दुष्ट अमर भुजंगाची गुहा आणि तेथे कुठेतरी खूप खोलवर गुप्त जागी सुंदर राजकन्या बंदिस्त होऊन खितपत पडली होती.

सुटीच्या दिवशी हवा ऊबदार असताना आम्हाला लांबच्या सफरी करता आल्या नाहीत तर आम्ही या "जादूच्या बेटा"वर जात असू. रॉबिन्सन क्रूसोच्या घराशेजारी आम्ही एक कुटिर उभारले. अद्‌भुतरम्य कल्पनाविला-साच्या पंखांवर बसून आम्हाला परीकथांच्या विश्वात घेऊन जाणारी आमची ही आवडती जागा होती. आमच्या परीकथांचे नायक आमच्याच शेजारी होते, आणि पृथ्वीवर रात्रीचे अवगुंठण पडले की आम्हाला दरवडेखोर सोलोवेयची शिटी ऐकू येई, अमर भुजंगाचे फुत्कार व हुंकार ऐकू येत आणि मोजडी घातलेल्या मांजरीची जपून टाकलेली पावले ऐकू येत. मुलांच्या अद्‌भुतरम्य कल्पनाविलासाच्या ज्योती येथे विशेष तेजाने चमकू लागत. या सांदीकोपऱ्यात युरा, गाल्या, तीना व वित्याने अप्रतिम गोष्टी रचल्या. ते वातावरणच असे होते की त्यातून कल्पनाविलासाला पंख फुटत. विचार अगदी सहजतेने व अदम्यपणे धावू लागत. मुलांच्या भावनाना अत्यंत सुस्पष्ट शब्दांतून व्यक्तरूप मिळे. येथेच सिन्योझाने सोनेरी इंद्रधनुष्याची पुढील गोष्ट रचली:

"एके संध्याकाळी अजस्र लोहार सूर्याकडे गेले व ते सूर्याला म्हणाले, 'रविमहाराज, रविमहाराज, आमचे लोखंडी घण मोडले आहेत आणि लवकरच रुपेरी धागे घडविण्यासाठी आमच्याकडे काहीही उरणार नाही. ऐरणी सुद्धा जुन्या झाल्या आहेत. आणखी लोखंड आणण्यासाठी आम्हाला पृथ्वीवर पाठवा'. सूर्याने लोहाराना मार्गस्थ केले. लोहाराना लोकांकडे

जावयाचे होते; पण काळ्या ढगानी त्यांची वाट अडवून धरली. लोहारानी ढगांमधून पृथ्वीकडे पाहिले – ते खूप, खूप उंचावर होते आणि कुठून खाली उतरायचे हे त्याना ठरवायचे होते. ते पुन्हा सूर्याकडे गेले आणि म्हणाले, 'रविमहाराज, रविमहाराज, आम्ही पृथ्वीवर कसे जाणार? आमच्यासाठी पूल बनवा' सूर्याने काळ्या ढगांमधून आपले किरण फेकले आणि प्रकाशाचा एक पूल आकाशात चमकू लागला. पृथ्वीवरच्या लोकाना दिसले ते एक सोनेरी इंद्रधनुष्य. लोहार पृथ्वीवर उतरले, त्यानी लोकांकडून लोखंड मिळविले आणि त्या प्रकाशाच्या पूलावरून ते पुन्हा सूर्याकडे परतले. सूर्याने त्यांच्या पांढऱ्या दाढया पहाताच आपली सोनेरी किरणे काढून घेतली आणि त्याबरोबर ते इंद्रधनुष्य अदृश्य झाले. त्या वेळेपासून आकाशात काळे ढग अवतरताच लोखंड आणण्यासाठी सूर्य आपल्या लोहाराना पृथ्वीवर पाठवतो. परंतु हिंवाळ्यात इंद्रधनुष्ये दिसत नाहीत; कारण दिवस अगदी लहान असतात आणि लोहाराना आपले घण फारसे वापरावे लागत नाहीत".

प्रत्येक मूल एखादी तरी गोष्ट रचीत होते याचा मला अतिशय आनंद वाटत होता. ग्रीष्मातले ते शांत संधिकाल मला नेहमी आठवतात. सूर्य क्षितिजाखाली गेल्यानंतर आकाशात राखाडी रंग पसरू लागे. ग्रीष्म ऐन भरात असताना असे अनेक दिवस आपल्याला पहायला मिळतात. आकाशात अंधुक अंधुक प्रकाशाची आभा पसरलेली असते, संधिप्रकाश नेहमीपेक्षा अधिक काळ रहातो व तारेही आकाशात उशिरा पदार्पण करतात... अशा वेळी निसर्गाचे सौंदर्य नजरेत साठवीत मुले स्तब्ध बसून रहात. त्या क्षणाला अद्‌भुतरम्य कल्पनाविलासाची ज्योत विशेष तेजाने विलसू लागे. नीनाने एक गोष्ट तयार केली होती; ती आम्ही ऐकली:

"सूर्य झोपण्यासाठी आपल्या जादूच्या बागेत गेला. त्याने अंग टेकले, पण तो डोळे मिटायचे विसरून गेला. लोहाराना वाटले अजून दिवस आहे. ते आपले रुपेरी धागे घडवतच बसले. धागे घरंगळत खाली पडले आणि त्यांचे बारीक कण झाले. ते कण सर्व आकाशभर पसरले. ते आता उजळत असतात आणि चमकत असतात..."

ही सुंदर गोष्ट ऐकताच मी थरारून गेलो. निसर्गाचे मोहक सौंदर्य आणि गोष्टींमधील अद्‌भुतरम्य प्रतिमासृष्टी या सर्वांमुळे मुलांच्या जाणिवेत मुक्त होणारे विचारांचे झरे पाहून मला आनंद न होणे कसे शक्य होते? का कोण जाणे पण सर्वात मोठ्या जूनमधल्या संध्यासमयास, ज्यावेळी ख.र.डी आकाशावर कसलेतरी एक गूढ आवरण पसरलेले असते अशा वेळी,

मुलांची कल्पनाशक्ती अनिर्बंध संचार करू लागते. तसे का होते मला ठाऊक नाही; पण तसे होते खरे.

तिसरी इयत्ता संपल्यानंतर "जादूच्या बेटा"वर मुलाना "गनिमी पथकाचे मुख्य केंद्र" स्थापन करावयाचे होते. मुख्य केंद्र हे खणून काढलेल्या विवरात असले पाहिजे अशी प्रथा होती. वडीलधाऱ्या मुलानी ते विवर खणायला व ते सुसज्ज करायला मदत केली. हा उद्‌बोधक खेळ अनेक महिने चालला होता. मुलाना रात्रीही हा खेळ खेळण्याची इच्छा होती आणि त्याना त्यापासून परावृत्त करणे कठीण होते. ती टेहळणी मोहिमांवर जात असत; होकायंत्राचा उपयोग करायलाही मुले शिकली. मुलानी ल कडाच्या "मशिन-गन" आणि "स्वयंचलित रायफली" बनवल्या होत्या लष्करी मोहिमा काढायच्या आधी हुकूम द्यायचाही त्याना सराव झाला.

शाळेच्या शेवटच्या वर्षात रशियन लेखक व कथाकार बाझोव यांच्या 'पाचूची पेटी' या पुस्तकाने मुले अगदी मंत्रमुग्ध झाली. उरालच्या अप्रतिम मौल्यवान रत्नांविषयी, ताम्र-पर्वताच्या दयाळू घरधनीणीच्या अगणित संपत्तीने भरलेल्या गुहांच्या विस्मयकारक सौंदर्याविषयी आणि अप्रतिम पाचू-खडचांविषयी मी जेव्हा मुलाना वाचून दाखविले तेव्हा त्यांचे डोळे आनंदाने उजळून गेले. त्या दिवसांत सुंदर, रहस्यमय, रोमांचकारक असे काहीतरी करावे असे मुलाना वाटत होते. पाचूचे एक भूम्यंतर्गत राज्य निर्माण करावे अशी कल्पना कोणाच्यातरी डोक्यात आली. आम्ही काचेचे हिरवे, गडद निळे, आकाशी, नारिंगी, लाल आणि जांभळे असे तुकडे जमा करावयास सुरुवात केली आणि आमच्या गुहेच्या भिंतींमध्ये ते लावून ठेवले. गुहेमध्ये विजेचा एक छोटा दिवा उजळण्यात आला आणि रंगांचे एक इंद्रधनुष्याच्या इंद्रधनुष्य तेथे चमकू लागले, तेव्हा सौंदर्याच्या त्या दर्शनाने मुलानी चैतन्य-भावनेचा आणि विस्मयाचा जो अनुभव घेतला त्याचे शब्दांत वर्णन करणे केवळ कठीण आहे. येथे नव्या गोष्टी जन्मास आल्या आणि बौद्धिक क्षमते-च्या विकासातील सौंदर्यशास्त्राच्या महान सामर्थ्याची मला पुन्हा एकदा प्रचिती पटली. वाल्या, पेत्रिक व नीनाच्या विचारक्रियेत घडणारी शीघ्र प्रगती मला तेथे पहावयास मिळाली. त्यानी गोष्टी रचल्या त्या गोष्टींतील आविष्कार-संपन्नता पाहून मला आश्चर्याचा धक्का बसला. येथेच ल्यूदानेही एक गोष्ट रचली; आणि मंद बौद्धिक विकास हे त्या छोटचा मुलीच्या मुग्धतेचे कारण नसून स्वप्नाळूपणा व अंतर्मुखता हे त्याचे कारण होते याची मला खात्री पटली.

# जगाचे सौंदर्य मुलाला गाण्यांतून प्रतीत होते

निसर्गाचे संगीत हे शब्दांच्या भावनिक रंगच्छटांचे एक महत्त्वाचे उगमस्थान आहे आणि स्वरसंगीताच्या सौंदर्याच्या आकलनाची व अनुभूतीची ती गुरुकिल्ली आहे. आनंद विद्यालयाप्रमाणेच प्राथमिक वर्गातही आम्ही निसर्गाचे संगीत ऐकत होतो. निसर्गाचे संगीत ऐकत असतानाच वृंदगानासाठी मुलांची भावनिकरित्या तयारी झाली. आम्ही जी गीते गाणार होतो त्या गीतांचे स्वर निसर्गात ओळखून काढायला मी त्याना शिकविले.

शाळेच्या जवळच एक छोटासा सुंदर कोपरा होता. तेथे तळयाच्या आरशासारख्या नितळ पाण्यात सायंसमयीच्या आकाशाचे प्रतिबिंब पडत असे आणि कुरणांवरून पक्ष्यांच्या गाण्याचे मधुर स्वर लहरत येत असत. संध्याकाळच्या शीतलतेत नाकतोडयांचे संगीत ऐकू येत असे. उक्रेनियन संगीतकार या. स्तेपोवोय यांचे 'माझा सायं-सूर्यास्त' हे गाणे शिकण्यापूर्वी आम्ही वारंवार निसर्गाचे संगीत ऐकले. सूर्यास्ताचे सौंदर्य अत्यंत मनोज्ञपणे या गाण्यात प्रकट झाले आहे. ग्रीष्मातील सायंसमयीच्या शांत वेळी ज्या संगीताची एक विलक्षण मोहिनी मनावर पडत असे. ते संगीत मुलाना त्या गाण्यातून प्रतीत होत असे. आम्ही या छोटयाशा कोपऱ्यात ते गाणे शिकलो. मुलाना ते गाणे गाण्याची फार इच्छा होती. नंतर काही आठवडयानी संगीत, गाणी आणि लोकवाद्यवादनाच्या श्रवणकोठीत मुलानी ते गाणे गाऊन दाखविले. त्या गाण्यामुळे सूर्यास्ताचे सौंदर्य त्यांच्या स्मृतिचक्षूंसमोर उभे राहिले आणि त्यांचे चेहेरे आनंदाने विलसू लागले.

जंगलामध्ये आम्ही **रवितेजांकित मध्यान्हीचे संगीत** ऐकले. उंच झाडांवर पाने शांतपणे सळसळत होती, कुठेतरी एक सुतारपक्षी झाडावर टोक टोक करीत होता आणि दूरवर रानकोकिळेचे कूजन चालू होते. निसर्गातील या संगीताच्या मोहिनीने रशियन संगीतकार अरेन्स्की यांच्या 'कुकुश्का' या गाण्याचे सौंदर्य मुलाना उमजले.

अत्यंत प्रेमोत्कटतेने मुलानी मोझार्तचे 'अंगाईगीत' हे गाणे म्हटले; नंतर त्यानी 'सोरोका' हे चेक लोकगीत, चैकोवस्की यांचे 'मुलांचे गाणे' आणि अशीच इतर अनेक लोकगीते व बालगीते म्हटली. आ कपेला हे गीत गाण्याचा आमच्या गायकवृंदाचा जणू काही परिपाठच होता. प्रत्येकाला गाणे गायला आवडत होते या गोष्टीचा मला आनंद वाटत होता.

आता गाण्यासाठी एकत्र जमण्याची मुलाना आवश्यकता भासू लागली.

गाण्याने मुलांच्या जीवनात प्रवेश केला, त्यांच्या विचारांवर त्याने अत्यंत तेजस्वी असा भावनिक रंग चढविला आणि आपल्या मायभूमीबद्दलच्या व सभोवतालच्या जगातील सौंदर्याविषयीच्या प्रेमाची भावना त्यांच्या मनात जागृत केली.

'शेतात गव्हाची कापणी करणारे शेतकरी' या उक्रेनियन लोकगीताने मुलांच्या मनावर फार मोठा ठसा उमटविला. आमच्या लोकांच्या प्राचीन भूतकाळाची व आक्रमकांबरोबर त्यानी दिलेल्या शौर्यशाली लढ्याची एक प्रतिमा त्याने मुलांच्या मनात निर्माण केली. त्या गाण्याच्या स्वररचनेने मुलाना आमच्या मायभूमीच्या स्वातंत्र्यलढ्याच्या काळात ओढून नेले. कित्येक शतकांपूर्वी आमच्या दूरच्या पूर्वजानी जसे जग पाहिले होते तसेच ते मुलांच्या मनश्चक्षूंसमोर उभे राहिले. शेतकरी शेतात गव्हाची कापणी करीत होते आणि मधून मधून त्या स्त्री-पुरुषांची सचिंत नजर क्षितिजाकडे वळत होती. शत्रू तेथे केव्हाही अवतीर्ण होणार होता आणि मग आपल्या मायभूमीचे व गव्हाच्या भाऱ्यांच्या छायेत झोपलेल्या आपल्या मुलांचे रक्षण करण्यासाठी विळ्यांच्या जागी हातात खड्गे परजणार होती. केवळ गाण्याची मंत्रमुग्ध करणारी स्वररचनाच ही चित्रे हृदयावर व मनावर उमटवू शकते. लोकांच्या आत्म्याचे सौंदर्य केवळ गाण्यातूनच प्रकट होते. आपल्या मायभूमीच्या गाण्यांचे स्वरसंगीत व शब्द ही एक सामर्थ्यशाली अशी शैक्षणिक शक्ती आहे आणि लोकांची ध्येये व आशा त्यातूनच मुलाना प्रतीत होतात.

संवेदनक्षमता व भावनाक्षमता असे काही मानवी गुण आहेत. सभो-वतालच्या जगामुळे प्रत्येक गोष्ट तीव्रतेने जाणवण्याची मुलाची क्षमता ज्यावेळी धारदार बनते त्यावेळी हे गुण आविष्कृत होतात. संवदेनाक्षम, भावनाक्षम मनाचा माणूस दुसऱ्याचे दुःख, व्यथा व वेदना कधीही विसरत नाही. त्याची सदसद्विवेकबुद्धीच त्याला मदतीचा हात पुढे करण्यास भाग पाडते. हा गुण लोकांमध्ये संगीतातून व गाण्यांतून प्रस्फुटित होतो.

मनाची भावनाक्षमता हे नैतिक व सौंदर्यात्मकदृष्ट्या सुशिक्षित बनलेल्या माणसाचे स्वभाववैशिष्टय असते; प्रेमळ शब्द, नीतीवचने, सल्ला, वियो-गाचे शब्द यांबाबतीत अशा माणसाचे हृदय ग्रहणशील बनते आणि तीच या भावनाक्षमतेची अभिव्यक्ती असते. शब्दांतून **जगावे कसे** याची विद्यार्थ्यांना शिकवण मिळावी असे तुम्हाला वाटत असेल, भल्यासाठी त्यानी झटावे असे तुम्हाला वाटत असेल तर त्याना कोमलतेची व भावनात्मक संवेदनक्षमतेची शिकवण द्या. बालहृदयावर प्रभाव पाडणाऱ्या अगणित गोष्टींमध्ये संगीताला

महत्त्वाचे स्थान आहे. **संगीत व नीतिमत्ता** हे असे क्षेत्र आहे की ज्याचा गंभीरतेने अभ्यास व संशोधन झाले पाहिजे.

जगाविषयीची काव्यात्म दृष्टी संगीतामुळे दृढ बनते. ज्यात लोकानी आपल्या भावना ओतप्रोत ओतल्या होत्या असे गाणे म्हटल्यानंतर एके दिवशी आम्ही स्टेप प्रदेशात गेलो. तो दिवस मला चांगला आठवतो. आमच्यासमोर गव्हाच्या शेतांचा अमर्याद सागर पसरला होता आणि क्षितिजावर प्राचीन दफनभूमीच्या टेकाडांचे एक धुकट निळे पटल दिसत होते. सोनेरी शेतांतून एक अरुंद नागमोडी वाट जात होती, आणि निळ्या आकाशात चंडोल पक्षी गात होता. मुले एकदम थांबली – जणू काही आपल्या मायभूमीचा हा तुकडा मुले प्रथमच पहात होती. "कापणी करणाऱ्या शेतकऱ्यांच्या गाण्यासारखेच हे दिसत आहे," संवेदनाक्षम, प्रतिबिंबनशील मनाची वार्या म्हणाली. त्या क्षणाला त्या लोकगीताचे शब्द प्रत्येक मुलाच्या हृदयात निनादत होते असे मला जाणवले. गाण्यातून आपल्या मायभूमीच्या सौंदर्याची नजरेला प्रचीती येते आणि त्या सौंदर्याविषयी आपल्या मनात अधिकच आत्मभावना निर्माण होते, ते सौंदर्य आपल्याला अधिकच प्रिय बनते.

उक्रेनियन गाण्यांमधून लोकांचा एक अमोल आत्मिक ठेवा म्हणून आपली मायभाषा मुलाना प्रतीत झाली. गाण्यांमुळेच शब्दांच्या ध्वनीतील कोमलता मुलांच्या प्रत्ययास आली.

प्रथम आमच्याकडे फारच थोडचा वाद्यसंगीताच्या ध्वनिमुद्रिका होत्या. रशियन लेखक तोलस्तोय व चेखोव, गोर्की व कोरोलेन्को, गैदार व चुकोवस्की, पोलिश लेखक सेन्केएविच, अमेरिकन लेखक जॅक लंडन यांच्या कथा, पुश्किन व शेवचेन्को यांच्या कविता आणि हान्स ख्रिश्चन अॅन्डरसन व ग्रिमबंधू यांच्या परीकथा यांचे वाचन करण्याइतकेच हे संगीत मला आवश्यक वाटत होते. संगीताच्या श्रवणाशिवाय, अगदी बालपणाच्या काळापासून स्वतःचे आवडते संगीत असल्याशिवाय शिक्षणाची मी कल्पनाच करू शकत नाही. आनंद विद्यालय सुरू होण्यापूर्वी आमच्या शिक्षकानी अनेक ध्वनिमुद्रिका मिळविल्या. त्यात ध्वनिपाट्टिकाही होत्या. ही आमची खजिन्याची पेटी होती आणि ही पेटी मानवजातीच्या कलासंपदेचे संपूर्ण चित्र मुलांच्या मनावर उमटवू शकणार नव्हती या गोष्टीची आम्हाला खंत वाटत होती. विद्यार्थ्यानी पहिली इयत्ता संपवली तेव्हा आमच्याकडे सत्तावीस संगीतकृती होत्या – सात गायनाच्या व वीस वाद्यसंगीताच्या. संगीत ऐकण्यासाठी खास आम्ही आठवडचातून दोनदा संगीतदालनात जात होतो. आनंद विद्यालयात अनेक

स्वररचना आणि गाणी मुलांच्या परिचयाची झाली होती आणि त्यांच्या अंतर्विश्वाची ती भाग बनली होती. त्यानी चैकोवस्कींचे 'चंडोल' आणि 'स्नोड्रॉप', मोझार्तचे 'अंगाईगीत', शूमानचे 'शूर घोडेस्वार', आणि ग्रीग यांचे 'पर्वत-राजाच्या दरबारगृहात' या स्वररचना अनेक वेळा ऐकल्या होत्या. लिसेन्को यांच्या 'कोझा-देरेझा' या बालसंगीतिकेतील कोल्ह्याचे गाणे, शेळीचे गाणे व लांडग्याचे गाणे तसेच 'माझा आकाशवेध', 'गर्जत धावणारी विशाल नीपर' आणि 'मावळता सूर्य व काळवंडणारे पर्वत' ही उक्रेनियन गाणीही त्याना ठाऊक होती.

मुलांबरोबर काम करताना जो चार वर्षांचा काळ गेला त्या काळात आमचे ध्वनिमुद्रिकासंग्रहालय जवळ जवळ दुप्पट झाले. संगीतकृतींच्या संख्येची मला विशेष फिकीर नव्हती. तर त्याच त्या संगीतकृतींच्या श्रवणाने मुलांचे मन सौंदर्यात्मक समाधानाने भरून यावे आणि मुलांच्या बौद्धिक व भावनिक जीवनावर त्याचा ठसा उमटावा म्हणून मानवजातीच्या (व प्रथमत: उक्रेनियन व रशियन कृतींच्या) संगीत खजिन्यातील सर्वोत्कृष्ट संगीतकृतींचा मुलांच्या जीवनात प्रवेश व्हावा हा माझा हेतू होता.

महिन्याला एक नवे स्वरसंगीत मुलाना ऐकू द्या; पण ते स्वरसंगीत आयुष्यभर त्यांच्या आत्मिक समाधानाचा स्रोत बनू द्या. मुलांच्या हृदयावर कोणताही ठसा न उमटविता त्यांचे केवळ मनोरंजन करणाऱ्या नव्या नव्या संगीतकृतींत मुलाना बुडबून टाकण्याची मला भीती वाटत होती.

वर उल्लेख केलेल्या संगीतकृतींशिवाय चार वर्षांच्या काळात मुलानी पुढील संगीतकृतीही ऐकल्या: ग्लिंका यांच्या 'रुस्लान व ल्यूदमिला' या संगीतिकेतील 'काळ्या समुद्राच्या योद्धयांची आगेकूच'; 'फाउस्ट' या गुनोकृत संगीतिकेतील एल्गार; एडवर्ड ग्रीग यांचे 'नॉर्वेजियन नृत्य' व 'कोबोल्द'; चैकोवस्की यांच्या 'दि नटक्रॅकर' व 'हंस-सरोवर' या नृत्यनाट्यातील काही भाग; रिम्स्की-कोर्साकोव यांच्या 'झार सुलतानची कथा' या संगीतिकेतील 'भ्रमर-भरारी' आणि 'तीन चमत्कारां'तील काही भाग; शूमानचे 'आनंदी शेतकरी'; ग्रीग यांचे 'वनपरींचे नृत्य'; शूबर्ट यांचे 'दि एकोसेसेस'; दुनायेवस्की यांचे 'स्टार्लिंग पक्ष्यांचे आगमन'; लिसेन्को यांच्या 'हेमंत व वसंत' या संगीतिकेतील काही निवडक भाग; स्तेत्सेन्को यांच्या 'कोल्हा, मांजर व कोंबडा' या संगीतिकेतील काही निवडक भाग; बीथोवेन यांचे 'बाबाक'; 'कोकीळ' हे स्विस गाणे; 'विहंगकूजन' हे पोलिश गाणे; अनेक उक्रेनियन लोकगीते; हंगेरियन लोकगीत 'बुलबुल';

रशियन लोकगीत 'उभा तेथे एक भोजवृक्ष'; कबालेवस्की यांचे 'बालवीर पथक'; ओस्त्रोवस्की यांचे 'बालवीर'; मुरादेली यांचे 'बालवीरांची शेकोटी'; लोबाचेव यानी लिहिलेले 'शौर्याने एकसाथ पुढे चला, कॉम्रेड्स्', आणि 'बंदीखान्यातील छळ' हे लेनिन यांचे आवडते गाणे.

संगीत ऐकण्यापूर्वी संगीतात्मक प्रतिमांमध्ये प्रतिबिंबित झालेल्या प्रत्यक्ष घटना किंवा अद्‌भुतरम्य चित्रे मी मुलाना निवेदन करीत असे. या कथाना मी अतिशय महत्त्व देत होतो. संगीत ऐकण्यासाठी त्यामुळे मुलांची योग्य मनःस्थिती तयार होत असे. उदाहरणार्थ, 'ड्रेझ परीचे नृत्य' ऐकण्यापूर्वी ज्या परीकथेवर हे नृत्यनाटय़ आधारले आहे ती हॉफमान यांची जुनी परीकथा मी मुलाना सांगितली. मुलांसाठी ठळक बोलक्या शब्दांत मी त्या दयाळू परीचे चित्र उभे करण्याचा प्रयत्न केला – तिचा पिसासारखा हलकेपणा, आनंदीपणा व दयाळू वृत्ती यांचे मी वर्णन केले. मी मुलाना म्हटले, "छोटया स्फटिक घंटांचा नाद तुम्हाला येथे ऐकू येईल. त्या सुंदर परीच्या भोवतालचा परिसर त्या संगीतातून प्रतीत होतो. माझ्या कल्पनाचक्षूंसमोर उभे रहात आहेत ते तेजस्वी प्रकाशाने उजळलेल्या जादूच्या राजवाडयाचे मुलायम, नाजूक स्तंभ". मुलानी संगीत ऐकले आणि परीच्या राजवाडयाची आपण कशी कल्पना केली याविषयी ती बोलू लागली. आपल्या कल्पनेमध्ये त्यानी तळयांची, कारंज्यांची, दाट सावल्यांच्या वनरायांची आणि रहस्यमय गुहांची चित्रे रंगविली. त्या अद्‌भुतरम्य प्रतिमांमुळे ते संगीत पुन्हा ऐकण्याची इच्छा त्यांच्या मनात प्रादुर्भूत झाली.

संगीतकृतींच्या निरूपणासाठी, विशेषतः मुलाना ठाऊक नसलेल्या संगीत-कृतींच्या निरूपणासाठी शिक्षकाकडे फार मोठे चातुर्य व कौशल्य असले पाहिजे. संगीताची भाषा ही भावनांची भाषा आहे हे आपण कधीही विसरता कामा नये. अगदी साध्या, व कधी कधी अगदी प्राथमिक शब्दानी गुंफलेल्या लोकगीतांकडेही कलाकृती म्हणून पाहिले जाते; व त्या गीतांचे स्वरमाधुर्य हेच त्याचे एकमेव कारण असते. संगीतकृतींतील कलात्मक प्रति-मांचे मर्म स्पष्ट करण्यासाठी संगीतरचनाकाराची विशिष्ट आविष्कारयुक्त माध्यमे शिक्षकाना समजली पाहिजेत. हे निरूपण म्हणजे एक रेखीव, बांधीव अशी कलापूर्ण कथा असली पाहिजे. प्रत्यक्ष त्या कथेनेच भावनांची कारंजी फुलविली गेली पाहिजेत आणि कल्पनापटलावर सुस्पष्ट चित्रे निर्माण झाली पाहिजेत.

संगीताचे सौंदर्य हा विचारांचा एक शक्तिशाली उगमस्रोत आहे याबद्दल

माझी दृढ खात्री पटली आहे. संगीताच्या प्रभावाखाली कल्पनाशक्तीमध्ये प्रादुर्भूत झालेल्या सुस्पष्ट प्रतिमांमुळे विचाराला सजीवता प्राप्त होते आणि त्याचे विविध ओघ एकाच पात्राला जाऊन भिडू लागतात. अशा वेळी आपल्या कल्पनाशक्तीने निर्माण केलेल्या व आपल्याला जाणवलेल्या गोष्टींची शब्दचित्रे रेखाटण्याचे मुलांचे प्रयत्न सुरू होतात. मंद विचारांच्या मुलांच्या मनोविकासाच्या दृष्टीने संगीतश्रवण हा खरोखरच एक शक्तिशाली असा स्रोत होता. संगीताचे श्रवण केल्यानंतर आपल्या मनावर उमटलेले ठसे निःसंकोचपणे मुलानी कथन करावेत यादृष्टीने मी प्रयत्न केले.

संगीत-दालनात आम्ही बासरीवादन करीत असू आणि आमची आवडती गाणी शिकत असू. मुले दुसऱ्या इयत्तेत असताना आमच्या बासरीवादन मंडळात माझे नऊ विद्यार्थी होते व इतर वर्गांतले चार विद्यार्थी होते. मुलानी स्वतःच ही वाद्ये बनविली होती. सिऱ्योझा, युरा, तिना व लीदा ही मुले बासऱ्या बनविण्यात अतिशय तरबेज होती. ती वनराईत जात, बासऱ्यांसाठी योग्य असलेले साहित्य बरोबर हेरीत, सुकलेल्या फांद्या सावलीत ठेवून त्याना पक्केपणा आणीत, आणि विशुद्ध, मधुर स्वरांचा त्यांच्यावर साज चढवीत. तिसऱ्या इयत्तेत असताना आम्हाला दोन ॲकॉर्डियन व तीन व्हायोलिन मिळाली. युरा, सिऱ्योझा, फेद्या, लीदा, कोल्या, तीना, लारिसा, सान्या आणि शूरा ॲकॉर्डियन व व्हायोलिन वाजवायला शिकले. प्राथमिक शाळा संपण्याच्या सुमारास एकोणीस मुलांच्या घरी ॲकॉर्डियन व व्हायोलिन ही संगीत वाद्ये होती. परंतु मुलानी आपल्या बासऱ्याना कधी अंतर दिले नाही. अनेक मुलांचा संगीताकडे कल होता; पण त्यांच्या उपजत नैपुण्याचा विकास करणे हा माझा मुख्य उद्देश नव्हता; तर सर्व विद्यार्थ्यांना संगीताविषयी प्रेम वाटावे व ती त्याना आपली आंतरिक गरज भासावी याची खात्री करून घेणे हा माझा मुख्य उद्देश होता.

बालपणात जे दुर्लक्षिले गेले असेल त्याची भरपाई तरुणपणात कधीच करता येत नाही; आणि प्रौढत्वकालात तर नाहीच नाही. हा नियम मुलाच्या आंतरिक जीवनाच्या सर्वच क्षेत्राना, आणि खास करून सौंदर्यशास्त्रीय शिक्षणाला लागू आहे. सौंदर्याविषयीची संवेदनक्षमता व ग्रहणशीलता व्यक्तिमत्व विकासाच्या पुढील काळापेक्षा बालपणाच्या काळात अतुलनीयरित्या अधिक सखोल असते. मुलाची संपूर्ण अंतर्जीवनपद्धती आणि त्याचे सामूहिकाशी असलेले संबंध अनेकविध मार्गे सुंदरतेमधून निर्णित होतात आणि मुलांमध्ये सुंदरतेच्या गरजेची जोपासना करणे हे प्राथमिक शाळाशिक्षकाचे एक मुख्य

कार्य आहे. सुंदरतेच्या गरजेतून नैतिक सौंदर्य आणि हीनता व ओंगळता यांविषयीची चीड वाढीला लागते.

"व्हायोलिन हातात असलेला माणूस कोणतेही दुष्कृत्य करू शकत नाही" अशी एक जुनी उक्रेनियन म्हण आहे आणि ती असामान्य विचारवंत ग्रिगोरी स्कवोरोदा (१७२२-१७९४) यांची असावी असे म्हणतात. दुष्टता आणि खरेखुरे सौंदर्य यांचा मेळ बसूच शकत नाही. संगीत कसे जन्मास येते हे सर्वच मुलाना जाणवावे म्हणून, अलंकारिक भाषेत बोलावयाचे झाल्यास, प्रत्येक मुलाच्या हाताला व्हायोलिनचा स्पर्श करणे हे शिक्षकाचे एक सर्वात महत्त्वाचे कार्य आहे. आजच्या काळात ध्वनिमुद्रणाच्या आणि व्यापक संगीत-वितरणाच्या तांत्रिक साधनांमुळे या शैक्षणिक कार्याला एक सार्वत्रिक स्वरूप आल्यामुळे तर या कार्याला एक विशेष अर्थ प्राप्त झाला आहे. बालपिढी ही सौंदर्याची केवळ उपभोक्ती बनणार नाही याची खात्री करून घ्या; नैतिक तसाच सौंदर्यशास्त्रीय शिक्षणाचा हा प्रश्न आहे.

## मुलाच्या अंतर्जीवनातील ग्रंथ

पुस्तके मुलाच्या अंतर्जीवनात फार मोठी भूमिका बजावतात; पण केव्हा? तर उत्तम कसे वाचावे हे मुलाला ठाऊक असते तेव्हाच. "उत्तम वाचणे" याचा अर्थ काय? प्रथमतः वाचनाच्या प्राथमिक नैपुण्यांवरील प्रभुत्व हा त्याचा अर्थ आहे. स्वतःहून वाचणे ही मुलाची आंतरिक गरज बनावी असा मी प्रयत्न केला. पहिल्या व दुसऱ्या इयत्तेचे विद्यार्थी वाचनालयातून आठवड्याला एक किंवा दोन पुस्तके नेत व ती मोठ्याने वाचत. त्याशिवाय, अस्खलितपणे वाचन करण्याची व जे वाचले असेल त्याचे आकलन करण्याची ठाम, स्थिर क्षमता निर्माण करणे अशक्यप्राय आहे.

दुसऱ्या इयत्तेत प्रत्येक विद्यार्थ्याने एक वही तयार केली. ही वही म्हणजे एक "शब्द-भांडार" होते. वेधक वाटलेला किंवा न कळलेला शब्द विद्यार्थी या वहीत लिहून ठेवीत. नंतर या शब्दांचा अर्थ किंवा भावनिक छटा मी स्पष्ट करून सांगत असे. तिसऱ्या व चवथ्या इयत्तेत, काही शब्द सोडता, ही वही विद्यार्थ्याला आवडलेल्या वाक्प्रचारानी, वाक्प्रयोगानी आणि वाक्यानी भरून गेली.

मनोसमृद्धीचा एक स्रोत या नात्याने वाचनक्रिया ही वाचण्याच्या क्षमतेच्या पातळीवर आणता येत नाही. ही क्षमता म्हणजे वाचनक्रियेचा केवळ प्रारंभ

आहे. मूल अस्खलितपणे व चुका न करता वाचू शकेल, पण त्याला बौद्धिक, नैतिक व सौंदर्यात्मक विकासाच्या शिखरांवर घेऊन जाणाऱ्या मार्गाचे स्थान पुस्तकाना प्राप्त झालेलेच असते असे नाही; आणि ही गोष्ट अनेक वेळा घडते. वाचायला येणे याचा अर्थ शब्दांचा अर्थ, सौंदर्य आणि सूक्ष्म छटा यांच्या बाबतीत संवेदनाक्षम बनणे. सभोवतालच्या जगातील रंगांच्या विलासासहित व स्वरमाधुर्यासहित ज्या विद्यार्थ्याच्या मनात शब्द रुंजी घालतो तोच विद्यार्थी "वाचतो" असे म्हणता येईल. ज्या गवाक्षातून मुले जगाचे व स्वतःचे दर्शन घेतात, ज्या गवाक्षातून मुलाना जगाचा व स्वतःचा बोध होतो असे वाचन हे एक गवाक्ष आहे. वाचन करीत असताना त्याच्या जोडीनेच, किंवा अगदी पहिले पुस्तक उघडण्यापूर्वीही शब्दसंपदेवर प्रभुत्व मिळविण्यासाठी खडतर परिश्रम कारणी लावण्यात आले तरच हे गवाक्ष मुलासमोर खुले होते; आणि मुलाच्या कार्याची व अंतर्जीवनाची सर्व क्षेत्रे — काम, खेळ, निसर्गाबरोबरची क्रियाप्रतिक्रिया, संगीत आणि सृजनशीलता यांचा या सर्वामध्ये अंतर्भाव होतो. सौंदर्याची घडण करणाऱ्या सृजनशील कार्याशिवाय, परीकथा, अद्‌भुतरम्य कल्पनाविलास, खेळ व संगीताशिवाय मुलाच्या बौद्धिक जीवनाचे एक क्षेत्र म्हणून वाचनक्रियेची कल्पना करणे अशक्यप्राय आहे.

विचाराच्या जिवंत उगमस्थानाकडील सफरी, भाषेचे सौंदर्य जाणवण्याच्या क्षमतेमुळेच केवळ ज्याचे आकलन होते त्या शब्दांच्या भावनिक-सौंदर्यात्मक रंगच्छटा आणि पुस्तकामध्ये ग्रथित झालेली कलात्मक गुणवत्ता हा वाचा व विचारक्रिया यांच्या विकासाचा पाया आहे.

मुलाने आपला पहिला शब्द वाचण्यापूर्वी शिक्षक, आपली आई आणि आपले वडील वाचन करीत असताना त्याने ऐकले पाहिजे; म्हणजे कलात्मक प्रतिमांचे सौंदर्य त्याला जाणवू शकेल. निसर्गजगताकडील "सफरी" या पुस्तकांपासून काही वेगळ्या आहेत अशी कल्पना करणे अशक्य आहे. पुस्तकातून वाचलेल्या शब्दांचे सौंदर्य जाणवल्याशिवाय सभोवतालच्या जगाचे सौंदर्य मूल पाहू शकणार नाही. मुलाच्या अंतःकरणाकडे व जाणीवेकडे जाणाऱ्या मार्गाला प्रथमदर्शनी अंतर्विरोधी वाटणाऱ्या दोन बाजू आहेत: पुस्तकांकडून आणि मोठ्याने उच्चारलेल्या शब्दाकडून बोली भाषेकडे जाणारी एक व मुलाच्या अंतर्विश्वात आधीच समाविष्ट झालेल्या जित्याजागत्या शब्दाकडून पुस्तकांकडे, वाचनक्रियेकडे व लेखनक्रियेकडे जाणारी दुसरी. गुण मिळविण्यासाठी नव्हे तर वाचन व लेखन मुलाच्या अंतर्जीवनासाठी आवश्यक

असते म्हणून – वाचनाच्या व लेखनाच्या क्षमतेच्या अभावी मुलाला अनेक आनंदाना पारखे व्हावे लागते म्हणून मुलाने वाचायला व लिहायला शिकावे या दृष्टीने वाचनक्रियेची व लेखनक्रियेची भावनिक व सौंदर्यात्मक सिद्धता ही एक महत्त्वाची अट आहे.

वाचनक्रियेच्या व लेखनक्रियेच्या भावनिक व सौंदर्यात्मक सिद्धतेची परिणती म्हणून चित्रकलेच्या व बोलक्या शीर्षकांच्या द्वारे, अगदी आनंद विद्यालयातही, माझ्या विद्यार्थ्यांनी सभोवतालच्या जगाविषयीच्या आपल्या भावनाना व विचाराना व्यक्तरूप दिले. आमच्या शिक्षणपद्धतीत निसर्गाकडील "सफरीं"चे उद्दिष्ट त्या "सफरीं"पुरतेच मर्यादित नव्हते तर शब्दांच्या मार्फत मुलाचा बौद्धिक विकास घडवून आणण्याचे ते एक साधन होते. शब्द नसते, बौद्धिक शिक्षण नसते आणि विचार करण्यास शिकविणे, वस्तू, घटना आणि त्यांच्या परस्पर क्रियाप्रतिक्रिया पहाण्यास शिकविणे, सर्वसाधरणीकरण करण्यास शिकविणे, आणि निसर्गापासून, दृष्टिगोचर वस्तूंपासून व मनावर उमटलेल्या ठशांपासून स्वतःला अलग करण्यास शिकविणे हे शिक्षणाचे जे मुख्य उद्दिष्ट आहे त्या उद्दिष्टाच्या दिशेने चाललेली धडपड जर नसती तर निसर्गसौंदर्य, रंग व ध्वनिविलास आणि जीवनातील अक्षय विविधता यांबाबत मुलांची वृत्ती उदासीन बनली असती.

पहिल्या इयत्तेत वाचन ही मुलांची आधीच आंतरिक गरज बनावी, अस्खलित वाचनपाठांची हातोटी निर्माण करणारे ते केवळ उपक्रम बनू नयेत याकडे मी लक्ष दिले. जे मुलाच्या बौद्धिक, भावनिक व सौंदर्यात्मक पातळीशी सुसंगत असते आणि, त्याच वेळी, जे त्याच्या पुढील विकासाशी सुसंवादी असते तेच फक्त मुलाच्या आत्मिक जगात प्रवेश करू शकते. वाचनसाहित्य अत्यंत चोखंदळपणे निवडणे हे शिक्षकाच्या दृष्टीने अनन्यसाधारणरित्या महत्त्वाचे असते. दुर्दैवाने, वाचनपाठमालांमध्ये मुलाना समजणाऱ्या अशा अनेक कलात्मक मूल्यांचा अभाव जाणवतो. शालेय वर्ष सुरू होऊन तीन महिन्यांनंतर वाचनपाठमालांमध्ये अंतर्भूत नसलेल्या चित्तवेधक कथा आणि परीकथा वाचावयास आम्ही सुरुवात केली.

'उक्रेनियन व रशियन कथा' हे पुस्तक मी मुलाना वाचायला दिले, 'पेंढ्याचा चिमुकला बैल' ही उक्रेनियन लोककथा वाचण्यासाठी मी मुलांची तयारी केली – कथा कशाविषयी आहे हे मी त्याना सांगितले आणि ते सांगताना मी त्याला चित्रांची जोड दिली. मुलानी पुस्तक उघडले. प्रथम एका विद्यार्थ्याने गोष्ट वाचली, नंतर दुसऱ्या, नंतर तिसऱ्या. आम्ही ती

गोष्ट पुन:पुन्हा वाचली, पण मुलांपैकी कोणीही कंटाळले नाही; कारण ते वाचन म्हणजे पुनरावृत्तीचा पाठ नव्हता तर अत्यंत ठळक, सुस्पष्ट प्रतिमांचा तो एक सखोल व्यक्तिगत अनुभव होता. प्रत्येक मूल शब्दाना आपल्या स्वत:च्या व्यक्तिगत बोधनाची जोड देत होते. एक मूल वाचीत असताना इतर मुले अत्यंत लक्षपूर्वक ती गोष्ट ऐकीत होती; जणू काही सर्व मुले एका पाठोपाठ एकच गाणे म्हणत होती आणि त्या गाण्याच्या शब्दानी व स्वरमाधुर्याने त्यांचे चित्त थरारून जात होते. प्रत्येक मूल आपापल्या पद्धतीने गाणे गात होते, प्रत्येकाच्या शब्दाना एक खास रंगच्छटा प्राप्त होत होती आणि त्यातून अनुभवाचे, बोधनाचे आणि ठशांचे सूक्ष्म बारकावे इतराना प्रतीत होत होते. असे वाचन संगीतासारखे भासते; शब्दांमधून स्वरमाधुर्य ओथंबू लागते.

मुलाने अनेक वेळा विचाराच्या उगमस्थानाकडे जाणे आणि भाषेचे सौंदर्य अनुभविणे हे मुलाची भावनिक, व्यक्तिगत वाचनाची तयारी करण्याच्या दृष्टीने खास महत्त्वाचे आहे. "चिमुकला बैल दाट अरण्यात गेला. तेथे त्याला एक भुरा लांडगा भेटला" हे वाक्य विद्यार्थी वाचतो. "दाट अरण्य" हे शब्द उच्चारताच मुलाचे मन त्या अविस्मरणीय चित्रांमध्ये डूब घेते: अरण्यातला तो सायंसमयीचा संधिप्रकाश, रात्री येणारे ते रहस्यमय आवाज, आणि गडगडाटी वादळापूर्वीची पानांची ती अस्वस्थ सळसळ! "दाट अरण्य" हे शब्द ऐकताना मुलाच्या अंतर्जीवनात या सर्व गोष्टीनी प्रवेश केलेला असतो आणि निसर्गाच्या तेजस्वी रंगांचा, ध्वनींचा व संगीताचा तेथे खेळ सुरू झालेला असतो. जित्याजागत्या शब्दाच्या व विचाराच्या उगमस्थानाकडे जाणारा मार्ग मुलाला जर ठाऊक नसेल तर वाचावे कसे, शब्दोच्चार कसा करावा, स्वरांचे चढउतार कसे वापरावेत हे शिक्षकाने कितीही विशद करून सांगितले तरी त्यामुळे आविष्कारयुक्त वाचन मुलाला शिकविता येणार नाही.

मुलानी उद्‌बोधक साहित्यकृतींच्या विश्वात जगावे, राष्ट्रीय व एकूण मानवी संस्कृतीचा एक भाग असलेल्या अशा या विश्वात जगावे म्हणून मुलांच्या हातात एकही निकृष्ट पुस्तक पडू नये ही, शाळेच्या माझ्या कामाच्या अगदी पहिल्या दिवसापासून, माझी विवंचना होती. हे एक अनन्य महत्त्वाचे असे कार्य आहे: आपल्या संपूर्ण हयातीत माणूस साधारण २००० पेक्षा अधिक पुस्तके वाचू शकत नाही–यावरून हाच निष्कर्ष निघतो की, बालपणाच्या काळात आणि यौवनाच्या प्रारंभकाळात वाचनसाहित्याची अत्यंत विचारपूर्वक

निवड केली पाहिजे. मुलाने थोडे वाचले तरी चालेल, पण प्रत्येक पुस्तकाने भावनिकदृष्टचा व बौद्धिकदृष्टचा त्याच्यावर प्रभाव पाडला पाहिजे; असे झाले तर माणूस त्या पुस्तकाकडे पुनःपुन्हा वळेल आणि नव्या नव्या मूल्यांचा त्याला तेथे सतत शोध लागेल.

मुलाला आविष्कारयुक्त वाचनातून समाधान व आनंद मिळणे हे येथे अतिशय महत्त्वाचे आहे. शब्दाचे सामर्थ्य व सौंदर्य त्याच्या ध्वनि-बोधनातून प्रकट होते, म्हणूनच शब्दाच्या भावनिक रंगच्छटा ध्वनि-बोधनातून – आविष्कारयुक्त वाचनातून – प्रतीत होणे हे अत्यंत महत्त्वाचे आहे.

पहिल्या इयत्तेत आमच्याकडे आधीच एक बालग्रंथालय तयार झाले होते. त्याचे चार विभाग होते. माझ्या मते मुलांच्या नैतिक, बौद्धिक व सौंदर्यशास्त्रीय शिक्षणाच्या दृष्टीने ज्या गोष्टी सर्वात बहुमोल होत्या अशा गोष्टींचा पहिला विभाग. (प्रत्येक पुस्तकाच्या आम्ही पंधरा प्रती खरेदी केल्या. त्यामुळे वाचनपाठांच्या वेळी दोन विद्यार्थ्यांना एक पुस्तक असे प्रमाण पडत असे). प्राथमिक शाळेच्या चार वर्षांच्या अभ्यासकाळासाठी हा विभाग तयार करण्यात आला होता. सुस्पष्ट कलात्मक प्रतिमानी साकार झालेल्या आणि मुलांच्या आकलनात येतील अशा कल्पनानी परिप्लुत असलेल्या गोष्टी या विभागासाठी निवडण्यात आल्या होत्या. तोलस्तोय, झुकोवस्की, हान्स ख्रिश्चन ॲन्डरसन, ह्यू गो, ग्रिम बंधू, पुश्किन, कोरोलेन्को, नेक्रासोव, तुर्गेनेव, चेखोव, सेन्केविच, लंडन, ट्वेन, गोर्की, फ्रॅन्को, कातायेव इत्यादी लेखकांच्या गोष्टींचा व कथांचा त्यांत अंतर्भाव होता.

मुलांच्या दृष्टीने या साहित्यकृतींचे वाचन म्हणजे केवळ जगाचे ज्ञान मिळविण्याच्या प्रक्रियेचा एक भाग नव्हता, नियमित संवयी व क्षमता संवर्धित करण्याचे ते केवळ उपक्रम नव्हते तर त्यांच्या भावनिक व नैतिक शिक्षणाचा तो भाग होता. प्रत्येक पुस्तकाचा मुलांच्या मनावर फार खोल ठसा उमटत होता. 'स्तुद्योनाया नदीवरील हिंवाळी झोपडी' या मामिन-सिबिर्याक यांच्या अप्रतिम कथेने मुलांच्या मनावर फार मोठा परिणाम घडवून आणला. एका वृद्ध माणसाची ही कथा आहे. तो एकटाच रहात असतो आणि सर्वजण त्याला विसरलेले असतात. तैगाच्या एका दूरच्या भागात तो आपला काळ घालवीत असतो. हे पुस्तक वाचल्यानंतर मुलांची सभोवतालच्या जगातील घटनांविषयीची संवेदनक्षमता किती धारदार बनली हे मला पहायला मिळाले.

पाठांच्या वेळी तसेच वर्गाबाहेरही आम्ही कथांचे वाचन करीत असू.

आमच्या ग्रंथालयाच्या या विभागाची तुलना सामूहिक श्रवणासाठी असलेल्या संगीतकृतींच्या ध्वनिमुद्रिकांशी करता येईल.

आमच्या ग्रंथालयाच्या दुसऱ्या विभागात सद्यःकालाविषयी, सोविएत लोकांच्या कार्याविषयी, शातंतालढ्याविषयी, महान देशाभिमानी युद्धातील वीरांच्या पराक्रमांविषयी आणि वीर-बालकांविषयी आजच्या रशियन व उक्रेनियन लेखकानी लिहिलेल्या गोष्टींचा संग्रह होता. सोविएत लेखक मिखालकोव आणि मार्शाक यांच्या कविता माझ्या विद्यार्थ्यांनी अत्यंत रस घेऊन आवडीने वाचल्या; त्याचप्रमाणे गैदार, कासिल, नोसोव, प्रिलेझायेवा, त्रुब्लाइनी, यानोवस्की, झ्बानात्स्की, लिन्कोव, इवानेन्को, वरोन्कोवा, झित्कोव आणि अलेक्सांद्रोवा यांच्या कथाही मुले अगदी आवडीने वाचत.

परीकथा, कविता आणि बोधकथा यांचा तिसरा विभाग होता. शाळे-व्यतिरिक्त वाचण्यासाठीच केवळ ही पुस्तके होती. प्रत्येक मूल आपल्याला सर्वात स्वारस्यपूर्ण वाटणारे पुस्तक निवडीत असे (आणि उत्कृष्ट चित्रे, व जे वाचले असेल त्याचे शिक्षकाकडून किंवा वर्गबंधूंकडून होणारे पुनर्कथन यांमुळे हे स्वारस्य जागृत होत असे).

ग्रीक पुराणकथा हा आमच्या वर्ग-ग्रंथालयाचा चवथा विभाग होता. अत्यंत प्रयासाने आम्ही ही पुस्तके शोधून काढली आणि मुलाना समजतील अशा स्वरूपात या ग्रीक पुराणांची मांडणी करण्यात आली. मुलांच्या बौद्धिक आणि सौंदर्यात्मक संगोपनात प्राचीन पुराणकथा महत्त्वाची भूमिका बजावतात. पुराणकथांमुळे केवळ मानवसंस्कृतिग्रंथाचे एक स्तिमितकारक पानच मुलांसमोर प्रकट होत नाही तर या पुराणकथा मुलांच्या कल्पनाशक्तीला जागृती आण-तात, त्यांच्या मनाचा विकास घडवितात आणि पुरातन व अतिपुरातन काळाविषयी मुलांच्या मनात स्वारस्य निर्माण करतात.

अभ्यासाच्या पहिल्या वर्षाच्या मध्याला आम्ही सामूहिक वाचनाच्या बैठका सुरू केल्या. एखादे पुस्तक मुलाना घरी वाचता यावे म्हणून त्या पुस्तकाच्या सर्व प्रती मी मुलाना वाटून देत असे. सामूहिक वाचनासाठी करण्यात येणारी ती तयारी असे. ज्या गोष्टीचा आशय मुलाना आधीच ठाऊक असे ती गोष्ट वाचण्यासाठी आम्हाला परीकथांच्या कोठीत जाण्याची काय गरज होती? ही इच्छा कोठून पैदा होत असे, आणि मुलानी तरी तसे का करावे? त्यापेक्षा काहीतरी नवीन वाचणे चांगले नव्हते का?

होय, नव्या, अपरिचित गोष्टीही वाचल्या पाहिजेत आणि आम्हाला नवीन असलेली पुस्तकेही आम्ही वाचीत असू. पण आपल्याला थरारून

टाकणाऱ्या गोष्टी आपल्या मित्राना वाचून दाखविण्याची व आपले विचार व भावना शब्दांमध्ये व्यक्त करण्याची मुलाला जेव्हा इच्छा उत्पन्न होते तेव्हाच पुस्तके मुलाच्या अंतर्जीवनाचा भाग बनतात. ग्रंथालयाच्या पहिल्या विभागातील प्रत्येक पुस्तक आम्ही निदान दहा वेळा तरी वाचले असेल, आणि या पुनरावृत्तीमुळे त्यातील स्वारस्य कधीही कमी झाले नाही. दोन-तीन आठवड्यांपूर्वी वाचलेले पुस्तकही मुलांच्या स्मरणातून जात नसे आणि केवळ ते पुन्हा वाचण्यासाठी मुले कधी कधी खास त्या कारणासाठी शाळेत येत असत. तीन-चार महिने उलटून गेल्यानंतरही मुलाना आपले एखादे आवडते पुस्तक पुन्हा वाचावेसे वाटे आणि सामूहिक वाचनाच्या यादीत त्याचा समावेश होई.

परंतु अगदी वाचायला शिकण्याच्या आधीच शब्दांच्या सूक्ष्म छटा ओळखायला मुलाने सुरुवात केली असेल तरच साहित्यकृतीच्या सौंदर्याचा व सामर्थ्याचा मुलाच्या अंत:करणाला व मनाला स्पर्श होतो. विचाराच्या जिवंत उगमस्थानांकडील "सफरीं"च्या काळात शब्दांचे मोहक सौंदर्य ज्याना जाणवलेले नसेल त्यांच्या मनाला त्याना ठाऊक असलेली गोष्ट दुसऱ्यांदा, तिसऱ्यांदा किंवा दहाव्यांदा ऐकण्याची कधीच इच्छा होत नाही.

आमचे काही पाठ आमच्या काही खास आवडत्या कथांसाठी आम्ही कारणी लावीत होतो. रोमांचित मनाने मुले वाचनाची तयारी करीत. आपल्याला जे सर्वात जास्त आवडलेले असेल, जे सर्वात जास्त चित्तथरारक वाटलेले असेल त्याचे प्रत्येक मूल वाचन करीत असे.

आमच्याकडे कवितावाचनाला एक खास स्थान प्राप्त झाले. उत्कृष्ट कवितांचे मी मुलांसाठी वाचन करीत असे: पुश्किन, लेर्मोन्तोव, झुकोवस्की, नेक्रासोव, फेत, शेवचेन्को, लेस्या उक्राइन्का, शिलर, मिच्केविच, हैने, बेरान्झे इत्यादी कवींच्या त्या कविता होत्या. आपल्या आवडत्या कविता मुखोद्गत करण्याची एक इच्छा मुलांच्या मनात निर्माण झाली. चार वर्षांत त्यानी अनेक कविता मुखोद्गत केल्या. पण काव्यमय भाषेच्या अप्रतिम नादसृष्टीने त्यांच्या हृदयाची पकड घेईपर्यंत त्याना ते कधीही साध्य झाले नाही.

उत्कृष्ट काव्यात शब्द, प्रतिमा आणि स्वर यांचे सौंदर्य एकात्मकतेने एकजीव झालेले असते. या सौंदर्यात्मक संपदेचे एकत्व मुलाना अगदी लहान वयापासून जाणवावे असा मी प्रयत्न केला. मी मुलाना उक्रेनियन व रशियन कवींच्या कविता म्हणून दाखवीत असे. पुश्किन यांचे 'द्रष्टया ओलेगविषयीचे

गाणे' आणि शेवचेन्को यांची 'मोलकरीण' ही कविता आम्ही अनेक वेळा ऐकली. मुद्दाम कोणतेही प्रयास करावे न लागताही जवळ जवळ सर्व मुलाना या कविता पाठ झाल्या. याच पद्धतीने निसर्गसौंदर्याचे वर्णन करणाऱ्या अनेक भावकविताही मुलानी मुखोद्गत केल्या. आज जे काही वाचलेले असेल त्याचा काही भाग दुसऱ्या दिवसासाठीही राखून ठेवावा असे मुलाना वाटे. स्वप्नांच्या सांदीकोपऱ्यात अनेक आठवडे आम्ही 'टॉम सॉयरची साहसे' वाचीत होतो. या पुस्तकाचा मुलांच्या मनावर जो ठसा उमटला होता त्याला सभोवतालच्या वातावरणामुळे अधिकच बळकटी आली. याच पद्धतीने आम्ही गोर्कीचे 'बालपण', कातायेव यांचे 'समुद्रात चमकणारे एकले शीड' आणि बाझोव यांची 'पाचूची पेटी' ही पुस्तके वाचली.

कालांतराने आम्ही नाटयमय वाचनाचे सायंकालीन व प्रभातकालीन मेळावे भरवावयास सुरुवात केली. ज्याना त्यांत भाग घ्यावयाचा असेल ते आपल्याला आवडलेली गोष्ट किंवा कविता वाचून दाखविण्याची किंवा म्हणून दाखविण्याची तयारी करीत असत. इतर वर्गातलेही अनेक विद्यार्थी या मेळाव्याला येत, आणि हळू हळू साऱ्या शाळेतच अशा प्रकारचे वाचनाचे मेळावे सुरू झाले.

पहिल्या सहामाहीच्या अखेरीला आणि शालेय वर्षाच्या अखेरीला असे दोन वेळा आम्ही मायभाषेचे महोत्सव साजरे करीत असू. या महोत्सवात अनेक प्रथांचा पायंडा पडला. कथा किंवा कविता कोण उत्कृष्टपणे म्हणून दाखवितो याचा निर्णय करण्यासाठी मुले खेडयातल्या वडीलधाऱ्या माणसाना पाचारण करीत असत. ही एक असाधारण अशी स्पर्धा असे, आणि विजेत्याना पारितोषिकादाखल पुस्तके देण्यात येत. आपल्या मायभाषेचे थोर उपासक व चोखंदळ समीक्षक असलेल्या श्रेष्ठ सामुदायिक शेतकऱ्यांच्या हस्ते ही पारितोषिके देण्यात येत. तेही गोष्टी सांगत व कविता म्हणून दाखवीत. कधी कधी असेही घडे की विद्यार्थ्याने आणि मोठ्या माणसाने सांगितलेली गोष्ट किंवा म्हटलेली कविता एकच निघे. चवथ्या इयत्तेत असताना गोष्टी, कविता, बोधकथा वाचून दाखविणारी किंवा म्हणणारी मुले इतकी झाली की त्यामुळे वासंतिक महोत्सव दोन-दोन दिवस चालवावा लागे.

आई, वडील, आजी, आजोबा या आपल्या वडीलधाऱ्या माणसांबरोबर घडणाऱ्या सततच्या साहचर्यामुळे एकूण जीवनामध्ये अनेक उद्बोधक परंपरा सुरू झाल्या. आमचे उत्कृष्ट वाचक घरी पालकाना पुस्तके वाचून दाखवू

लागले आणि मुले कसे वाचन करतात ते ऐकण्यासाठी प्रौढ माणसे शाळेत येऊ लागली. अनेक वाचनमंडळे गावात उदयास आली आणि अत्यंत मान्यवर अशी प्रौढ माणसेही त्या मंडळांत सामील झाली. ही मंडळे संघटित करण्याच्या कार्यामुळे मुलांच्या पुस्तकांतील व वाचनातील स्वारस्याला अधिकच गती मिळाली.

त्याच वेळी एक पारंपारिक ग्रंथोत्सव सुरू झाला आणि संपूर्ण शाळा त्या उत्सवात भाग घेऊ लागली. ३१ ऑगस्टला म्हणजे शाळा सुरू होण्याच्या आदल्या दिवशी मुले आणि पालक शाळेत येत. त्या दिवशी मुले एकमेकाना व पालक मुलाना पुस्तके भेट देत. त्या दिवशी वाचनमंडळांचे सर्वोत्कृष्ट नेतृत्व करणाऱ्याना सामुदायिक शेतांच्या व्यवस्थापनातर्फे पुस्तके देण्यात येत व पुढे तो एक नियमच बनला.

वाचन ही महत्त्वाची आंतरिक गरज बनावी म्हणून प्रत्येक मुलाने आपले एक व्यक्तिगत ग्रंथालय तयार करावे असा मी प्रयत्न केला. अभ्यासाच्या पहिल्या दोन वर्षांच्या काळात प्रत्येक कुटुंबाकडे एक ग्रंथालय तयार झाले पाहिजे यावर मी कटाक्ष ठेवला. काही कुटुंबांमध्ये पाचशेहून अधिक पुस्तके होती तर काही कुटुंबांकडे कमी, पण दर महिन्याला प्रत्येक कुटुंबाकडून आपल्या संग्रहात भर घातली जात असे. महिन्याभराच्या काळात एखाद्या कुटुंबाकडे नवे पुस्तक आले नाही तर ती गोष्ट मला भयावह वाटत असे.

स्वयंशिक्षण आणि व्यक्तिगत बौद्धिक जीवन हे पुस्तकांबरोबर सुरू होते. शैक्षणिक प्रक्रियेच्या क्रमात असा एक क्षण येतो की ज्यावेळी शिक्षकाने स्थिरपणे धरलेला विद्यार्थ्याचा हात तो सोडून देऊ शकतो व म्हणू शकतो, "आता तू स्वतःच्या बळावर मार्गक्रमण कर व जगायला शीक." असे पाऊल उचलण्यासाठी फार मोठी शैक्षणिक सुज्ञता आवश्यक आहे. स्वतंत्र जीवनासाठी माणसाची बौद्धिक व नैतिक तयारी करण्यासाठी आपण त्याला पुस्तकांच्या जगात घेऊन गेले पाहिजे. प्रत्येक विद्यार्थ्याच्या दृष्टीने पुस्तकाना मित्राचे, गुरूचे, आणि सुज्ञ शिक्षकाचे स्थान प्राप्त झाले पाहिजे. वाचन, मनन व चिंतन करण्यासाठी प्रत्येक छोटया मुलाने व मुलीने एकांत मिळविण्यासाठी धडपडणे हे एक महत्त्वाचे शैक्षणिक कार्य आहे असे मला दिसले. एकांतवास म्हणजे एकलेपणा नव्हे. विचार, भावना, मते व दृष्टिकोन यांच्या स्वयंशिक्षणाची ती सुरुवात आहे. आत्मिक गरज म्हणून छोटया मुलाच्या जीवनात पुस्तके प्रवेश करतात तेव्हाच हे शक्य होते. एखाद्या छोटया मुलाला व मुलीला कोणत्या प्रकारच्या पुस्तकात रस आहे आणि पुस्तकांकडून

कोणत्या प्रकारच्या प्रश्नांची उत्तरे त्याना हवी असतात हे मी त्यांच्या-बरोबर होणाऱ्या व्यक्तिगत संभाषणातून शोधून काढीत असे. मुलाना सुज्ञ सल्ला देण्यासाठी आणि आवश्यक असलेली पुस्तके त्याना मिळवून देण्यास मदत करण्यासाठी या गोष्टीची मला गरज होती.

शाळेमध्ये पुढील चार गोष्टींचे राज्य असेल तरच शाळा हे संस्कृतीचे खरेखुरे उगमस्थान बनते. त्या गोष्टी म्हणजे: आपल्या मायदेशाविषयीचे प्रेम, इतर जनांबद्दल आदर, ग्रंथप्रेम आणि आपल्या मायभाषेचे प्रेम.

किशोरवयीन मुलांबरोबर काम करण्यात काय अडचणी असतात याबद्दल माझ्या विद्यार्थ्यांबरोबर काम करण्यास सुरुवात करण्यापूर्वीही मी पुष्कळ वाचले होते. "लहान मुलांबरोबर काम करण्याइतकी सर्वात सोपी गोष्ट दुसरी कोणतीही नाही. पण किशोर वयात पदार्पण करताच मूल न ओळखण्याइतके बदलते. सहृदयता, संवेदनक्षमता व सौजन्य यांचा त्याच्या-मध्ये लोप होतो. त्या जागी उद्धटपणा व बेपर्वाई दिसू लागते," असे मला सांगण्यात आले होते. सत्यापासून हे शब्द फारच दूर आहेत याबद्दल पुढे माझी खात्री पटली आहे. शिक्षकाने मुलामध्ये चांगुलपणा निर्माण केला नाही, मूल स्वभावतःच चांगले आहे असा जर शिक्षकाने विचार केला तरच चांगुलपणा "लोप पावतो." बालपणापासूनच जर मुलाला पुस्तकांविषयीचे प्रेम शिकविले नाही, वाचन ही मुलाला उर्वरित आयुष्याची गरज भासली नाही तर पौगंडावस्थेचा काळ हा एक पोकळ काळ बनेल, आणि दुर्गुण कुठून, कसे अचानक प्रकट होतील त्याचा पत्ताही लागणार नाही.

## मायभाषा

उक्रेनियन ही आमची उक्रेनियन लोकांची मायभाषा असून आज ३ कोटी ६० लाख लोक ती भाषा बोलतात. पण आमच्या लोकांच्या इतिहा-साचा विकास असा झाला की आमची भाषा रशियन भाषेच्या अगदी निकट येऊन पोहोचली. या दोन भाषा परस्परांशी अत्यंत घनिष्टरित्या संबंधित आहेत, पण त्यामुळे उक्रेनियन व रशियन या दोन भाषांवरील प्रभुत्व नुसतेच सहजसुलभ झालेले नाही; उलट ते अधिकच बिकट बनले आहे. या भाषांत समान उच्चारांचे शेकडो शब्द आहेत पण त्यांचा अर्थ मात्र भिन्न भिन्न आहे. इतर काही बाबतीत रशियन व उक्रेनियन भाषेतील एकाच शब्दाला अलग भावनिक छटा असलेल्या आढळतात. एका भाषेत कारुण्याची

छटा असलेल्या शब्दाला दुसऱ्या भाषेत उपहासाची छटा असते. दोन्ही भाषांतील सूक्ष्म भावच्छटांचा विलास, शब्दांच्या भावनिक व सौंदर्यात्मक रंगच्छटांची नाजूक वैशिष्टये हा असा एक ठेवा आहे की जो आपण, उक्रेनियन शाळाशिक्षकानी, आपल्या बालपिढीकडे सुपूर्द करावयाचा आहे.

भाषा ही लोकसंपदेचा एक भाग आहे. "मला जेवढ्या भाषा येतात तेवढे लोक म्हणजे मी" अशी एक म्हण आहे. पण ज्या माणसाने आपल्या मायभाषेवर प्रभुत्व मिळविलेले नाही, तिचे सौंदर्य ज्याला जाणवलेले नाही त्या माणसाला इतर लोकांच्या भाषेचा संपन्न ठेवा अप्राप्य ठरेल. आपल्या मायभाषेच्या सूक्ष्म बारकाव्यांचे माणसाला जितक्या सखोलतेने ज्ञान होते तितकी आपल्या मायभाषेच्या सूक्ष्मछटाविलासांबाबतची त्याची ग्रहणशीलता अधिक तरल बनते, इतर लोकांची भाषा आत्मसात करण्याच्या दृष्टीने त्याच्या मनाला अधिक सिद्धता प्राप्त होते आणि तितक्या अधिक क्रियात्मक वृत्तीने तो भाषेचे सौंदर्य पाहू शकतो.

शालेय जीवनातल्या अगदी पहिल्या पदार्पणापासून हा जीवनदायी उगमस्रोत – आपल्या मायभाषेचे हे सुसंपन्न भांडार – मुलाना निश्चितपणे खुले होईल असा मी प्रयत्न केला. विचारांच्या आणि भाषेच्या जिवंत उगमस्थानांकडील "सफरी" करीत असताना उक्रेनियन व रशियन या दोन्ही भाषांतील शब्दांच्या भावनिक, सौंदर्यात्मक व अर्थात्मक छटांचा माझ्या विद्यार्थ्याना एकाच वेळी बोध झाला. त्याना भाषेचे सौंदर्य जाणवावे, शब्दांची त्यानी नीट जोपासना करावी आणि त्यांच्या विशुद्धतेची दक्षता घ्यावी असा मी प्रयत्न केला.

माणसाचा मौखिक विकास हा त्याच्या आत्मिक विश्वाचा आरसा आहे. मायभाषेचे सौंदर्य आणि महानता, सामर्थ्य आणि आविष्कारक्षमता ही मुलाच्या भावनाना, आत्म्याला, विचाराना व अनुभवाना उदात्ततेचा स्पर्श प्राप्त करून देणारी व त्याच्यावर प्रभाव पाडणारी अत्यंत महत्त्वाची साधने आहेत. प्राथमिक शाळेत, जेथे मुलाच्या मार्गात समोर उभी रहाणारी प्रत्येक नवी घटना मुलाला विस्मयकुंठित करीत असते तेथे तर या साधनांचे महत्त्व पुष्कळच मोठे असते.

आम्ही निसर्गाकडे गेलो – अरण्यांत गेलो, बागेत गेलो, शेतांत गेलो, कुरणांत गेलो, नदीकाठावर गेलो – आणि सभोवतालच्या जगाच्या समृद्धतेचे मुलाना दर्शन घडविण्यास मला मदत करणारे शब्द हे माझे साधन बनले. मुलानी जे काही पाहिले व जे काही श्रवण केले त्याचे सौंदर्य त्याना जाणवले,

त्यातून शब्दांच्या नाजूक छटांचा त्याना बोध झाला आणि शब्दांच्या मार्गे सौंदर्याने त्यांच्या हृदयात प्रवेश केला. निसर्गाच्या "सफरी" ही निर्मिती-क्षमतेची पहिली प्रेरणा होती. आपल्या भावना व आपल्या मनावर उमटलेले ठसे शब्दांतून व्यक्त करण्याची, सौंदर्याविषयी बोलण्याची एक इच्छा त्यांच्या मनात विकसित झाली. निसर्गाविषयी त्यानी छोटी छोटी शब्दांकने तयार केली. ही शब्दांकने म्हणजे मुलांच्या वाचाविकासाचे व विचारविकासाचे एक महत्त्वपूर्ण रूप होते. प्रत्येक मुलाने आपले स्वतःचे शब्दांकन तयार केले व नंतर वर्गामध्ये ते लिहून काढले. अभ्यासाच्या पहिल्या वर्षात मुलानी जी तोंडी शब्दांकने तयार केली आणि नंतर जी 'आमची मायबोली' या संग्रहात किंवा स्वतःच्या वैयक्तिक वहीत लिहून काढली अशी काही छोटी छोटी शब्दांकने मी येथे देत आहे :

**चंडोलाचे गाणे** ( लारिसा )

निळ्या आकाशात एक करडा गोळा लहरत आहे. तो आहे चंडोल. त्याचे अतिशय सुंदर गाणे मला ऐकू येत आहे – मला त्या गाण्याचा कधीच कंटाळा येत नाही. जणू काही तो अत्यंत नाजूक, कोमल रुपेरी तारा छेडीत आहे. सोनेरी गव्हाच्या कणसांपासून सूर्यापर्यंत त्या तारा पसरलेल्या आहेत. गव्हाची कणसे तल्लीनतेने ते गाणे ऐकत आहेत.

**सूर्य क्षितिजाखाली गेला** ( सिऱ्योझा )

सूर्य क्षितिजाखाली गेला. शेतांवर काळोखी पसरली. संधिप्रकाश घळीतून सरपटत बाहेर आला आणि शेतांवर व कुरणांवर पसरला. एखाद्या नदीसारखा तो पसरला आहे. पण पॉप्लरवरच्या शेंड्यांवर सोनेरी ठिणग्या चमकू लागल्या आहेत. तो होता सूर्याने पाठविलेला अखेरचा निरोप. त्या ठिणग्या काही वेळ चमकल्या आणि मग नाहीशा झाल्या. बरं आहे, रविमहाराज, अच्छा !

**मधमाश्या पाणी पीत आहेत** ( गाल्या )

मधमाश्या पाणी कशा पीत होत्या ते मी पाहिले. छोटे छोटे जलबिंदू गवताच्या छोट्याशा पात्यावरून घरंगळत आले आणि विलोवृ-

क्षाच्या गुळगुळीत बुंध्यावर पडले. बुंधा ओला झाला आहे. मधमाश्याना विलोचा वास आवडतो. त्या बुंध्याकडे उडत जातात आणि पाणी पितात. त्या आपले सोनेरी पंख फडफडवीत आहेत. चिमण्या मधमाश्यानो, थोडा वेळ विसांवा घ्या; तुम्हाला खूप खूप दूर उडायचे ओह.

**सातूचे शेत बहरायला लागले आहे** (वाऱ्या)

सातू बहराला आला. एखादे सफेद पांघरूण अंथरावे तसे शेत दिसत होते. पण ते पांघरूण जिवंत होते, आणि त्याचा वास तरी किती सुरेख येत होता! प्रत्येक फुलावर एक एक मधमाशी हीती. पांघरुणाचा गुं गुं असा आवाज येत होता – गुं गुं आवाज करणाऱ्या त्या मधमाश्या होत्या. छोटचा फुलावर एक भला मोठा केसाळ भुंगा बसला. ताटवा हलू लागला आणि खाली वाकला. भुंग्याला काही सावरता येईना. तो खाली पडला आणि रागाने गुं गुं गुं गुं करू लागला.

**कापणी-मळणी यंत्राचा चालक** (युरा)

माझे काका एक प्रचंड कापणी-मळणी यंत्र चालवतात. गव्हाचे पीक समोर उभे आहे. तीक्ष्ण पात्यानी गहू कापला जातो आणि तो मळणी यंत्राकडे रवाना होतो. मळणी यंत्र गव्हाची मळणी करते. धान्याचा एक छोटा ओघ सुरू होतो व तो टाकीत पडतो. ट्रकचालक टाकीपाशी येतो आणि धान्य घेऊन दळणयंत्राकडे जातो. आता पांढऱ्या पावाची खूप चंगळ होईल.

**आमचे मळणी यंत्र** (वान्या)

आमच्या शाळेत आमचे एक अगदी छोटे, छोटे मळणी यंत्र आहे – ते कसे दिसते पहा... शाळेच्या जमिनीतून विद्यार्थ्यानी गहू कापून आणला. त्याचे त्यानी पाच पाच पेरांचे भारे बनविले. छोटे मळणी यंत्र घरघराट करू लागले. त्याने गव्हाची मळणी केली. विद्यार्थ्यानी गहू पोत्यात भरले. आम्ही आता बियांची पेरणी करू.

**सफरचंदाची झाडे फुलारत आहेत** ( पावलो )

ओ हो! सफरचंदाची झाडे फुलारतात तेव्हा बाग किती सुंदर दिसते! सफेद फुले सूर्याच्या दिशेने आपल्या पाकळ्या उघडतात. वाऱ्याची झुळूक मोहोरल्या फुलाना हळूच गोंजारते आणि चिमुकल्या सोनेरी घंटींप्रमाणे त्या फुलांतून नाद झंकारतो. सूर्याकडे पाहून सारी बागच्या बाग झंकारत असते व हसत असते. आणि ज्यावेळी वारा वहायचा थांबतो तेव्हा मधमाश्यांचे गुणगुणणे ऐकू येते. त्या मधमाश्या झाडांवर उडू लागतात. सर्वात मोठ्याने निनादणाऱ्या घंटीकडे त्यांचे लक्ष असते. आणि हजारो तारा झंकाराव्यात तशी ती बाग निनादू लागते. मधमाशी एका सुबक फुलावर बसते, आपले चिमणे चिमणे पाय हलवते, आपले चिमणे चिमणे पंख फडफडविते आणि एखाद्या ढगासारखे सोनेरी पराग फुलातून उधळले जातात.

**दाशामावशीबरोबर शेतावर** ( कोल्या )

दाशामावशी जेथे काम करते त्या शेतावर आम्ही गेलो होतो. दाशामावशी तीस गाईंचे दूध काढते. तेथे दुधाची मोठमोठी भांडी आहेत. लोक दूध लोणी-कारखान्यात घेऊन जातात. दुधापासून ते तेथे लोणी तयार करतात.

**क्रौंचपक्ष्यांचे सायंगीत** ( तीना )

डोंगरांच्या पलिकडे सूर्य अस्तंगत होत आहे. निळ्या आकाशात क्रौंचपक्षी उडत आहेत. "नमस्ते, हिरव्या कुरणा, आम्ही ऊबदार सागरावरून आलो आहोत", असे ते गाणे गात आहेत. झाडांच्या फांद्या लहरू लागल्या आहेत. हिरवे गवत सळसळू लागले आहे. तळे झंकारू लागले आहे आणि म्हणत आहे – नमस्ते, क्रौंचपक्ष्यानो, ऊबदार सागरावर तुम्ही काय पाहिले ते आम्हाला सांगा.

**दयाळू संधिप्रकाश आजोबा** ( सान्या )

आकाशात तारे लुकलुकत आहेत. दयाळू संधिप्रकाश आजोबा धळीतून बाहेर पडत आहेत. ते अगदी म्हातारे आहेत व त्यांच्या अंगावर

दाट केस आहेत. ते काठी टेकीत टेकीत चालत आहेत. ते खेड्यात जातात. ते झोपडींत शिरतात. ते मुलाना आपल्या ऊबदार, मऊ तळव्यावर घेतात. मुलाना झोपायचे आहे. त्याना गोड गोड स्वप्ने पडत आहेत.

(आनंद विद्यालयात साऱ्यानेच संधिप्रकाशाविषयी गोष्ट रचली होती; आणि आता तीच गोष्ट या छोट्या मुलीच्या स्मृतीत पुन्हा जागी झाली होती.)

**कुझ्माकाका** (फेद्या)

आम्ही कुझ्माकाकांच्याकडे गेलो होतो. ते एक उभारणी-कामगार आहेत. घरांसाठी ते विटांच्या भिंती उभारतात. आता ते एका दुकानाची इमारत बांधीत आहेत. कुझ्माकाकानी आतापर्यंत पन्नास इमारती उभारल्या आहेत. त्या इमारतींत पुष्कळ लोक रहातात. कुझ्माकाका म्हणतात, "माझ्या इमारती दोनशे वर्षे टिकतील. कुझ्माकाका काय चांगले बांधणी-कामगार होते याची अनेक लोक आठवण काढतील."

**क्रोकस** (कात्या)

सूर्याने रानाला जागे केले. देवदार वृक्षांवरच्या शेंड्यांवरचे बर्फ त्याने वितळविले. ऊबदार थेंब बर्फावर पडले. बर्फाच्या ढिगाऱ्यांवर व सुकलेल्या पाचोळ्यावर त्यामुळे छिद्रे पडली. थेंब जिथे पडले तेथे हिरवे बाण प्रकट झाले. आणि तेथेच कर्ण्याच्या आकाराची निळी फुले उमलू लागली. त्यानी आश्चर्याने बर्फाकडे पाहिले आणि विचारले, "मी फार लवकर उठलो की काय?" "नाही, तू लवकर उठला नाहीस; तू अगदी वेळेवर उठलास," पक्ष्यानी गाण्यातून सांगितले. आणि वसंताला सुरुवात झाली.

**सूर्य आणि वादळी ढग** (तोल्या)

तेथे एक सोनेरी शेत होते आणि धान्याच्या प्रत्येक कणिसावर सूर्यकिरण खेळत होते. ओ हो! शेता, शेता किती सुंदर रूप

आहे तुझे! पण तो पहा – तुझ्या माथ्यावर वादळी ढग आला आहे. तो सूर्याला झाकून टाकीत आहे. धान्याच्या कणिसावरचे सोनेरी तेजोकण लुप्त झाले आहेत. शेत काळवंडले आहे; जणू काही कोणीतरी धरतीवर करड्या रंगाचे पांघरूण घातले आहे. रविमहाराज, लवकर लवकर ढगाआडून बाहेर ये. कणसे तुझी वाट पहात आहेत. आम्हीही तुझी वाट पहात आहोत, रविमहाराज!

**छोट्या तारा आकाशातून खाली पडतात** ( ल्यूबा )

ऑगस्टमध्ये छोट्या तारा आकाशातून खाली पडतात. धनदाट जंगलामध्ये एक मोठी मोकळी जागा आहे आणि छोट्या तारा तेथे खाली पडतात. आणि मग जांभळी फुले उमलतात.

**आमचा वर्ग छान ऊबदार आहे** ( साशा )

आमचा वर्ग ऊबदार आणि आरामशीर आहे. आमच्या वर्गात उष्णता-उत्सर्जक नळांची जाळी आहेत आणि त्यांतून पाणी वहात असते. तळघरात एक मोठा पाण्याचा बंब आहे. मोठ्या चुल्यात कोळसा जळत असतो. जमिनीच्या पोटात खूप खोलवर असलेल्या खणींत कोळसा खोदला जातो, मग तो रेलमार्गाने आमच्यापर्यंत आणला जातो. तेथे तो जमिनीवर खाली उतरवला जातो. मग लॉऱ्या तो कोळसा आमच्या शाळेपर्यंत घेऊन येतात. खाणकामगार व रेल्वेकामगार श्रम करतात म्हणून आम्हाला ऊब मिळते.

**हिंवाळी स्टार्लिंग पक्षी** ( मिशा )

गेल्या हिंवाळयात स्टार्लिंग पक्षी दक्षिणेकडे गेले नाहीत. फार गोठवणारी थंडी पडणार नाही हे त्याना कसे कळले असावे? संध्याकाळी थवा करून ते एकत्र कसे जमत असत आणि एका झाडावरून दुसऱ्या झाडावर कसे उडत असत ते मी पहात होतो. ते ऊबदार जागेचा शोध घेत होते आणि काळजीने कलकलाट करीत होते. हिमवादळांत स्टार्लिंग पक्षी आमच्या धान्य कोठारात येत असत. ते कुठेही बसत,

अगदी गाईच्या पाठीवरही बसत. परंतु थंड, सूर्यप्रकाशित दिवशी ते बर्फात स्नान करीत. एखादा स्टार्लिंग एखाद्या छोटचा दगडाप्रमाणे स्वतःला बर्फाच्या मऊ ढिगाऱ्यावर झोकून देत असे आणि बर्फ वाचकरून बर्फात शिरत असे. नंतर तो त्या ढिगाऱ्यातून बाहेर येई आणि आनंदाने किलबिलाट करी.

**ख्रिसमसचे झाड** ( दान्को )

आईने आणि मी ख्रिसमसचे झाड टेबलावर ठेवले. आम्ही त्या झाडाची सजावट केली. फ्रॉस्ट आजोबाना आम्ही तळाशी ठेवले. रात्र पडली. बाहेर चंद्र प्रकाशत होता. फ्रॉस्ट आजोबा काय करतात ते मला पहावयाचे होते. त्यानी आपली काठी उचलली, झाडाखालून ते बाहेर आले आणि टेबलाभोवती ते फिरू लागले. ते फिरत होते आणि घशातून घरघर आवाज काढीत होते. आणि शुभ्र हिमपिसे कशासंबं-धीतरी फांद्यांवर कुजबुजत होती. एका छोटचा डहाळीवर भुरा ससा अगदी स्तब्ध बसला होता. इतक्यात त्याने झाडावरून फ्रॉस्ट आजोबां-च्या पोतडीत उडी मारली. ती होती नव्या वर्षाची भेट.

**युखिम आजोबा** ( ल्यूदा )

माझे आजोबा युखिम हे वनरक्षक आहेत. सामुदायिक शेतावर ते पंचवीस वर्षे काम करीत आहेत. खेड्याच्या मागल्या बाजूला ओकवृक्षांची एक राई आहे. ते आजोबांचे ओकवृक्ष आहेत; त्यानी ते लावले होते. आजोबा म्हणतात की त्यांचे ओकवृक्ष तीनशे वर्षे जगतील. मीसुद्धा माझा स्वतःचा ओकवृक्ष लावणार आहे.

**दुष्ट कोळी** ( कोस्त्या )

कोठीच्या खोलीतल्या एका अंधाऱ्या कोपऱ्यात कोळ्याने आपले जाळे विणले. तो काय करणार आहे ते मी पहात होतो. तो कोळी भिंतीवर घुटमळला आणि त्याने आपले पाय घासले. तो जणू काही

जाळेच विणण्यात गुंतला आहे असे वाटत होते. इतक्यात गुणगुणत एक माशी तेथे आली. कोळी वळला आणि तो कानोसा घेऊ लागला. माशी उडत उडत जाळ्यात शिरली आणि तेथेच अडकून बसली. तिचे गुणगुणणे काळजाने ठाव सोडल्याप्रमाणे अधिकच वाढले. कोळी झपाझप तिच्याच दिशेने निघाला होता. नाही, दुष्ट कोळ्या, त्या माशीला तुला ठार मारता येणार नाही. मी तुझे जाळे नष्ट करून टाकीन आणि त्या माशीला मुक्त करीन. माशी, येथून उडून जा, आणि पुन्हा कधी कोळ्याच्या जाळ्यात फसू नकोस.

**टोमॅटो** ( स्लावा )

हिरव्या झाडांवर लाल टोमॅटो दिसत आहेत. सकाळी टोमॅटो दंवबिंदूनी आच्छादून जातात. प्रत्येक बिंदूवर सोनेरी रविकिरणे खेळत असतात. एका लाल टोमॅटोवर एक शुभ्र फुलपाखरू बसले आहे. एक मधमाशी तेथे गुणगुणत आहे. टोमॅटो म्हणजे एक मोठे लाल फूलच आहे असे तिला वाटले. टोमॅटोभोवती तिने गोल गोल फेऱ्या मारल्या आणि नंतर ती दूर उडून गेली.

दीर्घ श्रमांच्या परिणामी मुलांची ही शब्दांकने सिद्ध झाली होती. विचार आणि शब्द यांच्या जिवंत उगमस्थानाकडे मुलाना घेऊन गेले पाहिजे. भाषे-च्या द्वारे सभोवतालच्या जगातील घटना मुलांच्या केवळ जाणीवेलाच जाऊन भिडू नयेत तर त्या त्यांच्या हृदयाला व आत्म्यालाही जाऊन भिडाव्यात अशा रीतीने या घटना आपण मुलाना दाखविल्या पाहिजेत. भाषेचे भावनिक व सौंदर्यात्मक रंगविलास, तिच्या सूक्ष्म छटा या मुलांच्या सृजनशीलतेची जीवनदायी उगमस्थाने आहेत. अत्यंत ठळक व स्पष्ट प्रतिमांसारखे शब्द मुलांच्या जाणीवेत वास करीत असतात आणि म्हणूनच वर्गात शब्दांकने लिहीत असताना मुले त्याना चित्रांची जोड देत असत.

सभोवतालच्या जगातील सौंदर्याच्या प्रभावाखाली मूल ताबडतोब शब्दांकने रचायला सुरुवात करील अशी अपेक्षा करणे खुळेपणाचे आहे. सृजनशीलता ही मुलांमध्ये एखाद्या सहजप्रेरणेसारखी वास करीत नसते. ती शिकवावीच लागते. शिक्षकाकडून मूल जेव्हा निसर्गाचे वर्णन ऐकते तेव्हाच

ते शब्दांकने रचायला सुरुवात करते. संध्याकाळच्या नि:स्तब्ध वातावरणात तळयाच्या काठी मी मुलाना म्हणून दाखविलेले पहिले शब्दांकन रचण्यात आले होते. एखादी दृक्प्रतिमा शब्दांतून कशी वर्णिता येते हे मुलाना समजावे आणि जाणवावे असा माझा प्रयत्न होता. प्रथम, मी रचलेले शब्दांकन मुलानी पुन्हा म्हणून दाखविले. नंतर, हळू हळू, मुलाना थरारून सोडणाऱ्या निसर्गचित्रांचे वर्णन करायला मुलानी स्वतः सुरुवात केली. मुलांच्या दृष्टीने व्यक्तिगत सृजनशीलतेची प्रक्रिया सुरू झाली होती. या प्रक्रियेत शब्दांच्या भावनिक-सौंदर्यात्मक छटा जाणवणे हे महत्त्वाचे आहे. आपली निश्चित, विशिष्ट जागा असलेल्या तयार विटेप्रमाणे शब्द जेव्हा मुलांच्या दृष्टीसमोर येतात तेव्हा मूल शब्दांकनाला सुरुवात करते. आणि विशिष्ट परिस्थितीला योग्य असलेली नेमकी तीच वीट मुले बरोबर निवडतात. आपल्या मेंदूत डोकावलेल्या पहिल्याच शब्दावर मुले झडप घालीत नाहीत. त्यांची संवेदन-क्षमता त्याना तसे करू देत नाही.

शब्दांकने रचणे हे माझ्या विद्यार्थ्यांचे एक आवडते काम बनले. आपण जे जे पाहिले व जे जे अनुभवले ते सांगण्यासाठी ते धडपडू लागले. शब्द हे सभोवतालच्या जगाच्या सौंदर्याशी असलेले आपले नाते व्यक्त करण्याचे मुलांचे एक साधन बनले. दुसऱ्या, तिसऱ्या व चवथ्या इयत्तेत असताना मुलानी आपल्या वडीलधाऱ्या कॉम्रेड्स्‌विषयी – सामुदायिक शेतकरी व कामगा-रांविषयी – सोविएत लोकांच्या श्रमाविषयी, सफरचंदांच्या झाडाना फुटणाऱ्या कोंबांविषयी आणि हळू हळू लुप्तप्राय होणाऱ्या डेझींविषयी, कडक उन्हाळया-च्या दिवसांतील कोळयांच्या रुपेरी जाळयांविषयी आणि सामुदायिक शेताच्या फळबागेतील सफरचंदांच्या वेचणीविषयी शब्दांकने तयार केली. चार वर्षां-च्या काळात प्रत्येक विद्यार्थ्याने चाळीस ते पन्नास छोटी छोटी शब्दांकने रचली. अभ्यासाच्या दुसऱ्या, तिसऱ्या व चवथ्या वर्षात मुलानी रचलेली अनेक शब्दांकने पुढे दिली आहेत.

सौंदर्यनिर्मितीचे प्रयत्न ही लोकाना अत्यंत परिश्रमपूर्वक काम करण्यास प्रवृत्त करणारी प्रेरणा आहे. त्या प्रेरणेसारखी दुसरी कोणतीही प्रेरणा शोधून सापडणे कठीण आहे. या प्रयत्नाने साऱ्या सामूहिकालाच एक स्फूर्ती दिली. फुलांची निगा राखण्यात ज्याने भाग घेतला नाही असे तेथे एकही मूल नव्हते. पहिल्या उन्हाळयात निसर्गाने आमच्या प्रयत्नांची फळे आमच्या पदरात टाकली नाहीत; पण तरीही यशाची स्वप्ने मुले पहातच होती. दुसऱ्या वसंतात मैदान हिरवेगार बनले, उमलत्या रानफुलानी आच्छादिलेली एक

हिरवी चादर तेथे दिसू लागली. तिसऱ्या वर्षी आमचा सांदीकोपरा म्हणजे हिरवळीचे व फुलांचे एक संपूर्ण आटपाट नगर बनले. तेथे गोष्टी वाचण्या-साठी आणि सांगण्यासाठी मुले अनेकदा जमत.

**खिडक्यांच्या तावदानांवर हिम-फुले कोठून येतात?** (तान्या, चवथी इयत्ता)

मी आईला विचारले: "खिडक्यांच्या तावदानांवर हिम-फुले कोठून येतात?" आई म्हणाली: "फ्रॉस्ट आजोबांचा छोटा नातू ती काढतो. रात्री तो आपल्या आजोबांबरोबर जातो आणि तावदानांवर चित्रे रेखाटतो..." तो ती चित्रे कशी रेखाटतो ते मला पहायचे होते. मी झोपायला म्हणून बिछान्यावर पडले, पण मी डोळे मात्र मिटले नाहीत. सर्वजण झोपी गेले. खिडकीच्या पलिकडचे झाड करकरत होते. तो छोटा मुलगा खिडकीपाशी आला. रुपेरी पेन्सिलीने तो तावदानावर चित्रे काढीत होता आणि स्वतःशीच एक गाणे गुणगुणत होता. त्याने एक अतिशय सुंदर फूल काढलेले मी पाहिले. त्या फुलाला खूप रुंद, रुंद पाने होती व छोटचा छोटचा पाकळया होत्या. सकाळी सूर्याची किरणे चमकू लागली आणि ते फूल जणू जिवंत असल्यासारखे भासू लागले. मला कळत नाही, मला ते स्वप्न पडले होते की खरोखरच ते मी पाहिले होते?

**हिंवाळयाच्या मध्याला उमललेली पुष्पसृष्टी** (गाल्या, तिसरी इयत्ता)

शरदात उष्णतागृहाजवळ क्रिसॅन्थेममची फुले बहरली. गारठलेल्या धुक्याची त्याना भीती वाटत नव्हती. पण नंतर उत्तरेकडून हिमाचे आगमन झाले. बालद्यांतले पाणी गोठले. क्रिसॅन्थेममचे आम्हाला थंडीपासून संरक्षण करावयाचे होते. आम्ही ती झाडे कुंडयांतून लावली आणि त्या कुंडचा उष्णतागृहात ठेवल्या. आम्ही त्या झाडांची छाटणी केली. क्रिसॅन्थेममची झाडे पुन्हा हिरवी बनली आणि नंतर ती बहरली. सकाळी मी जेव्हा उठलो तेव्हा जमिनीवर सर्वत्र बर्फ पडले होते. बर्फ आणि सूर्यप्रकाश. मी धावताच उष्णतागृहात गेलो. क्रिसॅन्थेममची फुले

उमलत होती : शुभ्र, आकाशी आणि गडद निळी. आणि तावदा-नांच्या पलिकडे बर्फ होता. त्या तेजाळ सूर्यप्रकाशाकडे पाहून क्रिसॅन्थेम-मची फुले हसत होती.

**शेताकडून आम्ही केलेला परतीचा प्रवास** (पावलो, दुसरी इयत्ता)

उन्हाळयात गवत कापण्यासाठी मी आणि आई शेतावर गेलो. आईने कापलेले गवत एका मोठ्या गाडीत भरले. तिने गवताच्या भाऱ्यांभोवती दोरी बांधली. घोडे अगदी हळू हळू चालत होते. आम्ही खूप, खूप उंच गवतावर बसलो होतो. सूर्य मावळला आणि आकाशात तारे उगवले. मी गवतावर पडून आकाशाकडे पहात होतो. आमच्या गाडीची एक मोठी नाव बनली. आम्ही समुद्रातून चाललो होतो. आम-च्या माथ्यावर तारे होते. खूप जवळ होते ते. अगदी हात पुढे करावा व एखादा तारा हळूच हातात पकडावा. हिरवा किनारा खूप कुठेतरी दूरवर होता. तेथे क्वेल पक्षी गात होता आणि नाकतोडे व्हायोलिन वाजवीत होते. आमची नाव थांबली आणि इवले इवले तारे लुकलुकू लागले. नाव किनाऱ्याला पोहोचली होती. आई उठून उभी राहिली, पण मला काही वेळ तसेच पडून रहावेसे वाटत होते.

**शरदातला एक अभ्राच्छादित दिवस** (शूरा, तिसरी इयत्ता)

दिवस लहान झाले व रात्री मोठ्या झाल्या. सकाळी नदीवर दाट धुके तरंगू लागले. सूर्य कुठे गेला? हे ढगांचे भंगार तो साफ का नाही करून टाकीत? शारदीय पावसाचे छोटे छोटे थेंब आकाशातून खाली पडले. झाडांच्या फांद्या खाली वाकल्या होत्या. पाने खाली गळून पडत होती. फांद्यांवर पाण्याचे मोठमोठे थेंब ओथंबले होते. कुठेतरी धुक्यात एक समुद्रपक्षी ओरडत होता. कदाचित त्याला दक्षिणेकडे जाता आले नसावे आणि लोकाना तो आपली तक्रार सांगत असावा. रान अगदी नि:स्तब्ध होते. अरण्यात सुतारपक्ष्याची टोक टोक अनेक वेळ घुमली आणि मग लुप्त झाली. ओकवृक्षाची फळे पानांवर टपकत होती. सारेच जग शुभ्र धुक्यात आच्छादून गेले होते.

**शरदाला सुरुवात होत आहे** ( सिऱ्योझा, चवथी इयत्ता )

सकाळी पाकोळ्या भिरभिर करीत गावावरून उडत होत्या. नंतर त्यांचा एक थवा तयार झाला. त्या दूरध्वनियंत्राच्या तारांवर बसल्या आणि त्यांची कशाविषयीतरी हळू आवाजात किलबिल सुरू झाली. हिंवाळ्याच्या दिवसांसाठी दक्षिणेकडे केव्हा निघायचे ते त्या ठरवीत होत्या. दुसऱ्या दिवशी त्या सर्व पाकोळ्या निघून गेल्या होत्या. आता त्या कुठे असतील? आणि शरद जवळ येत असल्याचे त्याना कसे कळले? कारण दिवस अजून ऊबदार होते. सूर्याची किरणे पृथ्वीला कुरवाळीत अजून चमकत होती. शरदातले ते तेजोमय संध्यासमय मला अतिशय आवडतात. संधिप्रकाशाचे किरमिजी रंग खूप वेळ टिकून असतात. पॉप्लरची पानेही किरमिजी दिसतात. सूर्यास्ताचे प्रतिबिंब त्यांत पडलेले असते. निद्रिस्त तळयातील पाणीही सूर्यास्तासारखे दिसते. संध्याकाळी फक्त तळयावर कलकलाट माजलेला असतो: दक्षिणेकडे चाललेले पक्षी तेथे झोप घेतात. सकाळच्या सुमारास तळयावर धुक्याचे अवगुंठन पडते आणि गवतावर दंव साचते. ते दंव राखी रंगाचे दिसत आहे, उन्हाळयातल्यासारखे नाही. शरदाला सुरुवात होत आहे.

**जीवनातली मुख्य गोष्ट कोणती?** ( वाऱ्या, चवथी इयत्ता )

जीवनातली मुख्य गोष्ट कोणती? खाणकामगार म्हणतात मुख्य गोष्ट आहे कोळसा. कोळसा नसेल तर यंत्रे फिरणार नाहीत, धातू बनणार नाहीत, लोक गारठून जातील...

धातूकामगार म्हणतात मुख्य गोष्ट आहे धातू. धातू नाही तर यंत्रे नाहीत, कोळसा नाही, पाव नाही आणि कपडेही नाहीत.

शेतकरी म्हणतात मुख्य गोष्ट आहे अन्न. अन्न नसेल तर कोणीच काम करू शकणार नाही — खाणकामगारही नाहीत, धातूकामगारही नाहीत, पायलटही नाहीत आणि सीमासंरक्षकही नाहीत.

त्यांच्यापैकी कोणाचे बरोबर आहे? जीवनातली मुख्य गोष्ट कोणती? मुख्य गोष्ट आहे श्रम. श्रम नाहीत तर कोळसाही नाही, धातूही नाही आणि अन्नही नाही.

**अग्नि-अश्व** (सान्या, चवथी इयत्ता)

आईने मला हे सांगितले. खेड्यामध्ये जेव्हा पहिले सामुदायिक शेत निर्माण झाले तेव्हा शेतकऱ्यानी एक घोडा विकत आणला. त्याचे नाव होते अग्नि. त्याला कोणीच वठणीवर आणू शकेना. सर्वात अगदी शूर आणि अनुभवी लोकही अग्नीजवळ जायला घाबरत. आपल्या खुरानी तो जमीन उखळीत असे, दातानी लचके तोडीत असे आणि रागाने फुरफुरत असे.

तरीही युर्को नावाचा एक तरुण त्या बेफाम घोड्यावर आरूढ झाला. तो घोडा गर्जना करू लागला, खिंकाळू लागला, त्याने रस्त्यावर उडी घेतली आणि युर्कोला त्याने दूर भिरकावून दिले. तो कितीतरी कोस धावत पुढे गेला आणि गावाच्या वेशीवर थांबला. रस्त्याच्या मध्यावरच दोन लहान मुले खेळत होती. ती धावतच त्या घोड्यापाशी गेली आणि त्याच्या पुढच्या पायाना त्यानी प्रेमाने मिठी मारली. त्यांच्या आईचे काळीज भीतीने गोठून गेले. तिला वाटले की घोडा एक तर त्याना ठार मारील किंवा त्याना पायाखाली तुडवील. परंतु घोडा शांतपणे उभा होता. त्याने आपले पाय हलविले आणि पुन्हा तो उभा राहिला. त्याने तिरप्या नजरेने त्या मुलांकडे पाहिले; जणू काही त्याना स्पर्श करायची त्याला भीती वाटत होती. पण मुले खेळतच राहिली. मग अग्नीने अगदी जपून मुलाना वळसा घातला आणि तो खेड्यातून पुन्हा धावत सुटला. अखेरीस लोकानी त्याला पकडले आणि तबेल्यात ठेवले.

**साळिंदर** (फेद्या, चवथी इयत्ता)

आमच्या घराच्या दर्शनी कमानीखाली काही साळिंदर रहातात. संध्याकाळी ते सर्व कुटुंब आपल्या छोट्या बिळाबाहेर पडते आणि तळ्याकडे जाऊ लागते. वृद्ध साळिंदरबाबा सर्वांच्या पुढे असतात आणि पाच साळिंदर बछडी पाठोपाठ चाललेली असतात. साळिंदर आई पिछाडी संभाळते. ते तिथे काय करतात? मी पाळतीवर राहिलो आणि मला त्याचे उत्तर सापडले: ते तिथे पाणी पितात आणि स्नान करतात. मग आपल्या छोट्या पंज्यानी ते माती उकरतात आणि खायला काही

मुळे शोधतात. हे काम साळिंदरबाबा आणि साळिंदरआई करते. पण ती बछडी नुसतीच खेळत असतात आणि इकडेतिकडे धावत बागडत असतात. जेथे कोणाची वर्दळ नसते असा एक शांत कोपरा त्यानी शोधून काढला.

एके दिवशी अचानक एक कुत्रा तेथे प्रकटला. तो साळिंदरबाबांच्या दिशेने धावला. त्यानी चेंडूसारखी गुंडाळी केली व ते निश्चल पडून राहिले. आणि मग सर्वानीच चेंडूसारखी गुंडाळी केली. कुत्र्याने साळिदरबाबाना दातात पकडले आणि तो त्याना तळ्यावर घेऊन गेला. त्याने त्याना पाण्यात टाकले; पण साळिंदरबाबा पोहत काठावर आले आणि कुत्रा त्यांच्याकडे पहात राहिला. मग तो त्यांच्याशी खेळू लागला, पण मी कुत्र्याला हुसकावून लावले.

नंतरच्या वसंतात फक्त वृद्ध साळिंदरबाबाच कमानीखाली रहात होते. बाकीचे कुठे गेले असावेत? कदाचित दुसऱ्या ठिकाणी त्यानी आपले बिऱ्हाड नेले असावे. पण त्या वृद्ध साळिंदराला तेथून जावयाचे नव्हते. मी कमानीजवळ दुधाची बशी ठेवली. साळिंदराने ते दूध पिऊन टाकले. आता त्याला माझी भीती वाटेनाशी झाली. मी त्याला चुच-कारून आत नेले. मी दिवा पेटवला. साळिंदर दिव्यासमोर उभा राहिला आणि दिव्याकडे पाहू लागला. मी फरशीवर एक जुने वर्त-मानपत्र ठेवले. साळिंदराने त्या वर्तमानपत्राशी खेळायला सुरुवात केली. मग रात्री तो कमानीखालच्या आपल्या घरी निघून गेला.

**आर्तेम मिखाइलोविच — बुदेन्नींचे एक सैनिक** (दान्को, चवथी इयत्ता)

आर्तेम मिखाइलोविच आमच्या एका बालवीरसभेला आले होते. सामुदायिक शेताच्या भाजीच्या मळयावर ते काम करतात. ते फक्त एक आजोबा आहेत असे आम्हाला वाटत होते; पण १९१८-१९२२ च्या यादवी युद्धातले एक वीरपुरुष, बुदेन्नी यांचे ते सैनिक होते. आपण टेहळणी मोहिमेवर कसे गेलो आणि श्वेतरक्षकांवर आपण कसा हल्ला केला हे त्यानी आम्हाला सांगितले. एके दिवशी ते जखमी झाले आणि जनरल देनिकिनच्या सैनिकानी त्याना कैद करून नेले. त्याना ठार करण्यासाठी त्या सैनिकानी त्याना बाहेर काढले. त्यानी त्याना ठार

केले नाही, पण जबर जायबंदी मात्र केले. रात्री ते खुरडत, सरपटत बाहेर पडले आणि मदतीसाठी ते एका शेतकऱ्याच्या झोपडीत गेले. त्या लोकानी त्याना माळ्यावरच्या खोलीत लपवून ठेवले आणि त्याना बरे केले. पुन्हा ते श्वेतरक्षकांशी लढायला गेले. आमचे आजोबा आर्तेम मिखाइलोविच हे असे पुरुष आहेत. मला त्यांच्याचसारखे व्हावयाचे आहे.

**विजयदिनाचा सोहळा** (वलोद्या, तिसरी इयत्ता)

विजयदिन जवळ आला. या दिवशीच युद्ध संपले. आमच्या सोविएत सेनेने फॅसिस्टांवर विजय मिळविला. तोफगोळ्यांचे आणि बॉम्बचे स्फोट थांबले. आता या दिवशी लोक आपला विजय साजरा करतात आणि युद्धात मृत्युमुखी पडलेल्या लोकांचे स्मरण करतात. व्लादिमिर इल्यिच लेनिन यानी कम्युनिस्ट पक्ष स्थापन केला आणि लोकाना सांगितले: "उक्रेनियन, रशियन, बिलोरशियन, जॉर्जियन, आणि मोल्दावियन लोकानो, तुम्ही गुण्यागोविंदाने रहा; म्हणजे कोणीही तुमचा पराभव करू शकणार नाही."

आम्ही सामूहिक शब्दांकनेही रचली. शरदातल्या एका अभ्राच्छादित दिवशी स्वप्नांच्या सांदीकोपऱ्यात मुले चुल्यातील शेकोटीभोवती बसली होती. खूप दूरवरच्या उष्णकटिबंधीय बेटांविषयी मी मुलाना सांगत होतो. कशामुळेतरी मुलाना त्या रखरखीत ग्रीष्माची – त्या नदीची आणि कलिंगडाच्या शेतात आम्ही घालविलेल्या सुटीची – आठवण झाली.

या स्मृतिचित्रांतून एक शब्दांकन उदयाला आले आणि मुलानी ते 'आमची मायबोली' या वहीत लिहून काढले. ते शब्दांकन असे:

**आम्ही कलिंगडाच्या शेतात कसे राहिलो?**

तापलेल्या जमिनीवर मोठमोठी कलिंगडे पसरली होती. निळी, हिरवी आणि निळसर-राखाडी. सकाळी त्यांच्यावर दंवाचे आच्छादन पडलेले असे. गार, अगदी गार. आणि गवतावरही दंव पसरलेले असे आणि आमच्या कुटिरावरही. एक दिवस दान्को सकाळी लवकर उठला आणि तो एक मोठे कलिंगड घेऊन आला. त्याने त्या कलिंगडाच्या

खापा केल्या. जो उठत असे त्याला तो गार कलिंगड खायला देई. "शेवटी उठणाऱ्याला कलिंगडाचा गाभ्यातला चवदार गर, "बुढ्ढा" मिळेल". साशा सोडून बाकी सगळे उठले. साशा उठण्याची आम्ही वाट पहात बसलो. त्याच्या उठण्याची वाट पाहून शेवटी आम्ही थकलो आणि "बुढ्ढा" खाऊन टाकला. आम्ही दुसरे कलिंगड आणले, आणि त्याचा गर आम्ही साशाला दिला.

ती अगदी शांत, धुकेभरली सकाळ होतो. दाट धुके घळीमधून तरंगत वर येत होते आणि कलिंगडाचे संपूर्ण शेत त्याने आच्छादून टाकले होते. ढगांमागून हळूच सूर्य डोकावला आणि त्याची किरणे कलिंगडांवर पडली. त्यामुळे ती कलिंगडे नसून शुभ्र नदीतून तरंगत जाणारे गडद निळे, हिरवे आणि राखी रंगाचे काचेचे गोळेच आहेत की काय असा भास होत होता.

दिवसा उष्ण वारे कलिंगडाच्या शेतात पिंगा घालीत असत. निळ्या आकाशात चंडोल गात असत. ते कलिंगडाच्या शेतात का उतरत नव्हते? चंडोल पक्षी गव्हाच्या, बार्लीच्या, बाजरीच्या आणि विशेषत: सातूच्या शेतांतच घरटी का बांधतात आणि तेथेच आपली बाळे का वाढवितात?

कलिंगडाच्या शेताला लागूनच घळीजवळ आम्हाला मुंग्यांचे एक वारूळ आढळले मुंग्या कुठेतरी लगबगीने जात असल्याचे आजोबांच्या नजरेस पडले होते. ते म्हणाले की जवळच कुठेतरी मुंग्यांचे वारूळ असले पाहिजे आणि ते कुठे आहे हे मुंग्या स्वत:च आपल्याला सांगतील. कलिंगडाच्या काही फोडी त्यानी मुंग्यांच्या मार्गावर ठेवल्या. मुंग्या ताबडतोब त्या गोड कलिंगडाला चिकटल्या. त्यानी कलिंगडाचे साखरेसारखे खेदार कण कसे पकडले आणि कसे दूर नेले ते आम्ही पाहिले. आम्ही त्यांच्या पाठोपाठ अगदी थेट वारुळापर्यंत गेलो. एका झुडुपाखाली असलेले राखी रंगाचे ते वारूळ अगदी जिवंत असल्यासारखे भासत होते. मुंग्या साखरेचे ते कण घेऊन आत गेल्या आणि पुन्हा कलिंगडाच्या शेताकडे परतल्या. जंगलांच्या दृष्टीने आणि लोकांच्या दृष्टीने मुंग्या किती उपयुक्त आहेत ते आजोबानी आम्हाला सांगितले: प्रत्येक वारुळामुळे कित्येक हेक्टर जंगलाचे कीटकांपासून संरक्षण होते. आम्ही वारुळांचे रक्षण करायला सुरुवात केली; त्यानंतर नवे वारूळ कसे बनवायचे हे आजोबानी आम्हाला दाखविले.

आम्ही घरी जायला निघालो तेव्हा आजोबानी प्रत्येकाला एक एक मोठे कलिंगड दिले. कितीतरी दिवस ते कलिंगड आम्ही आमच्या घराच्या खिडकीत ठेवले होते. उष्ण वारे, विशाल स्टेप प्रदेश, चंडोल, आजोबा आणि आमच्या नजीकच वास्तव्य करणाऱ्या रातकिडयाचे ते अगदी सुस्पष्ट संगीत या सर्वांची ते कलिंगड आम्हाला आठवण करून देत होते. आता तो रातकिडा कुठे असेल?

भाषेचे सौंदर्य मूर्तिमंत रूप धारण करून सर्वात सुस्पष्टपणे जर कशात प्रकट होत असेल तर ते काव्यात. काव्याने किंवा गाण्यानी स्फुरित होऊन मुले जणु काही शब्दांचे संगीत ऐकत आहेत असे वाटते. सर्वोत्कृष्ट काव्यामध्ये आपल्या मायभाषेच्या अत्यंत नाजूक भावच्छटा शब्दांतून प्रकट होतात. म्हणून मुलाना कविता मुखोद्‌गत कराव्याशा वाटतात. आपल्या अंतःकरणात अगदी खोलवर जाऊन रुजलेल्या शब्दांचा पुनःपुन्हा उच्चार करताना मुलाला खरेखुरे समाधान लाभत असते.

काव्यमय भाषेचे संगीत मुलाना जाणवावे व त्याचा त्यानी अनुभव घ्यावा असा मी प्रयत्न केला. निसर्गाच्या मांडीवर पहुडल्या पहुडल्या सभोवतालच्या जगाच्या सौंदर्याने मुले मंत्रमुग्ध झालेली असताना त्या क्षणी मी त्याना कविता म्हणून दाखविल्या. एके दिवशी अनपेक्षितपणे आमची नजर शेताकडे गेली. तळयाचे एक अप्रतिम दृश्य आमच्यासमोर पसरले होते; त्याच्या नितळ पृष्ठभागावर विलो वृक्षांची छाया पडली होती. शेव्चेन्कोंच्या निसर्गाविषयीच्या काही पंक्ती मी मुलाना म्हणून दाखविल्या. मुलानी त्या पंक्ती पुन्हा म्हटल्या. शब्दांच्या मिलाफातून एक जिवंत प्रतिमा प्रकट होत असल्याचे आणि शब्दाना केवळ एक नवा भावनिक अर्थंच नव्हे तर सभोवतालच्या विश्वालाच एक नवे सौंदर्य प्राप्त करून देणारा भाषेचा एक संगीतमय नाद त्यातून निर्माण होत असल्याचे मुलाना जाणवले. जगातल्या सर्वोत्कृष्ट कवितांच्या प्रभावाखाली संगीताने झंकारणारी भाषा निर्माण करण्याची एक इच्छा मुलांच्या मनात प्रादुर्भूत झाली. वासंतिक दिवसाचे सौंदर्य चाखीत असताना मुलानी अशा रीतीने बोलण्याचा प्रयत्न केला की ज्यातून शब्दांचे स्वरमाधुर्य झंकारून बाहेर पडावे. काव्य-प्रतिभेने त्यांच्या अंतःकरणाची पकड घेतली. त्या छोटया मुला-मुलीनी कविता रचायला सुरुवात केली. प्रथम लारिसाने खूप दूरवर शेतांकडे नजर फेकली. तिचे

डोळे प्रज्वलित झाले होते आणि आपल्याच शब्दांचे नाद ऐकत तिने हळू आवाजात काही शब्द उच्चारले :

"खेळत आहेत लाटा गव्हाच्या पिवळया पिवळया शेतांत". आणि तिच्याच विचारांचा धागा उचलून सिऱ्योझा म्हणाला :

"लहरत आहेत निळया टेकडया विरळ झिरझिरीत धुक्यात."

सर्वांची मने आनंदाने रोमांचित झाली. आपले स्वतःचे संगीतमय शब्द शोधून काढण्याची त्या सर्वानाच उत्सुकता लागली होती. मुलाच्या अंतःकरणाला काव्य-प्रतिभेचा स्पर्श होतो अशा क्षणी इंद्रधनुष्याच्या साऱ्या सप्तरंगांची उधळण करीत, मुलाच्या आत्मिक जीवनात प्रवेश करणाऱ्या शेतांच्या व कुरणांच्या परिमलाने परिप्लुत झालेला शब्द जिवंत बनतो व चैतन्याने सळसळू लागतो. आपल्या भावना, विचार आणि अनुभव व्यक्त करण्याचे साधन मुले त्या शब्दांमध्ये शोधतात व त्याना ते तेथे सापडते. मुलाच्या अंतःकरणात काव्य-प्रतिभा जागृत करणे म्हणजे विचाराचे आणखी एक जीवनदायी उगमस्थान त्याला खुले करून देणे होय. येथे मानवी वैखरीत शब्दाने निर्देशित केलेली वस्तू किंवा घटनाच शब्दातून प्रतीत होते असे नाही तर भावना व अनुभव यांचे सखोल व्यक्तिगत बोधनही त्यातून प्रतीत होते आणि यातच त्या उगमस्थानाचे सामर्थ्य सामावले आहे.

विद्यार्थ्यांतून तरुण कवी घडविण्यासाठी नव्हे तर प्रत्येक बाल हृदयाला उदात्ततेच्या पातळीवर नेण्यासाठी आपण काव्यात्मक सृजनशीलता शिकविली पाहिजे. प्रत्येक मुलाच्या हृदयात भाषेला व्यक्तिगत काव्यात्म नादध्वनी प्राप्त व्हावेत म्हणून मुलांच्या अंतःकरणात काव्य-प्रतिभा जागृत करण्याची प्रत्येक संधी मी उपयोगात आणीत असे.

हिंवाळ्यातली ती एक शांत सकाळ होती. झाडांवर शुभ्रधवल हिमाचे वेष्टन पडले होते. बर्फाच्या बारीक बारीक नाजूक सुयानी भरलेल्या फांद्या जणू काही रुप्यातून घडविल्यासारख्या दिसत होत्या. आम्ही शाळेच्या बागेत गेलो; फांद्याना हात न लावण्याची आम्ही काळजी घेत होतो; कारण आमच्या स्पर्शाने त्यांचे ते मोहक, अप्रतिम सौंदर्य ढळेल अशी आम्हाला भीती वाटत होती. आम्ही तेथेच थांबलो आणि शिशिर-सौंदर्याविषयीच्या पुश्किन व हैने यांच्या कविता मी मुलाना म्हणून दाखविल्या. काव्याच्या व सौंदर्याच्या मोहिनीतून धवलशुभ्र हिमाने आच्छादित झालेल्या त्या झाडांचे वर्णन करण्यासाठी मुलाना शब्द सुचू लागले आणि त्यानी काव्यनिर्मिती केली. एका वेळी एक गट अशा रीतीने सामूहिकपणे त्यानी ही निर्मिती केली. आम्ही

अनेक वेळा त्या हिमाच्छादित बागेत गेलो. पूर्वी रचलेल्या गोष्टींतील अद्‌भुत-रम्य प्रतिमा त्या निर्मितीत जिवंत होऊन प्रकट झाल्या होत्या :

जादूचा लोहार
घेऊन आला आपली
सुवर्णभट्टी
आणि बागेतील वृक्षांवर
चढविण्यासाठी आच्छादन
वितळविले त्याने रुपे
त्या सुवर्णभट्टीत :
सारी रात्र
घडवीत होता तो रुपे
आपल्या सोनेरी घणाचे घाव घालीत ;
आता सर्वत्र चंदेरी रंगात
विलसत आहे आमची बाग
करीत आहेत
सुया सुयाना स्पर्श
आणि सारीच बाग
झंकारत आहे, झंकारत आहे...
पण कुठे आहे तो जादूचा लोहार ?
त्याने पुन्हा झेप घेतली आहे
आपल्या सोनेरी पंखानी सूर्याकडे
गोळा करून आणखी रुपे
भरले आहे त्याने ते
आपल्या थैलीत
आणि पुन्हा त्याने
उड्डाण केले आहे आमच्याकडे ;
रुपे पुन्हा वितळविले जात आहे
आणि सारीच बाग
गात आहे, गात आहे...
पण प्रतीक्षा करीत आहे सूर्य लोहाराची
कुठे गेला होतास तू, माझ्या मित्रा ?

काय करीत होतास तेथे इतका समय?
वितळवीत होतास माझे रुपे? आणि बागेत?
माझा हार तुला घडवायचा आहे
हे तू विसरलास का लोहारा?
आणि सूर्याची किरमिजी किरणे
डोकावली आमच्या चंदेरी बागेत
आणि स्तिमित झाला सूर्य
तिच्या सौंदर्यदर्शनाने...

प्रत्येक मूल कवी असते. अर्थात काहीतरी चमत्कार घडून मुलाला काव्य-प्रतिभेचा स्पर्श होईल असे समजणे खुळेपणाचे आहे. नैसर्गिक प्रज्ञेबद्दल माझ्या भावना सुतराम हळव्या नाहीत, प्रत्येक मूल स्वभावतःच कवी असते या विचाराना माझ्याकडे थारा नाही. सौंदर्यविषयक मानवी भावनेमुळे अंतःकरणात कवित्व जागे होते. या भावनेची मशागत केली नाही तर निसर्गाच्या व भाषेच्या सौंदर्याविषयी विद्यार्थ्याची वृत्ती उदासीन बनेल, तळ्यात दगड भिरकविणे काय किंवा गाणाऱ्या चंडोलाच्या दिशेने दगड भिरकविणे काय हे ज्याला सारखेच वाटते असा तो एक प्राणी बनेल. मुलाला काव्य-प्रतिभेचा आनंद मिळवून देणे, त्याच्या हृदयात काव्यात्मक निर्मितीक्षमतेचा जिवंत झरा जागृत करणे हे त्याला वाचन व अंकगणित शिकविण्याइतकेच महत्त्वाचे आहे. काही मुलांत हा झरा इतरांपेक्षा अधिक ओजस्वीपणे वहातो. काही मुलांमध्ये काव्य-प्रतिभा ही एखादी बेफाम, क्षणिक भरारी किंवा ज्वालेची एखादीच चमक नसून ती एक अविरत आत्मिक गरज असते असे मला दिसले आहे.

काव्यनिर्मिती ही भाषेच्या विकासाची सर्वोच्च पातळी असून मानवी विकासाचा मूर्त गाभाच त्या विकासाद्वारे व्यक्त होतो. काव्यनिर्मितीची भावना प्रत्येकाला जाणवते. त्यासाठी खास प्रज्ञेची आवश्यकता नाही. ती माणसाला उदात्ततेच्या पातळीवर नेते एवढे खरे. निर्मितीचे हे अत्यंत नाजूक क्षेत्र प्रकर्षाने व्यक्तिगत असणे, प्रत्येक मुलाच्या दृष्टीने ती हृदयाची बाब असणे हे अतिशय महत्त्वाचे आहे.

तिसऱ्या इयत्तेत लारिसा, सान्या, सिऱ्योझा, कात्या, वाऱ्या, कोल्या, तान्या व लीदा यानी कोणाला थांगपत्ताही लागू न देता रचलेल्या आपल्या कविता खाजगी बैठकीत मला वाचून दाखवावयास सुरुवात केली. इतर

काही मुलानीही कविता केल्या होत्या हे मला ठाऊक होते, पण आपल्या या आवडीसंबंधी उघड बोलायला त्याना फार संकोच वाटत होता; अर्थात ती चांगलीच गोष्ट होती.

मुलानी कविता रचणे या गोष्टीत असाधारण असे काही नाही. आत्मिक सामर्थ्याचा हा सामान्य विलास आहे, ती एक नित्याची सृजनशील ज्योत आहे आणि त्याशिवाय परिपूर्ण बालपणाची कल्पना करणेही अशक्यप्राय आहे. परंतु मुलांचे आत्मिक जीवन इतके समृद्ध आहे ही गोष्टच मला आनंद देणारी होती.

काव्य-प्रतिभेने कोल्याच्या मनाला उदात्ततेचा जो स्पर्श केला होता त्याने मला विशेष आनंद वाटला. आमची मैत्री उत्तरोत्तर दृढ होत होती. आमच्या शाळेच्या बागेत असा एक कोपरा होता की जेथे मला एकांतात बसणे आवडत असे. चांगली हवा पडली असता मी तेथे व्हायोलिन वाजवीत निवांत बसत असे. योगायोगाने कोल्याला त्या कोपऱ्याचा "शोध" लागला. कदाचित त्यालाही एकांत हवा होता आणि त्यासाठी तो जागा शोधीत असावा. त्याने मला पहाताच तो संकोचला आणि तेथून जाऊ लागला, पण मी त्याला थांबवून घेतले. ग्रीष्मातल्या त्या सायंसमयीच्या सौंदर्याचा माझा आनंद सुरात व्यक्त करण्याच्या उद्देशाने मी व्हायोलिन वाजवीत होतो. कोल्या ते मधुर स्वर ऐकत होता. मी त्यात इतका तल्लीन झालो की तो छोटा मुलगा माझ्या शेजारी बसला आहे याचे मला भानच उरले नाही. मी माझे व्हायोलिन त्याला दिले. मी वाजविलेली गत त्याने पुन्हा वाजवून पाहिली, पण त्याला ते जमले नाही. त्याने व्हायोलिन थांबविले. सूर्यास्ताचा आनंद चाखीत, सायंकाळची ती नीरवता कानात साठवीत निःशब्दपणे आम्ही तेथे बसलो होतो. सभोवतालच्या जगाच्या सौंदर्याने आम्हाला एकत्र आणले होते आणि कदाचित त्यामुळेच निसर्गाविषयीची आपली कविता कोल्याने मला विश्वासाने म्हणून दाखविली. ती कविता अशी होती:

> हिरव्या पानांतून डोकावणारी गडद निळी फुले;
> फुलाफुलांवर उडणारी मधमाशी.
> रात्री आमच्या बागेत अवतरणारा बुलबुल.
> गात आहे लायलॅकच्या दाट झुडुपांत.
> सकाळी बागेत निनादणारी मेघगर्जना

आणि फुलाना स्नान घालणाऱ्या इवल्याशा जलधारा.
बागेवर तरंगत आहे
राखी गरजणारा ढग
पण लायलॅकचे फूल मात्र
आकाशनिळे.

त्या संध्याकाळी कोल्या आणि मी पुष्कळ वेळपर्यंत बागेत बसलो होतो. आता कोल्या तेथे नेमाने येऊ लागला, आणि अशा प्रत्येक वेळी तो मला आपली छोटीशी कविता म्हणून दाखवीत असे. त्याची दुसरी कविता मी येथे देत आहे. ती कविता माझ्या स्मृतिकोशात इतकी कोरली गेली की त्याने ती म्हणून दाखविल्यानंतर वर्षाने मी ती उतरवून काढली. कविता अशी होती :

डोंगराच्या पलिकडे अस्ताला गेलेला सूर्य
किरमिजी रंगाने झळाळून निघालेले आकाश
उद्या सुसाट वारा थैमान तर घालणार नाही ?
अस्वस्थपणे काकपक्ष्यांच्या थव्याने पसरलेले पंख
आणि घाईगर्दीने पश्चिमेकडे, घन अरण्याकडे
त्यानी घेतलेली धाव,
उंच पॉप्लर वृक्षावर सळसळणारी पाने,
नंतर सारे कसे निःस्तब्ध. दूरवररस्त्यावरून चाललेल्या
गाडीचा कानी येणारा करकर आवाज;
किरमिजी आकाश आता काळेभोर
तप्त वातावरणावर साचलेला राखाडी तवंग
आकाशात फक्त एक तेजस्वी तारा – लुकलुकणारा –
दाटली रात्र.

मला असे दिसले की कोल्या त्याच्या कविता लिहून काढीत नव्हता; त्याच्या त्या सहज जिभेवर खेळत. कविता त्याच्या स्मृतीत व त्याच्या हृदयात वास करीत असत., कागद समोर ठेवून कविता लिहिणारे असे माझे फारच थोडे विद्यार्थी होते. अशा कविता लेखणीद्वारे लिहून काढण्या-साठी जन्माला आलेल्या नसतात. चित्रे काढायला मुलाना जेवढे आवडते तेवढेच कविता रचायलाही आवडते.

आत्मिक निकटत्वाच्या एका क्षणी आपले गुपित शूरानेही माझ्यासमोर उघडे केले. हिंवाळयातल्या एका दिवशी बर्फावर घसरगुंडी करण्यासाठी आम्ही रानात गेलो होतो. सूर्याचा लाल गोळा क्षितिजाखाली जात होता. सायंसूर्यप्रकाशात देवदार वृक्षांची खोडे लोहात घडविल्यासारखी वाटत होती. निसर्गाचे सौंदर्य नजरेत साठवीत आम्ही रानातल्या एका मोकळया जागी उभे होते. आणि त्या क्षणाला शूराने सुतारपक्ष्याविषयीची आपली कविता मला म्हणून दाखविली :

देवदाराच्या सालीखाली असलेल्या
हजार तारा ; देवदाराच्या शेंड्यावर बसलेला सुतारपक्षी,
आपल्या [चोचीने वरच्या तारेला त्याने मारलेली टोच
आणि त्यातून बाहेर पडलेले अत्यंत मंद झंकार]
श्रवणअसाध्य. सूर्य जितका जवळ तितकी तार बारीक
आणि प्रत्यक्ष पृथ्वीवर तार तारच नसते
पृथ्वीतलावर एक घंटा शांतपणे घणघणत आहे
लाल सालीखालील काशाची घंटा.
चोचीने प्रहार करीत
तारेवरचे आरण काढणारा, बागडणारा सुतारपक्षी
आणि निनादणारी तार...
रान गात आहे ; पण सुतारपक्षी केव्हाच
दुसऱ्या तारेच्या शोधात निघाला आहे.

आपल्या बालपणाच्या काळात वाऱ्याने विपुल कविता रचल्या होत्या. तिचे अंतःकरण अत्यंत संवेदनाक्षम, प्रतिबिंबनशील होते. ग्रीष्मातल्या एका सायंकाळच्या सौंदर्याने मंत्रमुग्ध होऊन तळयाच्या पाण्यावर झुकलेल्या विलो-वृक्षांकडे पहात वाऱ्या तळयाच्या काठावर कशी उभी होती हे मी माझ्या नजरेने टिपले होते. त्या तळयाच्या आरशासारख्या नितळ पाण्यात आकाशाचे प्रतिबिंब पडले होते. नंतर काही दिवसानी ग्रीष्मातल्या त्या सायंकाळचे वर्णन करणारी कविता मला तिने म्हणून दाखविली :

निळे आकाश, हरित विलो, धवल झोपड्या –
सारेच प्रतिबिंबित झाले आहेत जलात.

उभी आहे मी
आकाशनील आरशासमोर
आणि माझ्यासमोर पसरले आहे
खूप दूरचे असीम विश्व.
तेथे आहेत किरमिजी सूर्यास्त, आणि धवल मेघ
तेथे लुकलुकत आहेत तारे, आणि खूप दूरच्या त्या रस्त्यावर
एक पाखरू भरारत आहे – सूर्याचा निरोप घेत.
या विस्मयकारक जगाचे
स्वतःचे असे संगीत आहे.
ते पहा, कुणीतरी स्पर्श केला आहे जाड तारेला
आपल्या हाताने
आणि गाऊ लागले आहे ते नील अनंत आकाश;
गात आहेत विलो, आणि झोपडयाही.
खूप दूरच्या सागरापलिकडे
जेव्हा सूर्य अग्नीसारखा जळत असतो,
पारवे घाईघाईने आपल्या विसाव्याकडे
परतत असतात
आणि कोणत्यातरी पोकळीत वाघूळ आपले
पंजे साफ करीत असते
जेव्हा दिवसाच्या श्रमाने थकलेला वारा
झाकोळत्या घळीमध्ये
विश्रांतीसाठी पहुडलेला असतो
फक्त अशा सायंसमयीच
मला ऐकू येते हे संगीत
तळयाच्या काठी.

प्रत्येक वर्षी शरद ऋतू जवळ येत असताना मुलाना ग्रीष्माला निरोप द्यावयाचा असे. आम्ही अशा वेळी आमच्या ओकवृक्षाकडे जात असू आणि गत ग्रीष्मकाळाविषयी, क्रौंचपक्ष्यांविषयी आणि शरदातल्या ऊबदार दिवसांविषयी मुले कविता रचीत असत. चौथ्या वेळी आम्ही ग्रीष्माला निरोप देत असता आम्हाला अत्यंत प्रिय असलेल्या गोष्टीविषयी – आपल्या मायभूमीविषयी – मुलानी एक सामूहिक कविता रचली.

मुलांच्या कल्पनाशक्तीत निर्माण झालेल्या सुस्पष्ट प्रतिमा ही सर्वात लक्षणीय व प्रशंसनीय अशी गोष्ट होती. ज्या मुलांच्या आत्मिक जीवनात काव्य-प्रतिभा ही गरज बनली होती त्यानी उत्कृष्ट कवितांचे वाचन करावे असा मी प्रयत्न केला. आम्ही एक छोटे काव्यसंग्रहालय तयार केले. काव्य-निर्मिती ही ज्यांची अजून आत्मिक गरज बनली नव्हती, ज्यांच्यामध्ये अजून काव्यात्म भाषेची संवेदनक्षमता विकसित करण्याची गरज होती अशांसाठी ही गोष्ट विशेष आवश्यक होती. मुलांची काव्यनिर्मिती म्हणजे त्याना लाभलेली एखादी उपजत, नैसर्गिक देणगी आहे असे समजता कामा नये हे मी पुन्हा सांगतो. चित्र काढण्यासारख्या स्वाभाविक घटनेचाच तो एक प्रकार आहे: प्रत्येकजण चित्र काढतो, आणि सर्व मुले त्या अवस्थेतून जातात. परंतु सभोवतालच्या जगाच्या आणि भाषेच्या सौंदर्याचे शिक्षक जेव्हा मुलाना दर्शन घडवितो तेव्हाच काव्यनिर्मिती ही मुलांच्या आत्मिक जीवनातील एक सर्वसामान्य घटना बनते. संगीताशिवाय संगीताचे प्रेम शिकविणे जेवढे अशक्य तेवढेच सृजनशीलतेशिवाय काव्यनिर्मितीचे प्रेम शिकविणे अशक्य.

पुश्किन आणि हैने, शेवचेन्को आणि लेस्या उक्राईन्का यांच्यावर प्रेम करणारा माणूस, ज्याला आपल्या भोवतालच्या **सौंदर्याविषयी सुंदर भाषेतच बोलावेसे** वाटते असा माणूस; योग्य शब्दाचा शोध ही सौंदर्यनिरीक्षणाच्या गरजेइतकीच ज्याची गरज बनते असा माणूस, ज्याच्या बाबतीत मानवतेच्या सौंदर्याचे आकलन हे प्रथमत: मानवी स्वाभिमानाविषयीच्या आदरातून आणि लोकालोकांमधील सर्वात न्याय्य संबंधांच्या – कम्युनिस्ट संबंधांच्या – दृढीकरणातून व्यक्त होते असा माणूस कधीच हीन वृत्तीचा किंवा जीवन-द्वेष्टा बनू शकत नाही.

## आमच्या सौंदर्याचा सांदीकोपरा

पहिली इयत्ता पुरी होण्यापूर्वीच्या वसंत ऋतूत आम्ही आमचा सौंदर्याचा सांदीकोपरा तयार करण्यास सुरुवात केली. कितीतरी काळ मुले या सांदीकोपऱ्याची स्वप्ने पहात होती. जेथे सभोवतालच्या जगातील नैसर्गिक सौंदर्याला मानवी हाताने निर्माण केलेल्या वस्तूंच्या सौंदर्याची जोड मिळेल अशी एक शांत, एकांतातली जागा अशी आम्ही या सांदीकोपऱ्याची कल्पना केली होती. आमच्या स्वप्नाने भाविकालाचाही वेध घेतला होता; आमच्या

या सांदीकोपऱ्याला झाडाझुडुपानी आम्ही अधिकाधिक कसे नटवू याचेही चित्र आम्ही रेखाटले होते. आम्ही तेथे विसावा घेणार होतो आणि काम करणार होतो; वसंताचे स्वागत करणार होतो आणि ग्रीष्माला निरोप देणार होतो.

शाळेचे आवार आणि दाट झुडुपानी माजलेले रान यांच्या दरम्यान मुलाना एक छोटी मोकळी जागा आढळली. घळीच्या उतरणीजवळची ती जागा होती आणि त्या उतरणीवर दाट गवत माजले होते. पाऊस पडल्या-नंतर तेथे ओलावा दाटत असे. आम्ही त्या मोकळया जागेची बेणणी केली आणि तेथे हिरवळीचे मैदान तयार करायला सुरुवात केली.

"आपला सांदीकोपरा म्हणजे हिरवळीचे अधिराज्य असेल," मी मुलाना सांगितले. "घळीची उतरण आपण हॉप वेलींच्या हिरव्या आच्छा-दनाने झाकून टाकू; आणि या दाट झुडुपांत बुलबुल आणि ओरिओल रहातील."

या स्वप्नाने मुलाना स्फूर्ती दिली. त्या मोकळया जागेचे हिरवळीच्या मैदानात रूपांतर करण्यासाठी आम्ही खूप मेहनत घेतली. गवताचे छोटे छोटे पुंजके आणून आम्हाला तेथे ते रोवावे लागले आणि त्याना पाणी द्यावे लागले. पावसाची मुले आतूरतेने वाट पहात होती; कारण त्यामुळे त्या हिरव्या गवताला पाणी मिळणार होते. रानात आम्हाला हॉप वेलींचे पुष्कळ फुटावे मिळाले आणि आम्ही ते घळीच्या उतरणीवर आणून लावले. आमचे भाग्य जोरावर होते; कारण त्या उन्हाळयात पाऊस चांगला पडला आणि त्यामुळे सर्व रोपे जगली. रानामध्ये लिली-ऑफ-दि-व्हॅलीच्या कित्येक मुळया आम्ही खणून काढल्या आणि मैदानाच्या एका कोपऱ्यात लावल्या. ज्यांवर आम्ही रासगुलाबांचे कलम करणार होती अशा तीन रासगुलाबांची झुडुपे आम्ही लावली. ते फुलांचे राज्य बनणार होते. सर्व मैदानभर आम्ही हेझलनटची झाडे लावली. तेथे रानफुले उगवावीत असे मुलाना वाटत होते. आम्ही डेझींची व इतर झाडे मिळविली. क्रिसॅन्थेममची कित्येक झुडुपे उष्णतागृहातून काढून आणली आणि ती तेथे लावली; शरदऋतूच्या अगदी अखेरी अखेरीपर्यंत ती तेथे फुलणार होती.

वाऱ्याने सूर्यफुलाचे एक रोप लावले. हिरवळीच्या एका दूरच्या कोप-ऱ्यात मुलानी सातूचे बी पेरले. नीना आणि साशाच्या वडिलानी आम्हाला बुटक्या सफरचंदाच्या झाडांची दोन रोपे दिली. आपली आजी टच्यूलिपची झाडे लावते असे वित्याने मला सांगितले. आम्ही मग काही टच्यूलिपचे कंद

लावले. उन्हाळ्यातल्या एके दिवशी मुलानी रानात एक मोठे बहरते लिंडनचे झाड पाहिले. त्या झाडाच्या फांद्याफांद्यांतून हजारो मधमाश्या गुणगुणत होत्या. वीणेच्या तारा झंकाराव्यात तसे सारे रान निनादत असल्यासारखे वाटत होते. निसर्गाच्या सौंदर्याने मंत्रमुग्ध होऊन मुले निःशब्द उभी होती. आपल्या सांदीकोपऱ्याजवळच लिंडनची काही झाडे लावावीत असे त्याना वाटत होते. शरदात आम्ही रानात गेलो, तेथली काही रोपे खणून काढली आणि दोन ओळीत ती लावली. "आता हे लिंडन वृक्ष मोठे होतील, दाट पर्णसंभाराने ती भरून जातील आणि त्यांची छायेशीर एक आळी तयार होईल," अशी स्वप्ने मुले चितारीत होती.

प्रत्येक वर्गाने आपला इतरांपेक्षा निराळा असा स्वप्नांचा सांदीकोपरा बनवावयास सुरुवात केली. १९५५ च्या शरद ऋतूत सर्व शाळेने मिळूनच स्वप्नांचा एक सांदीकोपरा तयार करावयास घेतला. शाळेच्या इमारतीच्या शेजारीच आम्ही गुलाबांची बाग तयार केली. रासगुलाबाना आम्ही विविध जातींच्या गुलाबाची कलमे केली होती. त्याचीच कित्येक रोपे आम्ही तेथे लावली. वर्षागणिक ती बाग अधिकाधिक सुंदर दिसू लागली. वसंतात आणि ग्रीष्मात तर तेथे फुलांचा समुद्र निर्माण होई. निसर्गाचे सौंदर्य नजरेने टिपण्यासाठी आणि काम करण्यासाठी – सौंदर्यनिर्मितीसाठी – प्रत्येकजण तेथे येत असे.

गुलाबांची बाग ही संपूर्ण शाळेचीच निर्मिती होती. सामाजिकदृष्ट्या उपयुक्त श्रमामध्ये जो वर्ग सर्वात जास्त यश मिळवी त्याला बागेतील फुले तोडण्याचा व ती फुले वाटण्याचा हक्क प्राप्त होई. बहुदा प्राथमिक व माध्यमिक इयत्ताच त्यात जिंकत. दर दिवशी गुलाबांची डझनावारी फुले तोडण्याची त्याना मुभा असे. ते गुलाब घेऊन मुले वर्गात येत आणि ती फुले आपल्या शिक्षकाना, माताना व खेड्यातल्या सर्वोत्कृष्ट कामगाराना देत. पहिल्या सुगीच्या उत्सवात मुले गुलाबांच्या फुलांचा एक मोठा गुच्छ करीत आणि सामुदायिक शेतावरील सर्वोत्कृष्ट कर्मचाऱ्याना तो अर्पण करीत.

सौंदर्यनिर्मितीसाठी केलेले श्रम हे बाल-हृदयाला उदात्ततेचे दर्शन घडवितात आणि औदासिन्याला प्रतिबंध करतात. पृथ्वीतलावर सौंदर्य निर्माण करीत असता मुले अधिक चांगली, अधिक विशुद्ध मनाची आणि अधिक सुंदर बनली.

# जीवनातील आदर्शांची उगमस्थाने

प्रौढ व्यक्तीच्या रूपात माझा प्रत्येक विद्यार्थी मी माझ्या कल्पनेसमोर आणण्याचा प्रयत्न केला. तो कोणत्या प्रकारचा नागरिक, कोणत्या प्रकारचा माणूस बनणार आहे? तो समाजाला काय देणार आहे? त्याचे आनंद कोणते असणार आहेत? कोणत्या गोष्टींची त्याला ओढ वाटणार आहे? कोणत्या गोष्टींबद्दल त्याच्या मनात चीड निर्माण होणार आहे? कोणत्या गोष्टींत तो आपले सुख शोधणार आहे आणि कोणत्या प्रकारचा वारसा तो या पृथ्वीतलावर मागे ठेवणार आहे हे प्रश्न मला संत्रस्त करीत.

गतशतकांच्या काळात मानवजातीने जी नैतिक मूल्ये निर्माण केली व ज्या नैतिक मूल्यांसाठी मानवजात झगडली ती नैतिक मूल्ये बाल-हृदयांत रुजविण्याचा, शिक्षक व शिक्षणतज्ज्ञ म्हणून, मी प्रयत्न केला. ती नैतिक मूल्ये म्हणजे, मायभूमीविषयीचे व स्वातंत्र्याविषयीचे प्रेम, दडपशाहीची आणि एका माणसाकडून दुसऱ्या माणसावर लादण्यात येणाऱ्या गुलामगिरीची चीड, आणि लोकांच्या सुखासाठी व स्वातंत्र्यासाठी स्वतःची ताकद व जीवन पणाला लावण्याची तयारी ही होत. आपल्या मायभूमीसंबंधीचे उच्च-उदात्त उद्‌गार आणि उच्च-उदात्त ध्येये आमच्या विद्यार्थ्यांच्या मनात स्थित्यंतरित होत असताना त्यांचे रूपांतर प्रचंड आवाज करणाऱ्या पोकळ नगाऱ्यात न होणे, त्यांचे सामर्थ्य लोप न पावणे किंवा वारंवार वापराने त्यांचे महत्त्व पुसून न जाणे हे महत्त्वाचे आहे. उदात्त संकल्पनांविषयी मुले कमी बोलली तरी चालतील, भावना आणि कृती, प्रेम आणि तिरस्कार, निष्ठा आणि चीड यातून ती ध्येये साकार होऊ द्यात.

जे शब्द लहानग्याना समजत नाहीत ते त्यांच्या मुखीं कोंबणे ही गोष्ट विशेष चीड आणणारी आहे. लोक जे पवित्र समजतात त्याचे त्यामुळे केवळ पोकळ शब्दावडंबरात रूपांतर होईल.

जमिनीतून नुकत्याच अंकुरलेल्या इवल्याशा झाडाची मुळे दक्ष माळी बळकट करून त्याला जशी दशकानुदशके जगण्याची क्षमता प्राप्त करून देतो त्याचप्रमाणे आपल्या मायभूमीविषयीच्या अमर्याद प्रेमाची, श्रमजीवी जनते-बद्दलच्या निष्ठेची आणि कम्युनिझमच्या महान ध्येयांविषयीच्या विश्वासाची शिकवण देऊन शिक्षकाने आपल्या विद्यार्थ्यांच्या संगोपनाची दक्षता वाहिली पाहिजे. आपल्या भोवतालचे जग पहायला, त्याचे आकलन करून घ्यायला

आणि त्याचे मूल्यमापन करायला मूल जव्हा सुरुवात करते तेव्हा या गुणांच्या शिकवणीला सुरुवात होते.

वडीलधाऱ्या पिढयानी जे जे काही निर्माण केले आहे, आपल्या मायभूमीच्या स्वातंत्र्यासाठी व स्वाधीनतेसाठी, श्रमजीवी जनतेच्या सुखासाठी दिलेल्या बिकट लढयात त्यानी जे जे काही साध्य केले आहे आणि मिळविले आहे त्याचे मुलाना मोल वाटणे हे अत्यंत महत्त्वाचे आहे. पावाचा तुकडा आणि गव्हाचे शेत, रानातील वृक्षराजी आणि छोटया तळयाच्या माथ्यावरील निळे आकाश, रात्री झोपायच्या वेळेला आईने म्हटलेली गाणी आणि सांगितलेल्या गोष्टी येथून मुलांच्या दृष्टीने मायभूमीला सुरुवात होते. ज्यावेळी लहानगी मुले भाषा, प्रतिमा आणि इतर जनांचे आत्मिक विश्व यांबाबत विशेष संवेदनाक्षम असतात अशा बालपणाच्या सोनेरी दिवसांत वडीलधाऱ्या पिढीला ज्या ज्या गोष्टींचा अभिमान वाटतो त्या आपण मुलाच्या अंतःकरणाला नेऊन भिडविल्या पाहिजेत, विमुक्त श्रमिकांच्या सुखाप्रीत्यर्थच्या झगडयाचे मोल आपण त्याला सांगितले पाहिजे. मूलभूत गरजांच्या बेफिकीर उपभोगाला मुभा न देण्याचा मी प्रयत्न केला. सभोवतालच्या जगाविषयीचे व स्वतःविषयीचे मुलाचे आकलन एकतर्फी असता कामा नये. जगाचा व स्वतःचा बोध करून घेताना वडीलधाऱ्या पिढयानी निर्माण केलेल्या भौतिक व आत्मिक मूल्यांविषयीच्या आपल्या जबाबदारीचा मुलाना बोध झाला पाहिजे.

शेते, अरण्ये, नदीकिनारा, शेजारची खेडी येथे आम्ही काढलेल्या सहलीना आम्ही आमच्या मायप्रदेशाच्या भूतकाळात केलेले "प्रवास" म्हणत असू. असे "प्रवास" करताना आमच्या लोकांच्या आत्मिक जीवनात भूतकाळाला व वर्तमानकाळाला जोडणाऱ्या गोष्टी मुलाना दाखविण्याचा मी प्रयत्न करीत असे. मी त्याना सांगे:

"पिकलेल्या गव्हाचे एक सुपीक शेत तुमच्यासमोर पसरले आहे. त्या शेतावर रानाच्या वेशीपाशी यादवी युद्धाच्या काळात श्वेतरक्षकानी एका लाल गनिमी लढवय्याला गोळी घालून ठार केले होते. आणि महान देशाभिमानी युद्धाच्या पहिल्या बिकट ग्रीष्मकाळात येथेच आपले मूठभर सैनिक आणि नाझींची एक तुकडी यांच्यामध्ये तुंबळ रणक्रंदन झाले. आपल्या वीर सैनिकानी तेथे प्राणांचे बलिदान केले. या विशाल शेताकडे पहा, मुलानो. या छोटया टेकडया म्हणजे अज्ञात लोकांची थडगी आहेत. त्यांच्या कर्तृत्वाची स्मृति येथे धरतीने जतन करून ठेवली आहे. या हजारो छोटया छोटया

टेकड्या म्हणजे हजारो अज्ञात थडगी आहेत. त्या वीरांचे उदात्त रक्त या धरतीच्या कुशीत विसावले आहे; आणि लोकाना त्यांच्या थोर कर्तृत्वाचा कधीही विसर पडणार नाही. आपल्या मायभूमीसाठी त्यानी आपले प्राण वेचले नसते तर आज तुमच्या मायभूमीचे सौंदर्य तुम्हाला डोळे भरून पहाता आले नसते. नाझीनी तुम्हाला गुलामगिरीत लोटले असते."

आपल्या मायभूमीच्या भवितव्याचा लहान मुलाला विचार करू द्या. भविष्याविषयी त्याला आस्था व चिंता वाटू द्या व त्याची त्याला अनुभूती घेऊ द्या. वर्तमानाचे उगमस्रोत म्हणून भूतकाळातील घटना त्याच्यासमोर उभ्या राहू द्यात.

बालपणाच्या काळाला आपण स्वच्छंद आनंदाचा, खेळांचा व परीकथांचा काळ समजतो. आदर्शांचे उगमस्थान या काळातच सामावले आहे. नेमक्या याच काळात नागरिकत्वाची मुळे जमिनीत रुजतात. बालपणाच्या काळात सभोवतालच्या जगातील कोणत्या गोष्टी विद्यार्थ्यांसमोर खुल्या होतात, त्याना कोणत्या गोष्टींचे आश्चर्य वाटते व कोणत्या गोष्टींचा आनंद होतो, कोणत्या गोष्टींमुळे त्यांचे मन अस्वस्थ होते आणि – व्यक्तिगत अपमानाच्या भावनेतून नव्हे तर इतर लोकांच्या प्रारब्धाविषयीच्या आस्थेमुळे – त्यांचे काळीज आक्रोशते यावर ते विद्यार्थी कोणत्या प्रकारचे नागरिक बनतील हे अवलंबून असते. आपल्या अंतर्विरोधांसहित आणि गुंतागुंतीसहित बहुमुखी जग मुलासमोर खुले होते आणि त्यातून त्याला सौंदर्य व ओंगळता, सुख व दुःख यांचे दर्शन घडते. सभोवतालच्या जगामध्ये जे जे काही घडते, भूतकाळात व वर्तमानकाळात लोक ज्या ज्या गोष्टींसाठी जगले, धडपडले त्या सर्वांची मूल सुष्ट व दुष्ट अशा दोन भागात विभागणी करते. बालपणाच्या काळात मानवतेचा व नागरिकत्वाचा पाया घालण्यासाठी **सुष्ट व दुष्ट यांचा योग्य बोध** आपण मुलाला घडविला पाहिजे.

आणि त्याचा माझा अर्थ पुढीलप्रमाणे आहे: सभोवतालच्या जगाचे मुले जे जे ज्ञान मिळवितात ते सर्व ज्ञान, सर्व सामाजिक घटना, भूतकाळातील व वर्तमानकाळातील लोककर्तृत्व – या सर्व गोष्टीनी मुलांच्या मनात अत्यंत सखोल अशा नैतिक भावना जागृत झाल्या पाहिजेत. सुष्ट व दुष्टतेचा योग्य बोध याचा अर्थ जे मुलाला ठाऊक असते त्याची त्याच्या अंतःकरणात उमटलेली प्रतिक्रिया होय. मनात उसळून येणारा आनंद, मनाला वाटणारे कौतुक, आणि नैतिक सौंदर्याचा मार्ग चोखाळण्याचे प्रयत्न ही सुष्टतेची निष्पत्ती असते; संताप, चीड, आणि सत्याच्या व न्यायाच्या लढ्यासाठी मनात

उद्भवणारा आत्मिक सामर्थ्याचा ओघ ही दुष्टतेबद्दल व्यक्त झालेली प्रतिक्रिया असते. मुलाचे मन हे कधीही सत्यांच्या निर्जीव, अचेतन राशी रचून ठेवणारी शीतपेटिका बनता कामा नये. औदासिन्य व भावशून्यता हा एक गंभीर दोष आहे आणि तो टाळण्याचा मी प्रयत्न केला. भंग हृदयाचे लहान मूल हे भावी क्षुद्रमनस्क माणसाचे बालरूप असते. उत्कृष्ट नागरिक बनण्याच्या तळमळीचे स्फुल्लिंग आपण बालपणातच चेतविले पाहिजेत आणि जे प्रत्यक्ष दुष्टत्वाच्या सदरात मोडणारे आहे किंवा दुष्टत्वाला कारणीभूत ठरणारे आहे त्याबद्दल चीड निर्माण केली पाहिजे.

एका माणसाकडून दुसऱ्या माणसाची होणारी पिळवणूक ही एक दुष्ट गोष्ट आहे हे सत्य मुलाला पटवून देणे कठीण नाही. दुष्ट म्हणजे काय या शिक्षकाने विचारलेल्या प्रश्नाला मूल बरोबर उत्तर देऊ शकेलही; पण एका माणसाने दुसऱ्या माणसावर लादलेल्या गुलामगिरीची ठसठशीत चित्रे पाहूनही मुलाच्या मनात जर तिटकारा निर्माण झाला नाही, दुष्टत्व धारण करणाऱ्यांबद्दल त्याला जर तिरस्काराची भावना जाणवली नाही तर तो खरा नागरिक व उदात्ततेचा आदर्श ठरणारा माणूस बनणार नाही.

मानवाच्या मनात वसणारे औदासिन्य हे अत्यंत धोकादायक व किळसवाणे असते, आणि मुलांमध्ये वसणारे औदासिन्य हे तर महाभयानक असते. अगदी दूरवर, जगाच्या अगदी दुसऱ्या टोकावर रहाणाऱ्या लोकांच्या प्रारब्धाबद्दल किंवा अगदी शंभर वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या लोकांबद्दल व्यक्तिगत आस्थेची व चिंतेची एक उदात्त अशी सखोल भावना माझ्या प्रत्येक विद्यार्थ्याला जाणवावी असा मी प्रयत्न केला. ही भावना म्हणजे औदासिन्याशी दोन हात करण्याचे एक हुकमी साधन आहे, थंड हृदयांवरचा – क्षुद्रमनस्कतेच्या बीजांविरुद्धचा – तो एक उपाय आहे.

महान मानवी प्रतिष्ठेच्या लढ्यासाठी ज्यानी रणशिंग फुंकले होते, एका माणसाकडून दुसऱ्या माणसाची पिळवणूक कधीही सहन करता कामा नये ही कल्पना ज्यानी अत्यंत सुस्पष्टपणे व्यक्त केली होती आशा माणसांची चरित्रे मी मुलाना सांगत असे व तशा प्रकारची पुस्तके त्याना वाचून दाखवीत असे. पोलिश लेखक सेन्केविच यांची 'गायक यान्को' ही कथा मुलानी अत्यंत भावनोत्कंठित मनाने पुनःपुन्हा ऐकली. त्या कथेच्या पहिल्या वाचनाने मुलाना हलवून सोडले. त्या निराधार मुलाचे जीवन उध्वस्त करणाऱ्या जमीनदाराबद्दल राक्षस, रक्तपिपासू असेच शब्द मुलांच्या तोंडून बाहेर पडले. चिडीने, संतापाने त्यांच्या छोटया मुठी आवळल्या गेल्या आणि त्यांच्या नजरेत क्रोध दाटला. गायक यान्कोने माझ्या विद्यार्थ्यांच्या आत्मिक

जीवनात कायमचा प्रवेश केला. नंतर ती गोष्ट आम्ही अनेक वेळा वाचली आणि काही मुलाना तर ती शब्दश: पाठ झाली होती. यान्कोची ही कथा मुलाना पुन:पुन्हा का ऐकाविशी वाटत होती? मला असे वाटते की चिडी-च्या, संतापाच्या अनुभवातून आत्मिक सामर्थ्याच्या ओघाचा जन्म होतो, आणि हेच त्याचे कारण होते. दुष्टतेचे आपण खंबीर, कट्टर शत्रू असल्याची भावना मुलाला जाणवल्यामुळे ते अधिकच शक्तिमान बनते, आपल्या नैतिक सामर्थ्याच्या परिपूर्ण समृद्धतेचा त्याला अनुभव घ्यावासा वाटतो आणि पुढच्या वेळी सत्याच्या लढ्यासाठी आपण तयार असल्याची त्याला खात्री पटते. भोवतालच्या जगातील सुष्टतेबद्दल व दुष्टतेबद्दल अशा मुलाचे मन संवेदनाक्षम असते.

लोकोत्तर उक्रेनियन लेखक आर्खिप तेस्लेन्को यांच्या गरीब शेतकरी मुलांच्या आनंदशून्य बालपणाविषयीच्या व यौवनकालाविषयीच्या कथानी मुलांच्या मनावर लक्षणीय ठसा उमटविला. श्रीमंतानी व झारिस्ट अधिकाऱ्यानी केलेल्या विटंबनेमुळे व दारिद्र्यामुळे जिला आत्महत्येचा मार्ग पत्करावा लागला अशा बुद्धिमान शेतकरी मुलीच्या वाट्याला आलेल्या खडतर भोगाविषयी-ची गोष्ट वाचताना मुलांची नजर क्रोधाने पेटून उठली.

तिसऱ्या व चवथ्या इयत्तेत हॅरिएट बीचर स्टोव यांची 'अंकल टॉम्स केबिन' ही कादंबरी आम्ही दोनदा वाचली. त्या गुलामांसाठी मुलांचे काळीज फाटून निघाले. माणसे जनावरांसारखी कधी खरेदी केली गेली असतील व विकली गेली असतील याची कल्पनाच करणे कठीण होते. सुष्ट व दुष्ट यांचे आजच्या काळात चाललेल्या झगड्याचे एक सुस्पष्ट चित्र हळू हळू मुलांच्या मनात आकार घेऊ लागले: भांडवलदारी देशांतील लाखो लोक स्वत:साठी नव्हेत तर जमीनदारांसाठी व भांडवलदारांसाठी राबत असतात. तेथे वाढणाऱ्या मुलाना बालपण म्हणजे काय हेही ठाऊक नसते. आपल्या मायदेशांच्या स्वातंत्र्यासाठी व स्वाधीनतेसाठी लढणाऱ्या तेथील सर्वोत्कृष्ट सुपुत्राना व सुपुत्रीना गोळ्या घालून ठार मारण्यात येते, फाशी देण्यात येते किंवा सक्तमजुरीची सजा ठोठावली जाते हे ते चित्र होते.

निकोस बेलोयानिस या ग्रीक लोकवीराच्या वाट्याला आलेली शोका-न्तिका मुले कधीही विसरली नाहीत. ग्रीसवर नाझीनी केलेल्या कब्ज्याच्या काळात बेलोयानिस आक्रमकांविरुद्ध लढले. नाझींच्या पकडीतून त्यांच्या देशाची मुक्तता करण्यात आल्यानंतर भांडवलदारी न्यायालयाने देशद्रोहाबद्दल त्याना मृत्युदंडाची शिक्षा सुनावली. लाल कार्नेशनचे फूल हातात घेऊन

निकोस बेलोयानिस मृत्यूला सामोरे गेले ; त्याच दिवशी त्यांच्या पत्नीने एका मुलाला जन्म दिला. तिलाही मृत्युदंडाची शिक्षा सुनावण्यात आली होती. तो मुलगा तुरुंगातच होता. त्या बालकाचे काय होणार या विचाराने मुलाना धक्का बसला आणि निकोस बेलोयानिसच्या त्या मुलाला कशी मदत करता येईल असे ती विचारू लागली. उदात्त भावनांतून कृतीचा जन्म होतो. या बाल-बेलोयानिसच्या आईला मुलानी एक पत्र लिहिले आणि आंतरराष्ट्रीय रेड क्रॉसमार्फत ते तिला पाठविले. सफेद रेशमी कापडावर कशिदाकाम केलेल्या एका लाल कार्नेशन फुलाचीही त्यानी तिला एक भेट पाठविली. नंतर दर वर्षी त्या वीरपत्नीला मुले पत्र लिहीत असत आणि मुलाच्या वाढदिवसानिमित्त एक भेट पाठवीत असत. पांढऱ्या रेशमावर कशिदाकाम केलेला गुलाब, पॉपी, लायलॅक अशी ती भेट असे. सकृद्दर्शनी अत्यंत नगण्य वाटणाऱ्या या कृतीचा मुलांच्या मनावर फार मोठा परिणाम घडला होता ; कारण तो दुष्टत्वाचा धिक्कार होता आणि अन्यायाविरुद्धचा लढा त्यात प्रतिबिंबित झाला होता.

मुलाना सामाजिक जीवनाच्या विश्वात घेऊन जात असताना, मी त्याना हे पटवून देण्याचा प्रयत्न केला की, मानवी इतिहासाच्या अगदी काळ्याकुट्ट कालखंडांतही, जेव्हा लाखो माणसे दुष्ट शक्तींकडून चिरडली जात होती तेव्हाही अन्यायाविरुद्ध उठाव करणारे लोक नेहमीच या जगात होते. नेमके हेच लोक, त्यांचे जीवन व त्यांचे कार्य हे बालपिढ्यांचे तेजस्वी, मार्गदर्शक तारे आहेत. आपल्या मायदेशांच्या स्वातंत्र्यासाठी व स्वाधीन-तेसाठी, शोषणमुक्तीसाठी, आणि मानवी प्रतिष्ठेला बळकटी आणण्यासाठी जे झगडले आणि ज्यानी आपल्या प्राणांचे बलिदान केले अशा मानवजाती-च्या सर्वोत्तम सुपुत्रांचे व सुपुत्रींचे अविचल मनोधैर्य, धाडस, शौर्य व आपल्या मतांवरील त्यांची दृढ निष्ठा व विश्वास यातून माझ्या विद्यार्थ्यांनी स्फूर्ती घ्यावी असा मी प्रयत्न केला.

भूतकाळात मानवजातीने जी नैतिक मूल्ये निर्माण केली व जिंकून घेतली आणि आपल्या काळात समाजसत्तावादी समाजात जी आता सुफलित होत आहेत ती नैतिक मूल्ये मुलांची मने चेतनाबद्ध करणारी आणि सबंध जगभर सत्याचा विजय संवर्धित करण्यासाठी त्याना कृतीप्रवण करणारी त्यांची आत्मिक संपदा बनावी असा बिंदू गाठण्याचा मी प्रयत्न केला. अन्तोनिओ ग्रामशी यानी असे म्हटले होते की, सत्य हे नेहमीच क्रांतिकारक असते. शब्दांचे डांगोरे न पिटता आपल्या सर्व सौंदर्यासहित नैतिक सत्ये

मुलांसमोर प्रकट करण्याचा मी प्रयत्न केला. नैतिक मूल्यांच्या सौंदर्याचा क्रांतिकारक अर्थ जेव्हा ठळक, चैतन्ययुक्त प्रतिमांमध्ये प्रकट केला जातो तेव्हाच मानवजातीच्या नैतिक मूल्यांच्या सौंदर्याला मुलाच्या हृदयातील संपन्न भांडाराचे रूप येते. "शब्द शिकविण्याचे काम करतात पण उदाहरणे मनाची पकड घेतात" अशी एक लॅटिन म्हण आहे. असामान्य लोकांची उदाहरणे, मानवजातीच्या सुखासाठी मिळविलेले विजय — हा आहे प्रकाश मुलांचे जीवन उजळून टाकणारा. परंतु उदाहरणे ही मानवतावादी, पुरोगामी, क्रांतिकारक कल्पनांची जेव्हा मूर्तिमंत जिवंत प्रतीके बनतात तेव्हाच ती जगायचे कसे हे शिकवितात. कल्पनांपासून मागे हटणाऱ्या माणसाकडे अखेरीस फक्त संवेदनाच उरतात असे महान जर्मन कवी गेटे यानी म्हटले आहे.

ज्यांची नावे अनेक पिढ्याना मार्गदर्शक ताऱ्यांसारखी ठरली आहेत अशा असामान्य लोकांविषयी मी मुलाना सांगत असे. अर्थात लहान मुलाला तुम्हाला एकाच वेळी सर्वच गोष्टी सांगता येत नाही. प्रतिमांच्या व मुलांसमोर उभ्या करण्यात येणाऱ्या चित्रांच्या हिमप्रपाताखाली मुलाला तुम्ही गाडून टाकता कामा नये. अविरतपणे तुम्ही मुलाच्या हृदयाला धक्के देता कामा नये आणि त्याचे मन चेतविता कामा नये. तत्कालापुरते त्याला थोडेच ठाऊक असले तरी चालेल, पण त्या अल्पशा गोष्टीतून नैतिक मूल्यांचे सौंदर्य त्याला प्रतीत होऊ द्या. मुलाचे मन रोमांचित करणाऱ्या गोष्टीविषयी मुलाला विचार करू द्या; मुलाचे विचार आणि भावना एकजीव होऊ द्यात आणि प्रत्येक मुलाच्या हृदयात त्या वास करू द्यात. चार वर्षांच्या काळात, मानवजातीसाठी जे झगडले त्यांच्याविषयी — स्पार्टाकस, तोमासो कम्पानेला, इवान सुसानिन, स्तेपान खल्तुरिन, सोफ्या पेरोबस्काया, निकोलाय किबाल्चिच, तारास शेवचेन्को, थॉमस मुन्झेर, ख्रिस्तो बोतेव आणि यानुश कोर्चाक यांच्याविषयी मी मुलाना माहिती सांगितली. लेनिन यांचे जीवन व त्यानी दिलेले लढे, कम्युनिस्ट वीर इवान बाबुश्किन, सेर्गेइ लाझो, कामो, याकोव स्वेर्दलोव, फेलिक्स द्झेर्झिन्स्की, युलिउस फूचिक आणि अर्न्स्ट थेलमान, आणि महान देशाभिमानी युद्धातील समरवीर निकोलाय गास्तेल्लो व अलेक्सांदर मात्रोसोव यांच्याविषयी तसेच जोर्दानो ब्रुनो यानी शास्त्रीय सत्यासाठी दिलेला धैर्यशाली लढा आणि महान पंडित व मानवतावादी मिक्लुखो-मक्लाई यांच्याविषयी मी मुलाना सांगितले.

ज्या सुस्पष्ट व ठळक उदाहरणामध्ये जिवंत मानवी तळमळीच्या, कृतीच्या आणि पराक्रमाच्या रूपात कल्पना मूर्तिमान बनलेली असते असे उदाहरण मुलाच्या अंतर्विश्वावर जबरदस्त प्रभाव पाडते. या ना त्या कृतीचे मर्म कसे उमजावे हे मुलाना तुम्ही स्पष्ट करण्याची गरज नसते. कल्पना व प्रतिमा यांची जेव्हा एकत्र जोड घातली जाते तेव्हा कल्पनेचा मुलाला अतिशय चांगल्या रीतीने उमज पडतो. माझ्या विद्यार्थ्याना मी ज्या वीरांविषयी माहिती दिली त्या वीरांबद्दल सांगावयाचे झाल्यास लोकांच्या सुखासाठी आपले सामर्थ्य पणाला लावण्याची व आपल्या प्राणांचे बलिदान करण्याची त्यांची तयारी हे त्यांचे खास गुणवैशिष्टच होते. ही गुणवैशिष्टचे मुलांच्या मनात आनंदोर्मी निर्माण करतात आणि इतर लोकांच्या भवितव्याचा मूल विचार करू लागते. मानवजातीच्या सेवेमध्ये ज्याना आपले सुखाचे निधान सापडते अशी माणसे मुलाचे नैतिक आदर्श बनतात.

हृदयाचे स्पंदन वाढविणाऱ्या रोमांचित मनःस्थितीत मध्यरात्रीपर्यंत नैतिक महानतेविषयीची पुस्तके वाचण्यात मूल तल्लीन झाल्याशिवाय परिपूर्ण शिक्षणाची कल्पना करणे कठीण आहे. ज्या व्यक्तीला माणूस नैतिक सौंदर्याचा – सामर्थ्य, धैर्य, चिकाटी व अडचणींच्या आवतीतही प्रकट होणारा निर्धार – यांचा आदर्श म्हणून समोर ठेवतो त्या व्यक्तीशी माणसाकडून जेव्हा स्वतःची तुलना केली जाते आणि आत्मपरीक्षण केले जाते तेव्हा नैतिक आदर्शांचा जन्म होतो.

मुलाना नैतिक मूल्यांच्या उगमस्थानाकडे नेण्यासाठी शिक्षकाने कथांची निवड अत्यंत काळजीपूर्वक केली पाहिजे. ज्या वस्तुस्थितीमध्ये व घटनांमध्ये वैचारिक अर्थ सामावलेला आहे अशी वस्तुस्थिती व अशा घटना ही येथे महत्त्वाची गोष्ट आहे. बाल पिढ्याना आदर्श ठरणाऱ्या लोकांच्या जीवनाचे दर्शन घडविताना या लोकांचे व्यक्तिगत जीवन व मानवजातीचे भवितव्य यांचे त्यांच्या जीवनात जे ऐक्य साधले गेले आहे त्या ऐक्याचे दर्शन घडविणे हे अत्यंत महत्त्वाचे आहे.

लेनिन यांच्या जीवनाविषयी आणि त्यानी दिलेल्या लढ्यांविषयी मुलाना माहिती देताना श्रमजीवी जनतेच्या वाट्याला आलेल्या दुःखोपभोगाने लेनिनना किती यातना होत असत हे दाखवून देणाऱ्या गोष्टींचे मी विवरण करीत असे. या महान नेत्याने जे जे काही केले त्या सर्वाच्या बुडाशी जनतेचे सुख हेच उद्दिष्ट होते. यादवी युद्धाच्या बिकट काळात आणि वाताहतीच्या काळात अनाथ, पोरक्या मुलांची लेनिननी किती काळजी

वाहिली याची गोष्ट जेव्हा मुलानी ऐकली तेव्हा मुलांची मने आनंदयुक्त भावनेने थरारून गेली. या नैतिक सौंदर्याच्या व सत्याच्या निकषातून मुलानी स्वतःकडे आणि आपल्या भोवतालच्या संपूर्ण जगाकडे पहावे म्हणून एक महान नैतिक मूल्य या नात्याने लेनिनवादी मानवतेने मुलांच्या जीवनात प्रवेश करावा असे मला वाटत होते.

पोलिश जनतेचे राष्ट्रवीर यानुश कोर्चाक यांच्याविषयीच्या गोष्टीनी मुलांच्या मनावर फार मोठा ठसा उमटविला. ज्या मुलांवर त्यांचा जीव होता त्या मुलांसमवेत हा माणूसही मृत्यूला सामोरा गेला या घटनेने ती स्तिमित झाली. कोर्चाकना आपला जीव वाचविता आला असता; पण नाझींकडून हजारो निष्पाप मुले मृत्यूच्या खाईत लोटली जात असताना आपण आपले प्राण वाचविणे ही गोष्ट लांच्छनास्पद आहे असे त्याना वाटले... मुलांच्या दृष्टीने यानुश कोर्चाक हे खऱ्याखुऱ्या मानवतेचे प्रतीक बनले.

'लोकनिर्धार' या १९ च्या शतकातील क्रांतिकारक संघटनेचे सदस्य स्तेपान खल्तुरिन, सोफ्या पेरोवस्काया आणि निकोलाय किबाल्चिच यांच्याविषयीच्या कथा ऐकताना मुलांची मने ज्वलंत रोमांचक भावनानी पेटून उठली. यूलिऊस फूचिक आणि कामो (तेर-पेत्रोस्यान) या कम्युनिस्टांची मनोनिश्चलता, धैर्य व निष्ठा यांविषयी मी जेव्हा मुलाना माहिती सांगितली तेव्हा मानवाबद्दलच्या अभिमानाची एक भावना मुलाना प्रतीत झाली. मुले म्हणाली: "त्यांच्यासारखे बनणे ही खरोखरच महान गोष्ट आहे. ते खरे वीरपुरुष होते."

शूर बालवीरांबद्दल, आपल्या सोविएत मायभूमीच्या स्वातंत्र्याच्या व स्वाधीनतेच्या लढ्यात प्राणार्पण करणारे वाल्या कोतिक, वित्या कोरोबकोव, लेन्या गोलिकोव, वलोद्या दुबिनिन आणि वास्या शिश्कोवस्की यांच्या अजोड पराक्रमांबद्दल मी मुलाना खूप माहिती दिली. वैचारिक खंबीरता, धैर्य, याचबरोबर समाजसत्तावाद, शांतता, स्वातंत्र्य व लोकशाहीच्या शत्रूंबरोबर कधीही मिळते न घेण्याची वृत्ती ही कम्युनिस्ट नीतिमत्तेची सर्वात महत्त्वाची गुणवैशिष्टचे मी मुलाना हळू हळू प्रकट करण्याचा प्रयत्न केला. एक स्वाभिमानाची बाब म्हणून आपल्या निष्ठापूर्ण ठाम मतांसाठी पाय रोवून उभे रहाण्याच्या क्षमतेला दृढता आणणे हे शिक्षणाचे एक महत्त्वाचे कार्य आहे आणि सुष्ट व दुष्टतेबद्दलचे सुस्पष्ट प्रतिमांत मूर्तिमंत झालेले चित्र अगदी लहान वयापासून माणसाने तयार

करावयास सुरुवात केली तरच हे कार्य साकार होऊ शकेल. परंतु केवळ ही चित्रे पुरेशी नाहीत. व्यक्तिगत भावनिक मूल्यांकन हेही आवश्यक आहे. आपल्याला प्रिय असलेल्या गोष्टी कोणत्या व आपल्याला तिरस्करणीय असलेल्या गोष्टी कोणत्या यांमध्ये मुलाला भेद करता आला पाहिजे. लोकांसाठी आनंद निर्माण करण्याची, मानवी प्रतिष्ठेचे रक्षण करण्याची आणि कम्युनिझमच्या नैतिक तत्त्वांचे मोल राखण्याची मुलांमध्ये ओढ निर्माण करून त्याना नैतिक सौंदर्याची प्रेरणा देणे यातच मुलांचे नैतिक शिक्षण सामावले आहे.

छोटी शाळकरी मुले नैतिक आदर्शांच्या उगमस्थानांशी उभी असतात. नैतिक धैर्यवृत्तीच्या सौंदर्याची आपण शिक्षकानी प्रत्येक मुलाला जाणीव करून दिली पाहिजे आणि कम्युनिस्ट मतांवरच्या त्याच्या विश्वासाला बळकटी आणली पाहिजे; त्यान्वयेच आपण श्रमिक जनतेचा एक जिवंत, सृजनशील अंश आहोत असे प्राथमिक शाळेतील विद्यार्थ्यांच्या मनाला जाणवेल.

## कम्युनिस्ट पक्षाविषयी एक विचार

आपल्या देशाच्या कम्युनिस्ट पक्षावरील प्रेम, त्याच्या तत्त्वांवरील दृढ विश्वास आणि त्याच्या उद्दिष्टांसाठी लढा देण्याची तयारी यांची शिकवण देणे हे शाळेचे एक सर्वात महत्त्वाचे कार्य आहे. मुले अनेक वेळा **कम्युनिस्ट** हा शब्द ऐकतात. आपल्या लोकांची शोषणातून मुक्तता करण्यासाठी, समाजसत्तावादाच्या उभारणीसाठी, फॅसिझमवरील विजयासाठी आणि समाजाच्या कम्युनिस्ट पुनर्रचनेसाठी जे लढले त्या अत्यंत तेजस्वी, थोर लढवय्यांच्या प्रतिमांशी हा शब्द मुलाच्या मनात एकजीव व्हावा असा मी प्रयत्न केला. आपल्या वाडवडिलांच्या कम्युनिस्ट ध्येयांचे वारसदार या नात्याने आपल्या वाडवडिलांचा आपल्या मुलाना अभिमान वाटावा, आणि त्यानी आपल्या देशाचे खरेखुरे स्वामी बनावे, कम्युनिझमच्या उभारणीसाठी व कम्युनिझम बलशाली करण्यासाठी लढणारे ते झुंजार लढवय्ये बनावेत याची दक्षता घेणे हे शैक्षणिक कार्याचे एक उद्दिष्ट आहे असे मी मानीत असे.

प्रथमतः कम्युनिस्टांविषयीच्या संभाषणांतून हे शैक्षणिक कार्य मी तडीस नेले. या संभाषणसत्राला आम्ही "धगधगत्या अंतःकरणाचे लोक" असे

नाव दिले होते. आपल्या देशातील असामान्य कम्युनिस्टांविषयी मी मुलाना माहिती दिली. झारशाहीशी दोन हात करणाऱ्या आणि समाजसत्तावादी क्रांतीसाठी लढणाऱ्या या कम्युनिस्टांच्या लोकोत्तर चरित्रानी आणि शौर्यशाली लढ्यानी मुलांची खात्री पटवून दिली की, लोकाना आपली निष्ठा अर्पण करणे, लोकांच्या सुखासाठी झगडणे यातच कम्युनिस्टाचे सर्वोच्च सुख सामावले आहे.

आनंद विद्यालयाच्या अगदी पहिल्या दिवसापासून ते तहत या तरुण मुला-मुलीना माध्यमिक शाळा प्रमाणपत्र मिळून त्यानी व्यवसायाला किंवा पुढील शिक्षणाला सुरुवात करीपर्यंत लेनिन यांच्याविषयी मी मुलाना वाचून दाखवीत असे. सुरुवातीला लेनिन यांच्या बालपणाविषयीचे आणि त्यांच्या यौवनकालाविषयीचे साहित्य मी मुलाना वाचून दाखविले. महिन्यागणिक इतिहासाच्या प्रश्नांशी, कम्युनिस्ट तत्त्वप्रणालीच्या प्रश्नांशी आणि लोकांच्या सुसंपन्न भावी जीवनासाठी पक्षाने चालविलेल्या कार्याच्या प्रश्नांशी या गोष्टी अधिकाधिक निकटत्वाने निगडित होत होत्या. त्यातून मुलांची खात्री पटली की कम्युनिस्ट पक्ष म्हणजे लोकांच्या सर्वोत्तम सुपुत्रांमिळून व सुपुत्रींमिळून तयार झालेला जनतेचा सर्वोत्कृष्ट गाभा आहे.

मुलांच्या कम्युनिस्टांशी भेटी घडू लागल्या. त्यांच्या जीवनाच्या व संघर्षाच्या कथा या मुलांच्या दृष्टीने कम्युनिस्ट पक्षाच्या इतिहासाचा एक भाग बनल्या. व्ही एम् बेस्कोरोवाइनी, ए. एम्. राद्झिविल किंवा एन्. के. गायचुक यांच्यासारख्या जुन्या, वयोवृद्ध बोल्शेविकांबरोबर मुलांच्या झालेल्या भेटी मुले कधीही विसरणार नाहीत. आपले हे ग्रामबांधव सोविएत सत्तेचा उदय होत असताना प्रत्यक्ष तेथे उपस्थित होते आणि कामगारांच्या व शेतकऱ्यांच्या विजयासाठी त्यानी आपले रक्त सांडले होते या वस्तुस्थितीचा मुलांच्या मनावर खोल ठसा उमटला. कम्युनिस्ट हे आपल्या मतांवर व विचारांवर दृढ निष्ठा असलेले लोक आहेत हे मुलाना उमजले. त्याच वेळी मुलाना हेही दिसले की हे लोक अतिशय विनम्र असे लोक होते आणि आदरणीय वृद्धावस्था गाठल्यानंतरही त्यानी आपली सारी ताकद व बुद्धी कम्युनिझमच्या उभारणीसाठी खर्च केली. भाजीमळ्याचे एक सर्वोत्कृष्ट शेतकरी म्हणून मुले राद्झिविलना ओळखीत होती आणि बेस्कोरोवाइनी हे एक सर्वात अनुभवी यंत्रचालक होते — ज्यांच्या हातातून सोने पैदा होत होते अशी ती व्यक्ती होती हे मुलाना ठाऊक होते. खेड्यामध्ये पहिले सामुदायिक शेत कसे निर्माण करण्यात आले, कम्युनिस्ट

ट्रॅक्टर चालवायला कसे शिकले, ते ट्रॅक्टरच्या चाकाशी कसे बसले आणि सामुदायिक शेतातला पहिला चर त्यानी कसा खणला हे त्यानी मुलाना सांगितले.

सोविएत लोकांच्या सर्वोत्कृष्ट भवितव्यासाठी कम्युनिस्ट पक्षाने चालविलेल्या कार्यासंबंधी बेस्कोरोवाइनींचे मुलांबरोबर अनेक वेळा संभाषण झाले. सामुदायिक शेताच्या पक्ष-संघटनेविषयी त्यानी मुलाना माहिती दिली. सामुदायिक शेतावरील कम्युनिस्ट हे धान्यपैदास वाढविण्यासाठी आणि पशुपालनकेंद्राकडून आपल्यासाठी अधिक मांस, दूध व लोणी पैदा व्हावे म्हणून काम करतात असे मुलाना दिसून आले.

महान देशाभिमानी युद्धाविषयीच्या गोष्टी तर विशेष सद्‌बोधक होत्या. एस्. ए. कोवपाक यांच्या गनिमी संघटनेमधील एक सहभागी सोविएत संघराज्याचे वीर ए. के. त्सिम्बाल, फॅसिझमच्या पंजातून रुमानिया व हंगेरीची मुक्तता करण्यासाठी झालेल्या लढाईमध्ये ज्यानी भाग घेतला होता ते सोविएत संघराज्याचे वीर एन्. एस्. अनोपा, आणि फॅसिझमच्या पकडीतून आमच्या मायभूमीची मुक्तता करण्यासाठी झालेल्या लढाईतील वीरयोद्धे म्हणून नाव कमाविलेले आमचे अनेक ग्रामबांधव यांच्याबरोबर मुलांच्या भेटी झाल्या. कम्युनिस्ट पक्षाच्या कार्यातून आणि लोकांच्या श्रमातून लेनिनवादी ध्येये आणि लेनिनवादी सत्य अबाधितपणे प्रतिबिंबित होत आहे या ठाम विश्वासाला मुलांच्या मनात अधिकच दृढमूलता प्राप्त झाली.

## इतरांची चिंता वाहिल्याशिवाय एक दिवसही कोणी रहाता कामा नये

आनंद निर्माण करण्यासाठी काया न झिजविता, कोणत्याही प्रकारचे आत्मिक प्रयत्न कारणी न लावता मूल फक्त आनंद "उपभोगू" लागले तर त्याचे मन भावनाशून्य, निष्ठूर आणि बेपर्वा बनेल.

इतरांसाठी काहीतरी चांगले करणे ही मुलांच्या मनाला उदात्तता आणणारी एक प्रचंड नैतिक शक्ती आहे. ज्याना मदतीची, आस्थेची, वात्सल्याची, सौहार्दाची आणि सहानुभूतीची गरज आहे असे लोक आपल्या-भोवती आहेत ही भावना मुलाला जाणवणे हे सोविएत शाळेचे एक शैक्ष-

णिक कार्य आहे. या लोकाना टाळणे हे मुलांच्या सदसद्विवेकबुद्धीला न पटणे, आपण इतरांच्या नजरेत यावे या इच्छेने नव्हे तर निःस्वार्थ बुद्धीने मुलाने इतरांसाठी काहीतरी चांगले करणे ही मुख्य गोष्ट आहे.

दुःखाने आणि विपत्तीने ग्रासलेल्या लोकांच्या भावनांत सहभागी होण्याची वृत्ती हे मुलाच्या सदसद्विवेकबुद्धीचे, इतरांसाठी काहीतरी चांगले करण्याच्या त्याच्या इच्छेचे उगमस्थान आहे. माणसाच्या अंतर्विश्वाबद्दल जाणवणारी संवेदना, इतरांच्या दुःखाला प्रतिसाद देण्याची क्षमता येथून सर्वोच्च मानवी आनंदाला सुरुवात होते. त्याशिवाय नैतिक सौंदर्य अशक्यप्राय आहे. आनंद विद्यालयातच माझ्या विद्यार्थ्यांनी मानवताशास्त्राच्या मार्गाने पहिली पावले टाकावयास सुरुवात केली होती, दैनंदिन वातावरणात त्याना भेटलेल्या माणसाच्या नजरेतील शोक, दुःख, व्याकुळता आणि चिंता पहायला ते शिकले होते. जेव्हा बालपणाच्या संपूर्ण काळात लोकांची चिंता वाहिल्याशिवाय एक दिवसही जात नाही तेव्हाच प्रौढ काळात ही क्षमता त्या व्यक्तीच्या नैतिक निष्ठांच्या जगात प्रवेश करते आणि तिच्या आत्मिक जीवनाचे ते अविभाज्य अंग बनते.

इतर लोकांच्या भावनांत सहभागी होण्याची वृत्ती मी नेहमीच माझ्या विद्यार्थ्यांना शिकविली आणि दुसऱ्या माणसाच्या जागी आपण आहोत असा मुलाने विचार करावा, त्याची मदतीसाठीची व आस्थेसाठीची गरज त्याने स्वतः अनुभवावी असा मी प्रयत्न केला. दुसऱ्या माणसाचे दुःख हे मुलाचे स्वतःचे दुःख बनले पाहिजे. गरजेच्या काळात दुसऱ्याना कशी मदत करावी याचा विचार करण्यास मुलाला त्याने भाग पाडले पाहिजे. वैयक्तिक संबंध, दोन माणसांमधील क्रियाप्रतिक्रिया, सहृदयतेची शिकवण देण्यामध्ये असाधारण महत्त्वाची भूमिका पार पाडतात. आपल्या शेजाऱ्याला मदत करण्यापेक्षा नुसते मानवजातीवर प्रेम करणे अधिक सोपे असते. मानवी व्यक्तिमत्त्वाच्या मूर्त ज्ञानाशिवाय माणसाची उमज पडणे अशक्यप्राय आहे. आपल्या मित्राच्या खिन्न, आर्जवी, विव्हल नजरेत खोलवर दडलेले दुःख जर मुलाला वाचता आले नाही तर मानवी दुःख त्याच्या अंतःकरणा-पर्यंत जाऊन पोहोचणारच नाही. मानवी जीवनाच्या — आनंदाच्या तशाच दुःखाच्या — सर्व बाजू ज्या मुलाला ठाऊक नसतात ते मूल कधीच संवेदनाक्षम आणि सहानुभूतीशील बनणार नाही.

खुद्द आमच्या वर्गातच मोठ्या प्रमाणात दुःख आपला अंमल गाजवीत होते — त्यासाठी डोळ्याला ताण देण्याची फारशी गरज नव्हती. वर्गात

हसण्याखिदळण्याचे ध्वनी निनादत, आनंदोल्हासाच्या कारंज्या फुटत, पण काही मुलांच्या नजरेत खिन्नता जाणवे. शाळेत येऊन वाल्याला तीन वर्षे झाली होती आणि वाल्याच्या वडिलांची तब्येत अतिशय विकोपाला गेली. ती छोटी मुलगी मूक व उदास बनली. नीना आणि साशाची आई अतिशय आजारी होती आणि आपल्या वडिलाना घरकामात मदत करण्या-साठी त्या मुली वारंवार घरी रहात. शूराची आजी आजारी झाली आणि अनेक वेळा तिला रुग्णालयात हलवावे लागले. प्रथम एक आठवडा, आणि नंतर महिनोन्महिने तिला रुग्णालयात रहावे लागले. तो छोटा मुलगा दु:खाने व्याकुळ झाला होता. आजी आजारी असताना शूरा आपल्या आत्याकडे रहात असे. ती अतिशय चांगली बाई होती आणि शूराची ती खूप काळजी घेत असे. पण आजीच्या वियोगाने शूराचे मन अतिशय विव्हल झाले होते. शरदातल्या एका गारठ्याच्या दिवशी आपल्या आजीला भेटण्याचे शूराने ठरविले. आत्याला न सांगताच तो रुग्णालयात गेला. परतताना तो वादळी पावसात सापडला, त्याला सर्दी बाधली आणि तो अतिशय आजारी झाला. काही दिवसानी आजी ज्या रुग्णालयात होती त्याच रुग्णालयात त्याला हलविण्यात आले.

वलोद्याच्या कुटुंबात एक दुर्घटना घडली. त्याची आई गिलावा-कामगार होती. दररोज ती बसने कामावर जाई. वसंत ऋतूत, जमिनीवर अजून बर्फ असताना, एका गाडीवर तिची बस आदळली आणि वलोद्याच्या आईला गंभीर दुखापत झाली. जन्मभर ती अपंगच रहाणार असे डॉक्टर म्हणाले. त्याच वेळी, वलोद्याने जीवनात योग्य मार्गाला लागावे म्हणून ज्यानी खूप काळजी घेतली होती ते त्याचे आजोबा मरण पावले.

दु:खच, पण एक निराळ्या प्रकारचे दु:ख कोल्याच्या कुटुंबात अवतरले. चोरीचा माल स्वीकारल्याबद्दल त्याच्या वडिलाना अटक झाली आणि त्याना दोन वर्षांची तुरुंगवासाची शिक्षा झाली. कुटुंबातले नैतिक वातावरण काहीसे स्वच्छ झाले; पण जे काही घडले त्यामुळे कोल्याला धक्का बसल्याशिवाय राहिला नाही.

दर दिवशी मुलांशी माझी भेट होत असताना मी त्यांच्या चेहऱ्याकडे पहात असे. मुलाच्या नजरेतील खिन्नतेपेक्षा गुंतागुंतीच्या या शैक्षणिक प्रक्रियेत अधिक बिकट बाब ती कोणती असू शकेल? मुलाच्या मनात जर खिन्नता दाटली असेल तर वर्गात काय चालले आहे त्याकडे त्याचे लक्ष रहात नाही. ते मन ताणलेल्या तारेसारखे असते — एक निष्काळजी

स्पर्श, आणि ते मन घायाळ झालेच म्हणून समजा. प्रत्येक मूल आपापल्या तऱ्हेने दुःख अनुभवीत असते: एखाद्याच्या दुःखावर जर तुम्ही फुंकर घातलीत तर त्याला बरे वाटते. दुसऱ्यांच्या बाबतीत आपुलकीच्या शब्दाने जखम आणखीनच वाहू लागते. अशा बाबतीत शैक्षणिक कला ही प्रथमतः मानवी सुज्ञपणात सामावली आहे: दुखावलेल्या मनाला हात लावू नका, मुलाच्या दुःखात आणखी भर घालू नका, त्याच्या मनाला जेथे जखमा झाल्या असतील तेथे स्पर्श करू नका. ज्याचे मन दुःखाने बधिर झाले आहे आणि गोंधळून गेले आहे असा विद्यार्थी, अर्थातच, पूर्वीप्रमाणे अभ्यास करू शकत नाही. दुःखाचे व्रण त्याच्या विचारक्रियेवर उमटतात. मुलाच्या दुःखाचा, खिन्नतेचा आणि त्याला होणाऱ्या यातनांचा वेध घेणे हीच, प्रथमतः शिक्षकाच्या बाबतीतली मुख्य गोष्ट आहे. मुलाचे मन त्याला दिसले पाहिजे आणि जाणवले पाहिजे. मुलाच्या दुःखाशी शिक्षकाचे ज्या प्रकारचे नाते निर्माण होते, ज्या प्रमाणात मुलाचे मन समजण्याची आणि जाणविण्याची क्षमता शिक्षकामध्ये वास करीत असते, त्यातूनच शिक्षकाच्या शैक्षणिक कलेचा पाया तयार होतो.

दुःखाने ग्रासलेल्या विद्यार्थ्याला तुम्ही भंडावता कामा नये किंवा त्याच्याकडून अविरत अवधानाची, कष्टाची आणि मेहनतीची अपेक्षा धरता कामा नये. काय झाले असे तुम्ही त्याला विचारता कामा नये: मुलाला ते सांगणे कठीण जाईल. शिक्षकावर मुलाचा विश्वास असेल, तो त्याला आपल्या मित्राच्या जागी वाटत असेल तर जे शक्य आहे ते सारे ते मूल आपल्या शिक्षकाला सांगेल. ते जर मूक राहिले तर मुलाच्या व्यथित हृदयाला स्पर्श करू नका... भावनांची शिकवण ही शिक्षणातली सर्वात कठीण अशी गोष्ट आहे. आणि मुलाची वाढ जेवढी अधिक तेवढे, अलं-कारिक भाषेत बोलावयाचे झाल्यास, ज्या तारांतून उदात्त भावना झंकारल्या पाहिजेत त्या मानवी हृदयाच्या नाजूक ताराना स्पर्श करणे शिक्षकाच्या दृष्टीने अधिक कठीण.

आपल्या अगदी जिवलग व्यक्तीचे आंतरिक विश्व माणसाच्या नजरेत पहाण्यास, त्याच्या नजरेतून ते जाणविण्यास मुलाला शिकविण्यासाठी शिक्षकामध्ये मुलाच्या भावनांचा, आणि प्रथमतः, त्याच्या दुःखाचा आदर राखण्याची क्षमता असली पाहिजे. तुम्ही मुले तुमच्या दुःखाचा उगाच बाऊ करीत असता हे आम्हा मोठ्या माणसाना चांगले ठाऊक आहे असा उथळ डोक्याने वाद घालून मुलांच्या विकल भावनांच्या ठिकऱ्या उडवण्या-

चा मोठ्या माणसांकरवी जो प्रयत्न केला जातो त्यापरती प्रौढ माणसे व मुले यांच्या भावनिक-नैतिक संबंधांमधील अधिक ओंगळवाणी अशी दुसरी कोणतीही गोष्ट नसेल . . .

प्रथमतः मुलांच्या भावना तुम्ही समजावून घेतल्या पाहिजेत. एखाद्या खास साधनाच्या द्वारे ही गोष्ट शिकविणे अशक्यप्राय आहे. असे घडण्याचे एकमेव कारण म्हणजे शिक्षकामधील उच्च पातळीला पोहोचलेला भावनिक-नैतिक विकास हे होय. मुलाचे दुःख पोसणारी कोणतीही कारणे असोत काही समान गोष्टी तेथे हमखास आढळतात. त्या गोष्टी म्हणजे बालविह्श अंतर्मुखतेने भयचकित करणारी त्याची व्यथित खिन्न नजर, औदासिन्य, वैफल्य आणि एकलेपणाची भावना. व्यथाविकल मुलाचे ना खेळांकडे लक्ष असते ना आपल्या मित्रांच्या मौजमजेकडे, हसण्याबागडण्याकडे लक्ष असते. कोणत्याही गोष्टींमुळे खिन्न विचारांचे पटल त्याच्या मनावरून दूर होत नाही. अशा वेळी सर्वात स्निग्ध मदत जर कोणती असेल, करण्याजोगी सर्वात उत्तम गोष्ट जर कोणती असेल तर ती म्हणजे त्याच्या अंतर्गाभ्याला स्पर्श न करता त्याच्या दुःखात सहभागी होणे ही होय. उपऱ्या हस्तक्षेपा-मुळे कटुता निर्माण होण्याचा संभव असतो, आणि धीर सोडू नकोस, स्वतःवर ताबा ठेव असा सल्ला, त्या सल्ल्यामागे खरीखुरी मानवी भावना नसेल तर मुलाला तो अनाठायी वाटतो . . .

मुलाना भावनांची शिकवण देणे म्हणजे प्रथमतः आपल्या स्वतःचा भावनिक-नैतिक दर्जा त्यांच्यापर्यंत पोहोचविणे होय. माणसाची आत्मिक स्थिती उमजल्याशिवाय भावनिक दर्जाची प्राप्ती अशक्यप्राय आहे. आणि दुःख किंवा चिंता अनुभवणाऱ्या माणसाच्या जागी मूल जेव्हा स्वतःची विचारपूर्वक स्थापना करते तेव्हाच ही उमज मुलाला येते.

शूराची आजी जेव्हा आजारी झाली तेव्हा तो छोटा मुलगा अतिशय खिन्न आणि उदास झाला, आणि त्याच वेळी त्याच्या मनात संशयानेही घर केले. त्याला काही म्हणायचा अवकाश की कोणीतरी आपल्या जखमेवर डागण्या देत आहे अशा रीतीने तो उसळून उठे. एके दिवशी मी पाहिले तर त्याचे विशाल पिंगट डोळे अश्रूनी डबडबले होते. मुले मला म्हणाली : "शूरा रडतोय". मूल हे केवळ मूल आहे म्हणून त्याच्या अंगी आपल्या मित्रांबद्दल किंवा एखाद्या प्रौढाबद्दल सहानुभूती बाणेल अशी अपेक्षा करणे खुळेपणाचे आहे. ज्या विचारपूर्वकतेने व काळजीपूर्वकतेने मुलाला आपली पहिली स्वतंत्र पावले टाकायला शिकविले जाते तितक्याच

विचारपूर्वकतेने व काळजीपूर्वकतेने दुसऱ्याच्या भावनांत सहभागी होण्याची वृत्ती हे ज्ञानग्रहणाचे एक सर्वात नाजूक क्षेत्र आहे – हृदयाने व मनाने केलेले ते ज्ञानग्रहण असते. अनुभवी शिक्षकाच्या शस्त्रागारात दुसऱ्याच्या भावनांत सहभागी होण्याची वृत्ती शिकविण्याचे एक सामर्थ्यशाली साधन असले पाहजे – आणि ते साधन म्हणजे भाषा.

शूरा वर्गात नसल्याचा एक क्षण मी निवडला आणि मुलाना म्हटले, "एखाद्या माणसाला काही दुःख असले तर आपण आश्चर्य वाटल्यासारखे वागत कामा नये. आणि या क्षणाला शूरा फार मोठ्या दुःखाने तळमळत आहे. त्याच्या अगदी जवळचे त्याच्या नात्यातले फक्त एकच माणूस आहे, आणि ती म्हणजे त्याची आजी. त्याला त्याची आई आठवतही नाही; आणि त्याची आजी आजारी झाली आहे. कदाचित लोक तिला रुग्णालयात हलवतील; मग त्याच्याजवळ कोण उरेल? त्याच्या जागी आपणच आहोत अशी कल्पना करा, मग दुःख म्हणजे काय हे तुम्हाला जाणवेल. रस्त्यावर भेटलेला तो वृद्ध माणूस तुम्हाला आठवतो? त्याचे डोळे किती खिन्न होते ते तुम्हाला आठवते? तो माणूस दुःखी आहे असे तुम्हाला त्यावेळी वाटले. मग तुमच्या मित्राच्या नजरेतले दुःख तुम्हाला का दिसू नये? गेले काही दिवस शूरा अगदी मूक आणि विचारात गर्क असलेला दिसतो. तो वर्गात असला तरी त्याचे विचार, त्याचे मन आपल्या आजीच्या रुग्णशय्येपाशी असतात. तो काही दिवस घरी राहिला तर तो शाळेत का आला नाही हे विचारण्याची घाई करू नका. आपल्या दुःखाविषयी बोलणे माणसाला नेहमीच कठीण जाते. आणि एकूणच एखादा माणूस दुःखी आहे, व्यथित आहे असे तुम्हाला दिसले तर त्याला नाक खुपसणारे प्रश्न विचारू नका. त्याला मदत होईल असे काहीतरी करा. माणसाच्या जखमेवर कधीही मीठ चोळू नका. आपल्या वर्गातल्या एखाद्या मुलावर आपत्ती कोसळली आहे असे तुम्हाला कळले तर असं वागा की ज्यान्वये तुमच्या एकाही शब्दाने किंवा तुमच्या एकाही कृतीने त्याच्या दुःखात भर पडणार नाही. आणखी एक गोष्ट – शूराला आणि त्याच्या आजीला कशी मदत करता येईल याचा विचार करा. पण तुमच्या मदतीला बढाईखोरपणाचा वास येता कामा नये: आपण आपल्या मित्राला मदत करीत आहोत, तेव्हा आपण किती चांगले आहोत असे तुम्ही म्हणता कामा नये. आपला चांगुलपणा मिरविणे हे कधीही ग्राह्य मानले जात नाही. आपल्या मित्राला आपण मदत केली

पाहिजे हे जर तुमच्या अंतःकरणाचे बोल नसतील तर कितीही चांगुलपणा मिरविलात तरी तुम्ही चांगली माणसे ठरणार नाही."

शूरा वर्गात आला, आणि मग मी त्याच्याबद्दल एकही शब्द उच्चारला नाही. मी ताबडतोब विषय का बदलला हे मुलाना जाणवले. मधल्या सुटीत, शूराला आणि त्याच्या आजीला कशी मदत करता येईल याबद्दल मुले चर्चा करू लागली. मुलानी त्याच्यासाठी सफरचंदे आणि मासे आणले – आणि हे सारे त्यानी अगदी विशुद्ध मनाने केले होते. आजीला रुग्णालयात हलविण्यात आले आणि शूरा आपल्या आत्याबरोबर राहू लागला तेव्हा मुले अनेक वेळा त्याला भेटायला जात. शूराला पावसात सर्दीची बाधा झाली, तो आजारी पडला आणि आपल्या आजीबरोबरच त्याला रुग्णालयात पडून रहावे लागले आहे हे जेव्हा मुलाना कळले तेव्हा त्याना फार दुःख झाले. सुटीच्या दिवशी आम्ही रुग्णालयात गेलो. मुलानी त्याच्यासाठी सफरचंदे आणि मिठाई आणली होती. आणि साशा वडिलानी त्याच्यासाठी आणलेले मोठे चॉकोलेट घेऊन आला होता. मुले शूराला भेटण्यासाठी रुग्णकक्षेत गेली. अर्धा दिवस आम्ही तेथे थांबलो.

या गोष्टीचा मला आनंद झाला; पण माझे मन थोडे अस्वस्थही झाले. हा सारा सामूहिक प्रेरणेचा परिपाक होता. आपल्या मित्रासाठी काहीतरी चांगले करावे असे काही मुलाना वाटले खरे; परंतु प्रथमतः आपले सत्कृत्य इतरानी पहावे ही त्यामागची भावना होती. वलोद्या म्हणाला की वडिलानी त्याच्यासाठी आणलेली स्केट्स्‌ची जोडी शूरासाठी त्याला आणावयाची होती आणि रुग्णालयात ती शूराला द्यावयाची होती.

"तुझ्या वडिलानी तुला तसे करण्यास संमती दिली आहे का?" मी त्याला विचारले.

"होय, त्यांची संमती आहे," वलोद्या म्हणाला.

"मग स्केट्स्‌ची ती जोडी रुग्णालयात कशाला आणायची? शूराला ती काही आताच चालविता येणार नाही. तो बरा झाल्यानंतर घरी येईल तेव्हा ती त्याला तू दे."

वलोद्याने आपले स्केट्स्‌ शूराला दिले नाहीत. याचा अर्थ आंतरिक प्रेरणा फार क्षीण होती... या घटनेने सदयता, सौहार्द आणि सहानुभूती यांच्या शिक्षणाविषयी विचार करण्यास मला भाग पाडले. या अतिशय नाजूक आणि गुंतागुंतीच्या गोष्टी आहेत. बक्षीस मिळविण्याच्या हिशोबीपणातून नव्हे तर चांगुलपणाने वागण्याच्या गरजेतून छोट्या मुलाने

काहीतरी चांगले करावे ही गोष्ट मी कशी साधू शकेन? या चांगुलपणाच्या गरजेचे मर्म कशात सामावले आहे आणि त्याचा प्रारंभ कुठून होतो? अर्थात सहानुभूतीची शिकवण देताना सामूहिक आत्मिक प्रेरणा ही अत्यंत महत्त्वाची आहे. तरीही दुसऱ्याच्या भावनांत सहभागी होण्याच्या वृत्तीने प्रत्येक मुलाच्या वैयक्तिक आत्मिक जीवनक्षेत्रात प्रवेश केला पाहिजे.

एक आंतरिक गरजेतून, आणि अत्यंत उत्कट अशा समाधानाची अनुभूती घेण्याच्या प्रेरणेतून माझ्या सर्व विद्यार्थ्यानी सत्कृत्ये करावीत, आणि एकूणच आपल्या मित्राना किंवा इतर लोकाना मदत करावी असा मी प्रयत्न केला. माणसाला काहीतरी चांगले करण्यास शिकविणे आणि त्याचबरोबर या मार्गाने वागावे असा सरळ सरळ सल्ला देण्याचे टाळणे ही नैतिक शिक्षणातील कदाचित एक सर्वात अवघड गोष्ट आहे. ही गोष्ट व्यवहारात कशी उतरविता येईल? ज्यान्वये माणूस चांगली गोष्ट करण्याचे टाळू शकत नाही असे आंतरिक सामर्थ्य मुलात विकसित करणे म्हणजेच दुसऱ्याच्या भावनांत सहभागी होण्याच्या वृत्तीची शिकवण देणे ही येथे मुख्य गोष्ट आहे यात वाद नाही. पण हे कसे साधता येते? ज्यान्वये स्पष्ट विचारातून स्पष्ट भावना निर्माण होतील, ज्यान्वये छोटया मुलाचे व्यक्तिमत्व आणि दुःखपीडित माणसाचे व्यक्तिमत्व परस्परांत मिसळून जाईल, ज्यान्वये आपणच दुःखाचा अनुभव घेणारी ती व्यक्ती आहोत असे मुलाला वाटेल व जाणवेल अशा रीतीने दुसऱ्याचे दुःख पहाताना स्वतः आपण त्याच्या जागी आहोत असा विचार मुलाच्या मनात अपापतः प्रादुर्भूत होईल असा बिंदू तुम्ही कसा गाठू शकाल?

मुलांच्या आत्मिक जीवनाच्या व परस्पर संबंधांच्या अत्यंत बिकट व जटिल क्षेत्राना वाहिलेल्या आमच्या शिक्षकसभाना हळू हळू मानसशास्त्रीय परिसंवादाचे रूप आले. केवळ प्राथमिक शिक्षकच नव्हेत तर माध्यमिक वर्गांचे व वरच्या वर्गांचे शिक्षकही त्यांत भाग घेऊ लागले. आमच्या विवेचनेचा विषय होता **माणूस** – म्हणजेच मूल, किशोरवयीन मुले आणि युवक. या मानसशास्त्रीय परिसंवादाच्या बैठकांमध्ये आम्ही अहवाल वाचून दाखवीत असू आणि विशिष्ट मुलांच्या आंतरिक विश्वाबद्दल, त्यांच्या बौद्धिक, नैतिक, भावनिक, शारीरिक व सौंदर्यात्मक विकासाच्या मूलस्रोतांबद्दल, ज्या वातावरणात त्यानी आपली शालेयपूर्व आणि शालेय वर्षे घालविली त्या वातावरणाचा त्यांच्या विवेकबुद्धीवर, विचारक्रियेवर, भावनांवर, इच्छाशक्तीवर, स्वभावावर, आणि वैयक्तिक दृढ मतांवर कसा परिणाम

होतो त्याबद्दल माहिती देत असू. प्राथमिक शिक्षकांच्या अहवालानी माध्यमिक वर्गांच्या व वरच्या वर्गांच्या शिक्षकांची वैचारिक सिद्धता घडवून आणली आणि त्यामुळे किशोरवयीन मुलांवर व तरुण मुलां-मुलींवर प्रभाव पाडण्यास त्याना मदत झाली. ज्या माणसाला आपण शिक्षण देत आहोत त्या माणसाने सर्व शिक्षकांच्या प्रभावक्षेत्राखाली रहावे या दृष्टीने प्रत्येक शिक्षकाला प्रत्येक व्यक्तिगत विद्यार्थ्याची सखोल, सर्वांगीण ओळख असली पाहिजे या सामूहिक शैक्षणिक मताला या सर्व गोष्टींमुळे बळकटी प्राप्त झाली.

काही मुलांच्या आंतरिक विश्वाची अत्यंत जटिल क्षेत्रे सर्वांगपरिपूर्णरित्या आकलून घेण्याच्या दृष्टीने दोन किंवा तीन तास पुरेसे नसतात असे आम्हाला आढळून आले. अशा रीतीने कोल्याच्या व्यक्तिमत्वाबद्दलच्या माझ्या अहवालानंतर काही शिक्षकानी माझ्या विश्लेषणात अत्यंत महत्त्वपूर्ण तपशिलांची भर घातली; हे मूल सामुहिकात जे जे पहाते त्याचे त्याच्या भावनिक विश्वात कसे प्रतिबोधन होते, म्हणजेच, दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे तर, माणसामाणसांमधील संबंध आणि इतर लोकांबरोबरचे त्याचे स्वतःचे संबंध त्याच्या आकलनबुद्धीला कसे प्रतीत होतात याबद्दलचे ते गुणपृथक्करण होते. त्यातून, काहीतरी चांगले करण्याची आंतरिक आच, तसेच इतरांसाठी काहीतरी चांगले करण्यासाठी मूल स्वतःला कसे उद्युक्त करते यांसंबंधीचा एक अत्यंत उद्बोधक व काही शिक्षकांच्या मते, एक अत्यंत नवीन असा निष्कर्ष आमच्या हाती लागला.

मुले आपल्या दुःखग्रस्त मित्रांबद्दल जेवढी अधिक सहानुभूती दाखवितात तेवढे त्यांचे हृदय अधिक संवेदनाक्षम बनते. मुले तिसऱ्या इयत्तेत असताना फेब्रुवारीतल्या एका भयंकर गारठ्याच्या दिवशी मिशा, कोल्या, कात्या आणि लारिसा धावत धावत माझ्या घरी आले. कशामुळेतरी ती मुले अस्वस्थ झाली होती.

"वान्याचा भाऊ ल्योन्या गेला," कात्या म्हणाली. "लोकानी त्याच्या वडिलाना तार पाठविली, आणि उद्या ते कझाखस्तानला* जाणार आहेत. आम्ही काय करावं?"

मुलांच्या नजरेत आर्जव होते: आमच्या मित्राला मदत कशी करता येईल ते आम्हाला शिकवा!

---

* कझाखस्तान – कझाख सोविएत समाजसत्तावादी प्रजासत्ताक.

ही शोकांतिका कशी घडली ते आम्हाला त्याच दिवशी कळले. ल्योन्या हा अठरा वर्षांचा ट्रॅक्टरचालक होता आणि पशुपालनकेंद्रावर तो गवत घेऊन चालला होता. वाटेवर तो हिमवादळात सापडला. खेडे रस्त्यापासून जवळच होते. ट्रक्टर तेथेच टाकून त्याला खेड्यात जाता आले असते. पण त्याने तसे केले नाही. वादळ ओसरेल आणि गवत वेळेवर पशुपालनकेंद्रावर पोहोचविता येईल अशी त्याला आशा वाटली. परंतु वादळ अधिकच वाढले आणि त्याने साऱ्याच वस्तू गोठायला सुरुवात झाली. ल्योन्या आपल्या ट्रक्टरमध्येच गोठून मरण पावला... कित्येक दिवस वान्या शाळेत येत नव्हता. मुलाना फार वाईट वाटले; त्यांची किलबिल थांबली. आपल्या मित्राला कशी मदत करता येईल असे प्रत्येकजण विचारीत होता. त्याच्या घरी जाण्याची कल्पना कोणीतरी पुढे मांडली. पण मी त्याना तसे न करण्यास सांगितले. मी त्याना म्हटले: "वान्या, त्याची आई, त्याचे वडील, त्याचे भाऊ आणि त्याच्या बहिणी शोकात बुडाल्या आहेत. आपण त्यांच्या घरी गेलो तर आपण त्याच्या आईच्या नजरेस पडू आणि ल्योन्या शाळेत कसा जात होता ते तिला आठवेल, आणि आपला शोक विसरणे तिला अधिकच कठीण जाईल. त्याच्या आईचे मन जरा हलके झाले की आपण वान्याला भेटायला जाऊ. आणि तो जेव्हा शाळेत येईल तेव्हा त्याचा भाऊ कसा मेला हे त्याला विचारू नका. त्याचा विचार करणे किंवा त्याविषयी बोलणेही त्याला अवघड जाईल. त्याच्याकडे लक्ष द्या आणि त्याचं सारं काही ऐका, आणि त्याची जखम अधिक चिघळेल असे काही करू नका."

वान्याचे वडील कझाखस्तानहून परतले तेव्हा नापेर प्रदेशातल्या खेड्याच्या एका रस्त्याला आपल्या वडील मुलाचे नाव देण्यात येणार असल्याचे त्यानी मला सांगितले. त्यानी मला जे सांगितले तेच मी मुलाना सांगितले. त्यावेळी आमचा वर्ग बालवीर संघटनेत सामील होण्याची तयारी करीत होता. आपल्या तुकडीला आणि त्यानंतरच्या तीन पथकाना काय नावे द्यायची याचा मुलानी विचार केला. आणि मी अपेक्षिले होते तेच त्यानी सांगितले. वान्या ज्या पथकात होता त्या पथकाला वान्याच्या भावाचे – आपले कर्तव्य बजावताना मरण पावलेल्या लिओनिदचे – नाव द्यायचे मुलानी ठरविले. वान्याने ती बातमी आपल्या आईला सांगितली. मुलानी एक चित्रसंग्रहवही तयार करावी आणि त्यात आपल्या शाळेविषयी चित्रे काढावीत असा मी मुलाना सल्ला दिला. अर्थात, लिओनिदशी संबंधित

असलेल्या गोष्टींची व त्याच्या शालेय जीवनाची चित्रे काढावीत असाच प्रत्येक मुलाचा मानस होता. तिसऱ्या इयत्तेत असताना लिओनिदने एक सफरचंदाचे झाड लावले होते; ते वरच्या वर्गातल्या मुलानी आम्हाला दाखविले. पदार्थविज्ञानाच्या खोलीत लिओनिदने आणि त्याच्या मित्रानी तयार केलेल्या यारीची एक प्रतिकृती आम्हाला आढळली. लिओनिदचे पक्ष्यांवर फार प्रेम होते आणि लिओनिदने व त्याच्या पथकाने तयार केलेल्या कबुतरांच्या एका छोटयाशा खुराडयाची स्मृती अजून शाळेत कायम होती. या सर्व गोष्टी मुलानी चित्रसंग्रहवहीत लिहून काढल्या. मी लिओनिदचे एक चित्र तयार केले. आम्ही ही चित्रसंग्रहवही त्याच्या आईकडे घेऊन गेलो. ही भेट तिला अगदी अमोल वाटली. आपल्या मुलाची स्मृती शाळेने जतन करून ठेवली आहे या गोष्टीचा तिला अतिशय आनंद झाला. लिओनिदचे नाव दिलेल्या बालवीरपथकासाठीही आम्ही अशीच एक चित्रसंग्रहवही तयार केली.

सहृदयतेच्या भावनांचे आणि सत्कृत्यांचे निव्वळ देखाव्यात रूपांतर न होणे हे अतिशय महत्त्वाचे आहे. जे काही करण्यात आले असेल त्याविषयी शक्य तेवढे कमी बोलण्यात आले पाहिजे, आणि सत्कृत्यांचे कधीही प्रशस्तीपाठ गाइले जाता कामा नयेत – शैक्षणिक कार्यात अत्यावश्यक असलेल्या या गोष्टी आहेत. सर्वात धोकादायक गोष्ट ही आहे की त्यामुळे आपण काहीतरी अचाट पराक्रमाचे कृत्य केले आहे आणि आपण स्तुतीला पात्र आहोत असे मुलाला स्वतःलाच वाटू लागेल. बहुदा, शाळेचाच येथे दोष असतो. कुणाचेतरी हरवलेले दहा कोपेकचे नाणे एका विद्यार्थ्याला सापडले. त्याने ते वर्गात आणले. प्रत्येकालाच ठाऊक होते की त्याला ते सापडले आहे. त्यावरून मला शेजारच्या शाळेत घडलेल्या एका मजेशीर गोष्टीची आठवण झाली. आपल्याला सापडलेले पाच कोपेकचे नाणे एका मुलीने वर्गात आणले आणि शिक्षिकेने तिच्यावर स्तुतीचा नुसता वर्षाव केला... त्यानंतरच्याच मधल्या सुटीत तीन मुली आणि एक मुलगा शिक्षिकेकडे धावत आली. एकाकडे एक कोपेकचे नाणे होते आणि इतर दुसऱ्यांकडे दोन कोपेकचे. आपल्या मित्रांचे हरवलेले पैसे आपल्याला सापडल्याचा त्या सर्वांचाच दावा होता. आता शिक्षिका आपली खूप प्रशंसा करतील असे त्याना वाटत होते; पण येथे काहीतरी पाणी मुरतेय असे शिक्षिकाला वाटले आणि ती संतापली... "चांगुलपणाची छोटी छोटी कृत्ये" पैदा करण्याची मुलाना कशी संवय होते याचे हे एक उदाहरण

आहे आणि या सत्कृत्यांबद्दल त्यांची स्तुती करण्यात आली नाही तर त्यांच्यामध्ये एक नाराजी निर्माण होते.

विचारक्रिया ही माणसाची जशी एक नित्याची सामान्य अवस्था आहे तशीच सहृदयतेची भावना ही एक सामान्य अवस्था बनली पाहिजे; ती एक संवय बनली पाहिजे. सहृदयतापूर्ण भावनेने आणि आंतरिक तळमळीने केलेल्या कृत्यामुळे मुलांच्या मनावर एक सखोल समाधानाचा ठसा उमटावा असा शिक्षकानी प्रयत्न केला. शिक्षकाने उच्चारलेल्या शब्दांच्या प्रभावाखाली आणि सांघिक मनोवृत्तीच्या प्रभावाखाली दुसऱ्या व्यक्तीच्या अंतर्विश्वाबद्दलची हार्दिक संवेदनक्षमता मुलाच्या मनात प्रादुर्भूत होते. सर्व मुलांमध्ये हार्दिक अनुकंपेची आणि सत्कृत्यांसाठी सिद्ध बनण्याची प्रेरणा निर्माण करणे ही गोष्ट अतिशय महत्त्वाची आहे. परंतु ही प्रेरणा जेव्हा व्यक्तिगत कृतीचे रूप धारण करते तेव्हाच ती मुलाचे मन उदात्त बनविते.

माझे विद्यार्थी आपल्या जुन्या मित्राला – आंद्रेइ आजोबाना – विसरले नव्हते. हिंवाळयाच्या दिवसांत हिंवाळी मधुमक्षिकापालनकेंद्रापासून जवळच असलेल्या एका छोटया कुटिरात ते रहात. मुले त्यांच्यासाठी सफरचंदे आणि चित्रे घेऊन जात. आपुलकीच्या प्रत्येक शब्दाबद्दल आंद्रेइ आजोबाना अतिशय कृतज्ञता वाटत असे. एकलेपणाची भावना हे माणसाच्या वाटयाला आलेले खडतर असे प्रारब्ध आहे असे मुलाना वाटे आणि त्यांच्यासाठी काहीतरी चांगले करण्यासाठी ती धडपडत.

मार्चमधल्या एका ऊबदार दिवशी मुले धावतपळत आंद्रेइ आजोबांकडे गेली. मधमाश्या बाहेर काढण्यासाठी त्याना आजोबाना मदत करावयाची होती. तो सर्वानाच सुटीचा दिवस होता. वसंताचे ते सुवर्णपंखी अग्रदूत इतस्ततः कसे उडत होते हे मुलानी जेव्हा पाहिले तेव्हा ती खूप आनंदली. हिंवाळी मधुमक्षिकापालनकेंद्राच्या वाटेवर आम्ही पाणी पिण्यासाठी म्हणून एका कुटिरात शिरलो. ते एका म्हाताऱ्या आजीबाईंचे कुटीर होते. तिने घरी बनविलेली काही मिठाई आम्हाला खायला दिली आणि पुन्हा येत जा असे आम्हाला सांगितले.

तिचे नाव होते ओल्गा फ्योदोरोवना. युद्धाच्या काळात तिने खूप दुःख उपभोगिले होते. तिचे दोन मुलगे, नवरा आणि भाऊ युद्धात मारले गेले होते आणि फॅसिस्ट जर्मनीमध्ये कोळशाच्या खाणीत कामाला जुंपलेली तिची मुलगी अतिश्रमाने मरण पावली होती. तिच्या दारुण जीवनाबद्दल मी मुलाना सांगितले. ओल्गा आजीबाईंशी मैत्री करण्याची मुलांची इच्छा

होती. ती अनेक वेळा तिला भेटायला जात असत. तिच्या मुलाना व नवऱ्याला मिळालेली पदके आणि सन्मान तिने आम्हाला दाखविले. ओल्गा आजींच्या जीवनात आनंद निर्माण करण्याची इच्छा मुलांच्या मनात प्रादुर्भूत झाली. फळझाडांची लागवड करण्याचे दिवस उगवताच तिच्या मुलांच्या, मुलीच्या, भावाच्या आणि नवऱ्याच्या स्मरणार्थ पाच सफरचंदाची, आणि तेवढीच पिअरची, चेरींची आणि द्राक्षवेलींची रोपे आम्ही लावली. आणि खुद्द आजींसाठीही आम्ही काही झाडे लावली. त्यावेळी ओल्गा फ्योदोरोवनाना वाटलेल्या कृतज्ञतेच्या भावनेचे शब्दांत वर्णन करणे खरोखरच कठीण आहे. आमच्याशिवाय त्या झाडाना पाणी घालू शकत होत्या. तरीही उन्हाळ्याचे दिवस तापले असताना आम्ही झाडाना पाणी घालण्यासाठी तेथे जात असू. उन्हाळ्यात संपूर्ण दिवस मुले तिच्या सहवासात घालवीत असत.

ओल्गा आजींचा मुलांशी खूप स्नेह जमला. तिच्याशिवाय मुले एकही सण साजरा करीत नसत. ज्यावेळी चेरी, सफरचंदे, पिअर आणि द्राक्षे तयार होऊ लागली तेव्हा तो क्षण आम्ही दवडला नाही. आम्ही आजींच्या फळबागेत गेले, पिकलेली फळे वेचली आणि ती आजींना दिली. मुले सातव्या इयत्तेत असताना ओल्गा आजी अतिशय आजारी झाल्या. शालेय वर्ष संपून एक आठवडा झाला असताना त्यांचे निधन झाले. मुलाना खूप वाईट वाटले. काही काळानंतर आम्हाला असे आढळून आले की आपल्या मृत्युपत्रात ओल्गा फ्योदारोवनानी आपले कुटीर व आपली फळबाग मुलाना अर्पण केली होती. सामुदायिक शेताचे प्रमुख त्यामुळे घोटाळ्यात पडले. विद्यार्थी हे या कुटिराचे व फळबागेचे मालक आहेत याचा अर्थ कसा लावायचा? कायद्याच्या कोणत्याही नित्यनियमांत ते बसत नव्हते. अखेरीस हा प्रश्न सोडविण्यात सामुदायिक शेतकऱ्यानी मदत केली. ते म्हणाले की मुलानी आपल्या चांगल्या कामासाठी जमिनीचा हा छोटासा तुकडा उपयोगात आणावा. आम्ही आंद्रेइ आजोबाना त्या कुटिरात रहाण्याचे आमंत्रण दिले आणि ते अगदी आनंदाने तेथे रहायला आले. ती जागा मधुमक्षिकापालन-केंद्रापासून फारशी दूर नव्हती. चवथ्या इयत्तेत असताना वाऱ्या आणि झीनाने ऑक्टोबर बालसंघटनेच्या मुलांबरोबर मैत्री केली आणि बालवीर संघटनेत सामील होण्यास त्याना तयार केले. आपल्या फळबागेत ही मुले संपूर्ण दिवसचे दिवस घालवीत असत.

आपल्या मायभूमीच्या स्वातंत्र्याच्या व स्वाधीनतेच्या लढाईत मृत्यू

पावलेल्या आपल्या पुत्राचे आईला फार मोठे दु:ख वाटत असते. ते दु:ख आपल्या मुलाना जाणवू द्या व त्यात त्याना सहभागी होऊ द्या. वोल्गा-पासून ते एल्बापर्यंत, आर्क्टिक सागरापासून ते भूमध्यसमुद्राच्या ऊबदार किनाऱ्यांपर्यंत ज्यांची मुले अज्ञात थडग्यांत पहुडली आहेत अशा हजारो माताना शाळकरी मुलांबरोबर स्नेह जमवू द्या. आपल्या मायभूमीच्या दु:खाची — जेथे दोन कोटी वीस लक्ष जीव गमावले जातात त्या दु:खाची, ज्या भयानक छळांचा, अग्नितांडवाचा आणि विध्वंसाचा आमच्या लोकाना कधीही विसर पडणार नाही किंवा ज्यांच्या फॅसिस्ट प्रवर्तकाना आमचे लोक कधीही क्षमा करणार नाहीत अशा त्या भयानक छळांच्या, अग्नितांडवाच्या आणि विध्वंसाच्या दु:खाची — मुलाला जर अनुभूती जाणवली नाही तर मुलाच्या हृदयाला उदात्ततेचा स्पर्श करणे अशक्यप्राय ठरेल.

आईचे दु:ख मूल जितक्या सखोलतेने आत्मसात करील तितके ते अधिक संवेदनाक्षम बनेल, तितकी त्याची नागरिकत्वाविषयीची निष्ठा अधिक दृढावेल, आणि तितक्या अधिक दृढत्वाने त्या छोटया व्यक्तीला आपल्या मायभूमीविषयीची जबाबदारी जाणवेल. म्हणूनच जिच्या पुत्राला महान देशाभिमानी युद्धात वीरमरण आलेले आहे अशा आईला बालवीरसभेचे किंवा एकूणच शाळेचे आमंत्रण देण्यासारखा गंभीर प्रसंग अतिशय कौशल्याने हाताळला पाहिजे. मुलांच्या दृष्टीने एक सामान्य शैक्षणिक उपक्रम म्हणून तो मनातून सरकून जाता कामा नये. एका माणसाचे वैयक्तिक दु:ख हे जेव्हा संपूर्ण जनतेच्या दु:खाचे व्यक्तीकरण असते तेव्हा अशा माणसाबरोबर घडलेल्या भेटीचा मुलांच्या मनावर अतिशय खोल ठसा उमटला पाहिजे.

उत्कृष्ट नागरिकाची घडण करणे हा केवळ शैक्षणिक सिद्धांतातीलच नव्हे तर शैक्षणिक व्यवहारातीलही सर्वात जटिल असा एक प्रश्न आहे. या क्षेत्रात ज्ञानाचा प्रवास हृदयाच्या मार्गे घडून त्याने मुलाच्या व्यक्तिगत जीवनात प्रवेश करणे या गोष्टीला सर्वश्रेष्ठ महत्त्व आहे. आपल्या मायभूमीविषयीचे किंवा सोविएत लोकाना जे अत्यंत पवित्र व प्रिय वाटते त्याचे ज्ञान हा एखादा केवळ माहितीवजा ग्रंथ नाही की जो आत्मसात केल्यानंतर त्याचा दैनंदिन जीवनात उपयोग करता येईल. ज्यांचा विद्यार्थ्यांच्या व्यक्तिगत जीवनावर परिणाम झालाच पाहिजे अशी ही सत्ये आहेत. माणसाच्या थोरवीतून मुलाला आपल्या मायभूमीची थोरवी उमजली तरच ही सत्ये त्याच्या बाबतीत पवित्र बनतील.

"लोकांची स्मृती हा एक अजस्र ग्रंथ असून त्यात सर्व काही लिहिलेले

असते."* आणि या ग्रंथाचे वाचन केल्याशिवाय, त्याच्या प्रत्येक शब्दाचा व प्रत्येक अक्षराचा सखोल बोध झाल्याशिवाय सुनागरिकत्वाचे शिक्षण ही एक अर्थशून्य गोष्ट ठरेल. ज्या गोष्टीला शाळा आणि जीवन यांमधील संबंध म्हणण्याचा आपल्याला सराव झाला आहे ती गोष्ट, माझ्या दृष्टीने, प्रथमतः आपल्या मायभूमीविषयीचे प्रेम आणि महान यातनाना व विपत्तीना कारणीभूत झालेल्या तिच्या शत्रूंबद्दलचा आणि जेत्यांबद्दलचा प्रखर द्वेष लोकांच्या हृदयातून मुलांच्या हृदयात व मनात प्रवर्तित होणे यात सामावली आहे. लोकस्मृतीच्या या महान ग्रंथाशी घडविण्यात येणारा प्रत्येक संपर्क ही मानवी व्यक्तिमत्वाच्या घडणीतील एक सर्वात जटिल व जबाबदारीपूर्ण अशी कृती आहे.

## उदात्त भावनानी परिप्लुत झालेले श्रम

श्रम हे जेव्हा आपल्या विद्यार्थ्यांच्या जीवनात प्रवेश करतात आणि त्याना मित्रत्वाचा व बंधुभावाचा आनंद देतात, त्यांच्यामध्ये जिज्ञासेचा व कुतूहलवृत्तीचा विकास घडवून आणतात, अडचणींवर मात करण्यातील रोमांचकतेला जन्म देतात, सभोवतालच्या जगातील अविरत नवनव्या सौंदर्याकडे जाणारा मार्ग त्यांच्यासमोर खुला करतात आणि नागरिकत्वाची पहिली भावना – ज्यांच्याशिवाय मानवी जीवन अशक्य ठरते त्या भौतिक मूल्यांचे आपण निर्माते आहोत ही भावना – त्यांच्या मनात जागृत करतात तेव्हा श्रमाना महान शिक्षकाचे स्थान प्राप्त होते.

श्रमाचा आनंद ही एक प्रचंड शैक्षणिक ताकद आहे. बालपणाच्या काळात प्रत्येक बालजीवाने ही उदात्त भावना अनुभवली पाहिजे.

आमच्या शालेय जीवनाच्या पहिल्या शरद ऋतूत वडीलधाऱ्या विद्यार्थ्यांनी शाळेच्या जमिनीवर आमच्यासाठी काही चौरस मीटर जागा आखून दिली. आम्ही कुदळीने ती जागा उखळून काढली. खेड्यातल्या मुलाना या कामाचा चांगलाच सराव असतो. नंतर मी मुलाना सांगितले, "आपण येथे हिंवाळी गहू पेरू, आणि मग धान्य गोळा करू व ते दळू. त्यातून आपण तयार केलेला तो पहिला पाव असेल." पाव ही काय चीज

---

* एल्. लिओनोव, 'वीरार्पित पुष्पचक्र'. 'कीर्तिमान लोक'मध्ये, दुसरी आवृत्ती, गोस्पोलितूइदात, १९६६, पृ. ७ (रशियनमध्ये).

आहे हे मुलाना चांगलेच ठाऊक होते आणि ती आपल्या आईवडिलांसारखीच कामाला लागली. त्याच वेळी, आम्ही जे काही करीत होतो त्यात रोमांचकतेचा एक अंश होता, खेळाचा एक अंश होता.

आमच्या पहिल्या पावाच्या स्वप्नाने आम्हाला स्फूर्ती दिली आणि अडचणींवर मात करण्यास आम्हाला मदत केली. आणि अडचणी काही कमी नव्हत्या. छोटया छोटया टोपल्यांतून मुलानी पाचोळा कुजून तयार झालेल्या खताची माती आणली आणि ती जमिनीत मिसळली, गव्हाची पेरणी करण्यासाठी चर खणले आणि एक एक दाणा टिपीत बी निवडले. पेरणीला खऱ्याखुऱ्या आनंदमेळयाचे रूप आले. श्रमाच्या प्रेरणेने सर्व मुलांच्या मनाची पकड घेतली. शेत पेरून झाले, पण कोणीही घरी गेले नाही. आम्हाला स्वप्ने चितारायची होती; म्हणून मी एका झाडाखाली बसलो आणि गव्हाच्या सोनेरी दाण्याविषयी मी मुलाना एक गोष्ट सांगितली. मी गोष्टीविषयी विचार करीत होतो आणि त्याच वेळी बालपणाच्या काळात माझ्या विद्यार्थ्यानी केलेले श्रम हे केवळ बालसुलभ श्रम न उरता नागरिकत्वाचा पहिला आनंद त्यात सामावलेला असावा या माझ्या मनीषेविषयी मी विचार करीत होतो. लोकांची आणि स्वतःची ओळख करून घेत, नागरिक म्हणून अभिमानाच्या पहिल्या भावना अनुभवीत एखाद्या विशाल मार्गाने वाटचाल करावी त्याप्रमाणे श्रमाच्या द्वारे मुलाने सामाजिक जीवनात प्रवेश करावा असे मला वाटत होते. श्रम अगदी सुलभ, हलके असण्याची काहीही गरज नाही ही गोष्ट मी कधीही विसरलो नाही. जिला माणसाची वाढ म्हणतात ती अत्यंत महत्त्वाची प्रक्रिया मुले शारीरिक व आत्मिक परिश्रम किती करतात यावर निर्धारित होते. मुलाची वाढ श्रमातून होते. आपण अवघड गोष्टींची अशी एक विशिष्ट पातळी शोधली पाहिजे की जेथे श्रम हे मुलाना अनुरूप ठरतील आणि त्याच वेळी त्यांच्या वाढीलाही ते मदत करतील. प्रौढांच्या उत्पादन-क्रियेचा अंश म्हणजेच माणसांच्या एखाद्या गटातील परस्पर संबंधांत अंतर्भूत असलेल्या भौतिक फलश्रुती ज्यावेळी मुलांच्या श्रमात सामावल्या जातात त्यावेळी हे उद्दिष्ट साध्य होते अशी अनेक वर्षांच्या अनुभवातून माझी खात्री पटली आहे.

गव्हाची रोपे अंकुरायची मुले अगदी अधीरतेने वाट पहात होती. आपले शेत हिरवे केव्हा बनेल याचा ती उत्कंठित मनाने विचार करीत होती. रोपे जेव्हा अंकुरली तेव्हा ती पहाण्यासाठी रोज सकाळी मुले

शेतावर धाव घेत. ही रोपे लवकर वाढतील की नाही याचीच त्याना चिंता लागून राहिली होती. हिंवाळयात गहू ऊबदार रहावा म्हणून आम्ही ते शेत बर्फाने आच्छादून टाकले. वसंत ऋतूत गव्हाची पेरे तरारली आणि त्याना कणसे धरली. धरतीवर एखाद्या गालिच्याप्रमाणे पसरलेली ती रोपे पाहून मुले आनंदाने नुसती बेहोष झाली. प्रत्येक कणसाची त्या मुलाना काळजी लागून राहिली होती.

पेरणीपेक्षा कापणीचा हंगाम हा अधिक मोठा आनंदोत्सव होता. मुले आपले ठेवणीतले उत्तमोत्तम कपडे घालून शाळेत आली. प्रत्येक मुलाने हळुवार हाताने गव्हाची कापणी केली आणि त्यांच्या छोटया छोटया गुंड्या बांधल्या. मळणी हा आणखी एक श्रमोत्सव होता. मुलानी गव्हाचा दाणा न् दाणा टिपला आणि ते धान्य पोत्यात भरले. आंद्रेइ आजोबानी गहू दळले आणि ते सफेद पीठ ते आमच्याकडे घेऊन आले. तीनाच्या आईला आम्ही आमच्यासाठी पाव भाजून द्यायला सांगितले. त्या बालकानी तिला मदत केली: मुलानी पाणी आणले आणि मुलीनी सरपण. आणि मग ते तयार झाले – चार गोल, मोठे, सफेद पाव – आमचे श्रम, आमची निगा, आमची रोमहर्षकता. मुलांची मने अभिमानाने उचंबळून आली.

आणि मग ज्याची दीर्घ काळ प्रतीक्षा चालली होती तो दिवस उजाडला – पहिल्या पावाचा उत्सव. मुलानी आंद्रेइ आजोबाना आणि आपल्या सर्व पालकाना आमंत्रण दिले. कशीदाकाम केलेल्या एका शुभ्र वस्त्राने टेबल आच्छादिण्यात आले होते. मुलीनी पावाचे तुकडे केले व ते स्वादिष्ट तुकडे टेबलावरच्या बशीत ठेवले. आंद्रेइ आजोबानी मधाने भरलेल्या बशा टेबलावर मांडल्या. पालकानी पाव खाल्ला, मुलांची त्यानी प्रशंसा केली आणि त्यानी केलेल्या श्रमाबद्दल त्यांचे आभार मानले.

तो दिवस मुले कधीही विसरली नाहीत. त्या उत्सवात श्रमांबद्दल किंवा मानवी स्वाभिमानाबद्दल शब्दांचे नगारे पिटण्यात आले नाहीत. त्या सोहळयाबद्दल मुलांचे मन रोमांचित करणारी मुख्य गोष्ट होती ती त्याना व्यापून राहिलेली अभिमानाची भावना: त्यानी स्वतःचे धान्य पिकविले होते आणि आपल्या आईवडिलाना आनंद दिला होता. आणि स्वतःच्या हाताने केलेल्या श्रमाबद्दल माणसाला वाटणारा अभिमान हे नैतिक शुचितेचे आणि उदात्ततेचे एक सर्वात महत्त्वाचे उगमस्थान आहे.

पहिल्या पावाच्या आमच्या उत्सवाने इतर वर्गांचेही लक्ष वेधून घेतले. त्यानाही आपला स्वतःचा पाव तयार करावयाचा होता. इतराना पावाचा

उत्सव साजरा करता आला पण आम्हाला मात्र तो करता आला नाही असे का याचे कारण शोधून काढीपर्यंत मुलानी आपल्या शिक्षकाना स्वस्थता लाभू दिली नाही.

या घटनेने शिक्षकांच्या विचाराना चालना दिली. जमिनीची मशागत करणे आणि खतपेरणी करणे हे रानातून भ्रमंती करण्याइतकेच किंवा एखादे मनोरंजक पुस्तक वाचण्याइतकेच मुलांचे आवडते काम बनू शकते ही अगदी साधी गोष्ट प्रत्येकाच्या नजरेस आली. कशातही स्वारस्य न वाटणारे आळशी विद्यार्थी कामाला लागताच न ओळखू येण्याइतके बदलले असे शिक्षकानीच सांगितले. त्याना काम करावयाचे होते. "काय घडत असले पाहिजे?" हा विचार आमच्या मनात आला. आणि स्फूर्तीची भावना हाच त्याचा मुख्य निष्कर्ष निघाला. प्रामाणिक सातत्यशील दीर्घ परिश्रम हा प्रथमतः मुलाच्या भावनिक जीवनाचा एक भाग आहे. या कामाचा त्याला आनंद मिळाला की मूल काम करते. कामाचा आंनद जितका अधिक सखोल तेवढे मुलाला वाटणारे आत्मप्रतिष्ठेचे मोल अधिक, आणि समान कार्यातील त्याच्या सहभागाबद्दल – त्याच्या परिश्रमांबद्दल, त्याच्या नावाबद्दल त्याला वाटणारी जाणीव अधिक स्पष्ट. कामाचा आनंद हे शिक्षणाचे एक सामर्थ्यशाली असे साधन आहे आणि त्यातून सामूहिकाचा सदस्य म्हणून मुलाला स्वतःची ओळख पटते. याचा अर्थ असा नव्हे की काम ही काहीतरी मनोरंजनाची बाब बनते. त्याच्यासाठी परिश्रमाची व सातत्यशील चिकाटीची गरज असते; पण ज्यांच्यासमोर जग नुकतेच कुठे खुले व्हायला लागले आहे अशा मुलाना आपण हाताळीत आहोत ही गोष्ट आपण विसरता कामा नये.

पहिल्या पावाचा हा उत्सव मुले दर वर्षी साजरा करीत असत. नंतरच्या वर्षी त्यानी जमिनीचा नवा तुकडा निवडला, त्यात हिंवाळी गव्हाचे पीक काढले, आणि पुन्हा एकदा उत्सवानिमित्त त्यानी आपल्या पालकाना व आपल्या छोटया शालेयपूर्व मित्राना आमंत्रित केले. माझ्या विद्यार्थ्यानी तारुण्यात पदार्पण केल्यानंतरही शाळेच्या आपल्या छोटया जमिनीच्या तुकडयात तेवढयाच रोमांचित मनाने ते गहू पिकवीत असत. गहू दळण्याचे व पाव तयार करण्याचे कामही तेच करीत असत, आणि हे सर्व करीत असताना त्यातील क्रीडेचा व रोमांचकतेचा अंश कधीही नष्ट झाला नाही. कामाच्या आनंदाची कोणत्याही आनंदाशी तुलना करता येणार नाही. सौंदर्याच्या भावनेशिवाय कामाचा आनंद अर्थशून्य आहे;

पण येथे जे सौंदर्य आहे ते मुलाला केवळ प्राप्त झालेले सौंदर्य नाही, तर त्याने निर्माण केलेले ते सौंदर्य आहे. श्रमाचा आनंद हे जीवनाच्या अस्तित्वाचे सौंदर्य आहे; आणि या सौंदर्याची ओळख करून घेत असताना अडचणींवर मात करण्यात जी अभिमानाची भावना सामावलेली आहे त्या भावनेची व आत्मप्रतिष्ठेची मूल अनुभूती घेत असते.

जे परिश्रम करू शकतात आणि घाम व थकवा म्हणजे काय हे ज्याना ठाऊक आहे त्यानाच आनंद साध्य होऊ शकतो. बालपणाचा काळ हा अखंड स्वच्छंदतेचा काळ असण्याची गरज नाही; श्रम खर्च केले नाहीत — अर्थात ते मुलांच्या ताकदीबाहेर असता कामा नयेत — तर श्रमाचा आनंद मुलाला अप्राप्य ठरेल. मुलाला श्रमाचे मोल शिकविणे यातच उच्च शैक्षणिक सुज्ञता सामावली आहे. श्रमांशिवाय मानवी अस्तित्वाला अर्थच उरत नाही. माणसाच्या दृष्टीने श्रम ही केवळ जीवनाची गरज नाही तर त्याच्या अंतर्जीवनाच्या व मानवी व्यक्तीच्या आत्मिक समृद्धतेच्या बहुमुखी आविष्काराचे ते क्षेत्र आहे. संबंधांची समृद्धता श्रमातून प्रकट होते. या संबंधांचे सौंदर्य मुलाला जाणवल्याशिवाय त्याला श्रमाविषयीच्या प्रेमाची शिकवण देणे अशक्यप्राय आहे. श्रमकार्यात माणसाना आत्मप्रकटीकरणाची व आत्म-प्रतिपादनाची सर्वात महत्त्वाची साधने आढळून येतात. म्हणतात त्याप्रमाणे श्रमाशिवाय माणूस म्हणजे एक पोकळ, रिकामे भांडे. प्रत्येक विद्यार्थ्यातील स्वत्वाची व स्वाभिमानाची भावना यशोदायी श्रमावर आधारली जावी हे पहाणे हे एक महत्त्वाचे शैक्षणिक कार्य आहे.

आपल्या शालेय जीवनाच्या पहिल्या वसंतात सफरचंदाची एकतीस झाडे व तेवढयाच द्राक्षवेली लावून मुलानी "मातृ-फल-उद्यान" तयार केले. मी माझ्या विद्यार्थ्याना म्हटले, "मुलानो, हे फल-उद्यान आपल्या मातांसाठी आहे. आपल्याला सर्वात प्रिय, सर्वात जवळची व्यक्ती जर कोणती असेल तर ती आई. तीन वर्षांत सफरचंदाच्या झाडाना व द्राक्षवेलीना फळे धरतील. पहिली सफरचंदे आणि द्राक्षांचे पहिले घोस ही आपल्या मातांसाठी आपली भेट असेल. आपण त्याना आनंद देऊ या. तुमच्या माताना खूप चिंता आहेत हे विसरू नका. या चिंतांची भरपाई म्हणून आपण त्याना आनंद देऊ."

"मातृ-फल-उद्यानात" ओतलेले श्रम हे आपल्या वडीलधाऱ्या माणसाना, आपल्या आईवडिलाना आनंद देण्याच्या इच्छेतून प्रेरित झाले होते. मातृप्रेमाची — या उदात्त मानवी भावनेची — प्रगाढता अजून काही

मुलाना ठाऊक नाही. प्रत्येक मुलात ती भावना जागृत करण्याचा मी प्रयत्न केला. गाल्याने आपल्या सावत्र आईसाठी, साशाने आपल्या आजीसाठी आणि वित्याने आपल्या आतेसाठी एक एक झाड लावले. या कामात कोणीही अलिप्त राहिले नाही. वसंत ऋतूत आणि ग्रीष्मात मुले झाडाना पाणी घालीत आणि कीटकांचा नाश करीत. सफरचंदाची झाडे व द्राक्षवेली हिरव्यागार झाल्या. तिसऱ्या वर्षी पहिला मोहोर धरला आणि पहिली फळे दिसू लागली. आपल्या झाडावरचे फळ अधिक जलद पिकावे असेच प्रत्येकाला वाटत होते.

तोल्या, तीना आणि कोल्याला या कामात आनंद वाटत होता या गोष्टीने मला संतोष झाला. त्यांच्या झाडांवर रसाळ सफरचंदे व द्राक्षाचे सोनेरी घड तयार झाले. मुलानी तयार झालेली फळे वेचली व ती त्यानी आपल्या माताना दिली. मुलांच्या जीवनात ते अविस्मरणीय असे दिवस होते. आपल्या आईला द्यायला कोल्याने जेव्हा सफरचंदे वेचली तेव्हा त्याच्या नजरेत जाणवणारा हळुवारपणा मला अजूनही आठवतो.

शाळेच्या दुसऱ्या वर्षात मुलानी केलेल्या श्रमामध्ये उदात्त भावनांची प्रेरणा होती. घरी, आपल्या आईवडिलांच्या फळबागेमध्ये आपल्या आईसाठी, वडिलांसाठी, आजीसाठी, आजोबांसाठी मुलानी फळझाडे लावली. "हे माझ्या आईचे झाड, हे वडिलांचे, हे आजींचे, हे आजोबांचे", असे मुले अभिमानाने म्हणत. साशाने आपल्या आईच्या व वडिलांच्या स्मरणार्थ सफरचंदाची झाडे लावली. गाल्याने व कोस्त्यानेही आपल्या मातांच्या स्मरणार्थ फळझाडे लावली; पण आपल्या सावत्रमाताना ते विसरले नाहीत; त्यांच्यासाठीही त्यानी सफरचंदाची झाडे लावली होती.

दुसऱ्या कोणत्याही कामापेक्षा मुलानी या फळझाडांची अधिक हृदयतेने चिंता वाहिली. सफरचंदाची झाडे मोहोरण्याची प्रत्येकजण अधीरतेने वाट पहात होता. झाडावरची फळे वेचण्यासाठी आणि ती आपल्या माताना देण्यासाठी मुले थांबली होती. मुलानी एका पाठोपाठ एक पुऱ्या केलेल्या कामांची केवळ ही एक मालिका नव्हती. नैतिक विकासाच्या मार्गावरील ही पावले होती आणि त्यामुळे मुलाना आपण केलेल्या कामातील सौंदर्याची अनुभूती घेता आली.

माणसाच्या जीवनातील सर्वात पवित्र आणि सुंदर वस्तू जर कोणती असले तर ती त्याची आई. आपल्या माताना आनंद देणाऱ्या श्रमाचे

नैतिक सौंदर्य मुलाना जाणवणे हे सर्वात महत्त्वाचे आहे. हळू हळू आमच्या सामूहिकात एक अतिशय सुंदर परंपरा उदय पावली: शरदात, जेव्हा धरती आणि श्रम माणसावर अपार संपदांची उधळण करतात, तेव्हा आम्ही शारदीय मातृ-उत्सव साजरा करावयास सुरुवात केली. आपल्या स्वतःच्या श्रमाने निर्माण केलेली आणि ग्रीष्मभर किंवा वर्षांनुवर्षे ज्याची मुलाने स्वप्ने पाहिली होती अशी वस्तू – सफरचंदे, फुले, किंवा आपल्या छोट्याशा जागेत पिकविलेल्या गव्हाची कणसे (आपल्या आवडत्या कामा-साठी पालकांच्या बागेत प्रत्येक मुलाचा एक छोटासा कोपरा होता) मुले आपल्या आईला देत. "आपल्या आईची काळजी घ्या" – हा विचार शारदीय मातृ-उत्सवासाठी मुलांची तयारी करीत असताना आम्ही मुलांच्या मनात दृढतेने बाणवत असू आपल्या आईसाठी केलेल्या श्रमात मूल जेवढे अधिक परिश्रम कारणी लावते तेवढे ते अधिक सहृदय बनते.

आम्ही वासंतिक मातृ-उत्सव साजरा करायलाही सुरुवात केली. उन्हाळ्यात बेरीफळांची रेलचेल असलेला रानामधला एक दूरचा कोपरा मुलाना आढळला; त्यावरून मुलानी त्याला रान स्ट्रॉबेरींचा सांदीकोपरा असे नाव दिले होते. त्या अतिसुंदर जागेशी संपर्क येताच मुलांची मने आनंदाने न्हाऊन निघाली. आपला आनंद आपल्या आईपर्यंत पोहोचवावा असे मुलाना वाटले. आणि धरतीवर सौंदर्याचा साज चढविणारी पहिली फुले आपल्या आईला अर्पण करण्याची कल्पना मुलाना सुचली. अशा रीतीने वासंतिक मातृ-उत्सवाचा उदय झाला. त्या दिवशी स्नोड्रॉपची पहिली अतिशय कोमल, नाजूक फुलेच नव्हेत तर उष्णतागृहात मुलानी वाढविलेली फुलेही मुले आपल्या आईला अर्पण करीत. मातेला वाहिलेले उत्सव साजरे करताना सनसनाटीपणा आणि "संघटनात्मक उपाययोजना" टाळण्यात आल्या पाहिजेत. मातृ-उत्सवाचे सोहळे हे अत्यंत जिव्हाळ्याचे कौटुंबिक मेळावे असावेत असा आम्ही प्रयत्न केला. शब्दांचे ढिंढोरे नव्हेत तर सखोल भावना ही येथे मुख्य गोष्ट आहे.

मानवतेवर प्रेम करणे हे आपल्या आईसाठी काहीतरी चांगले करण्यापेक्षा अधिक सोपे असते अशी एक जुनी उक्रेनियन म्हण आहे. असे म्हणतात की अठराव्या शतकातील लोक-तत्त्वज्ञ ग्रिगोरी स्कोवोरोदा यांची ही म्हण असावी. शिक्षकाच्या दृष्टीने या म्हणीमध्ये फार मोठे ज्ञान भरले आहे. आपल्याला अत्यंत प्रिय असलेल्या व्यक्तींविषयीच्या प्रेमाची ताकद जर माणसाच्या हृदयाला लाभली नाही तर सहृदयतेची शिकवण देणे ही

अशक्य कोटीतील गोष्ट आहे. आपल्या बांधव व्यक्तीबद्दलच्या प्रेमाचा उच्चार म्हणजे प्रेम नव्हे. कुटुंब ही सहृदयतेची व सहानुभूतीची शिकवण देणारी खरीखुरी पाठशाळा आहे. आपले आईवडील, आजीआजोबा आणि आप्तजन यांच्याबरोबरचे आपले संबंध हा मानवतेचा निकष आहे.

मुलांचे श्रम ही सौंदर्याची निर्मिती असली पाहिजे; कारण सौंदर्यशास्त्रीय व नैतिक शिक्षणाच्या एकतेची ती गरज आहे. शालेय जीवनाच्या पहिल्या शरद ऋतूत आम्ही रानगुलाबांचे बी गोळा केले आणि शाळेच्या जमिनीवरच्या अगदी एका बाजूच्या कोपऱ्यात राखून ठेवलेल्या वाफ्यात आम्ही ते बी पेरले. ती झाडे मोठी झाल्यावर आम्ही त्यांच्यावर पांढऱ्या लाल, किरमिजी व पिवळया गुलाबांची कलमे केली. अशा रीतीने आम्ही आमची स्वतःची "गुलाबांची बाग" तयार केली. त्या झाडांवर पहिली फुले उमलली तेव्हा मुलाना झालेला आनंद केवळ अवर्णनीय होता. झाडाना दुखापत होईल या भीतीने त्या झाडाना हात लावायला मुले घाबरत होती. मी त्याना म्हटले की फुले जर नीट तोडली तर सर्व ग्रीष्मभर ही झाडे डवरलेली रहातील तेव्हा मुले आनंदाने बेभान झाली. सर्वानाच वाटत होते की गुलाबाची ही फुले आपल्या आईला द्यावीत. शारदीय मातृ-उत्सवाच्या वेळी सफरचंदांबरोबरच गुलाबपुष्पांचा एक एक छोटा गुच्छ मुलाना जेव्हा आपल्या आईला द्यायला मिळाला तेव्हा त्याना अपार आनंद झाला.

आमच्या पहिल्या शालेय वर्षाच्या वसंत ऋतूत आम्ही पुष्कळ फुलझाडे लावली. सर्वकाळ आम्हाला त्यांची काळजी घ्यावी लागत होती, आणि त्याना पाणी देणे हे विशेषच कठीण काम होते. त्या सुमारास वडीलधाऱ्या मुलानी एक छोटा जलमनोरा बनविला आणि त्याला पंप जोडला. ते पाणी फुलांच्या वाफ्यांपर्यंत आणण्यात आले. त्यामुळे मुलांचे काम पुष्कळच सुकर झाले. परिणामी प्रत्येकजण, अगदी छोटा दान्कोही, अर्ध्या तासात सर्व फुलझाडाना पाणी देऊ शकत असे.

फुलझाडे लावणे व वाढविणे हा प्रत्येक मुलाचा मनोरंजनाचा व्यक्तिगत उद्योग व्हावा असे मला वाटत होते. सौंदर्य आणि सृजनशीलता, निर्मिती आणि मानवता. यांच्या मिलाफापेक्षा मनाला अधिक उदात्त बनविणारे असे क्वचितच दुसरे कोणते काम असेल, आणि ते गुलाबांची निगा राखण्यात आढळून येते. आपल्या घरी आपला स्वतःचा फुलांचा वाफा असावा अशी प्रत्येक मुलाच्या मनात इच्छा निर्माण व्हावी याकडे मी लक्ष पुरविले.

तिसऱ्या आणि चवथ्या वर्गात असताना स्वतःच्या घरी फुलविलेल्या गुलाबांची माझे विद्यार्थी स्तुतीस्तोत्रे गाऊ लागली होती.

सौंदर्याचा आस्वाद घेण्यासाठी मुलाने जर गुलाब वाढविले, सौंदर्याचा आनंद आणि दुसऱ्या माणसाच्या सुखासाठी व आनंदासाठी त्या सौंदर्याची निर्मिती हे जर त्याच्या श्रमाचे एकमेव सार्थक ठरले तर दुष्टता, कोतेपणा, जीवनद्वेष्टेपणा किंवा हृदयशून्यता त्या मुलाला कधीही स्पर्श करणार नाही अशी जीवनातूनच माझी खात्री पटली आहे. नैतिक शिक्षणाचा हा एक अत्यंत जटिल असा प्रश्न आहे. खुद्द सौंदर्यात माणसाला मनोदात्तता शिकविणारी जादूमय शक्ती नसते. उदात्त नैतिक दृढ निष्ठांच्या आधारे सौंदर्याची निर्मिती करणाऱ्या कामाचे जेव्हा मानुषीकरण होते तेव्हाच सौंदर्याच्या द्वारे नैतिक शुचितेची व मानवतेची शिकवण मिळते. आणि प्रथमतः इतर लोकांबद्दल आदर दाखविणे या गोष्टीचा त्यात समावेश होतो. लोकांसाठी सौंदर्य निर्माण करणाऱ्या श्रमांचे मानुषीकरण जेवढे अधिक सखोल तेवढा माणसाचा स्वतःविषयीचा आदर अधिक आणि नैतिक तत्त्व-च्युतीविषयीची त्याची चीड अधिक.

नैतिक शिक्षणामधील सौंदर्याची भूमिका या विषयावर आमच्या शिक्षकां-मध्ये चर्चा घडून येऊ लागल्या. विद्यार्थ्यांच्या अंतर्विश्वावर विशेषतः त्याच्या भावनांवर प्रभाव घडवून आणण्याचे एक साधन म्हणून आम्ही सौंदर्याला फार मोठे महत्त्व देत होतो; पण त्याचबरोबर या प्रभावाच्या भूमिकेला फाजील महत्त्व देण्याची आम्हाला भीती वाटत होती. कोणत्या परिस्थितीत सौंदर्य हे शैक्षणिक प्रभावाचे साधन होऊ शकते? एका मानसशास्त्रीय परिसंवादात हा प्रश्न आम्ही स्वतःलाच विचारला. शैक्षणिक प्रक्रियेच्या नित्यनियमांच्या एकूण पृथक्करणातून आम्हाला त्याचे उत्तर मिळाले. प्राथमिक, माध्यमिक व वरच्या वर्गांच्या विद्यार्थ्यांच्या अंतर्विश्वावरील शिक्षकाच्या प्रभावाच्या पद्धती व साधने यांबद्दलच्या परस्परांच्या अनुभवांची आम्ही देवाणघेवाण केली आणि त्या पद्धतींचे व साधनांचे पृथक्करण केले. त्यातून आमची अधिकच खात्री पटली की, शिक्षणामध्ये यशाची निश्चिती निर्माण करणारी व त्याच वेळी शैक्षणिक प्रक्रियेच्या इतर क्षेत्रांतील अपुरेपणाची व कमजोरींची भरपाई करणारी एकच एक सर्वसमर्थ अशी कोणतीही पद्धत नाही.

एखादा माणूस सौंदर्यशास्त्रीय शिक्षणाचे काम उत्कृष्टरित्या बजावू शकेल, पण कम्युनिस्ट शिक्षणाचे इतर घटक व अंगोपांगे अपुरेपणाने

अंमलात आणली गेल्यास सौंदर्याचा शैक्षणिक प्रभाव क्षीण बनेल; इतकेच नव्हे तर त्याची निष्पत्तीही शून्य ठरू शकेल. समान महत्त्वाच्या प्रक्रियांची एकाच वेळी एकत्रपणे अंमलबजावणी झाली तरच मुलाच्या अंतर्विश्वावरील प्रत्येक प्रभावाला शैक्षणिक सामर्थ्य प्राप्त होईल. एखाद्या विशिष्ट परिस्थितीत एखादा माणूस फुलांबद्दल हळुवार भावना जोपासताना दिसेल, त्यांच्या सौंदर्याने आनंदित होताना दिसेल, पण त्याच वेळी तो जीवनद्वेष्टा, इतरांबद्दल बेपर्वा वृत्तीचा व कठोर हृदयाचाही असू शकेल. ज्या प्रभावावर आपण शिक्षणतज्ज्ञ भिस्त ठेवतो त्या प्रभावाबरोबरच सहअस्तित्वात असलेल्या व व्यक्तीच्या अंतर्विश्वावर प्रभाव पाडणाऱ्या इतर साधनांवर सर्व काही अवलंबून असते.

या मूलस्रोतांबद्दल आमच्या शिक्षकांची खात्री पटली. मूर्त जीवनवास्तव परिस्थितीच्या चर्चेतून आम्ही **शैक्षणिक प्रभावांच्या सुसंवादित्वाच्या** प्रश्नाकडे आलो. माझ्या मते शिक्षणाचा हा एक मूलभूत नित्यनियम आहे. हा प्रश्न आमच्या शाळांमध्ये सोडविण्यात आला आहे असे मला वाटत नाही; पण तरीही तो प्रश्न सोडविण्याच्या दिशेने पुष्कळच काही करण्यात आले आहे. शिक्षणाच्या एका सर्वात महत्त्वाच्या नित्यनियमातून या प्रश्नाचे मर्म प्रकट होते आणि तो नियम पुढील गोष्टीत सामावला आहे: प्रभावाची इतर साधने किती सांगोपांग, हेतुगर्भ व परिणामकारक आहेत यावर व्यक्तिमत्त्वावर प्रभाव पाडणाऱ्या प्रत्येक साधनाचा शैक्षणिक परिणाम अवलंबून असतो. एक शैक्षणिक पद्धत म्हणून श्रमाच्या सामर्थ्याचा प्रत्यय किती चांगल्या प्रकारे घडवून आणण्यात येतो, आणि बुद्धी व भावना यांचे शिक्षण किती सखोल व सांगोपांग असते यावर एक शैक्षणिक साधन म्हणून सौंदर्याचे सामर्थ्य अवलंबून असते. आपल्या वडीलधाऱ्या माणसांच्या व्यक्तिगत उदाहरणांची ताकदही जेव्हा आपले कार्य बजावते आणि इतर सर्व शैक्षणिक पद्धती नैतिक शुचितेने व उदात्ततेने भारलेल्या असतात तेव्हाच फक्त शिक्षकाच्या शब्दाला शैक्षणिक सामर्थ्य प्राप्त होते.

शैक्षणिक प्रभावात शेकडो व हजारो परस्परावलंबने व सशर्तता असतात. अंतिमतः, ही परस्परावलंबने आणि सशर्तता कशा प्रकारे विचारात घेतल्या जातात, किंवा अधिक नेमकेपणाने सांगावयाचे झाल्यास, व्यवहारात त्या कशा प्रकारे मूर्तरूपात उतरविल्या जातात यावर शिक्षणाची परिणामकारकता निर्धारित होते. शिक्षणशास्त्र जीवनाशी गती राखण्यात अपेशी ठरले आहे असा एक आरोप करण्यात येतो. इतर शेकडो प्रभाव नसतील तर

व्यक्तिमत्त्वावरील कोणताही प्रभाव आपले सामर्थ्य गमावून बसतो आणि इतर शेकडो नित्यनियम जर अमलात आणले गेले नाहीत तर कोणताही नियम हा शेवटी शब्दांचा एक पोकळ बुडबुडा ठरतो या वस्तुस्थितीकडे करण्यात आलेले दुर्लक्ष हे, माझ्या मते, या सर्व कंटाळवाण्या आरोपांचे उगमस्थान आहे. व्यक्तिमत्वावर परिणाम घडवून आणणाऱ्या शेकडो परस्परावलंबनांचे व अन्योन्याश्रयभावांचे अन्वेषण करण्यात शिक्षणशास्त्राला ज्या प्रमाणात अपयश आले आहे त्या प्रमाणात ते शास्त्र मागे पडले आहे. शिक्षणामधील अत्यंत नाजूक परस्परावलंबने आणि सशर्तता यांचे शिक्षणशास्त्र जेव्हा अन्वेषण करील व त्यांचे विशदीकरण करील तेव्हाच शिक्षणशास्त्र हे एक बिनचूक शास्त्र, एक खरेखुरे शास्त्र बनेल.

...अशा रीतीने कित्येक पुष्पोत्सव उदयास आले. वासंतिक पुष्पोत्सव हा लिली-ऑफ-दि-व्हॅली, ट्यूलिप आणि लायलॅक या फुलांसाठी होता. त्या दिवशी आम्ही रानात व आमच्या शालेय जीवनाच्या पहिल्या शरद ऋतूत आम्ही तयार केलेल्या लायलॅक फुलांच्या बागेत जात असू. रंगांची अद्वितीय गुंफण करीत प्रत्येक विद्यार्थी छोटा छोटा गुच्छ बनवीत असे. आम्ही हिरवळीच्या मैदानात जात असू आणि त्या गुच्छांचे सौंदर्य डोळे भरभरून पहात असू. आम्ही ती आमच्या मातांसाठी, आंद्रेइ आजोबांसाठी व ओल्गा आजींसाठी — या आमच्या मित्रांसाठी — घेऊन जात असू. आम्ही छोटया छोटया शालेयपूर्व मुलाना उत्सवाला बोलवत असू आणि त्यानाही छोटे छोटे गुच्छ देत असू.

दुसरा उत्सव हा गुलाबपुष्पांचा उत्सव होता. शाळेच्या गुलाबांच्या बागेतील आणि मळयातील गुलाबांपासून आम्ही गुलाबांचे गुच्छ तयार करीत असू.

तिसरा उत्सव हा रानफुलांचा उत्सव होता. सर्वात जास्त आनंद मुलाना या उत्सवातून मिळत असे. सकाळच्या वेळी फुले विशेष सुंदर दिसतात. त्यावेळी आम्ही शेतावर जात असू. रानफुलांचा गुच्छ तयार करण्यात खरीखुरी सृजनशीलता दिसून येते. आम्ही ते गुच्छ शाळेत नेत असू. आमच्या बागेतही रानफुले फुलली आहेत अशी विश्रांती घेता घेता आम्ही स्वप्ने पहात असू. सर्वात सुंदर फुले कुठे फुलतात याची आम्ही नोंद घेतली आणि शरदामध्ये आम्ही त्यांचे बी व कंद गोळा केले. आम्ही ते मग आमच्या बागेत लावले आणि त्यांतून शाळेजवळच सुंदर कॉर्नफ्लॉवरची व डेझींची फुले फुलली.

शारदीय पुष्पोत्सवाला आम्ही क्रिसॅन्थेममचा उत्सव म्हणत असू. जड अंत:करणाने ग्रीष्माला दिलेला तो निरोप असे. जितक्या उशिरा हा उत्सव साजरा करता येईल तितक्या उशिरा तो साजरा करण्यासाठी आम्ही अतिशय धडपडत असू... थंड वाऱ्यापासून व हिमापासून आम्ही क्रिसॅन्थेममच्या झाडांचे संरक्षण करीत असू आणि रात्री त्या झाडांवर कागदाच्या टोपांचे आवरण घालीत असू. शारदीय पुष्पोत्सवानंतर आम्ही ती झाडे उपटून उष्णतागृहात नेऊन लावीत असू.

तिसऱ्या इयत्तेत असताना मुलानी प्रथमच स्नो-ड्रॉप फुलांचा उत्सव साजरा केला. रानामध्ये जमिनीवर अजून बर्फ होता; हिंवाळी निद्रेतून धरती जागी झाली होती. मोकळ्या जागी ब्लूबेलची पहिली निळी-जांभळी व सफेद फुले फुलू लागली होती. त्या दिवशी आपल्या आईसाठी मुलानी छोटे छोटे गुच्छ घरी नेले.

श्रमामध्ये मुलाना आनंदाचा उगम सापडावा असा मी प्रयत्न केला. केवळ अन्न व वस्त्र मिळविण्यासाठी आपल्या डोक्यावर छप्पर उभारण्यासाठी नव्हे तर आपण बांधलेल्या घराशेजारी फुले उमलावीत, स्वत:ला व इतरानाही आनंद देणारी फुले फुलावीत म्हणून माणसाने काम केले पाहिजे. लहानपणापासूनच आनंदनिर्मितीसाठी माणसाने श्रम वेचले पाहिजेत.

मुलांची शाळा सुरू होऊन वर्ष उलटल्यानंतर आपल्या आईवडिलांच्या बागमळ्यात मुलांचा सौंदर्याचा एक सांदीकोपरा दिसू लागला. बहुतेक सर्व मुलानी गुलाबाची लागवड केली. त्याशिवाय प्रत्येक मुलाची स्वत:ची अशी आवडती फुले होती. वाऱ्या, लीदा, पावलो, सिऱ्योझा, कात्या, लारिसा आणि कोस्त्या याना क्रिसॅन्थेममची फुले आवडत असत. सान्या, झीना, ल्यूबा, ल्यूदा आणि साशाने कार्नेशन व टयूलिप फुलांची लागवड केली. वान्या, वित्या आणि पेत्रिकने लायलॅकची अनेक झाडे लावली. फुलांची निगा कशी राखायची, रोपे कशी वाढवायची आणि झाडांसाठी उत्कृष्ट जागा कशी निवडायची हे मुलाना मी दाखविले.

फुलांचे प्रेम हे कोल्या आणि त्याच्या आईमधील वादाचे कारण ठरले. या छोटया मुलाला उष्णतागृहात काम करण्याची फार आवड होती. मी त्याला क्रिसॅन्थेममची तीन झाडे दिली व ती कशी लावायची हे त्याला दाखविले. त्याच वेळी चांगल्या जातीच्या टोमॅटोंची काही रोपटी मी मुलाना वाटून दिली. कोल्याने क्रिसॅन्थेममच्या झाडांबरोबरच टोमॅटोंची एक डझन रोपटी घरी नेली. कोल्याच्या आईने टोमॅटोंची रोपे लावली

आणि कोल्याने क्रिसॅन्थेममची. दोन आठवड्यांनंतर चांगली मुळे धरलेली ती क्रिसॅन्थेममची झाडे त्याच्या आईच्या नजरेस पडली आणि तिने ती उपटून फेकून दिली. कोल्याने ती फेकलेली झाडे कुंपणापाशी पाहिली. तो रडू लागला व धावत धावत आईकडे आला. ती बाई जोरजोरात हंसायला लागली आणि म्हणाली, "म्हणजे, झाडांवर इतकं प्रेम करायला लागलास तू? काय गरज आहे त्यांची आपल्याला? त्यांच्याशिवाय आम्ही जन्म काढला आणि तसाच पुढेही काढू!" कोल्याने शांतपणे ती झाडे घेतली व धान्यकोठाराच्या मागच्या बाजूला लावली.

काही दिवसानी आकाशी रंगाची काही फुले त्याने आईला दिली व तो म्हणाला, "आई, बघ, किती सुंदर दिसतात ही फुले!" त्या मुलाच्या शब्दात काही निराळ्याच भावना गुंतल्या होत्या. कदाचित त्याला म्हणावयाचे होते: "आपल्या कुटुंबातले जीवन या फुलांइतकेच सुंदर असते तर किती छान झाले असते, आई!"

"पक्षी-रुग्णालयात" मुले अतिशय उत्साहाने काम करीत असत. वादळानंतर आम्ही रानात जात असू आणि घरट्यातून खाली पडलेली पक्ष्यांची पिले आम्हाला नेहमीच तेथे आढळत. केव्हाही पहावे तेव्हा "पक्षी-रुग्णालयात" मुलांचे आवाज ऐकू येत... आणि जोरदार हिमवर्षावाच्या काळात रुग्णालयाच्या खिडकीबाहेर ती डांगराच्या बियानी भरलेली खाद्यपात्रे ठेवीत. त्या बिया खायला कित्येक निळे टिटमाऊस पक्षी तेथे येत. एकदा पुरेसे खाद्य मिळाले नाही तेव्हा त्या पक्ष्यानी चिवचिवाट करून नुसता गोंगाट मांडला. मुलानी टेबलावर बिया पसरल्या. तसे ते टिटमाऊस पक्षी उडून आत आले व त्या बिया टिपू लागले. हळू हळू त्या पक्ष्याना मुलांचा सराव झाला आणि अधिकाधिक काळ ते तेथे राहू लागले. रात्री गोठवणारी थंडी पडली तर ते पुन्हा बाहेर जात नसत. आनंदाने चिवचिवाट करीत ते मुलांच्या खांद्यावर, डोक्यावर आणि हातावर बसत. सूर्यप्रकाशित दिवशी ते पक्षी खायला आत येत आणि ताबडतोब बाहेर उडून जात. आपल्या या विहंग-मित्रानी आपल्यापासून दूर जाऊ नये असे मुलाना वाटे. त्यांचे मन जणू काही पक्ष्याना जाणवे. त्यांच्या नजरेत मुलाना एक दिलगिरीची भावना दिसे. जणू काही ते म्हणत: आम्हाला माफ करा, पण जास्त काळ थांबणे आम्हाला शक्य नाही.

कोल्या, युरा, साशा, कोस्त्या आणि पावलो तासन्तास "पक्षी-रुग्णालया"त बसलेले आढळत. मी मुलाना घरी पक्ष्यांसाठी छोटी छोटी

खाद्यपात्रे तयार करण्यास सांगितले. मुलांच्या खिडक्यांपाशी डांगराच्या बियानी भरलेली व फळयांसारखी रचलेली छोटी छोटी खाद्यपात्रे दिसू लागली. पावलोने पक्ष्यांचे एक छोटे खुराडेही तयार केले.

प्रथमदर्शनी असे वाटण्याचा संभव आहे की याचा शिक्षणाशी अर्थाअर्थी काहीही संबंध नाही. पण प्रत्यक्षात प्राणिमात्रांच्या जोपासनेतून संवेदन-क्षमतेची व आत्मीयतेची शिकवण मिळते.

तिसऱ्या इयत्तेच्या सुरुवातीला, पूर्वी ज्याचा मी उल्लेख केला आहे तो चंडोलाचा उत्सव हा श्रमाचा व कलात्मक सृजनशीलतेचा एक अद्वितीय असा उत्सव बनला. मुली मैद्याच्या गोळयांतून छोटे छोटे चंडोल पक्षी तयार करीत. आपल्या या साध्या साध्या कलाकृतीतून पक्ष्याच्या वेगवान भरारीची अभिव्यक्ती साधण्याचा प्रत्येक मुलगी प्रयत्न करी. मुली आपले पक्षी एकमेकीना दाखवीत. त्यांत केवळ गतीच नव्हे तर गाण्याचे स्वरही प्रतिबिंबित झालेले आहेत असे त्याना आढळे. "तुझा चंडोल पक्षी नुसताच शांत बसला आहे. माझा बघ कसा गात आहे" असा एखादा शेरा त्या दिवशी ऐकायला मिळे.

मुले मोठी झाल्यावर शेतांवर किंवा पशुपालनकेंद्रांवर ती काम करणार होती. कोणी शेत नांगरणी करणारे कामगार बनणार होते, कोणी गवळणी बनणार होत्या, कोणी शेतीतज्ज्ञ बनणार होते तर कोणी बागवान बनणार होते. म्हणूनच भूमीवरच्या किंवा शेतावरच्या साध्या साध्या श्रमांचे सौंदर्य जाणवण्यास मुलाना शिकविले पाहिजे. अगदी साध्या शेतकामाचा त्याना आनंद होणे हे महत्त्वाचे होते. आणि खेळाशिवाय, श्रमकार्याबद्दलच्या सामूहिक प्रेरणेशिवाय, परस्पर सांघिक संबंधांतील – मैत्री, बंधुभाव व परस्पर साहाय्य यांमधील सौंदर्याच्या प्रचीतीशिवाय ही गोष्ट अशक्यप्राय आहे. माझ्या विद्यार्थ्यांना सांघिक कामाविषयी नेहमीच जवळीक वाटत असे आणि त्याच्या फलश्रुतींविषयी ते नेहमीच चिंता वहात असत. एकत्र काम करण्याची संवय आमच्या वर्गाच्या अंगी पुरेपूर मुरली.

वसंताच्या सुरुवातीला तान्याच्या वडिलाना भेटायला आम्ही पशुपालन-केंद्रावर गेलो. धान्य साठविण्याच्या ठिकाणी त्यानी एक ऊबदार जागा निवडली आणि एक छोटा मेंढवाडा तयार करून त्यात आमच्यासाठी चार कोकरं ठेवली. सर्वात दुबळी अशी कोकरं त्यानी निवडली होती. या छोटया छोटया सजीव गोळयांची आपण निगा राखू, त्याना गवत चारण्या-

साठी आणि गरम दूध देण्यासाठी, ती चांगली तगडी होईपर्यंत, रोज आपण येथे येऊ असे मी मुलाना सांगितले.

काही मुले इतकी आळशी असतात की त्याना कशात म्हणून कशातही रस वाटत नाही आणि काही मुले इतकी कठोर हृदयाची असतात की कशाचाही त्यांच्या हृदयावर परिणाम होत नाही असे अनेक वेळा बोलले जाते. पण वास्तविक ते खरे नाही. उदाहरणार्थ, पशुपालनकेंद्रावर छोटया कोकरांची निगा वाहण्यासारख्या कामापासून सुरुवात करून बालजीवाना (कुमार वयातील मुलाना नव्हे – अकरा किंवा बारा वर्षे म्हणजे फार उशीर झाला) प्रेरित करा. या मुलांबरोबर एक-दोन महिने काम करा आणि मग कठोरातल्या कठोर हृदयातला बर्फही कसा वितळू लागतो ते पहा. एकत्र काम करण्यातला आनंद जर मुलानी घेतला तर ती अत्यंत मेहनती कामगार बनतील. आमच्या वर्गात एकही अलिप्त, आळशी विद्यार्थी नव्हता आणि मुलाना मिळालेल्या साध्या श्रमाच्या प्रेरणेचीच ती फलश्रुती होती.

आम्ही उत्तम गवत गोळा केले आणि "कोकरांकरिता लापशी" बनविण्यासाठी आम्ही त्याचा आटा तयार केला. आम्ही त्याना दूधही पाजीत असू. कोकरे हिरवे गवत खाऊ लागली तेव्हा मुलानी उष्णता-गृहातून त्यांच्यासाठी बार्लीची व ओटची कोवळी कोवळी पेरं आणायला सुरुवात केली. बाहेर हिरवे गवत तयार होऊ लागले तेव्हा दोन्ही हातात मावेल इतकी ताजी चार आणून मुले ती कोकराना देऊ लागली. धान्यकोठाराजवळच तान्याच्या वडिलानी एक मेंढवाडा तयार केला. सारा दिवस त्या कोकराना आम्ही तेथे बागडू देत असू. ते आमचे "मेंढया चरविण्याचे प्रचंड कुरण" होते.

शाळेच्या तिसऱ्या वर्षात निगेचे एक नवे, व अधिक गंभीर क्षेत्र निर्माण झाले; वासरांची काळजी घेण्याची इच्छा मुलामुलींच्या मनात प्रादुर्भूत झाली. गवळीवाडयावर आणखी एक कोपरा आमच्यासाठी राखून ठेवण्यात आला. संपूर्ण हिंवाळाभर आपल्या कोकरांसाठी व वासरांसाठी मुले उष्णतागृहात हिरवी चार तयार करीत असत. उन्हाळयामध्ये आम्ही वासरांसाठी गवत सुकवीत असू. पुष्कळ मुले जवळ जवळ दर दिवशी शेतावर जात असत.

वसंत ऋतूच्या आगमनाबरोबर मेंढयाना आणि कोकराना जेव्हा मोठया शेतांवर हलविण्यात आले तेव्हा मुलाना एकटं एकटं वाटू लागलं. निदान

एक दिवसापुरते का होईना पण त्याना निसर्गाच्या सान्निध्यातील त्या शेतांवर रहावयाचे होते. रविवारी आम्ही त्या शेतांवर गेलो. मेंढ्या आणि कोकरे तेथे चरत होती. त्याना तसेच चरू देत आम्ही मेंढपाळानी कापलेले गवत गोळा केले. पहिले वासंतिक गवत हे कोकराना अतिशय आरोग्यदायक असते. ग्रीष्मात शाळेला सुटी पडल्यानंतर जवळ जवळ दररोज मुले त्या शेतांवर जात. लहानपणीच दैनंदिन कामाच्या सौंदर्याची माणसाला प्रेरणा मिळाली नाही तर साध्या साध्या शेतकामाची त्याला कधीही ओढ व आवड निर्माण होणार नाही.

अभ्यास आणि काम यांची जोड घालणारी शाळेच्या आवारात एक जागा होती. मुलांच्या मनात प्रज्वलित झालेल्या रोमहर्षक भावनेच्या ज्योतीने तेथील कामालाही उजाळा मिळाला. पहिल्या इयत्तेत असताना आम्हाला ०.१ हेक्टरचा जमिनीचा एक छोटा तुकडा देण्यात आला होता. मोठ्या विद्यार्थ्यांच्या मदतीने मुलानी विटांचे तेथे छोटे घर उभारले. त्याला कौलारू छप्पर होते. त्याची फरशी लाकडी होती. तेथे एक छोटी भट्टी होती, एक नळ होता आणि वीजही होती. अगदी खऱ्या घरासारखे ते घर होते; फक्त ते तेवढे मोठे नव्हते इतकेच. त्या घराला मुले "छोटा हरित-मंडप" म्हणत. निसर्गाविषयीच्या गोष्टी वाचण्यासाठी व ऐकण्यासाठी मुलांचा तो एक छोटा सांदीकोपरा बनला. पुढे, मुले तिसऱ्या इयत्तेत असताना, आम्ही त्या छोट्या घरात बियांवर प्रयोग करीत असू.

छोट्या घराची ही बांधणी म्हणजे काम व खेळ यांचा मिलाफ होता. हे काम पुरे झाल्यानंतर स्वतःच्या हातानी तयार केलेल्या वस्तूंबद्दल मुलांची वृत्ती अधिक दक्ष बनली. हे घर म्हणजे आपल्या श्रमाचे फळ आहे ही गोष्ट त्याना अतिशय चांगल्या रीतीने उमजली. स्पष्टीकरणाचा कोणताही प्रकार प्रत्यक्ष जीवनानुभवाची जागा घेऊ शकत नाही.

सामायिक मालमत्तेबद्दल मुलाला आदर वाटावा असे वाटत असेल तर इतरांबरोबर काम करण्याचा व्यक्तिगत अनुभव त्याने प्राप्त केला पाहिजे. जे सामायिक आहे ते माणसाला प्रिय बनते तेव्हाच फक्त भौतिक मूल्यांचे मर्म आकळून येते. हा गुण बालपणातच प्राप्त झाला पाहिजे. सामाजिक मालमत्तेचा प्रश्न येतो तेव्हा काही कुमारवयीन मुलांमध्ये उधळेपणाची वृत्ती आढळून येते असे अनेकदा शिक्षकांच्या बोलण्यात येते – कुमारवयीन मुले इतकी आस्थाशून्य बनू शकतात याचे कारण काय? माणसाच्या अंगात त्याच्या पौगंडावस्थेच्या काळात किंवा प्रारंभिक तारुण्यकालात काटकसरी

वृत्ती व आंतरिक शिस्त बाणावी असे तुम्हाला वाटत असेल, सामाजिक हितसंबंधांबद्दल त्याला वाटणाऱ्या आस्थेला दिखाऊपणाचे रूप येऊ नये आणि जी आपली वैयक्तिक मालमत्ता नाही अशा गोष्टींबद्दल त्याला हार्दिक आस्था जाणवावी असे जर तुम्हाला वाटत असेल तर बालपणातच सामाजिक स्वरूपाच्या गोष्टींचे मोल त्याला जाणवले पाहिजे. त्याच्या व्यक्तिगत सुखाशी ही बाब एकजीव झाली पाहिजे.

ज्या जागेवर आम्ही गहू, बार्ली, कडधान्ये, सातू, मका व सूर्यफुले लावीत होतो त्या जागेच्या शेजारीच आमचा हा "छोटा हरित-मंडप" होता. आम्ही तेथेच बी-बियाणांची निवड करीत होतो व धान्याच्या राशी रचून ठेवीत होतो. खतांचे मिश्रणही आम्ही तेथेच तयार करीत होतो. ज्ञानग्रहणाच्या रोमांचकतेतून मुलांच्या श्रमाला प्रेरणा मिळत होती. मुले अत्यंत विचारपूर्वक काम करीत. निसर्गाची रहस्ये व नियम त्यांच्यासमोर प्रकट होत असत. निसर्गशक्तींचा उपयोग करून घेण्याच्या बाबतीत माणसाला मदत करणारे ज्ञान केवळ श्रमातूनच प्राप्त होते हे व्यक्तिगत अनुभवातून माझ्या विद्यार्थ्यांना पटावे याची मी खात्री करून घेतली. मी गव्हाच्या दाण्याबद्दल त्याना सांगितले व श्रमाची त्याच्या जीवनावर कशी सत्ता चालते हे विशद केले. भूमीमध्ये मुलाना स्तिमितकारक जीवनविश्वाचा शोध लागला. आम्ही त्या जागेवर सेंद्रिय द्रव्ये घेऊन गेलो आणि ती भूमी सुपीक बनली. मुलानी गव्हाचे प्रत्येकी शंभर दाणे लावले आणि रोपे कशी वाढतात याचे त्यानी अतिशय रस घेऊन अवलोकन केले. गव्हाची कणसे अधिक भरघोस बनावीत आणि गव्हाचे दाणे अधिक भरदार व्हावेत म्हणून भूमीला "खाद्य पुरविण्या"च्या प्रयत्नांतून मुलांची प्रेरणा अधिकच वाढीला लागली. पोषक द्रव्यानी आपल्या रोपांचे जास्तीत जास्त चांगले पोषण व्हावे असेच प्रत्येकाला वाटत होते. साध्यातली साधी कामे पार पाडण्याच्या प्रेरणेचे पाठबळ लाभलेल्या या मुलांच्या दृष्टीने ही एक खरीखुरी सृजनशीलता होती. त्यानी अत्यंत काळजीपूर्वक गव्हाची पेरे कापली आणि प्रत्येकाने वजन करण्यासाठी हजार दाण्यांची एक एक रास बनवली. ज्याने सर्वात उत्तम पीक काढले होते अशा मुलाचे मन अभिमानाच्या अपार भावनेने भरून आले आणि इतर मुलानी अधिक चांगले काम करण्याचा विडा उचलला.

मुले वनस्पतीजीवनावर प्रेम करायला आणि भूमीचे जीवनस्पंदन जाणवायला शिकली होती याबद्दल माझी खात्री झाली. तिसऱ्या व चवथ्या

इयत्तेत असताना, शेतांवर सर्वसाधारणपणे जो गहू पिकविला जातो त्यापेक्षा दुप्पट आकाराचे दाणे मुलानी तयार केले.

उष्णतागृहात व "छोटया हरित-मंडपात" आम्ही पोषक द्रव्यांच्या रासायनिक मिश्रणांत काकडया व टोमॅटो पिकविले. हिंवाळयात पालापाचोळा कुजवून तयार केलेली खताची माती व काळी माती यांची मुले पोषक मिश्रणे तयार करीत व वसंतात ती लागवडीच्या जागी नेत. शरदात त्यानी बटाटयांचे व टोमॅटोंचे भरघोस पीक काढले.

काही मुले "हिरव्या प्रयोगशाळे"तही काम करीत. माध्यमिक वर्गातल्या मुलांसाठी बांधलेली ही छोटी इमारत होती. येथे, वडीलधाऱ्या विद्यार्थ्यांच्या देखरेखीखाली, माझ्या विद्यार्थ्यानी बागकाम आणि वनस्पतींची लागवड या क्षेत्रातले काही उद्‌बोधक प्रयोग केले. रानबेरींच्या झुडुपाना व झाडाना फळझाडांच्या जातींची कलमे कशी करावयाची हे येथे मी मुलाना दाखविले. दुसऱ्या इयत्तेत असताना या नाजूक प्रक्रियेतील मेख सर्व मुलाना उत्तम उमजली होती. त्यातून ज्ञानाचे निसर्गावरील प्रभुत्व आणि सिद्धांत व व्यवहार यांची एकता यांची त्याना जाणीव आली.

आपल्या कलमांची फलश्रुती पहाण्यासाठी ती छोटी मुले-मुली वसंताची अधीरतेने प्रतीक्षा करीत होती. कलम केलेल्या डेखांवर जेव्हा छोटी छोटी पालवी दिसू लागली तेव्हा मुलांच्या आनंदाला पारावार उरला नाही. आम्ही एक वनस्पती-संगोपन-केंद्र तयार केले आणि दर वर्षी तेथे निरनिराळी रोपे तयार करण्याचे मुलानी ठरविले. हे वनस्पती-संगोपन-केंद्र म्हणजे मुलांचे कामाचे एक दुसरे आवडते ठिकाण बनले. तिसरी इयत्ता पुरी केल्यानंतर जो उन्हाळा आला त्या उन्हाळयात एका दाट झाडीच्या ठिकाणी आम्हाला रान-अलबुखाराचे एक झाड आढळले. आम्ही प्रत्येकाने त्याच्यावर काही छोटया छोटया डहाळयांची कलमे केली — त्यात काही जर्दाळूच्या, काही अलबुखाराच्या व काही पीचच्या डहाळया होत्या. सर्व कलमानी जीव धरला. एका झाडावर निरनिराळया फळझाडांच्या डहाळया वाढताना पाहून मुले स्तिमित झाली. दोन वर्षानी त्याना फळेही धरली.

निसर्ग हे विचाराचे, सृजनशीलतेचे व जिज्ञासाबुद्धीचे सर्वात समृद्ध असे उगमस्थान आहे हे मी पूर्वीच सांगितले आहे. निसर्गनियमांच्या आकलनातून मुलाला माणूसपण येते आणि निसर्गविकासाच्या प्रदीर्घ

पथावरील सर्वोच्च अवस्था आपल्या स्वत:त सामावली आहे याची त्याला हळू हळू उमज पडते. पण निसर्ग स्वत: चमत्कार निर्माण करू शकत नाही, मुलाची नैसर्गिक ताकद विकसित करू शकत नाही, त्याची बुद्धी शिकवून तयार करू शकत नाही किंवा त्याची विचारक्रिया समृद्ध बनवू शकत नाही. क्रियाशील ताकद कमाविल्याशिवाय, श्रमाशिवाय, निसर्गाची रहस्ये उलगडून दाखविणे व ती आत्मसात करणे शक्य नाही. निसर्गशक्तींचा उपयोग करण्याच्या मार्गावर माणूस जेव्हा आपले पहिले जाणीवपूर्वक पाऊल उचलतो तेव्हा निसर्गाकडून त्याला त्याचे फळ मिळते – प्रथम ते हात राखून दिलेले असते, पण एकाच वेळी ज्ञान संपादन करीत व निर्मिती साधीत माणूस जेव्हा नवे नवे प्रयत्न करतो तेव्हा निसर्गाकडून अधिक उदारहस्ताने हे फळ त्याच्या पदरात टाकले जाते. मुले जेवढे अधिक श्रम करतात तेवढी निसर्गाची अधिकाधिक रहस्ये मुलांच्या मनात उलगडली जातात आणि त्याचबरोबर अधिक नवनव्या, पण अजून अगम्य असलेल्या घटना त्याना सामोऱ्या येतात. पण अद्याप त्याना न उमजलेल्या गोष्टी जितक्या अधिक तेवढे त्यांच्या विचाराने धारण केलेले रूप अधिक क्रियाशील. व्यामिश्रतेतून विचाराना हमखास चालना मिळते. नांगरलेल्या जमिनीत गव्हाचा दाणा पेरल्यापासून ते पीक तयार होईपर्यंत "कसे?" व "का?" या स्वरूपाचे मुलानी दोनशेच्या वर प्रश्न विचारले. झाडांची, धान्याची व औद्योगिक पिकांची लागवड यासारख्या जमिनीच्या मशागतीशी संबंधित असलेल्या क्षेत्राइतके विचारक्रियेला चालना देणारे निसर्गप्रभावाचे दुसरे कोणतेही क्षेत्र शोधून सापडणे कठीण आहे.

आपले उपजत कलागुण व कल हुडकून काढण्यास मुलाना मदत व्हावी म्हणून मुलांच्या कामात वेळोवेळी बदल करण्याचा मी प्रयत्न केला. शाळेच्या यंत्रशाळेशेजारीच छोटया मुलांसाठी आम्ही एक खोली तयार केली. आवळपकडी (vices) असलेली काही टेबले आम्ही तेथे ठेवली. आणि माझे एक जुने स्वप्न साकार करण्यात मी यश मिळविले – मोठ्या मुलानी या छोटयांसाठी दोन छोटी लेथयंत्रे व एक ड्रिलिंग यंत्र तयार केले. तेथे फळयांवर व कपाटांमध्ये छोटे छोटे रंधे, करवती आणि धातुकामासाठी आवश्यक असलेल्या निवडक हत्यारांच्या पेटया होत्या. तेथे काही धातूचे पत्रे व ताराही ठेवण्यात आल्या होत्या – थोडक्यात उभारणीसाठी व नमुने तयार करण्यासाठी आवश्यक असलेल्या सर्व गोष्टी तेथे होत्या. त्या छोटया यंत्रशाळेत अनेक मुलामुलीना रस निर्माण झाला.

हळू हळू एक बाल-कारागीरमंडळ तेथे उदयाला आले. विशेषत: नमुने तयार करण्यात, उभारणीकार्यात व लाकडी कातरकामात मुलाना अधिक रस वाटत असे.

दुपारच्या जेवणानंतर आम्ही यंत्रशाळेत जमलो आणि ताबडतोब काही उद्बोधक प्रतिकृती आम्ही बनविल्या. त्यांत वाऱ्यावर चालणारे एक विद्युत्‌निर्मितीकेंद्र होते, धान्य साफ करण्याची यंत्रे होती, धान्यपाखडणीयंत्रे होती, अगदी खऱ्या इमारतींसारख्या दिसणाऱ्या इमारती होत्या, मेज आणि धातुकामाच्या छोट्या हत्यारांसाठी कपाट होते. लाकूडकामाच्या व धातुकामाच्या तपशिलांची आखणी करून मुले सामूहिकरित्या काम करीत असत. प्रतिकृती जितकी लहान व जितकी काटेकोर असे तेवढी तिची घडण, प्रौढानी बनविलेल्या अस्सल प्रतिकृतीप्रमाणे करणे अधिक कठीण जाई, व तेवढेच अधिक स्वारस्य मुले त्या कामात दाखवीत.

मुलांमधील उपजत प्रज्ञेला व कलाना जागृती आणणे, त्याना निर्मितीक्षमतेचा आनंद देणे, आणि भाविकालात आवश्यक असलेल्या क्षमतांचा व कौशल्यांचा त्याना लाभ करून देणे हे मुलाना या कामात ओढण्यामागील माझे मुख्य उद्दिष्ट होते. मी त्याना जे करून दाखवीत असे त्यात त्यानी रस घ्यावा असा मी प्रयत्न केला. लाकूडकामासाठी आणि धातुकामासाठी हत्यारांचा कसा उपयोग करावा हे मी त्याना दाखवीत असे. शिक्षकाचे कौशल्य व कसब हे मुलांचे जे कल असतात त्या कलांची ज्योत प्रज्वलित करणारी व मुलांची प्रेरणा जागृत करणारी एक ठिणगी असते. मुलांच्या नजरेसमोरच मी बाहुलीचा एक छोटासा लाकडी पलंग बनविला. तेथून यंत्रशाळेतील आमच्या पाठाना सुरुवात झाली. तो छोटा पलंग जसजसा अगदी खऱ्याखुऱ्या पलंगासारखा दिसू लागला तसतसे मुलांच्या नजरेत अधिकाधिक तेज चमकू लागले. त्या कामात ती छोटी मुलेही भाग घेण्यास धडपडू लागली. काही मुलानी तेथल्या तेथेच मला मदत करायला सुरुवात केली. पलंगाच्या निरनिराळ्या भागाना त्यानी रंधा मारला व सॅन्डपेपरने ते भाग गुळगुळीत केले. वाऱ्यावर चालणाऱ्या विद्युत्‌निर्मितीकेंद्राची प्रतिकृती तयार करीत असताना मला केवळ मदतनीसच लाभले नाहीत तर खरेखुरे सहकारी लाभले. युरा, वित्या आणि मिशा फार झपाट्याने हत्यारांचा उपयोग करावयास शिकले. प्रत्येकालाच काम करण्याची इच्छा होती, आणि म्हणून आम्ही एकाच वेळी अनेक प्रतिकृती तयार करावयास घेतल्या.

येथे थोडे विषयांतर आवश्यक आहे. मुलांमधील स्वाभाविक कलागुण व प्रज्ञा ही त्यांच्या कराग्रात सामावलेली असते. अलंकारिक भाषेत बोलावयाचे झाल्यास सृजनशील विचारांच्या उगमस्थानाचे पोषण करणारे छोटे छोटे स्रोत हाताच्या बोटांतून स्रवतात. मुलांच्या बोटांची हालचाल जितकी अधिक निश्चिततापूर्ण व कल्पकतापूर्ण असते तेवढी त्यांच्या हातांची व श्रम-हत्यारांची क्रियाप्रतिक्रिया काटेकोर बनते, आणि या क्रियाप्रतिक्रियेला आवश्यक असलेल्या हालचाली जितक्या अधिक गुंतागुंतीच्या असतात तितके मुलाच्या विचारबुद्धीतील सृजनशील घटक अधिक स्पष्ट बनतात आणि या क्रियाप्रतिक्रियेला आवश्यक असलेल्या हालचालींना अधिक नेमकेपणा, हळुवारता व जटिलता प्राप्त होते. हात, निसर्ग आणि सामाजिक श्रम यांमधील क्रियाप्रतिक्रिया जितक्या अधिक सखोलतेने मुलाच्या अंतर्जीवनात प्रवेश करतात तितके मूल अधिक निपुण, दक्ष, जागरूक व तपशीलपूर्ण संशोधनास सक्षम बनते.

दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे मुलाचे हात जेवढे अधिक कुशल तेवढे ते मूल अधिक हुशार बनते. पण कौशल्य हे एखाद्या सहजप्रेरणेतून साध्य होत नाही. मुलाच्या बौद्धिक व शारीरिक ताकदीवर ते अवलंबून असते. कौशल्य जसजसे पूर्णत्वाला पोहोचते तसतशी बौद्धिक शक्तीला अधिकाधिक बळकटी प्राप्त होते; पण कौशल्य आपली ताकद विवेकबुद्धीतून मिळविते. सभोवतालच्या जगाचे मुलांचे ज्ञानग्रहण मुलांचे हात व त्यांच्या भोवतालची साधने यांच्यामधील क्रियाप्रतिक्रियेतून घडावे, आणि आपले कुतूहल केवळ प्रश्नांतून नव्हे तर श्रमातून व्यक्त करून व विकसित करून केवळ आपल्या नजरेनेच नव्हे तर हातानीही मुलाने निरीक्षण करावे असा मी प्रयत्न केला.

आनंद विद्यालयाच्या पहिल्या दिवसांपासून माझ्या विद्यार्थ्यांनी एक वनस्पतीशास्त्रीय संग्रहालय तयार केले होते, बिया आणि लाकडाच्या विविध जातींचे नमुने गोळा केले होते. केवळ निरीक्षणप्रक्रियेच्या आधारे नव्हे तर छोटे छोटे हातोडे, चाकू, कातरी व छिन्न्या यांसारख्या अगदी साध्या साध्या हत्यारांच्या साहाय्याने हातांचा उपयोग करून पदार्थांच्या गुणधर्मांचा त्यानी अभ्यास केला. ही हत्यारे ती मुले निरनिराळ्या पदार्थांवर चालवीत. पहिल्या व दुसऱ्या इयत्तेत असताना मुले चाकूचा उपयोग करायला शिकली. विलो, ॲश, पॉप्लर, ओक, देवदार, पीअर व चेरी अशा विविध जातींच्या झाडांचे त्यानी नाजूक पापुद्रे कापले, ते

घासून गुळगुळीत केले, कागदावर ते गोंदाने डकविले किंवा शिवले आणि त्यांचा कठीणपणा व इतर गुणवैशिष्टयांची त्यानी तुलना केली. ॲश झाडांच्या खोडाना आलेल्या गाठींपासून त्यानी अक्षरे किंवा छोटे छोटे प्राणी व पक्षी बनविले; कारण हा अत्यंत मऊ व लवचिक असा पदार्थ असतो. ॲशच्या झाडापासून तयार करण्यात आलेल्या अक्षराना मुले "लाकडी मुळाक्षरे" म्हणत. अशी मुळाक्षरे सर्व मुलामुलींनी स्वत:साठी बनविली. आमच्या खेडयापासून जवळच एक ग्रॅनाइटची गुहा होती. खडकांचे नमुने गोळा करण्यासाठी आम्ही अनेकवेळा तेथे जात असू. आपल्या इटुकल्या हातोडयानी मुलानी अभ्रकाचे छिलके काढले आणि विविधरंगी खडयांचा एक संग्रह तयार केला. चिकणमातीच्या त्यानी खेळण्यातल्या विटा बनविल्या, त्या उन्हात सुकविल्या आणि घराच्या छोटया प्रतिकृती उभारल्या. उन्हाळयात सुगीच्या वेळी आम्ही रायच्या व गव्हाच्या पेंढया-च्या समान लांबीच्या काडया कापीत असू, त्यांच्या पेंढयाच्या फिती तयार करीत असू आणि टोप्या शिवीत असू.

ही केवळ औद्योगिक निर्मितीक्षमतेची पूर्वतयारी नव्हती. मुलांच्या हस्तनैपुण्याचा विकास घडवीत असताना मी त्यांच्या विवेकबुद्धीचाही विकास घडवीत होतो. आम्ही पवनचक्कीवर चालणाऱ्या विद्युत्‌निर्मितीकेंद्राचा जेव्हा नमुना बनविला तेव्हा धातूच्या पात्यांऐवजी लाकडाची पाती वापरावीत असे मुलानी सुचविले. "ज्या लाकडापासून पाती बनवायची ते लाकूड चांगले मजबूत पण वजनाने हलके असले पाहिजे; म्हणजे ती पाती वाऱ्याच्या झुळुकेने फिरतील," सिऱ्योझा म्हणाला.

प्राथमिक शाळेतील चार वर्षांच्या काळात विविध प्रकारची गुंतागुंत असलेले मुलानी तिसाहून अधिक क्रियाशील नमुने बनविले. छोटे जनित्र चालविणाऱ्या पवनचक्की – विद्युत्‌निर्मितीकेंद्राच्या नमुन्याइतकाच त्यातील प्रत्येक नमुना गुंतागुंतीचा होता. प्रतिवर्षी मुलांचे व्यक्तिगत कल अधिकाधिक स्पष्टपणे प्रत्ययास येऊ लागले. शूरा, वित्या, मिशा, सिऱ्योझा आणि युरा याना धातूची व यंत्रांची आवड निर्माण झाली. आवळपकड घेऊन तासन्‌तास ते काम करू शकत असत आणि वेळेचे त्याना भानही रहात नसे. कधी कधी महत्प्रयासाने त्याना घरी पाठवावे लागत असे. ती छोटी मुले आवळपकडीत व छोटया लेथयंत्रावर लाकडाचे व लवचिक धातूचे साधे साधे बारकावे तयार करीत असत. ते काम पहात असताना आनंद विद्यालयात आणि पहिल्या इयत्तेत मुले लाकडी अक्षरे कातरण्यास

कशी शिकली होती हे मला आठवले. या बालिश स्वारस्यात भावी पेशांचे किंवा खास तंत्रकौशल्यांचे एखादे रूपरेषात्मक चित्र पहाणे हे खुळेपणाचे ठरले असते. कौशल्यामध्ये अनेक गुंतागुंतीची स्थित्यंतरे घडतात असे जीवनातून सिद्ध झाले आहे. आपण अमुक होणार म्हणून लहानपणी माणसाने स्वप्ने रेखाटली असली तरी पुढे तसा तो होतोच असे क्वचितच घडते.

शारीरिक श्रम हे बौद्धिक शिक्षणाशी अत्यंत घनिष्टरित्या निगडित आहेत. नैपुण्य हे चौकस वृत्ती, बुद्धीचातुर्य व सृजनशील कल्पनाशक्ती यांचे भौतिक मूर्तरूप आहे. आपण आरेखिलेल्या गोष्टी आपल्या स्वतःच्या हाताने प्रत्येक मुलाने निर्माण करणे हे अत्यंत महत्त्वाचे आहे.

चवथ्या इयत्तेत असताना मुलानी स्वतःची हत्यारे – छोटे छोटे रंधे व सरकरंधे – तयार केले. प्राण्यांच्या व जनावरांच्या मानोरंजक आकृत्या, परीकथेतील बाबा-यागा व अमर भुजंग यांसारख्या कळसूत्री बाहुल्यांसाठी व छायानाट्यासाठी विविध आकृत्या कोरून काढण्यासाठी मुलानी जे छोटे छोटे चाकू वापरले होते त्या चाकूसारखे अगदी साध्यातले साधे हत्यारही मुले विसरली नाहीत. सिऱ्योझा व मिशाने दोन मत्स्यालये बनविली – त्यांपैकी एक वर्गासाठी तयार केले होते व दुसरे परीकथांच्या कोठीसाठी.

आणखी एक वेधक काम मुलाना खूप आंनद देऊन गेले : मोटारीसारख्या इंजिनवर चालणारे एक छोटे विद्युत्‌निर्मितीकेंद्र आम्ही उभारले. त्या केंद्रातून कमी दाबाचा विद्युत्प्रवाह निर्माण होत असे ; त्यामुळे मुलाना त्यापासून काहीही धोका नव्हता.

तिसऱ्या व चवथ्या इयत्तेत असताना आपल्या आवडत्या कामासाठी मुले आठवड्यातून दोन तास खर्च करीत. त्यावेळी ती "छोट्या हरित-मंडपात" – यंत्रशाळेत, उष्णतागृहात, श्रम-अभ्यासाच्या जागी किंवा बागेत जाऊ शकत. ज्याना शेतावर काम करण्याची आवड होती ती मुले कोकरांची व वासरांची देखभाल करण्यासाठी जात. या काळात आपल्या सर्वात आवडत्या कामासाठी प्रत्येक विद्यार्थी आपला वेळ खर्च करी. एका आठवड्यात मी एका ठिकाणी जात असे, तर दुसऱ्या आठवड्यात दुसऱ्या. प्रत्येक गटात अशी काही मुले होती की ज्यांचा विशिष्ट प्रकारच्या कार्याबद्दलचा कल ठळकपणे निदर्शनास आला. छोट्या छोट्या कार्य-गटांची ती संघटक बनली आणि आपल्या उदाहरणाने त्यानी आपल्या सहकाऱ्यानाही प्रेरित केले. यंत्रशाळेत चालणाऱ्या कामाचे दिग्दर्शन युरा करीत असे.

वाऱ्या बागकामशास्त्रज्ञांचा पुढारी बनला आणि वाऱ्या बागवानांची. पशुसंगोपकांचे प्रमुखत्व साशाकडे होते. ही मुले अनेक गोष्टी करू शकत होती आणि आपल्या खेळगड्यांपेक्षा त्याना पुष्कळच महत्त्वपूर्ण माहिती होती. इतर मुले त्यांचे अनुकरण करण्याचा प्रयत्न करीत आणि पुढे पुढे त्यांच्या कामाला सृजनशील क्षमतांच्या स्पर्धेचे रूप आले.

शारीरिक व बौद्धिक ताकदींचा एक आनंददायक खेळ म्हणून, स्वाभिमानाला मजबुती आणणारी एक ताकद म्हणून श्रमाने माझ्या विद्यार्थ्यांच्या जीवनात प्रवेश केला. बालपणाच्या काळात आपल्या आवडत्या कामात प्रत्येक माणसाने अर्थपूर्ण यश संपादन केले पाहिजे आणि आपल्या सृजनशील क्षमतांच्या भौतिक फलश्रुतींचा वेध घेतला पाहिजे. आपल्या आवडत्या कामात माणसाने प्रभुत्व मिळविले पाहिजे; अर्थात मुलाच्या शक्यतेच्या कोटीचा विचार करूनच ते साधले गेले पाहिजे. आपल्या शालेय वर्षांच्या काळात काहीतरी चांगले व सुंदर करण्यास माणसाने शिकले पाहिजे. आपल्या आवडत्या कामातील यशाच्या संदर्भात अनुभवलेली अभिमानाची भावना हा आत्मज्ञानाचा पहिला मूलस्रोत आहे, मुलाच्या अंतःकरणातील सृजनशील प्रेरणेचा तो पहिला स्फुल्लिंग आहे. आणि प्रेरणे-शिवाय, सिद्धीच्या आनंदाशिवाय व पूर्णविकसित ताकदीच्या संवेदनेशिवाय माणूस हा माणूस रहाणार नाही आणि जीवनात त्याला स्थान मिळेल की नाही याची निश्चित खात्री देता येणार नाही. ज्याचे व्यक्तित्व व मौलिकता श्रमाच्या द्वारे प्रकट झालेली नाही असे शाळेत एकही मूल राहू नये हे पहाण्याचा मी प्रयत्न केला.

माझ्या प्रत्येक विद्यार्थ्यांचे बालपण मी जेव्हा आठवतो तेव्हा उत्कृष्ट काम पार पाडल्याच्या अभिमानाने चमकणारे डोळे माझ्या नजरेसमोर येतात. सिऱ्योझाचा तो छोटा रेडिओच घ्या. चवथ्या इयत्तेत असताना त्याने तो बनविला होता. महान आनंदाच्या रूपात तीन महिन्यांच्या प्रदीर्घ मेहनतपूर्ण परिश्रमाचे फळ त्याच्या पदरात पडले होते. फेद्या आपल्या मोहोरत्या पीच वृक्षाच्या शेजारी उभा होता. एका रान-अलबुखाराच्या झाडाला त्याने पीचच्या डहाळीचे कलम केले होते आणि त्याला फुलेफळे येण्याची तो वाट पहात होता. पशुवाड्यातून एक छोटे कोकरू घेऊन आल्यानंतर वाल्याला जो आनंद झाला होता त्या क्षणाची वाल्या माझ्या मनःचक्षूंसमोरून हलता हलत नाही. तिने ते आजारी, दुबळे कोकरू आपल्या घरी आणले होते व त्याला निकोप व पुष्ट बनविले होते. आपल्या

किरमिजी गुलाबांची दृष्टिभेट घेत असताना तीनाची हंसरी नजर सूर्याकडे व निळ्या आकाशाकडे वळत होती. एका रानगुलाबाला गुलाबांच्या तीन डहाळ्यांचे तिने कलम केले होते आणि विस्मयकारक सौंदर्याची उधळण करीत ती झुडुपे तरारली होती. साशाचा जेव्हा मी विचार करतो तेव्हा गव्हाची छोटी गुंडी हातात घेतलेला काळ्याभोर डोळ्याचा एक मुलगा माझ्या मनोगाभाऱ्यात डोकावू लागतो. तीन चौरस मीटर जागेवर त्याने जो गहू पिकविला होता त्याचे आम्ही जेव्हा वजन केले तेव्हा या गव्हाने दर हेक्टरी ऐंशी सेंटनेर गव्हाचे पीक दिले असते असा आम्ही हिशोब काढला होता... शाळेच्या विहिरीजवळच अनेक फांद्या असलेले सफरचंदाचे एक झाड वाढत आहे. दर वर्षी जेव्हा ते झाड बहरते तेव्हा गुलाबवर्णी फुलांच्या अद्वितीय अशा सूक्ष्म रंगच्छटानी मी अगदी भारावून जातो आणि मला असा भास होतो की दोन शेपटयांची एक छोटी मुलगी धावत धावत त्या झाडाकडे येत आहे आणि म्हणत आहे: "हे माझे सफरचंदाचे झाड आहे! हे माझे सफरचंदाचे झाड आहे!" सफरचंदाचे झाड जेव्हा प्रथम बहरले तेव्हा कात्या असेच म्हणाली होती. कोस्त्याबद्दलची माझी आठवण मन काहीसे खिन्न करणारी आहे: त्याच्या हातात एक छोटे वासरू होते. पण त्याच्या आंजारण्या-गोंजारण्याला ते प्रतिसाद देत नव्हते; कारण ते वासरू आजारी होते.

अशा रीतीने मला ही सर्व मुले आठवतात. मला ती त्यांच्या कामात व्यग्र झालेली दिसतात. पण कोणत्याही प्रमाणात त्यांच्या भावी जीवनाचा मार्ग या स्वारस्यावर पूर्वनिर्धारित झाला होता असा मी अजिबात विचार करीत नाही. मुलाच्या मनात चरसृष्टीबद्दल प्रेम निर्माण झाले, फळबागेतील किंवा शेतावरील कामाने त्याला आनंद दिला तर त्याचा अर्थ असा नव्हे की त्याने बागवान झाले पाहिजे किंवा शेतीतज्ज्ञ बनले पाहिजे. प्रज्ञा, क्षमता आणि कल हे गुलाबाच्या बहरत्या झाडाप्रमाणे आहेत: प्रथम एक फूल फुलते, नंतर दुसरे फूल आपल्या पाकळ्या उघडते. प्रत्येक मुलाला अनेक गोष्टींत रस असतो; अर्थात त्याशिवाय मुलाच्या समृद्ध अंतर्जीवनाची कल्पना करणे अशक्यप्राय आहे. पण एक गोष्ट नेहमीच अत्यंत ठळकपणे दिसून येते. कोणत्या ना कोणत्या श्रमात मूल अर्थपूर्ण यश संपादन करीत नाही तोपर्यंत माणूस म्हणून त्याची आठवण रहात नाही. पण कामातून माणसाला अत्यंत उत्कट असा व्यक्तिगत आनंद मिळू लागताच मानवी व्यक्तित्वाचा उदय होतो.

ज्या कामात माणूस परिपूर्णता साध्य करतो ते श्रम ही एक प्रचंड शैक्षणिक ताकद आहे. आपण निर्माते आहोत या भावनेतून आपण आहोत त्यापेक्षा अधिक चांगले बनावे ही इच्छा माणसाच्या मनात प्रादुर्भूत होते. बालपणातच, पौगंडावस्थेच्या उंबरठ्यावर, माणूस आपली सृजनशील ताकद व क्षमता ओळखतो या वस्तुस्थितीचे महत्त्व फार मोठे आहे. व्यक्तिमत्त्व घडणीचे साक्षात मर्मच या प्रचितीत सामावले आहे.

आपण पूर्वी ज्याची चर्चा केली त्या शैक्षणिक प्रभावांच्या सुसंवादित्वाच्या प्रश्नासंबंधात एक अत्यावश्यक अट येथे ठामपणे मांडली पाहिजे. व्यक्तिमत्त्वावरील हेतुपूर्ण प्रभाव या नात्याने श्रम हे इतर शैक्षणिक प्रभावांशी अनेकानेक परस्परावलंबनानी आणि सशर्ततानी घनिष्टरित्या निगडित झालेले असतात आणि ही परस्परावलंबने व सशर्तता उमजल्या नाहीत तर श्रमाला एखाद्या तिरस्करणीय कर्तव्याचे रूप प्राप्त होते आणि मनाला व अंतःकरणाला त्यापासून लाभणाऱ्या गोष्टींची बेरीज शून्य ठरते. व्यक्तिमत्व-शिक्षणाच्या प्रश्नांची चर्चा करणाऱ्या आमच्या मानसशास्त्रीय परिसंवादात श्रमाचा इतर प्रभावांबरोबर सुसंवादी वापर करण्याच्या प्रश्नाकडे मोठ्या प्रमाणात लक्ष पुरविण्यात आले. बौद्धिक शिक्षणामधील हातांचे स्थान यासंबंधीच्या अहवालावरील चर्चेने सर्वांमध्येच खूप स्वारस्य निर्माण केले. श्रम आणि इतर शैक्षणिक प्रभाव यांमधील परस्परावलंबने आणि अन्योन्य सशर्तता हा असा एक प्रश्न आहे की ज्या प्रश्नाचा आमचे शिक्षक अजूनही अभ्यास करीत आहेत.

## तरुण लेनिनवाद्यानो,
## तुम्ही तुमच्या मायदेशाचे भावी स्वामी आहात

मुले पहिल्या इयत्तेत असताना मला माझी पहिली मदतनीस मिळाली. तिचे नाव ओल्या. ती बारा वर्षांची एक बालवीर होती आणि सहाव्या इयत्तेत शिकत होती. बालवीर संघटनेत सामील होण्याची ऑक्टोबर बालसंघटनेच्या मुलांची तयारी करण्याची कामगिरी आपल्यावर सोपवावी असे तिने बालवीर मंडळाला सांगितले होते. मुख्य गोष्ट ही होती की मुले तिला आवडत असत. (आमच्या शाळेत ऑक्टोबर बालसंघटनेच्या व बालवीरांच्या नेत्यांची नेमणूक केली जात नाही; ज्याना मुले आवडतात

व त्यांच्याबरोबर काम करण्याची ज्यांची इच्छा असते त्याना हे स्थान मिळते). तिची मला अनेक गोष्टींत मदत होत असे. ती मुलांबरोबर खेळत असे, त्यांच्याबरोबर रानात व शेतांवर जात असे आणि त्याना शूर बालवीरांच्या व महान देशाभिमानी युद्धातील सोविएत लोकांच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगत असे.

ओल्याने ज्या कामाला सुरुवात केली ते तिचे काम आज पंधरा वर्षे अव्याहत चालले आहे आणि तरुण लेनिनवाद्यांच्या वैचारिक शिक्षणात त्याने फार मोठी भूमिका बजाविली आहे. माझ्या सल्ल्यावरून महान देशाभिमानी युद्धातील वीरपुरुषांबरोबरच्या मुलांच्या पहिल्या भेटी तिनेच संघटित केल्या. या वीरांच्या कथा इतक्या चित्तवेधक होत्या की ओल्याने त्या सर्वच्या सर्व उतरवून काढल्या. तिने केलेल्या टिपणांतून हळू हळू एक हस्तलिखित मासिक आकाराला आले. त्या मासिकाचे नाव होते 'महान देशाभिमानी युद्धाच्या काळातील आमचे ग्राम-बांधव'. मुलांबरोबर काम करीत असतानाच्या काळात प्रथम ओल्याने आणि नंतर खुद्द बालवीरानी शंभराच्यावर कथा लिहिल्या आणि त्या वीरांची छायाचित्रे त्या मासिकात दिली. आता त्या मासिकात सहाशेच्यावर कथा झाल्या आहेत. आपल्या मायभूमीविषयीच्या प्रेमाची शिकवण देण्याच्या दृष्टीने हे एक अमोल असे उगमस्थान आहे.

मुलांबरोबरचा संपर्क हे ओल्याच्या बाबतीत एक कर्तव्य नव्हते तर तिची ती एक नित्य आंतरिक गरज बनली होती. या गरजेला मी एक अप्रतिम प्रज्ञा मानतो—मानवतेच्या संदर्भातील प्रज्ञा. ज्यांच्याकडे ही प्रज्ञा आहे ते उत्तम शिक्षक बनतील व आपल्या कामात त्याना फार मोठ्या आनंदाचा आढळ होईल. शाळेतील मुलांचे अतिशय बारकाईने निरीक्षण करा, आणि आपल्या छोट्या मित्रांसाठी काहीतरी केल्याशिवाय ज्याना चैन पडत नाही अशी मुले-मुली तुम्हाला तेथे आढळून येतील. मुलांमध्ये अनेक वेळा मस्करी, चेष्टा, खोड्या यातून ही गरज व्यक्त होते. एखादा छोटा मुलगा पुढारी होण्याचा प्रयत्न करतो, आपल्या मित्राना तो आपल्या मागून यायला सांगतो पण आपल्या शक्ती कुठे वळवायच्या हे त्याला ठाऊक नसते. ही उसळती शक्ती दाबून टाकण्याचा प्रयत्न करू नका असा मला शिक्षकाना सल्ला द्यावयाचा आहे. खट्याळ, खोडकर मुलांमध्ये तुमचे मदतनीस सुप्तपणे वास करीत असतात हे विसरू नका. त्यांची शक्ती योग्य दिशेने वळविण्यास तुम्ही समर्थ असला पाहिजे.

तरुण लेनिनवादी संघात सामील होण्याची पूर्वतयारी आणि बालवीर पथकांचे संपूर्ण जीवन यातून ज्या आपल्या पवित्र भूमीवर तिच्या स्वातंत्र्यासाठी व स्वाधीनतेसाठी लढणाऱ्या लोकांचे अपरंपार रक्त सांडले आहे त्या पवित्र भूमीविषयीच्या अत्यंत सखोल प्रेमाची मुलाना शिकवण मिळावी असा मी प्रयत्न केला. मायभूमीच्या सौंदर्याच्या गौरवभावनेतून मायभूमीविषयीच्या प्रेमाला सुरुवात होते. आपल्या मायभूमीच्या निसर्गसौंदर्याची आणि सोविएत लोकानी स्वतःच्या हातानी निर्माण केलेल्या सर्व गोष्टींची मी व ओल्याने मुलाना प्रचिती आणून दिली.

आम्ही स्टेप प्रदेशात गेलो आणि एका टेकडीवर बसलो. तेथून गव्हाच्या विस्तीर्ण शेतांवर आम्ही नजर टाकली आणि मोहोरल्या फळबागा, उंच पॉप्लर वृक्ष, निळे आकाश आणि चंडोलाचे मधुर गीतस्वर यांचा आम्ही आस्वाद घेतला. जेथे आपले वाडवडील राहिले, जेथे आपल्याला स्वतःला रहावयाचे आहे, मुलेबाळे वाढवावयाची आहेत, वार्धक्य गाठावयाचे आहे आणि शेवटी या धरतीचा निरोप घ्यावयाचा आहे त्या भूमीच्या सौंदर्याविषयीची गौरवभावना हे आपल्या मायभूमीच्या प्रेमाचे एक सर्वात महत्त्वाचे उगमस्थान आहे. आमच्या शेतांपेक्षा आणि कुरणांपेक्षा निसर्गाच्या विपुलतेने भरलेले देश या जगात आहेत; पण आमच्या मुलाना आपल्या मायभूमीचे सौंदर्य सर्वात प्रिय वाटले पाहिजे. वसंतात झाडे धवलांकित कशी होतात, हॉप वेलींच्या सोनेरी फुलांवर मधमाश्या कशा विहरतात, सफरचंदे कशी तयार होतात व टोमॅटो लाल कसे बनतात एवढेच मुलानी पहाता कामा नये – जीवनाचा आनंद आणि जीवनाची परिपूर्ण समृद्धता म्हणून त्यानी या सर्वांचा अनुभव घेतला पाहिजे. नखशिखान्त धवल वसनांचा साज ल्यालेली फळबाग, सातूच्या शेतांवर विहरणाऱ्या मधमाश्यांचे अनिर्वचनीय गीतगुंजन, शरदातले अथांग, शीतल आकाश आणि क्षितिजावर उडणारा क्रौंचपक्ष्यांचा थवा, गडद निळ्या टेकड्या आणि किरमिजी सूर्यास्तात लहरणारे विरल धुके, आरशासारख्या स्वच्छ तळ्यावर झुकलेले विलो वृक्ष, आणि रस्त्याच्या कडेला उभे असलेले उंच पॉप्लर अशा चमकत्या लखलखत्या प्रतिमानी पूरित झालेला काळ म्हणून त्याना आपले बालपण आठवू द्या. आपल्या बालपणाच्या काळातील जीवनसौंदर्य म्हणून, जे काही अत्यंत प्रिय आहे त्याची स्मृती म्हणून या सर्वांचा त्यांच्या हृदयावर अक्षय असा ठसा उमटू द्या.

पण, आपल्या बांधव झुंजाराना गोळयांच्या वर्षावातून वाचविण्यासाठी शत्रूच्या मशिनगनवर अंग झोकून देऊन हिंवाळयातल्या त्या गारठयाच्या रात्री एकोणीस वर्षांच्या अलेक्सांद्र मत्रोसोवने आपल्या छातीचा कोट केला नसता, निकोलाय गास्तेल्लोनी आपले पेटते विमान शत्रूच्या रडगाडयांवर झोकून दिले नसते, किंवा वोल्गापासून एल्बापर्यंत सहस्रावधी वीरानी आपले रक्त सांडले नसते तर या फुलारत्या फळबागा, त्या मधमाश्या, ती वत्सल अंगाईगीते पहाटेच्या समयाला अत्यंत हळुवारपणे तुमचे पाय तुमची आई पांघरुणाने झाकून घेत असताना तुम्ही पहात असलेली गोड स्वप्ने यांपैकी काही म्हणून काहीही दिसले नसते या विचाराच्या जोडीनेच या सौंदर्याचा मुलाच्या मनात प्रवेश झाला पाहिजे. मूल जेव्हा अस्तित्वाचा आनंद अनुभवीत असते अगदी नेमक्या त्याच क्षणाला हा विचार मुलाला आपण दिला पाहिजे. आपल्या अगदी याच खेडयात, याच शेतांवर, आणि याच झाडांखाली आपल्या मायभूमीच्या स्वातंत्र्यासाठी व स्वाधीनतेसाठी सोविएत सैनिक कसे लढले हे मी माझ्या विद्यार्थ्यांना सांगितले.

अस्तित्वाचा आनंद हे केवळ व्यक्तीच्या आत्मज्ञानाचे एक ठळक व्यक्तीकरण नसून सभोवतालच्या जगाचे, मूल जे स्वत:भोवती पहाते त्या-च्याशी असलेल्या त्याच्या क्रियाशील संबंधांचे ते मूल्यांकन आहे. समाज-सत्तावादी समाजातील जीवनाचे तर्कशास्त्रच असे आहे की, सभोवतालच्या जगाचे सौंदर्य हे आमच्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीने बालपणातल्या एका आनंदाचे – अस्तित्वाच्या आनंदाचे – एक उगमस्थान ठरते. म्हणूनच प्रत्येक फूल, गवताचे प्रत्येक पाते मुलाला आनंद प्राप्त करून देईल हे पहाण्याचा शिक्षकाने प्रयत्न केला पाहिजे. पण सभोवतालचे जग केवळ सुंदर आहे एवढयामुळेच ते मुलाना प्रिय बनते का? कारण अस्तित्वाचा आनंद म्हणजे वडील पिढयांकडून मुलाला मिळणाऱ्या विविध आंनदाची एक गुंफण आहे, याशिवाय दुसरे काही नाही. आणि आपल्या मायभूमीच्या स्वातंत्र्या-साठी व स्वाधीनतेसाठी आपल्या पितामहानी व प्रपितामहानी जे रक्त, घाम व अश्रू सांडले ते या छोटया जीवांच्या जेव्हा नजरेस येतात व त्याना ते जेव्हा जाणवतात तेव्हा सभोवतालचे जग त्याना प्रिय बनते. अस्तित्वाचा आनंद व नागरिकत्वाची भावना यांची एकमेकात होणारी गुंफण लिथुआ-नियन कवी मार्तिसन्‌क्याविचुस यानी आपल्या 'रक्त व रक्षा' या कवितेत फार सुंदर रीतीने व्यक्त केली आहे:

मातानो,
आपल्या मुलांमध्ये
आपल्या मायभूमीच्या प्रेमाची ज्योत
प्रज्वलित करा
ज्यायोगे
या उदात्त भावनानी
त्यांची मने
अधिक विरश्रीयुक्त, अधिक भव्योदात्त बनतील.
भिनू द्या त्यांच्या मनात
दिशादिशांतील ताऱ्यांच्या तेजाने
झगमगणारे मध्यरात्रीचे आपले आकाश
अधिक उंच नाही, ना अधिक सुंदर
पण त्याची तोड कधीच येणार नाही
इतरांच्या आकाशाला.
आणि हेही ध्यानात ठेवा
ज्यांच्या भावना
तुमच्या मुलांच्या भावनांत एकजीव होतील
तीच माणसे
त्याना प्रिय बनतील.

या सौंदर्याचे ज्यानी रक्षण केले त्या लोकांबाबतच्या जबाबदारीच्या भावनेशी अस्तित्वाचा आनंद जेव्हा एकरूप होतो तेव्हा आपली मायभूमी आपल्याला अपंरपार प्रिय बनते. बालपिढ्यांच्या नैतिक व सौंदर्यशास्त्रीय शिक्षणाची एकता या एकरूपत्वातून अभिव्यक्त होते. अस्तित्वाच्या आनंदाला कसलीही पीडा होता कामा नये हे म्हणणे बरोबर नाही. समाजसत्तावादी समाजाच्या विमुक्त नागरिकाच्या सुखासाठी करण्यात आलेले त्याग, भोगण्यात आलेल्या हालअपेष्टा व दुःखे यांच्या कथांची बालपणाच्या आनंदावर अभ्रे चढू नयेत असा जे शिक्षक विचार करतात ती त्यांची चूक असते.

शरदाच्या सुरुवातीला दिवस जेव्हा सूर्यप्रकाशाची उधळण करीत उगवतात तेव्हा सफरचंदाच्या फांद्या फळभाराने लवलेल्या असतात, द्राक्षांचे घोस तयार होतात, खळ्यातल्या गव्हाच्या राशी सोनेरी बनू

लागतात आणि पारदर्शक हवेत कोळयांची रुपेरी जाळी तरंगू लागतात. खेडयाच्या वेशीवर एक उंच टेकडी उभी होती. तिथून दूरवरचे नयनमनोहर दृश्य दृष्टिपथात येत होते. ओल्या आणि मी मुलाना तेथे घेऊन गेलो. तिथून निळसर कलिंगडांचे व त्यापलिकडील फळबागेचे दर्शन घडत होते. फळबागेच्या मागच्या बाजूला उंच पॉप्लर वृक्ष होते, नंतर स्टेपचा प्रदेश, हिंवाळी गव्हाची हिरवी शेते आणि क्षितिजावर गडद] नि या धुक्यातील दूरवरच्या टेकडया नजरेस पडत होत्या. मुलामुलींनी तेथे काही अनिर्वचनीय क्षण अनुभवले. त्यांच्या नजरेसमोर पसरलेल्या सौंदर्यात त्याना जाणवत होता तो त्यांच्या बालपणाचा काही भाग: रात्री या दूरच्या शेतांवरून त्यांचे आईवडील घरी येत असत. त्यांच्या प्रेमळ नजरेत सूर्य-प्रकाशाचे तेजोस्फुल्लिंग चमकत असत. आम्ही त्या टेकडीवर बसलो आणि मी सुष्ट व दुष्टतेसंबंधीची मुलाना एक गोष्ट सांगितली. सुष्टतेच्या जयाने मुले अतिशय हर्षभरित झाली.

एक आठवडयानंतर आम्ही पुन्हा त्या टेकडीवर गेलो. मुलांसमोर पसरलेल्या त्या अप्रतिम निसर्गचित्रात आता काहीतरी नाविन्य भरलेले आढळून येत होते—शरदाने आपल्या पहिल्यावहिल्या रंगच्छटांची उधळण केली होती. सफरचंदाची झाडे आणि पॉप्लर वृक्ष सोनेरी रंगात न्हाऊन निघाले होते, हिंवाळी गव्हाचे पाचूचे शेत अधिक तजेलदार बनले होते, आणि आकाशाची निळाई अधिक गडद झाली होती. अशा रीतीने, स्वच्छ, निर्मळ हवा अंतरात शोषण घेत आणि चंडोलाच्या भेटीसाठी वसंतात आपण येथे कसे येऊ याची स्वप्ने पहात सौंदर्याचा आनंद चाखण्यासाठी, सुंदर सुंदर लोककथांतील सुष्ट-दुष्टतेचा झगडा अनुभवण्यासाठी, शारदीय स्टेपचे संगीत ऐकण्यासाठी आम्ही दर आठवडयाला त्याच विशिष्ट वेळी त्या जागी येत असू. स्टेप प्रदेशातील या सांदीकोपऱ्याने मुलांच्या जीवनात प्रवेश केला आणि त्याना तो अतिशय प्रिय बनला. मुलांच्या हृदयावर चिरंतन कोरली गेलेली आपल्या मायभूमीची ती पहिली ठळक, स्पष्ट प्रतिमा होती.

सभोवतालच्या जगातील सौंदर्याच्या बोधनाशिवाय मायभूमीविषयीची भावना तुम्हाला जागृत करता येणार नाही. आपले बालपण आनंदाने परिपूरित रहावे म्हणून वडील पिढयाना जी जबर किंमत द्यावी लागली त्याबाबत बोलण्याआधी आपल्या मायभूमीच्या निसर्गसौंदर्याचे तुम्ही मुलाना प्रचीतीपूर्ण दर्शन घडविले पाहिजे. बालपणाच्या त्या दूरच्या काळातील

त्या छोटया सांदीकोपऱ्याचे स्मरण मुलाला नेहमीच जतन करू द्या. आपल्या महान मायभूमीची प्रतिमा या छोटया सांदीकोपऱ्याशी निगडित राहू द्या.

शरदातला तो एक शांत दिवस होता. टेकडीच्या माथ्यावरचा फारसा लक्षातही न येणारा एक खोलगट भाग मी मुलाना दाखविला आणि मी त्याना म्हटले :

"या खोलगट भागाकडे पहा. काळाच्या ओघात तो आता सपाट झाला आहे आणि त्याच्यावर गवत उगवले आहे... पण आजच्यासारख्याच एक सूर्यप्रकाशित शारदीय दिवशी आपले सैन्य या मार्गाने नीपरच्या पलिकडे माघार घेत होते. मशिनगन चालविणारा एक तरुण सैनिक या टेकडीच्या माथ्यावर आला. शत्रूला रोखून धरण्यासाठी आणि नीपर नदी त्याला गाठता येऊ नये म्हणून तो या माथ्यावर पाय रोवून उभा राहिला. शत्रूच्या मोटारसायकली रस्त्यावर दिसू लागल्या. मशिनगन चालविणाऱ्या त्या सैनिकाने त्यांचा धुव्वा उडविला. उखळी तोफांच्या व मोठया तोफांच्या साहाय्याने फॅसिस्टानी त्या टेकडीवर तोफगोळयांचा भडिमार सुरू केला. दक्षिणेच्या बाजूला ती टेकडी कशी उखळली गेली आहे पहा. तोफगोळयांच्या कवचाचे प्राणघातक तुकडे अजून तेथे पसरले आहेत. तोफगोळयांचे स्फोट बंद झाले. पुन्हा काही मोटारसायकलस्वार रस्त्यावर आले, आणि टेकडी पुन्हा एकदा जिवंत झाली – सोविएत सैनिकाच्या गोळयानी शत्रूसैनिकाना अचूक टिपले. फॅसिस्टांचा एक रणगाडा टेकडीच्या रोखाने चालून आला. तेथे जी झाडे दिसताहेत त्या झाडांपर्यंत तो आला आणि त्याने आग ओतायला सुरुवात केली. गोळीबार थांबला आणि पुन्हा मोटारसायकलस्वार रस्त्यावर आले. पुन्हा एकदा ती टेकडी जिवंत झाली. हातावर, डोक्यावर, छातीवर मार बसून तो तरुण सैनिक जबर जखमी झाला होता, पण त्याचे हात लढतच राहिले. त्याच्या डोळयांवरून रक्ताचे ओहळ वहात होते; आपल्या मायभूमीच्या या निळया आकाशाचे आपण हे शेवटचे दर्शन घेत आहोत हे त्याला जाणवले. पण त्याच्या मशिनगनच्या शेजारी तोफेचा एक गोळा येऊन त्या गोळयाचा स्फोट झाला तेव्हाच त्या तरुणाच्या हृदयाचे स्पंदन थांबले. संध्याकाळी शेतकरी तेथे आले, त्यानी एक खड्डा खणला व ते रक्ताने न्हाऊन निघालेले शरीर त्यानी त्या खड्ड्यात पुरले. सोविएत सैन्याने ते खेडे शत्रूच्या तावडीतून मुक्त करीपर्यंत त्या सैनिकाच्या देहाचे अवशेष तेथेच होते. त्या तरुणाचे सैनिक मित्र त्या टेकडीच्या माथ्यावर आले, त्यानी ते अवशेष बाहेर काढले, ते खेड्यात

आणले आणि सन्मानपूर्वक ते एका सामायिक थडग्यात पुरले. त्या वीराचे नाव आपल्याला ठाऊक नाही की आपल्या मुलाला कोठे पुरले आहे हे त्याच्या आईला ठाऊक नाही."

मुलांची मने शोकविव्हल झाली. जीवनसौंदर्याने आणि आपल्या मायभूमीच्या या सांदीकोपऱ्याच्या सौंदर्याने मुलांच्या मनात अधिकच प्रिय स्थान प्राप्त केले. त्या वीराच्या नजरेतून मुले जगाकडे पाहू लागली. आपल्याला सुखाने व शांततेने जगता यावे, आकाशात सदैव तारे लुक-लुकत रहावेत, गवताचा व सफरचंदांच्या झाडांचा परिमल चिरकाल दरवळत रहावा, नाकतोड्यांचे हळुवार गाणे स्टेप प्रदेशावर घुमत रहावे, आणि नव्या वर्षाच्या पूर्वरात्री फ्रॉस्ट आजोबांकडून मिळालेल्या भेटी आईने हळूच आपल्या उशाखाली ठेवाव्यात म्हणून या तरुणाने आपल्या प्राणांचे बलिदान केले होते हे त्याना उमजले... मुले अगदी स्तब्ध झाली व रक्ताचे सिंचन झालेल्या त्या धरतीकडे पहात राहिली. मातीच्या प्रत्येक कणाला, गवताच्या व करडईच्या प्रत्येक पात्याला आलिंगन द्यावे, कुरवाळावे असे त्याना वाटले.

त्या रात्री माझ्या कित्येक विद्यार्थ्यांचा डोळ्याला डोळा लागणे कठीण गेले असेल ही गोष्ट अगदी शक्य आहे. त्यांच्या नजरेसमोर प्रथम तेजस्वी सूर्यप्रकाशाने उजळलेला आणि नंतर युद्धाच्या काळ्याकुट्ट धुराने काळवंडलेला आपल्या मायभूमीचा स्टेप प्रदेश पसरला होता. त्यांचे हृदय वेदनेने कळवळले. त्यादिवशी त्यानी पाहिलेले, पुढच्या दिवसात व पुढच्या वर्षी ते पहाणार असलेले सौंदर्य त्या वीराला कधीही पहायला मिळणार नव्हते. त्या विचाराने त्यांच्या डोळ्यात पुन्हा अश्रू जमा झाले; आणि त्यांच्या स्वप्नात त्याना दिसत होते आपल्या मातांचे प्रेमाने कुरवळणारे हात.

दुसऱ्या दिवशी शाळा सुरू होण्यापूर्वीच सकाळी वाऱ्या माझ्याकडे आली. आदल्या दिवशी संध्याकाळी तिने एक कविता केली होती. ती कविता तिने मला म्हणून दाखविली:

स्टेपच्या प्रदेशाकडे जाणाऱ्या रस्त्याच्या बाजूला
उभी आहे एक टेकडी
घोघावले आहेत अनेक वर्षे त्या टेकडीवर वारे
तळपला आहे सूर्यप्रकाश तिच्या माथ्यामाथ्यावर
तिच्या अंगांअंगांवरून

तरंगून गेले आहे शरदातले धुके.
अवतरला एक क्रूर शत्रू आमच्या भूमीवर
उभा होता त्या टेकडीवर
एक वीर तरुण
आणि रक्षिला त्याने तो रस्ता
त्या पाशवी शत्रूपासून
प्राणार्पण केले एका तरुण योद्धयाने
येथे, या प्राचीन टेकडीवर
उरी घेऊन तोफगोळयांचे तुकडे,
या धरतीवरच
त्याचे रक्तरंजित हृदय थडथडत होते,
निळे आकाश बनले काळेकुट्ट
वादळी ढगाने
झाकून गेला सूर्य...
कधीही विस्मरण होणार नाही तुझे आम्हाला
मृत्यूला कवटाळलेस तू आम्ही जगावे म्हणून;
जेथे तुझ्या हृदयाने स्पर्श केला पृथ्वीला
तेथेच आम्ही रोवला आहे आज
एक ओकवृक्ष.

एक आठवडयानंतर आम्ही पुन्हा त्या टेकडीवर गेलो. तो वीर कोण होता, तो कुठे जन्मला होता, तो कुठे शिकला होता आणि त्याची आई कोण होती हे जाणून घ्यायची मुलाना इच्छा होती. त्यावेळी मुलांच्या जे नजरेला आले व मुलानी जे ऐकले ते सर्व मुलानी आपल्या मायभूमीसाठी प्राणार्पण करणाऱ्या त्या वीराच्या नजरेने पाहिले. आपल्या भावना व्यक्त करण्यासाठी काहीतरी करण्याची मुलाना इच्छा होती. पानगळ सुरू झाली तेव्हा मुलानी एक छोटा ओकवृक्ष त्या टेकडीच्या माथ्यावर आणला. मुलांच्या हृदयात प्रेमळ भावनांच्या कोमल ऊर्मी जेव्हा लहरू लागतात तेव्हा कोणत्याही शब्दांची गरज भासत नाही. मुलानी जी गोष्ट केली त्यामागे प्रगाढ भावना होत्या: ती टेकडी हिरवीगार बनावी म्हणून आम्ही केवळ ते झाड तेथे लावीत नव्हतो – वीराचे एक जिवंत स्मारक आम्ही तेथे उभे करीत होतो.

या टेकडीवर ओकवृक्षाची वाढ होणे कठीण आहे हे मुलाना ठाऊक होते. पण त्यानी कोणत्याही अडचणीना भीक घातली नाही. हिंवाळ्यात ते झाड बर्फाने आच्छादून आम्ही गार वाऱ्यांपासून त्याचे रक्षण केले. वसंतामध्ये ती टेकडी जेव्हा कोवळया गवताने आच्छादून गेली तेव्हा त्या झाडाला कळे फुटले की नाही हे पहाण्यासाठी मुले रोज तेथे धावत जात असत. ती केवळ झाडाची निगा नव्हती—वीराबरोबर होणारी ती भेट होती. तो छोटा ओकवृक्ष हिरवागार बनला आणि त्याच्या प्रत्येक पानातून मुलाना त्या भीषण दिवसांचे पडसाद ऐकू येऊ लागले. ज्यानी त्या सैनिकाला पुरले होते त्या वृद्ध माणसानी त्या वीराने गाजविलेल्या पराक्रमाचा दिवस कोणता हे शोधून काढण्यास आम्हाला मदत केली. तेजस्वी गौरवाचा, स्मृतीचा व शोकाचा दिवस म्हणून आम्ही दर वर्षी तो पाळत असू. त्या दिवशी सकाळी मुले लवकरच शाळेत येत आणि आपल्याबरोबर ती फुले आणीत. त्या फुलांचे ती टवटवीत पुष्पचक्र बनवीत आणि त्या पराक्रमी कथेनुसार वीराचे जेथे पतन झाले होते तेथे ती ते पुष्पचक्र वहात.

मुलांच्या दृष्टीने टेकडीचा तो माथा म्हणजे आपल्या मायभूमीच्या स्वांतत्र्याचे व स्वाधीनतेचे रक्षण करणाऱ्या वडील पिढयांच्या शौर्याचे एक प्रतीक बनले. "जिच्यासाठी वडील पिढयानी आपले रक्त सांडले त्या भूमीचे तुम्ही स्वामी आहात. आपली मायभूमी संपन्न व बलशाली बनावी याची तुम्ही दक्षता घेतली पाहिजे" हा विचार मी मुलाना सुचवला.

एका ऊबदार दिवशी ओल्याने व मी मुलाना "वीरांच्या राई"कडे नेले. जेथे १९४१ च्या शरदाच्या अखेरी फॅसिस्ट कब्जाच्या काळात खऱ्या-खुऱ्या शौर्याने व त्यागाने भरलेली एक शोकान्तिका घडली त्या जागी विद्यार्थ्यानी उभारलेले ते गौरवस्मारक होते. फॅसिस्टानी सामुदायिक शेताची फळबाग उध्वस्त केली आणि युद्धकैद्यांसाठी तेथे छळ-छावणी उभारली. काटेरी तारांचे कुंपण केलेल्या या आवारात, उघडयावर, सोविएत सैन्यातले सहा हजार जखमी, भूकेले, अर्धनग्न सैनिक व अधिकारी मृत्यूच्या दाढेत लोटले गेले होते. लोकांचे पाणी तोडण्यात आले होते. शरदातल्या गारठलेल्या रात्री थिजलेल्या जमिनीवरचे भुरभुरीत सफेद बर्फ लोक गोळा करीत आणि गवत पोटात भरत. दररोज डझनावारी सैनिक मरत होते. क्रूर पाशवी वृत्तीने त्या सर्व माणसांच्या मृत्यूची फॅसिस्ट वाट पहात होते. ती माणसे मेली की शेजारचे दारूगोळयाचे कोठार उडवून

द्यावयाचे आणि विमानातून बॉम्ब टाकून आपल्याच लोकाना मारल्याबद्दल सोविएत सेनेवर दोष ठेवायचा असा त्यांचा बेत होता.

सोविएत देशभक्तानी छावणीत एक गुप्त संघटना उभारली आणि तेथून सर्वानी सुटका करून घ्यावयाची तयारी केली. पुढे एका रात्री कडाक्याच्या थंडीत त्या छावणीतील हजारो लोक पावसात व वाऱ्यात कुड-कुडत असताना सैनिक व अधिकारी वीस ठिकाणी काटेरी कुंपणाजवळ सरकत गेले. मृत्यूला कवटाळायलाच ते जात होते. त्या कुंपणावर पडून त्यानी आपल्या शरीरांचे जिवंत पूल बनविले आणि त्यांवरून पलिकडे उड्या टाकून कित्येक लोकानी स्टेप प्रदेशात पलायन केले. त्या रात्री चार हजाराहून अधिक लोकाना शेतकऱ्यानी लपवून ठेवले; आणि कोणालाच ते सापडले नाही – गेस्टॅपोनाही नाहीत किंवा त्यांच्या पित्त्यानाही नाहीत. चार हजार लोकाना पुन्हा हाती शस्त्र घेता यावे आणि आपल्या मायभूमी-च्या स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्यांच्या फळीत सामील होता यावे म्हणून चारशे वीरानी आपल्या प्राणांचे बलिदान केले होते.

फॅसिस्टांच्या तावडीतून त्या खेड्याची मुक्तता करण्यात आल्यानंतर ती पवित्र जागा ही एक बहरती वनराई बनावी, त्या वीरांचे ते एक जिवंत स्मारक बनावे असे विद्यार्थ्यानी ठरविले. त्यानी ती जागा साफ केली, खंदक भरून काढले आणि तेथे त्यानी ओकची चारशे झाडे लावली. आपल्या बांधवमित्रांचे प्राण वाचविण्यासाठी ज्यानी आपल्या जीवाची कुरवंडी केली त्यांच्यासाठी उभारलेली ती चारशे जिवंत स्मारके होती. ओकवृक्ष पुष्कळ उंच वाढतात आणि शौर्यशाली पराक्रमाच्या आख्यायिका एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे सुपूर्द होतात. ही ओकवृक्षांची राई लावल्यानंतर कित्येक वर्षानी बालवीर पथकांत सामील झाल्यानंतर विद्यार्थ्यांच्या नव्या पिढीने या राईशेजारीच आपले स्वतःचे ओकचे वृक्ष लावले. वीरांच्या रक्ताने जेथे काटेरी कुंपण भिजले होते, जेथे त्यांच्या हृदयांची रक्षा धरतीत मिळाली होती तेथे सर्वात प्रदीर्घ काळ जगणारे जिवंत झाड वाढू द्या हा त्यांचा विचार होता. बालवीर पथकांत सामील होताना प्रत्येक विद्यार्थी आपले स्वतःचे झाड लावीत असे. "वीरांच्या राई"त एक ओकवृक्ष लावणे ही या संघटनेत सामील होणाऱ्या प्रत्येकाचीच एक परंपरा बनली.

ओल्या आणि मी मुलांबरोबर तेथे गेलो आणि वीरांच्या पराक्रमाबद्दल तिने त्याना माहिती दिली व आपण लावलेला ओकवृक्ष दाखविला. आपण

केव्हा बालवीर होऊ याची मुले अधीरतेने प्रतीक्षा करीत होती.

वसंताचे आगमन झाले. लेनिन यांच्या जयंतीला* काही आठवडेच उरले होते. त्या दिवशी नव्या बाल-लेनिनवाद्याना संघटनेत सामील करून घेण्याच्या समारंभानिमित्त एक उत्सवसभा भरविण्यात आली होती. आम्ही पुन्हा एकदा "वीरांच्या राई"त गेलो. प्रत्येक मुलाने ओकचे एक रोप, एक फावडे आणि पालापाचोळा कुजवून तयार केलेल्या मातीची एक टोपली आणली होती. त्यानी ती झाडे लावली व त्याना पाणी घातले. येथे, शौर्यशाली पराक्रमाने पूनित झालेल्या या पवित्र जागी, २२ एप्रिलला, त्या मुलांच्या वडीलधाऱ्या मित्रानी या मुलांच्या गळ्याभोवती बालवीरांचे लाल रुमाल बांधले. येथे बाल-लेनिनवाद्यानी आपल्या समाज-सत्तावादी मायभूमीचे खरेखुरे देशभक्त बनण्याची पवित्र शपथ घेतली.

वर्षातून अनेकदा आम्ही "वीरांच्या राई"त जात असू. वसंताच्या सुरुवातीला झाडावरचा सुकलेला पालापाचोळा आम्ही साफ करीत असू आणि जीर्ण फांद्या काढून टाकीत असू. त्याचबरोबर थंडीमुळे हानी पोहोचलेल्या झाडांच्या जागी नवी झाडे लावीत असू. ओसरत्या शरत्काला-तल्या ज्या दिवशी त्या वीरानी ते विलक्षण पराक्रमी कृत्य केले होते त्या दिवशी आमची बालवीर सभा आम्ही त्या ठिकाणी घेत असू. आता काटेरी तारांच्या कुंपणाच्या जागी उंच ओकवृक्ष वाढले होते. मुले निःशब्दपणे त्या ठिकाणी येत व आपल्या झाडाच्या खाली पुष्पे अर्पण करीत. या चिरस्मरणीय रात्री धरती जेथे लाल रक्ताने माखून निघाली होती तेथे ॲस्टर व क्रिसन्थेमम फुलांच्या ज्वाला लहरत असत.

उन्हाळ्याच्या सुटीच्या प्रारंभी किंवा लांब सहलीला निघण्यापूर्वी — अशा आनंदांच्या प्रसंगीही — आम्ही "वीरांच्या राई"त जात असू. त्या पूनित जागी नेहमीच एक पवित्र शांतता पसरलेली असे. येथे कोणीही धावत, हुंदडत नसे, खेळत नसे, किंवा आरडाओरडा करीत नसे: सृष्टीसौंदर्याचा आस्वाद घेण्याचे, विश्रांतीचे किंवा वाचन करण्याचे ते ठिकाण होते. ज्यांच्या वडिलाना महान देशाभिमानी युद्धात मरण आले होते अशांची मुलेमुली येथे येत. ज्याचे वडील दूरवर, आर्क्टिक महासागराच्या किनारी किंवा कार्पेथियन पर्वतांमध्ये मृत्यमुखी पडले होते

---

*लेनिन यांचा जन्म २२ एप्रिल १८७० रोजी झाला. त्यांच्या स्मरणार्थ दर वर्षी हा दिवस उत्सवदिन म्हणून मानला जातो.

अशा पुत्राला आपल्या वडिलांच्या थडग्यासमोर येथे नतमस्तक होता येत होते. आपल्या मरणाचे मोल देऊन ज्यानी सूर्यप्रकाशाचे, फुलांचे व सोविएत लोकांच्या मुक्त श्रमाचे जतन केले होते त्या वीरांच्या कथा येथे एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे पोहोचविल्या जात होत्या.

टेकडीच्या माथ्यावरचा ओकवृक्ष उत्तरोत्तर उंच उंच वाढत होता. अभिमानाने आपल्या फांद्या आकाशाकडे झेपावणारा तो वृक्ष कोणताही प्रौढ माणूस जेव्हा पाहील तेव्हा त्याचे मन ओजाने थरारून जाईल आणि आपली मायभूमी त्याला अधिकच प्रिय बनेल.

अशीच दशकानुदशके लोटतील, युद्धात लढलेली माणसे या जगाचा निरोप घेतील, पण या अभूतपूर्व युद्धात जे लढले आणि फॅसिस्ट गुलामगिरीच्या पाशाच्या धोक्यातून ज्यानी मानवजातीला वाचविले त्यांच्या पराक्रमाचे नव्या पिढ्याना गौरवादरपूर्वक व कृतज्ञतापूर्वक स्मरण राहील.

युद्धाने लादलेला अपरिमित भीषण संहार, प्रचंड विपत्ती, घोर यमयातना, आगीचे तांडव, बॉम्बच्या स्फोटामुळे मृत्यूचे क्षण मोजणाऱ्यांचे आर्त विव्हळणे, फॅसिस्ट जर्मनीमध्ये सक्तीच्या वेठबिगारीसाठी नेण्यात आलेल्या लोकांच्या कंठातून फुटलेले हुंदके, आघाडीवर जायला निघालेल्या वडिलांची कडकडून पडलेली मिठी, आपल्या पतीच्या किंवा वडिलांच्या मृत्यूची बातमी देणाऱ्या पत्रामुळे स्त्रियांच्या नेत्रांतून पाझरणाऱ्या अश्रूंच्या धारा आपण कधीही विसरता कामा नयेत... धारातीर्थी पतन पावलेल्या वीरांच्या चिरंतन स्मारकाचा बालपिढ्यानी पाया रचला पाहिजे. आज आम्ही जेथे शिकत आहोत त्या शाळेचा, या गावावर फॅसिस्टांचा कब्जा असताना, सक्तीच्या वेठबिगारीवर पाठविण्यात येणाऱ्या सोविएत तरुण स्त्रीपुरुषांसाठी स्थलांतराच्या काळातील तात्पुरता तुरुंग म्हणून उपयोग करण्यात येत होता. ही गोष्ट तुम्ही कधीही विसरता कामा नये मुलानो! तुम्ही मोठे व्हाल, तुम्हाला मुले होतील; पण शत्रूविषयी तुम्हाला वाटणाऱ्या या जळजळीत द्वेषाची मशाल तुम्ही त्यांच्या हाती सुपूर्द केली पाहिजे.

युद्धापूर्वी आमच्या गावात ५,१०० माणसे होती. महान देशाभिमानी युद्धाच्या काळात त्यांच्यापैकी आमच्या ८३७ ग्रामबांधवाना – ७८५ पुरुषाना व ५२ स्त्रियाना – आघाडीवर वीरमरण आले. आघाडीवरून न परतलेल्या या ८३७ लोकांव्यतिरिक्त ६९ लोकाना फॅसिस्टांच्या मृत्यु-छावणीत मरण आले. उपासमारीमुळे व अमानुष छळामुळे त्याना मृत्यू

आला. त्यांचे हालहाल करण्यात आले, त्याना ठार मारण्यात आले आणि दहनभट्टीत जाळण्यात आले. फॅसिस्टानी त्यांची राख पायदळी तुडविली. बुखेनवाल्डपासून जवळच असलेल्या वैमारच्या पंचक्रोशीतील शेतकऱ्यांची जमीन तुमच्या भावांच्या व बहिणींच्या, मातांच्या व वडिलांच्या रक्षेने सुपीक बनली आहे. आपल्या भावांच्या व बहिणींच्या, वडिलांच्या व आजोबांच्या या रक्षेचे तुमच्या छातीवर आघात होऊ द्यात. तुमच्या मुलांच्या आणि नातवंडाच्या छातीवर तिचे आघात होऊ द्यात. आपल्या खेड्यातील २७६ कुमाराना, तरुण स्त्रीपुरुषाना बळजबरीने पकडण्यात आले होते आणि त्याना जर्मनीतील फॅसिस्ट छावण्यांमध्ये नेण्यात आले होते हे विसरू नका. त्यांपैकी १९४ तरुणाना उपासमारीमुळे व अतिश्रमामुळे मृत्यु-छावण्यांत मरण आले आणि त्यांच्यापैकी काहीना दहनभट्टीत जाळण्यात आले. पावेलच्या भावाला बोखुम शहरात नेण्यात आले होते आणि तेथे घातपाताच्या आरोपावरून तापलेल्या सळयानी त्याचे डोळे बाहेर काढण्यात आले. त्यानंतर त्याला लाकडी बुंध्याशी उभा करून त्याच्या जिवंत शरीरात खिळे ठोकण्यात आले. कम्युनिस्ट प्रचाराबद्दल तान्याच्या बहिणीला जिवंत गाडण्यात आले. कोस्त्याच्या काकाना एका लोखंडी पिंजऱ्यात टाकण्यात आले. कित्येक दिवस विवस्त्रावस्थेत ते यमयातना भोगीत होते व शेवटी हाल हाल होऊनच त्याना मरण आले. युराचा चुलतभाऊ आपली सुटका करून घेऊन निसटून जात असताना त्याच्यावर धनगरी कुत्रे सोडण्यात आले आणि जिवंतपणीच त्याच्या शरीराची लक्तरे करण्यात आली. वाल्याच्या चुलत बहिणीचे मूल तिच्याकडून छिनावून घेण्याचा एका फॅसिस्ट अधिकाऱ्याने हुकूम केला आणि तिच्या डोळयादेखत त्याचे डोके दगडावर चेचण्यात आले. २६ वर्षांच्या ल्यूस्याच्या आत्याला आपल्या दोन मुलांसहित – तिच्या चार वर्षांच्या मुलीसहित व तीन वर्षांच्या मुलग्यासहित – ऑशविझ येथील फॅसिस्ट छळ-छावणीत नेण्यात आले. छावणीमध्ये तिला तिच्या मुलांपासून वेगळे करण्यात आले. त्या स्त्रीने फॅसिस्ट अधिकाऱ्याना सांगितले," ती मुले आजारी आहेत; मी तुमच्या पाया पडते, पण त्याना माझ्यापाशीच राहू द्या!" ते फॅसिस्ट किंचाळले: "ती आजारी आहेत काय? मग आम्ही त्याना बरे करतो..." असे म्हणून त्या दुःखविव्हल आईसमोरच त्या विवस्त्र मुलाना त्यानी खडकावर आपटले आणि त्या मुलांची शरीरे त्यानी आपल्या बुटांखाली तुडविली...

मी मुलाना म्हटले "या गोष्टी आपण आपल्या केवळ स्मरणातच

ठेवता कामा नयेत, तर मानवी सदसद्विवेकबुद्धीला आवाहन करणारे हे स्मरण आपण आपल्या सर्व भावी पिढ्यानाही दिले पाहिजे." आम्ही सर्वांनी मिळून खेड्याचे एक वीरमंदिर–सोविएत मायभूमीच्या स्वातंत्र्या-साठी व स्वाधीनतेसाठी ज्यानी देह ठेवला अशा वीरांच्या छायाचित्रांचे एक दालन–उभारावयाचे ठरविले. तिसऱ्या इयत्तेच्या अखेरीला व चवथ्या इयत्तेच्या सुरुवातीला मुलानी खेड्यातल्या सर्व कुटुंबाना भेटी दिल्या.

युद्धात वीरमरण आलेल्या आणि फॅसिस्टांच्या मृत्यूछावण्यांत यमयातना भोगिलेल्या आपल्या मुलांची छायाचित्रे त्यांच्या मातानी आम्हाला दिली. छोटचा छायाचित्रांवरून तयार केलेली त्यांची चित्रे आम्ही आमच्या "गौरव व शोक दालनात" ठेवली. ती त्या मंदिराची सुरुवात होती; शालेय मुलांच्या नव्या पिढ्या हळू हळू ते मंदिर पूर्ण करणार होत्या. आम्ही आमच्यासमोर ठेवलेले ते ध्येय होते. पुन्हा कधीही युद्ध होऊ नये, लोकां-मध्ये परस्परात बंधुत्वाचे नाते निर्माण व्हावे, आणि मुलांचा जन्म व्हावा तो युद्धासाठी व मृत्यूसाठी नव्हे तर शांततेसाठी व सुखासाठी व्हावा म्हणून हे कार्य तडीस नेणे हे आम्ही आमचे कर्तव्य मानले होते. संपूर्ण जगातील सर्व लोकांच्या बाबतीतील हे आमचे कर्तव्य होते–फॅसिझमच्या भयानकतेची व भीषणतेची पुनरावृत्ती घडू नये म्हणून कोणतीही गोष्ट आपण विसरता कामा नये किंवा त्या गोष्टीना क्षमा होता कामा नये ही आमची प्रतिज्ञा होती.

एका छावणी-सहलीच्या वेळी नीपरच्या मोकळया किनाऱ्यावर उंचवटचाच्या जागी आम्ही रात्रीचा मुक्काम केला होता. घळीतल्या झऱ्या-तून पाणी आणण्यासाठी मुलाना अनेक वेळा खाली जावे लागे, आणि प्रत्येक वेळी त्याना वळसा घ्यावा लागे. मार्गाच्या मध्यावरच एक मोठा गोल प्रस्तर होता आणि त्याला वळसा घालून मुलाना जावे लागत असे.

"हा दगड इथे कशाला पडला आहे?" आश्चर्य व्यक्त करीत मुलानी विचारले. "झाडीत जाताना लोकाना वळसा घालून जाण्याची काय गरज आहे? आपण तो मार्गातून बाजूलाच सारला तर?" सद्धेतूनेच मुलानी तो प्रस्तर गडगडत बाजूला नेला व मार्ग साफ केला. सकाळी एक म्हातारा कोळी आमच्यापाशी आला. तो दगड कुठे आहे असे तो विचारीत होता. मुलाना वाटले तो आपल्याला आता नक्कीच शाबासकी देणार; पण त्याने मान हलवली आणि तो म्हणाला, "पुष्कळ वर्षे तो प्रस्तर

तेथे आहे. तीच ती जागा..." असे म्हणून तीन सोविएत टेहळणी सैनिकांची कथा त्यानी आम्हाला सांगितली. नीपरच्या महान रणक्रंदनात ते तीन सैनिक नदी ओलांडून तेथे आले होते आणि आपल्या बंदुकांसहित ते या प्रस्तरामागे दडून बसले होते. शत्रूचे संख्याबळ त्यांच्यापेक्षा पुष्कळच मोठे होते. पण एक दिवस व एक रात्र ते त्या शत्रूशी लढत होते. फॅसिस्टानी तोफगोळयाचा व उखळी तोफांचा त्यांच्यावर मारा केला. कित्येक तास त्यांच्याभोवती तोफगोळयांचे व सुरुंगांचे स्फोट होत होते; पण एखाद्या अभेद्य किल्ल्यासारखा तो प्रस्तर त्या सैनिकांचे रक्षण करीत होता. त्या रात्री सोविएत सैन्याने नदी ओलांडली आणि त्यानी त्या सैनिकांची सुटका केली. प्रस्तरामागच्या त्या सैनिकांची शरीरे रक्ताने माखली होती, बंदुकीच्या गोळयानी व तोफगोळयांच्या कवचानी त्याना जखमा झाल्या होत्या; पण ते शरण गेले नाहीत. त्याना नीपरच्या पलिकडील लष्करी रुग्णालयात पाठविण्यात आले; त्यांची नावे येथे कोणा-लाच ठाऊक नाहीत. पण त्या वीरांच्या पराक्रमाचे स्मारक म्हणून हा काळा प्रस्तर येथे उरला आहे. मुले त्या प्रस्तराजवळ गेली आणि मूकपणाने कितीतरी वेळ ती त्या प्रस्तरासमोर उभी राहिली. त्यानी झुडुपांतून तो ढकलत ढकलत वर आणला आणि पुन्हा जेथे होता तेथे उभा केला. आणि नंतरच त्यांच्या लक्षात आले की त्या प्रस्तराच्या गोळयानी व स्फोट झालेल्या तोफगोळयांच्या कवचानी कपच्या उडाल्या होत्या. त्या प्रस्तराच्या अनेक कपच्या मुलाना खाली पडलेल्या दिसल्या आणि स्मृती म्हणून त्या कपच्या प्रत्येक मुलाने आपल्याबरोबर घेतल्या.

त्या वेळेपासून छावणीदाखल येणाऱ्या मुलांचा रस्ता नेहमीच त्या पवित्र प्रस्तरावरून जातो. टेकडीवरच्या ओकवृक्षाप्रमाणे आणि "वीरांच्या राई"प्रमाणे तो काळा प्रस्तर आता बालहृदयांत देशभक्तीच्या प्रगाढ भावना जागृत करणारे शौर्यशाली कृतिसौंदर्याचे एक प्रतीक बनले आहे.

आपल्या बालपणाच्या काळात आपल्या पूर्वजांच्या शौर्यशाली कृत्यांशी माणसाने कोणत्या प्रकारचे संबंध जोडलेले असतात यावर त्याचा नैतिक दृष्टिकोन, व सामाजिक हितसंबंधांबाबतची आणि आपल्या मायभूमीच्या भल्यासाठी वेचण्यात येणाऱ्या श्रमांसंबंधीची त्याची वृत्ती अवलंबून असते. जेथे आम्ही आज काम करतो त्या पलिकडच्या टेकडीवर वीरानी आपले रक्त सांडले होते या विचाराने मुलांची हृदये थरारून उठावीत असा मी प्रयत्न केला. आपल्या मायभूमीच्या कल्याणार्थ जिथे आपण जन्मलो त्या

धरतीवर काम करणे हा फार मोठा आनंद आहे आणि त्यासाठीच लोक प्राण पणाला लावून लढ्यात उतरले या निष्ठेला भावनांतून बळकटी प्राप्त होते आणि मुलाच्या हृदयाच्या गाभ्याच्या अंतर्गाभ्यात सदसद्विवेकबुद्धीचा एक आवाज उमटू लागतो : तुमच्यासाठी प्रकाशाचे व जीवनाचे जतन व्हावे म्हणून ज्यानी आपल्या प्राणांचे बलिदान केले त्यांचे देह या पॉप्लरच्या व बर्चच्या, सफरचंदांच्या व ओकच्या वृक्षांखाली पहुडले आहेत म्हणूनच केवळ निळया आकाशाकडे पहात तेजस्वी सूर्यप्रकाशात तुम्हाला पावले उचलता येतात.

बाल-लेनिनवाद्याना हा आवाज याच गोष्टीचे स्मरण करून देत आहे की, आपल्या मायभूमीचे तुम्ही भावी स्वामी आहात. वडीलधाऱ्या पिढ्यानी निर्माण केलेल्या भौतिक व आत्मिक मूल्यांचे आपण स्वामी आहोत या भावनेतच प्रौढ नागरिकत्वाच्या भावनेचे मूळ सामावले आहे. आपल्यासाठी ज्यानी तेजस्वी सूर्यप्रकाशाचे व निळया आकाशाचे रक्षण केले त्यांच्यासंबंधीच्या कर्तव्याची मुलांच्या कामाला कशी प्रेरणा द्यावयाची याचा मी व ओल्याने विचार केला. एकदा मुले आपल्या शेतावर आली. ज्या नापीक जमिनीत यापूर्वी कधीही काहीही पिकले नव्हते त्या जमिनीत गहू तयार करण्यासाठी त्या जमिनीच्या तुकड्यावर कित्येक सेंटनर कुजलेली माती मुलाना घेऊन यावयाची होती. ते काम बिकट व एकसुरी होते. १९४३ साली वोल्गा नदीवरील महान लढाईतील उग्रकठोर काळात मिखाईल पनिकाको या उक्रेनियन कम्युनिस्ट युवक संघटनासदस्याने गाजविलेल्या शौर्यशाली पराक्रमाची कथा ओल्याने काम सुरू होण्यापूर्वी मुलाना सांगितली.

फॅसिस्ट रणगाड्यांचा रस्ता रोखून धरणाऱ्या खंदकात तो एकोणीस वर्षांचा युवक उभा होता. शत्रूचा रणगाडा खंदकापर्यंत आला. स्फोटक द्रव्यानी भरलेली बाटली रणगाड्यावर फेकून तो रणगाडा उध्वस्त करण्यासाठी सैनिकाने ती बाटली उगारली. त्याच क्षणाला एक गोळी त्याने उंचावलेल्या हातातल्या बाटलीवर येऊन थडकली. बाटलीतल्या द्रवणाचा स्फोट झाला आणि त्याचे कपडे पेटून तो जाळ त्याच्या चेहेऱ्याला येऊन भिडला. तो सैनिक म्हणजे आपल्या पाठीमागे आगीच्या ज्वाळांचा व धुराचा लोट लोटीत पुढे जाणारी एक जिवंत मशाल बनली. मिखाईल-च्या हातात स्फोटक द्रव्यांची शेवटची बाटली होती. शत्रूच्या चिलखती रणगाड्यावर तो चढला. त्याने रणगाड्याच्या झरोक्याच्या आवरणावर

बाटलीने प्रहार केला. रणगाड्याने पेट घेतला आणि तो गर्‌कन फिरला. रणगाड्याचा स्फोट होण्यापूर्वी अगदी शेवटच्या क्षणी मिखाईल एकदम ताठ उभा राहिला, आपला जळता हात त्याने उंच केला आणि प्रचंड आवाजात एल्गार पुकारला. सैनिकानी त्याची रणगर्जना ऐकली, ते खंदकातून बाहेर पडले, शत्रूला त्यानी निपटून काढले आणि रस्ता काबीज केला.

त्या कथेने मुलांच्या मनावर प्रभाव पाडला. त्या क्षणकालांच्या दरम्यान जणू काही तो वीर जिवंत व अमर रूपात त्यांच्या शेजारी उभा राहून त्याना सांगत होता: "आपल्या पवित्र मायभूमीच्या अगदी अशाच जमिनी-च्या तुकड्यासाठी मी माझे प्राण अर्पण केले आहेत. तेथे काटे वाढतात की गहू वाढतात याबाबत कोणी कसे बेपर्वा राहू शकेल?" त्याच क्षणी प्रत्येक हृदयातून सदसद्विवेकबुद्धीचा एक आवाज ऐकू आला: नाही, मला बेपर्वा रहाता येणार नाही.

मुले कामाला लागण्यापूर्वी प्रत्येक वेळी शौर्यशाली पराक्रमाची एखादी कथा मुलाना सांगितली पाहिजे असा माझा विचार नाही. तू आळशी राहिलास, काम जसे करावयास पाहिजे तसे केले नाहीस तर आपल्या मायभूमीविषयीचे कर्तव्य बजाविण्यात तू कसूर करीत आहेस असे आपण मुलाला सुचविता कामा नये. कर्तव्याची भावना ही अत्यंत पवित्र भावना आहे आणि मुलाने ती आपल्या हृदयात अत्यंत सुरक्षितपणे जतन करून ठेवली पाहिजे. त्याचबरोबर मुलाच्या मनात नागरिकत्वाच्या पहिल्या कल्पना जागृत करून जगावे कसे हे शौर्यशाली पराक्रमांच्या कथानी मुलाना शिकविणे हेही महत्त्वाचे आहे. आगामी काम आणि मिखाईल पनिकाकोची कथा यांचा अर्थाअर्थी काहीही संबंध न जोडता, कोणताही उपदेश न करता, केवळ एक नागरिक म्हणून आपल्या मायभूमीच्या या छोट्याशा जमिनीच्या तुकड्याकडे मुलाने पहावे या दृष्टीने ओल्याने ती कथा मुलाना सांगावी असा मी ओल्याला सल्ला दिला.

## मुले बाल-लेनिनवादी संघटनेत सामील होतात

१९५५ च्या वसंतात, तिसरी इयत्ता पूर्ण होण्याच्या काही काळ आधी, मुले व्ला. इ. लेनिन बालवीर संघटनेत सामील झाली. कम्युनिस्ट युवक संघ समितीने त्यांच्या नेतृत्वपदी ओल्याची नेमणूक केली. त्यावेळी ती आठव्या इयत्तेत शिकत होती.

परंपरेनुसार, झोया कस्मोदेम्यान्स्काया बालवीर पथकाची पवित्रगंभीर सभा २२ एप्रिलला लेनिन जयंतीच्या दिवशी भरविण्यात येत असे. तो दिवस उजाडण्याच्या पुष्कळ आधीपासून ओल्याने व तिच्या कॉम्रेडस्नी बालवीर संघटनेत सामील होणाऱ्या मुलांची तयारी सुरू केली होती. आठव्या इयत्तेतील विद्यार्थ्यांनी मुलाना लेनिनवादी पक्ष, कम्युनिस्ट युवक संघ आणि बालवीर संघटना यांचा शौर्यशाली इतिहास सांगितला.

ओल्या त्याना म्हणाली, "ज्या माणसाच्या शौर्यशाली कृत्यांची तुम्हाला सर्वात जास्त प्रेरणा मिळाली असेल त्याचे नाव तुमच्या पथकाला देऊ या!" आणि स्तालिनग्रादच्या रणसंग्रामाचे वीर पुरुष मिखाईल पनिकाको यांचे नाव आपल्या पथकाला देण्याचे मुलानी एकमताने ठरविले. "लेनिन जसे लढले आणि विजयी झाले त्याप्रमाणे लढा आणि विजयी व्हा!" हे या पथकाचे ब्रीदवाक्य होते. आमचा निसर्ग-परिसर संपन्न करण्यासाठी-च्या आमच्या लढ्यासाठी आम्ही ओकवृक्षाची पाने व फळे हे चिन्ह धारण केले होते.

बालवीर सभेला केवळ विद्यार्थीच आले होते असे नाही तर पालक, महान ऑक्टोबर समाजसत्तावादी क्रांतीमध्ये ज्यानी भाग घेतला होता असे लोक, गनिमी चळवळीतील व यादवी युद्धातील जुने, वयोवृद्ध लोक, कम्युनिस्ट युवक संघाचे पहिले सभासद या सभेला उपस्थित होते.

एका प्रशस्त हिरवळी मैदानावर ही सभा भरविण्यात आली. आठव्या इयत्तेचे बालवीर पथक तिसऱ्या इयत्तेतील मुलांच्या समोर, भावी बाल-लेनिनवाद्यांसमोर उभे होते. आठव्या इयत्तेच्या पथकमंडळाच्या प्रमुखाने जाहीर केले की त्या दिवशी त्यांच्या पथकाच्या कार्याची सांगता होईल आणि ती मशाल तिसऱ्या इयत्तेतील बाल-लेनिनवाद्यांकडे सोपविण्यात येईल.

मुलाना बालवीरांचा लाल रुमाल देण्याचा तो पवित्रगंभीर क्षण उगवला. आमच्या शाळेच्या परंपरेप्रमाणे आपल्या कार्याची सांगता करणारे बालवीर पथक बालवीर संघटनेत सामील होणाऱ्या ऑक्टोबर बालसंघाच्या मुलाना आपले रुमाल देत असे. त्याप्रमाणे मुलामुलींनी आपले बालवीर रुमाल काढले—आणि ते आपल्या छोट्या मित्रांच्या गळ्यात बांधले. प्रत्येक विद्यार्थ्याने त्याची ज्या मुलाशी मैत्री झाली होती त्या मुलाला आपला रुमाल दिला. आठव्या व तिसऱ्या इयत्तांतील मुलांमध्ये काही भाऊबहिणी होत्या आणि वंशपरंपरागत चालत आलेली एखादी अत्यंत प्रिय अशी कौटुंबिक वस्तू हाती सोपवावी त्याप्रमाणे वडील भावंडाने धाकट्या

भावंडाकडे आपला रुमाल सुपूर्द केला. ते लाल रुमाल स्वीकारीत असताना मुलानी बाल-लेनिनवाद्यांची पवित्र शपथ घेतली. मिखाईल पनिकाकोइतकेच खंबीर व धैर्यशाली देशभक्त बनण्याची व "लेनिन जसे लढले व विजयी झाले त्याप्रमाणे लढा व विजयी व्हा!" या आपल्या ब्रीदाशी इमान राखण्याची त्यानी प्रतिज्ञा केली. बालवीर संघटनेत सामील झाल्याचे प्रतीक म्हणून असामान्य अशा व्यक्तीच्या जीवन व कार्याविषयीचे एक एक पुस्तक मुलाना भेट मिळाले.

ही सभा माझ्या मुलांच्या हृदयात कायमची कोरून राहिली. अशा समारंभात मुख्य गोष्ट असते ती ही की, हा लाल रुमाल बाल-लेनिनवाद्यांच्या एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे चालत येतो. तो लाल रुमाल क्रांतिकारक लढ्याचे प्रतीक असून त्याचे अत्यंत काळजीपूर्वक जतन होणे अत्यंत आवश्यक आहे.

## लेनिन जसे लढले आणि विजयी झाले त्याप्रमाणे लढा आणि विजयी व्हा!

कम्युनिझमचा लढा ही दैनंदिन व्यवहाराची गोष्ट आहे अशी लेनिन यांची शिकवण होती. अवतीभोवती जे काही चालले आहे ते मुलांच्या हृदयाला जाऊन कसे भिडेल, जनतेच्या मालकीच्या भौतिक मूल्यांच्या भवितव्याविषयी मुलांच्या मनात कशी काळजी उत्पन्न होईल याचा ओल्या आणि मी विचार करीत होतो. बालवीर पथकामध्ये ओल्याने बाल निसर्ग-संरक्षकांचा एक गट तयार केला. शाळेच्या जवळच जंगलाचा एक राखीव पट्टा होता. त्यावर मुलानी नजर ठेवावयास सुरुवात केली. त्यानी त्या पट्ट्यातून फेरी मारली आणि कोणीतरी काही झाडांची वर्तुळाकार साल काढली आहे असे त्यांच्या निदर्शनास आले. ही झाडे मरावीत, म्हणजे ती पाडायला कारण मिळेल असे कोणालातरी वाटत होते ही गोष्ट उघड होती. हो, मेलेली झाडे उभी कशाला ठेवायची? मुलाना संताप आला: हे असे घडलेच कसे? आम्ही झाडे लावायची आणि वाढवायची, आणि कोणीतरी त्यांचा नाश करावयाचा? हे कृत्य कोणाचे असावे हे मुलाना शोधून काढावयाचे होते.

त्या दिवसापासून बाल निसर्ग-संरक्षकांच्या पथकाने छापे घालायला सुरुवात केली. संध्याकाळी ते राखीव जंगलपट्ट्याकडे जायला निघत आणि

गुन्हेगारांसाठी दबा धरून बसत. काही दिवसानी या गुन्हेगाराना मुद्देमाला-सकट पकडण्यात आले. झाडे तोडण्यासाठी करवती घेऊन आलेले ते दोन शेतकरी होते. झाडांचा विध्वंस करणाऱ्या या लोकांबद्दल मुलानी सामुदायिक शेताच्या कारभारमंडळाला माहिती दिली. नष्ट करण्यात आलेल्या प्रत्येक झाडामागे गुन्हेगारांकडून दहा झाडे लावून घेण्यात आली. मुलाना आनंद झाला: न्यायाचा विजय झाला होता. कार्यक्षम नैतिक शिक्षणासाठी ही एक अनिवार्य अशी अट आहे. न्याय मिळाला आहे असे जेव्हा बाल-लेनिनवाद्याना दिसते तेव्हा कम्युनिस्ट ध्येयांसाठीचा लढा हे उदात्त भावनांचे उगमस्थान बनते. या विजयातून त्याना प्रेरणा लाभते आणि अडचणींवर मात करण्यासाठी आवश्यक असलेले नवे सामर्थ्य त्याना प्राप्त होते.

एका उद्‌बोधक खेळाने या बाल निसर्ग-संरक्षकांच्या मनाची पकड घेतली. सौंदर्याची व प्रामाणिक कष्टाळूपणाची मोहीम हा त्या खेळाचा पाया होता. अशाच एका छाप्याच्या वेळी काही शेतकऱ्यांच्या आवारात रानगवत वाढत असल्याचे मुलाना आढळले. मुले त्या शेतकऱ्यांकडे सफरचंदाची रोपे घेऊन आली आणि ते रानगवत उपटून त्या जागी ही फळझाडे लावावीत अशी त्यानी शेतकऱ्याना सूचना केली. त्यांच्यापैकी तीन शेतकरी या कामाच्या बाबतीत अतिशय आळशी निघाले. बालवीरानी बाल निसर्ग-संरक्षकांच्या तर्फे त्याना एक पत्र लिहिले. या निष्काळजी लोकाना उद्देशून त्यात पुढील आवाहन करण्यात आले होते: "तुमच्या आवारात वाढणाऱ्या रानगवताकडे पहात राहणे आम्हा बाल निसर्ग-संरक्षकाना केवळ अशक्य आहे. तुमच्या आवारात माजलेल्या या काटेरी रानगवताच्या जंगलात लवकरच लांडग्यांचा वावर व्हायला लागणे अगदी शक्य आहे. अशा गलथान, गचाळ अवस्थेत तुम्ही रहाता तरी कसे? हे रानगवत तुम्ही उपटून टाकावे व त्या जागी सफरचंदाची झाडे, द्राक्षांच्या वेली व फुलझाडे लावावीत अशी आम्ही तुम्हाला कळकळीनी विनंती करीत आहोत. तुमच्या घराजवळ आम्ही पाच रोपे व तीन द्राक्षवेली ठेवल्या आहेत. उद्याच्या उद्या ही झाडे लावली गेली पाहिजेत आणि त्याना पाणी देण्यात आले पाहिजे. तुमच्या अंगात जर फारच आळस चढला असेल तर आम्ही येऊन खड्डे खणू, रानगवत उपटून टाकू आणि झाडे लावू. तेथे एक फळबाग तयार होईल, पण लक्षात ठेवा, ती तुमची असणार नाही; ती बालवीरांच्या मालकीची असेल."

या चिठ्ठ्या पोहोचविण्याची पद्धतही मोठी मौलिक होती. उघड्या खिडकीतून त्या टेबलावर टाकण्यात आल्या होत्या. कोणाच्या नजरेस पडू नये म्हणून झाडाची रोपे संध्याकाळी आणण्यात आली. मुलांचा हा अगदी आवडता खेळ झाला. अगदी अधीरतेने ती दुसऱ्या दिवसाची वाट पहात होती. हे निष्काळजी लोक काही हातपाय हलवतील का? शाळा सुटल्यावर मुले रस्ता पार करून तेथे गेली आणि काय आश्चर्य! त्याना आवार ओळखू येईना. रानगवताच्या जागी आता फळझाडे लावलेली दिसत होती... शाळेत ही बातमी वाऱ्यासारखी पसरली. बालवीरांमध्ये अशा प्रकारचे बाल निसर्ग-संरक्षकांचे गट संघटित करण्यास आमच्या पथकाने सुरुवात केली. सामुदायिक शेताच्या कारभारमंडळाचे लोक वडीलधाऱ्या बालवीरांकडे आले आणि तुतीच्या झाडांचे शेत त्यानी आपल्या संरक्षणाखाली घ्यावे अशी त्यानी या बालवीराना विनंती केली. काही सामुदायिक शेतकरी निर्दयपणे तुतीच्या फांद्यांची काटछाट करीत होते. बालवीरानी अनेक छापे घातले आणि ही काटछाट थांबली.

उन्हाळ्यात संकरित बियाणांच्या प्रयोगशाळेतील प्रयोगांसाठी गव्हाचे वीस किलोग्रॅम बियाणे निवडून काढण्याची जबाबदारी आमच्या पथकाने घेतली. मुलानी सर्वात उत्कृष्ट कणसे वेचली, हिंवाळयात ती साठवण्यासाठी शाळेच्या इमारतींतील एक कोरडी जागा शोधून काढली, वसंतामध्ये त्यानी त्या कणसांची झोडपणी केली व ते बियाणे शेतीतज्ज्ञाकडे सोपविले. हे सर्व करताना त्यांचे मन उत्कंठित चिंतेने आणि रोमांचकतेने इतके दाटले होते की पेरणी सुरू झाली तेव्हा आपले धान्य कसे पेरले जात आहे हे स्वतःच्या डोळ्यानी पहाण्यासाठी मुले शेतावर जात. आता त्यानी चवथ्या इयत्तेत पदार्पण केले होते. रोपे अंकुरली तेव्हा मुले पुन्हा शेतावर गेली. कापणीच्या वेळी पीक गोळा करण्यासाठी आपल्या वडीलधाऱ्या शाळासोबत्याना मदत करण्याचे बालवीरानी ठरविले. मुले इतरांसाठी आपल्या शक्तीचा काही भाग वेचीत होती आणि आपल्या सभोवतालच्या जगात जे काही चालले आहे त्याबद्दल त्यांचे मन अधिक ग्रहणशील बनले होते या गोष्टीचे मी आनंदित मनाने अवलोकन करीत होतो. आम्हाला असे कळले की आमच्या बियाणापासून तयार झालेले पीक चांगले वाढले होते व त्या खुषीनेच आम्ही शेतावरून परत फिरलो. आम्ही सामुदायिक शेताच्या फळबागेवरून चाललो होतो आणि छोट्या छोट्या सफरचंदांच्या झाडावर सुरवंट असल्याचे आम्हाला आढळले. मुलांच्या मनात भयभावना दाटली.

या क्षणी ते बालवीर आपल्या समाजविषयक कर्तव्याचा विचार करीत नव्हते. एका सजीव वस्तूला विध्वंसाचा धोका निर्माण झाला होता आणि त्याकडे ती मुले निव्वळ अलिप्त वृत्तीने पाहू शकत नव्हती. मुले फळबागेत गेली आणि त्यानी सुरवंटांचा नि:पात केला. त्यानी सफरचंदाच्या झाडाचा बचाव केला व त्या कीटकांचा संसर्ग शेजारच्या झाडाना तर लागला नाही ना याची खात्री करून घेतली.

आपण आपल्या मायदेशाचे स्वामी आहोत ही भावना ही एक सर्वात महत्त्वाची अशी देशभक्तीपर भावना आहे आणि प्रत्येक बालमनात ती दृढ केली पाहिजे. सामायिक शेतावरील गव्हाचे प्रत्येक कणीस, सामायिक फळबागेतील प्रत्येक झाड, सामुदायिक शेताच्या मळणीपटावरील गव्हाचा प्रत्येक दाणा हा ज्यांच्या बाबतीत, त्यांच्या बालपणाच्या, पौगंडावस्थेच्या व तारुण्याच्या काळात, त्यांच्या अत्यंत सखोल अशा व्यक्तिगत आनंदाइतकाच मौल्यवान ठरतो, आपल्या आईने किंवा वडिलानी दिलेल्या खेळण्याने, आपल्या आवडत्या चित्रमय पुस्तकाने, स्केट्सनी किंवा घसरगुंडी पट्टचानी त्याना दिलेल्या आनंदाइतकाच मौल्यवान ठरतो तेच लोक खरेखुरे देशभक्त बनू शकतात... मूल जेव्हा आपल्या श्रमात आपल्या आत्म्याच्या काही अंश ओततो व लोकांसाठी काही निर्मिती करतो, आपल्या स्वत:च्या हातानी निर्माण केलेल्या भौतिक मूल्यांच्या वस्तूनी जेव्हा त्याला सखोल व्यक्तिगत आनंदाचा लाभ होतो, आनंदाचा हा मार्ग जेव्हा आस्था, निगा आणि प्रासंगिक अपयशे यानी भरलेला असतो तेव्हाच जे जे समाजाच्या मालकीचे आहे त्याबाबत त्याला सखोल आत्मीय भावना निर्माण होते. मुलांच्या दु:खांच्या व व्यथांच्या उगमस्थानांबद्दल काळजी वहाण्याचे मी कधीच थांबविले नाही. मुलाला जे अतिशय प्रिय वाटते ते केवळ त्याच्या व्यक्तिगत सुखाशी संबंधित आहे की त्यात इतर लोकांचाही विचार केला गेला आहे या प्रश्नाचे उत्तर हाच मुलाच्या नैतिक गुणांचा नित्य निकष आहे. बागेच्या आवारातली गव्हाची पेरे मुसळधार पावसामुळे वाकल्याचे दिसताच कोल्याला किंवा वाल्याला हळहळ वाटल्याचे पाहून मला आनंद झाला. अशा प्रकारच्या दुर्दैवी घटनांचा मुलाला अनुभव येईपर्यंत, त्याबद्दल त्याला वेदना व यातना होईपर्यंत शिक्षकाला स्वस्थ बसता येणार नाही; कारण, नाहीतर, एक अलिप्त प्रेक्षक म्हणूनच विद्यार्थ्यांचा जीवनात प्रवेश होण्याची शक्यता आहे.

इतर लोकांबद्दलच्या आस्थेचा स्वत:ला स्पर्श करू न देता ज्यानी

आपले बालपण व्यतीत केले आहे आणि जे आनंदाचे केवळ उपभोक्तेच बनले आहेत त्यांच्यामधूनच अहंमन्य व अहंभावी लोक निर्माण होतात. वलोद्या व स्लावा या माझ्या दोन विद्यार्थ्यांना हा धोका भेडसावीत होता हे पाहून माझे काळीज थरकले. त्यांच्या घरामध्ये त्यांचे नको तेवढे कोड पुरविण्यात येत असत. त्यांच्या आईवडिलांकडून त्याना एखादी नवीन व चांगली वस्तू विकत घेऊन मिळाली नाही तरच त्याना दुःख होत असे. एका दुसऱ्या प्रकारच्या आस्थेने व दुःखाने या अहंभावी आस्थाना शह देण्यात आला पाहिजे, आणि ही आस्था म्हणजे लोकांच्या बाबतीत जे भौतिकदृष्टचा व आत्मिकदृष्टचा मौल्यवान असेल त्याबद्दलची आस्था.

आनंद विद्यालयात आम्ही लावलेले लिंडनचे झाड उन्हाळयाच्या रखरखीत दिवसांत अतिशय कोमेजून गेलेले मला दिसले. "आपल्या मित्राला ओलाव्याची गरज आहे" मी वलोद्याला व स्लावाला सांगितले. काहीतरी मनोवेधक गोष्ट दाखवायला मी त्याना बागेत घेऊन गेलो होतो आणि त्यांचे लक्ष मी उन्हामुळे कोमेजलेल्या त्या झाडाकडे वळविले. "लिंडनच्या झाडाला आपली मदत हवी आहे, आणि मनात असले तर आपण तशी मदत करू शकू," मी त्या मुलाना सांगितले. "अशा प्रकारच्या झाडाला, विशेषतः ते जेव्हा लहान असते तेव्हा, आर्द्र हवा, ओलावा आणि शीतल छाया आवडते. आपण आपल्या या छोटचा मित्राला मदत करू या. पाण्याच्या नळापासून आपण इथपर्यंत होजची एक नळी आणू शकतो. तो नळ काही फारसा दूर नाही, आणि होजची नळी लिंडनच्या झाडापर्यंत आणून आपण त्याच्यासाठी एक छोटीशी जलधारा निर्माण करू शकतो. झाडाला त्यामुळे नेहमीच गारवा लाभेल." सुरुवातीला मुलानी माझ्या बोलण्याकडे फारसे ध्यान दिले नाही; पण त्याना मी कृत्रिम-जलधारेविषयी सांगताच त्यांच्या मनात कुतूहल निर्माण झाले. त्याना तो एक मनोवेधक खेळ वाटला आणि काम सुरू झाले—आणि जगात असे कोणते मूल आहे की ज्याला खेळ आवडत नाही? त्यानी खेळाला सुरुवात केली, झाडापर्यंत त्यानी एक होजची नळी आणली, त्याला तुषारांचे टोपण लावले आणि झाडावर नजरेसही पडणार नाही असे तुषारांचे एक अभ्रपटल तयार झाले. मध्यान्हीच्या उन्हाच्या वेळी मुले त्या जलधारा सुरू करीत व संध्याकाळ व्हायच्या आधी बंद करीत. हळू हळू मुलाना त्या झाडाविषयी आस्था निर्माण झाली: त्या छोटचा जलधारा अंगावर घेताना त्या झाडाला काय वाटत असेल? नवी पालवी फुटलेल्या झाडाच्या

फांद्या जेव्हा तरारल्या तेव्हा मुलाना खूप आनंद झाला. अशा रीतीने व्यक्तिगत सुखाशी संबंधित नसलेल्या एका स्वारस्याने मुलांच्या जीवनात प्रवेश केला.

पण ती केवळ सुरुवात होती. साध्या मौल्यवान खड्यातून उत्कृष्ट हिरा पैदा करण्यासाठी तो कसा हाताळावा याचा विचार करीत, त्याच्या प्रत्येक पैलूकडे लक्ष देत, ज्याप्रमाणे जवाहिऱ्या खडबडीत हिऱ्याला घासून घासून आकार आणतो त्याचप्रमाणे मुलाच्या अगदी अंतर्गाभ्यातील कोपऱ्यापर्यंत कसे पोहोचावयाचे याचा शिक्षकाने विचार केला पाहिजे. उत्कृष्ट रासबेरी गोळा करण्यासाठी मी आणि वलोद्या अनेक वेळा रानात जात असू. पुढे ते बी आम्ही पेरीत असू आणि त्याच्या हिरव्या अंकुराना पाणी देत असू. कलम करण्याची वेळ येताच आम्ही सफेद गुलाबाच्या फांद्यांचे त्या झाडांवर कलम करीत असू. याला केवळ कामाचे स्वरूप नव्हते तर मुलाच्या हृदयाला केलेला तो अत्यंत हळुवार असा स्पर्श होता. हळू हळू वलोद्याने असा टप्पा गाठला की त्याचे स्वतःचे व्यक्तिगत सुख हेच त्याच्या आनंदांचे व दुःखांचे उगमस्थान न रहाता सभोवतालच्या जगातही त्या उगमस्थानांचा आढळ होऊ लागला.

स्लावाकडे मला खूपच लक्ष पुरवावे लागले. पशुपालनकेंद्रावर त्याने व ओल्याने एका आजारी कोकराला बरे केले होते. सुरुवातीला प्राणिमात्राची देखभाल हा एक खेळ होता. पण पुढे त्या कामात स्लावाला स्वारस्य निर्माण होण्यास सुरुवात झाली आणि हळू हळू स्लावा एक अत्यंत कष्टाळू व मेहनती प्राणीप्रेमी बनला. एकदा हिंवाळ्यातल्या एका गारठ्या-च्या दिवशी डोळ्यात आसवे दाटलेल्या अवस्थेत तो माझ्याकडे कसा आला होता ते मी कधीही विसरणार नाही. त्याच्या आवडत्या वासराला ओटचे हिरवे दांडे आवडतात, पण उष्णतागृहात फक्त बार्लीच आहे अशी त्याची तक्रार होती. ओटशिवाय मी केंद्रावर कसा जाऊ असा त्याचा प्रश्न होता. तेव्हा आम्ही ओटही पिकवायला सुरुवात केली...

प्रत्यक्ष आपल्या व्यक्तिगत गरजांशी निगडित नसलेल्या गोष्टींविषयी आस्था बाळगणे हा मुलांचा अहंभाव बरा करण्याचा एक उत्कृष्ट उपाय आहे. समाजाच्या कल्याणाविषयीच्या चिंतेत मूल जर व्यक्तिगत स्वारस्य घेऊ लागले तर आत्मकरंटेपणाचा दुर्गुण त्याच्या मनात कधीही मूळ धरणार नाही. कर्तुमकर्तुम "मी"भोवती ज्यांचे जीवन केंद्रित झाले आहे अशा मुलांच्या मानेवरच अहंमन्य भावनांची पकड बसते.

# "निर्भय व शूर मुलांचे पथक"

माझ्या विद्यार्थ्यांच्या शारीरिक व नैतिक विकासाच्या क्रमात अशी एक वेळ आली की त्यांच्या शक्तीने उधाणबिंदू गाठला व ती ओसंडून वाहू लागली. प्रथमदर्शनी विचित्र, अगम्य वाटणाऱ्या कृतीतून ही शक्ती व्यक्त होऊ लागली. माझ्या अगदी नजरेसमोरच एक विलक्षण बदल घडून येत होता. लाजाळ मुले बेफाम, बेदरकार बनत होती, आणि भित्री मुले शूर व खंबीर बनली होती.

एकदा वडीलधारे विद्यार्थी आणि सामुदायिक शेतकरी गवताची गंजी कशी रचतात हे पहाण्यासाठी आम्ही शेतावर गेलो होतो. ट्रॅक्टरचालकाने आपल्या ट्रॅक्टरला जाड तार कशी जोडली होती आणि संपूर्ण गंजीच्या गंजी त्या तारेने उंचच्या उंच कशी उचलली जात होती या गोष्टीने मुला-मुलींचे लक्ष वेधून घेतले होते. ती तार पंधरा मीटर वर चढली होती. गंजीकडून आम्ही कापणीमळणीयंत्राकडे आलो. त्यावेळी माझ्या लक्षात आले की एका मुलाने त्या तारेला पकडले आहे आणि त्या तारेने तो उंच उंच उचलला जात आहे. मी आजूबाजूला पाहिले तेव्हा शूरा तेथे नव्हता. शूराच पंधरा मीटर उंचीवर त्या तारेला लोंबकळत होता. मुलानी शूराला पाहिले आणि आनंदाने ओरडत ती गंजीकडे धावली. त्या प्रचंड उंचीवर जाण्याचा आनंद कदाचित त्या सर्वानाच उपभोगायचा होता. मी जीव मुठीत घेऊन शूरा त्या गंजीवरून खाली येण्याची वाट पहात होतो; आणि एखाद्या घसरगाडीसारखा तो गंजीवरून घसरत खाली आला. काय करावे तेच मला कळेना—या विलक्षण प्रवासाचा शेवट गोड झाला म्हणून आनंद मानावा की शक्य तितक्या लवकर मुलाना तेथून घेऊन जावे या संभ्रमात मी पडलो.

मी मुलाना कसेबसे शांत केले आणि पुन्हा अशी गोष्ट करण्यास त्याना प्रतिबंध केला. पण माझ्या सावधगिरीच्या इशाऱ्याने ती फारच नाराज झाल्याचे दिसले. या प्रवासाला केवळ आळा घालून चालणार नाही तर तो सुरक्षित बनवला पाहिजे हे मला उमजले. त्या तारेखाली आम्ही एक गंजी उभारली आणि प्रथम मुलानी व नंतर मुलीनी तो प्रवास सुखरूप पार पाडला.

त्या काळात आमच्याकडे विद्युत्प्रवाहाची कायम व्यवस्था नव्हती, आणि त्यासाठी वडीलधाऱ्या विद्यार्थ्यांनी एक विद्युत्केंद्र उभारले होते. ते वाऱ्यावर

चालत असे आणि त्यातून विद्युत्संचयिकांमध्ये वीज साठवली जात असे. त्याची पवनचक्की बारा मीटर उंचीच्या मनोऱ्यावर बसविली होती. त्या मनोऱ्याच्या टोकाला लाकडाचा एक सपाट फलाट होता आणि विद्युत्कारागिराला जनित्रापर्यंत जाता यावे म्हणून त्याला एक छोटी झडप ठेविण्यात आली होती. एके दिवशी जोरदार वारा सुटला होता आणि मुले पतंग उडवीत होती. इतरांपेक्षा आपला पतंग उंच जावा असा प्रत्येकाचा प्रयत्न चालला होता. "सर्वांपेक्षा माझाच पतंग उंच जाईल", वान्या म्हणाला; आणि ते छोटं पोरगं मनोऱ्यावर चढलं; फलाटाच्या बाजूने उभ्या केलेल्या लाकडी कठड्यावर तो ओणवला आणि पतंगाची दोरी सोडू लागला. वान्या ज्या बाजूला सरकला होता त्या बाजूचे झडपेचे झाकण फलाटाच्या कडेने सटकले होते व जमिनीवर पडले होते. माझ्या छातीत धस्स् झाले. त्या उघड्या झडपेभोवती वान्या धावत होता आणि आपल्या पायाखाली काय आहे याकडे त्याचे लक्षच नव्हते. त्याचे सर्व लक्ष पतंगाकडे होते. त्या दिवशी अपघात टळला, पण, तो अगदी योगायोगाने.

उंच जागांचे मुलाना अदम्य आकर्षण असते. आपण कोणत्यातरी उंच ठिकाणी आहोत या मधुर भावनेने मुलाना आनंद होतो. पण आम्हा शिक्षकाना या बालिश प्रेरणांमुळे घोर चिंता मात्र निर्माण होते. मला चिंतेत टाकणाऱ्या मुलांच्या जवळ जवळ सर्व कृती उंच जागांबद्दलच्या या अनिवार आकर्षणाशी निगडित होत्या...

शाळेच्या जवळच एक जुने चर्च होते. त्या चर्चला वीस मीटर उंचीचे एक घंटाघर होते आणि त्याच्यावर एक गोल, उतरता घुमट होता. तो वसंतातला एक सुंदर सूर्यप्रकाशित दिवस होता. माझी नजर सहज घुमटाकडे गेली आणि क्रूसाशी उभ्या असलेल्या तीन मुलांच्या आकृत्या मला दिसल्या. त्या तीन मुलाना – सिऱ्योझा, कोल्या व शूराला – मी ताबडतोब ओळखले. आणि त्याना पाहून माझ्या काळजाचे पाणी पाणी झाले. मुलानी मला पाहिले आणि माझ्या नजरेपासून लपण्यासाठी ती घुमटाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत धावू लागली. मी मुलाना हाक मारली असती तर तो मूर्खपणा ठरला असता. त्यामुळे विनाकारण काहीतरी विपरीत घडले असते. मी शाळेत गेलो आणि सर्व मुलाना रानात घेऊन जाण्यास किंवा शेतावर फिरायला नेण्यास व मोठ्या मुलाना घरी पाठविण्यास मी शिक्षकाना सांगितले. चर्चच्या छपरावर चढलेल्या मुलाना कोणी पाहू नये आणि भीतीने त्यानी आरडाओरडा करू नये हाच,

थोडक्यात, माझ्या वागण्याचा उद्देश होता. यंत्रशाळेतून घंटाघर व्यवस्थित-पणे नजरेत येत होते. मी तेथे गेलो आणि दोन्ही हातानी डोके घट्ट दाबून धरून खिडकीशी बसलो. कदाचित, गवताच्या गंजीजवळच्या खेळाला मुभा देऊन उंच जागेची गंमत लुटायची इच्छा मुलांच्या मनात मी प्रज्वलित तर केली नव्हती ना? त्यानंतर मी पाहिले तर एका जुन्या, गंजलेल्या नळावरून मुले घुमटापासून खाली सरकत येत होती; आणि काही ठिकाणी तर त्या नळाचे आधारही तुटले होते...

ग्रीष्मातल्या एका मुसळधार जलवृष्टीनंतर तळयावरच्या पुलाखाली एक धबधबा तयार झाला. एक म्हातारी बाई माझ्याकडे शाळेत आली आणि तुमची मुले काय करताहेत ते जरा जाऊन पहा म्हणून सांगू लागली. मी तळयावर गेलो. धरणावरून मला काही दिसत नव्हते. पण पुलाखालून मुलांचे किंचाळणे ऐकू येत होते. तोल्या आणि वित्याने एक मोठी दोरी पुलाच्या कठड्याला बांधली होती आणि एक झोपाळा तयार केला होता. त्या वेगवान धबधब्यावर त्यांचे झोके घेणे चालले होते आणि झोके घेता घेता ते आनंदाने किंचाळत होते...

पेत्रिक, वित्या आणि कोल्याने कुठूतरी एक लाकडी पिंप पैदा केले. त्याचे बूड अर्धे तुटले होते. तळयाला एक उंच काठ होता. तेथे त्यानी ते पिंप आणले. एक मुलगा त्या पिंपात शिरत होता व इतर दोन मुले त्याला हलकेच धक्का देत होती आणि उतरंडीवरून ते पिंप गडगडत खाली यायला सुरुवात होत होती. कोणालाच आपली पाळी चुकविण्याची इच्छा नव्हती; म्हणून अगदी काटेकोरपणे त्यानी आपले क्रम लावले होते. ते पिंप उतरंडीवरून गडगडत खाली येत होते आणि पाण्यापासून काही मीटर अंतरावर येऊन थांबत असे. काहीही दुर्घटना न घडता त्यानी हे कसे साधले याचा उलगडा आजतागायतही मला झालेला नाही. अशा प्रसंगी गोड शेवट फक्त मुलांच्या बाबतीतच शक्य आहे.

रानातून फेरफटका मारीत असताना काही लाकूडतोडे आम्हाला दिसले. सामुदायिक शेतासाठी ते काही बांधकाम साहित्य तयार करीत होते. तोडलेली झाडे जमिनीवर पडताना मुले श्वास रोधून ते दृश्य पहात होती. आम्ही घरी जायला निघालो. पण शूरा आणि दान्को गायब झाल्याचे आमच्या लक्षात आले नाही. आम्ही एका मोकळया जागी विश्रांती घेत असताना त्या दोन मुलाना घेऊन एक म्हातारा लाकूडतोड्या आमच्यापाशी आला. तो म्हणाला की हे मुलगे झाडावर चढायचा प्रयत्न करीत होते.

झाड पडताना त्याच्यासकट वरच्या फांद्यांवरून खाली झेप घेण्याचा त्यांचा विचार होता असे त्याच्या बोलण्यावरून दिसले.

मुले तिसऱ्या व चवथ्या इयत्तेत असताना साधारण सहा महिन्याच्या काळात हे सर्व प्रसंग घडले. अशा कृतींपासून मुलाना रोखून धरणे आणि केवळ काहीच घडले नाही एवढ्यावरच समाधान मानणे हा यातून बाहेर पडायचा मार्ग नव्हे असे मला जाणवले. त्यांच्या शक्तीच्या सामर्थ्यशाली प्रवाहाला आवश्यकता होती ती केवळ कोणत्यातरी कृतीची नव्हे; मुलाना इच्छा होती ती संकटाच्या वेळी आपल्या निधडेपणाची कसोटी घेण्याची. साहसातील रोमांचकता माझ्या विद्यार्थ्यांच्या जीवनाची दारे ठोठावीत होती आणि विद्यार्थ्यांना लागलेल्या शौर्यशाली कृत्यांच्या पिपासेतून या वस्तुस्थितीची साक्ष पटत होती. विद्यार्थ्यांची शक्ती योग्य मार्गाने वळविणे आवश्यक होते.

प्रथमदर्शनी पहाता या कृती अविचारी साहसाच्या वाटत होत्या आणि त्या मुख्यतः मुलग्यांच्या हातून घडल्या होत्या हे वाचकांच्या लक्षात आले असेल. असा एकही मुलगा नव्हता की ज्याने मला घोर लावून ठेवला नव्हता. इतकेच कशाला; ज्याला मी विचलित मनाचा व भित्रा समजत होतो त्या दान्कोनेही १९५५ च्या शरदाच्या अखेरी मला चकित केले. बर्फाच्या अगदी पातळ थरावरून त्याने एकदा तळे ओलांडले. बर्फातून खाली जाण्याची शक्यता कमी करण्यासाठी तो आपली पुस्तके पुढे सरकवीत होता. बर्फ तडकत होते, खाली झुकत होते आणि अत्यंत खोलगट भागी त्याच्यावर पाणी साचले होते. पण केवळ चमत्कार म्हणून ते बर्फ फुटले नाही आणि दान्को सुखरूप शाळेत पोहोचला. त्याच्या मागून दोन विद्यार्थी येत होते. परंतु त्यांच्या समोरच बर्फ फुटले; सुदैवाने ते अगदी काठावरच होते.

अर्थात, अशा प्रसंगांविरुद्ध दक्षता तर बाळगली गेलीच पाहिजे; पण तेवढेच करून भागत नाही. माणसाने संकटाला सामोरे गेले पाहिजे व त्यावर मात केली पाहिजे हेही तेवढेच खरे.

अशा रीतीने आमचे "निर्भय व शूर मुलांचे पथक" उदयाला आले. सर्व मुलगे त्या पथकात सामील झाले, आणि काही काळाने काही मुलीही त्यात सामील झाल्या. इच्छाशक्ती, शौर्य व निर्भयता यांची जेथे गरज लागते असे खेळ व गंमती मी शोधून काढल्या. तळयाच्या काठावर आम्हाला एक उंच सुळका आढळला. त्या ठिकाणचा तळयाचा तळ अगदी सुरक्षित होता. जुलैमधल्या एका रणरणत्या दिवशी मुले तेथे पोहायला

आली. सुळक्यावरून उडी कशी मारायची आणि उडीला दिशा कशी द्यायची हे मी मुलाना दाखविले. माझ्या पाठोपाठ ताबडतोब शूरा, सिऱ्योझा, कोल्या, वित्या आणि फेद्याने उडी मारली. दुसऱ्या दिवशी युरा, कोस्त्या आणि पेत्रिकने उडी मारायचे धाडस केले. तिसऱ्या दिवशी तोल्या, मिशा, साशा व वान्याने उडी मारली. फक्त चार मुलगे राहिले होते— पावलो, वलोद्या, दान्को आणि स्लावा.

त्यांच्या मित्रानी त्यांची चांगलीच चेष्टा उडवली. मुलीही खाली पोहत होत्या; त्यानीही त्याना ढुसकायला सुरुवात केली. तीना सुळक्यावर आली. तिलाही उडी मारायची होती. तिने सूर मारला आणि तोही अतिशय सुंदर. लारिसा व वाऱ्याने तिचा कित्ता गिरवला. मुलग्याना लाज वाटली. अखेरीस पावलो, दान्को आणि स्लावाने उडी मारलीच.

फक्त वलोद्याला ते काही जमेना. आपण घाबरत आहोत ही गोष्ट त्याच्या मनाला खटकत होती; पण त्या भीतीवर मात करणे त्याला जमत नव्हते. वलोद्यासाठी आम्हाला एक खालचा सुळका शोधून काढावा लागला. मुलींबरोबर त्याने तेथून उडी मारली पण वरच्या कडयावरून उडी मारण्याचे त्याला काही धारिष्टच होईना. त्याने काही शूरत्वाच्या गोष्टी कराव्यात म्हणून मला त्याच्यासाठी खूप वेळ खर्च करावा लागला. वसंता-मध्ये स्टार्लिंग पक्ष्यांसाठी मुलानी जेव्हा घरटी टांगायला घेतली तेव्हा मी वलोद्याला एका उंच झाडावर चढायला लावले. भीतीवर त्या मुलाने मिळविलेला तो पहिला विजय होता. मुलानी मला सांगितले की वलोद्या गुप्तपणे एकटाच सुळक्यावर गेला होता, त्याने कपडे उतरले, पुष्कळ वेळ तो बसून राहिला, आणि नंतर उडी मारण्यासाठी त्याने वेग घेतला; पण तरीही उडी मारायला मात्र तो घाबरला.

सर्वात शूर अशा तीन मुलींच्या पाठोपाठ वाल्याने सुळक्यावरून उडी मारली. तिच्याकडून ही अपेक्षा कोणीच केली नव्हती. वाल्याच्या कृतीने वलोद्या संभ्रमित झाला. त्याने आपले डोळे घट्ट मिटून घेतले आणि पाण्यात उडी मारली. वाल्यानंतर नीना, गाल्या, ल्यूस्या, झीना, कात्या व साशाने तिचाच कित्ता गिरविला आणि त्यांनंतर सर्व मुलीनी उडया मारल्या. माझी खात्री पटली की मुलग्यांपेक्षा मुलींचीच इच्छाशक्ती अधिक दांडगी असते. भीती आणि मनाची चलबिचलता यांवर मुली अधिक धाडसाने मात करतात व काहीतरी शूर कृत्य केल्यानंतर आपला आनंद व्यक्त करताना मुलगे जी उगाच शेखी मिरवितात ती शेखी त्यांच्याकडे नसते.

तिसरी इयत्ता पुरी केल्यानंतर निसर्गाच्या कुशीत आम्ही सुटी घालवीत असताना मुलानी ध्रुवप्रदेशीय संशोधकांचा एक खेळ शोधून काढला. खेळाच्या अटी अशा होत्या : लांबवर काटेरी झुडुपानी माजलेले एक बेट होते – सर्व बाजूनी पाण्याने वेढलेला तो आमचा "हिमखंड" होता. जहाज फुटल्यामुळे तेथे उतरलेले काही ध्रुवप्रदेशीय संशोधक होते ; आणि आमच्या बाजूला "विशाल भूमी" होती. ध्रुवप्रदेशीय संशोधकांसाठी आम्हाला अन्नपुरवठा (पाव आणि बटाटे) घेऊन जावयाचे होते. "हिमखंड" आणि "विशाल भूमी" यांच्यामध्ये एक छोटे सरोवर पसरले होते. कडाक्याच्या ध्रुवप्रदेशीय रात्रीच्या काळोखात तो अन्नपुरवठा घेऊन जावयाचा असा या खेळाचा नियम होता.

तेव्हा "निर्भय व शूर मुलांच्या पथका"तले स्वयंसेवक पुढे आले. मुले थोडीशी घाबरलीच होती. कोणीतरी म्हणे त्या बेटावर लांडग्याची गुहा पाहिली होती. पण शूरा आणि सिऱ्योझा त्या रात्रीच्या प्रवासाला निघाले. देवदाराच्या एका जाड फलकाला आम्ही पाव, बटाटे, काडयापेटया आणि डुकराची चरबी यांचे एक पुडके बांधले. टायरच्या आतल्या दोन जुन्या रबरी धावा आम्ही पाण्यात सोडल्या – आमच्या खेळातली ती नाव होती. सूर्य खाली गेला आणि सरोवरावर व त्या छोटया बेटावर धुके पसरले. आकाशात तारे उगवले. मुलानी कपडे उतरविले, ते फलकाला बांधले आणि संथपणे त्यानी नाव सुरू केली. मिनिटभराने त्यांच्या आकृत्या आम्हाला दिसेनाशा झाल्या, काही मिनिटानी पाण्याचा एक अत्यंत अस्पष्ट असा सपकारा ऐकू आला आणि नंतर तोही अंतर्धान पावला. "निर्भय व शूर मुलांचे" ते संपूर्ण "पथक" त्रावका या आमच्या छोटया कुत्र्यासहित किनाऱ्यावर बसून होते... एक तास झाला. सर्वत्र दाट अंधार माजला होता. आता ते बेटही दिसत नव्हते की ते सरोवरही दिसत नव्हते. इतक्यात काळोखातून एक अंधूक ज्योत फडफडली : फुटलेल्या जहाजाच्या ठिकाणी ते बाल ध्रुवप्रदेशीय संशोधक जाऊन पोहोचल्याची ती खूण होती. दुसऱ्या जोडीने आपली नाव हाकारायला हरकत नाही असा इशारा ते पाठवीत होते.

आम्ही पुन्हा एका फलकाला पाव, बटाटे, डुकराची चरबी आणि कांदे यांची शिदोरी बांधली व रबरी धावा पाण्यात सोडल्या. वित्या व युरा तयार झाले. पूर्वी या सरोवरात मोठमोठे पाइक मासे कसे रहात होते आणि अजूनही ते तेथे असण्याची कशी शक्यता आहे हे एका मुलीने सांगितले...

वित्या आणि युराला घाबरविण्यासाठी ती गोष्ट सांगण्यात आली होती हे स्पष्ट होते. अर्थात त्या काळया पाण्यातून वाट काढणे त्या मुलाना भयप्रद वाटू लागले; पण आता काहीही झाले तरी आपला विचार ती बदलणार नव्हती. युराने व वित्याने त्या ऊबदार पाण्यात पाय सोडले आणि त्याच क्षणी पुढच्या दिशेला पाण्याचा एक सपकारा ऐकू आला. अर्थात कुठेतरी एखादा मासा खेळत होता, पण ती मुले पाइकची गोष्ट विसरली नव्हती. आणखी एक तास लोटला आणि काळोखातून दुसरी ज्योत फडफडू लागली. त्याचा अर्थ असा की ध्रुवप्रदेशीय संशोधकांच्या दोन जोडचा एकमेकाना भेटल्या होत्या. आम्ही जमिनीवर अंग टाकले, पण कोणालाच झोप येत नव्हती.

बेटावर एक शेकोटी पेटली. सूर्योदयापर्यंत डोळयाला डोळा न लावता ती मुले तेथे आपला वेळ काढणार होती. छोटचाशा वर्तुळात दाटीवाटीने अंगाची जुडी करून अधीरतेने पूर्वेकडे आपल्या नजरा वळवीत आकाश उजळण्याची ती प्रतीक्षा करणार होती. आणि दुसऱ्या दिवशी सूर्याची पहिली सोनेरी किरणे झाडांच्या शेंडचांवर अवतरताच ती सरोवर पार करून परत येणार होती. भीतीवर मात करण्यातला आनंद ज्यानी अजून चाखला नव्हता ती मुले त्यांचा हेवा करणार होती. आणि आपल्या भय-भीतीवर ज्यानी विजय मिळविला होता ते माणसाला भूषणावह ठरणाऱ्या संयत वृत्तीने उत्तर देणार होते: "उं! त्यात घाबरण्यासारखे असे काहीच नव्हते!"

रात्रीच्या त्या अंधारात आम्ही सर्वच मुलग्याना तेथे पाठविले, अगदी वलोद्यासकट. खेळ अगदी ऐन रंगात आला असताना मुलीनी विचारले की फक्त मुलग्यानीच तेथे का जावे, मुलीनी का नको? मी या प्रश्नाची अपेक्षाच केली होती; तेव्हा तीना कोल्याबरोबर आणि वाऱ्या तोल्याबरोबर त्या बेटावर गेली. मुलानी तेथे वाळलेले गवत गोळा केले आणि मुलींसाठी बिछाना बनवला.

रात्र, नीरवता आणि एकांतातले आडवळणी ठिकाण – या सर्व गोष्टींची मुलाना गोडी वाटते; कारण अडचणींवर मात करण्यातली रोमांचकता त्याना या गोष्टींत आढळून येते. मुलानी आणखी एक मनोरंजक खेळ शोधून काढला – भूगर्भशास्त्रज्ञांचा खेळ. रानात अगदी आतवर, रानाच्या वेशी-पासून पाच किलोमीटरवर असलेल्या घनदाट झाडांझुडुपांत दिवसाच्या वेळी मुलीनी एक झोपडी उभारली व आपला तळ ठोकला. भूगर्भशास्त्रीय

संशोधन पथकाचा तो मुख्य तळ बनणार होता. खेळाच्या नियमाप्रमाणे रात्रीच्या काळयाकुट्ट अंधारात तैगा पार करून भूगर्भशास्त्रज्ञांच्या एका पथकाने, म्हणजेच मुलानी तो तळ गाठावयाचा होता... खनिजांच्या नमुन्यानी भरलेल्या काही थैल्या त्या भूगर्भशास्त्रज्ञांच्या पाठीवर होत्या. बाहेर अंधार दाटू लागला असताना मुले शाळेतून बाहेर पडली आणि एका तासात ती रानाच्या वेशीवर आली. काळोखातच त्याना आपली वाट हुडकून काढावयाची होती आणि त्याशिवाय बेफाम तैगा नदी व पर्वतरांगा त्याना पार करून जावयाच्या होत्या. मुलीनी कोणताही इशारा द्यावयाचा नाही असा दंडक घालून देण्यात आला होता. रान पार करून जायला चांगले दोन तास लागले. मध्यरात्रीनंतर मुले मुख्य तळावर जाऊन पोहोचली; मुले चांगलीच थकून गेली होती पण त्यांचे मन मात्र आनंदाने व रोमांचानी फुलून आले होते.

ऑगस्टमध्ये एकदा मुसळधार पाऊस कोसळत असताना सामुदायिक शेताच्या खिल्लारातील चौदा वासरे मागे राहिली. जलमय झालेल्या कुरणां-च्या पल्याड ती कुठेतरी पळाली होती. मोठ्या माणसानी पुष्कळ वेळ-पर्यंत त्या वासरांचा शोध घेतला, पण ती त्याना सापडली नाहीत. "आपण त्यांचा तपास लावू या," शूराने व वित्याने मला सुचविले. तेव्हा "निर्भय व शूर बाल-पथका"तील सहा मुलगे व तीन मुली असे मिळून नऊ लोक माझ्याबरोबर त्या वासरांचा शोध घ्यायला निघाले. आम्ही काही शिदोरी बरोबर घेतली, राहुटीचे सामान घेतले, एक होकायंत्र घेतले आणि नदीनाले पार करण्यासाठी दोन रबराच्या धावा घेतल्या. मुलांचा उत्साह व आनंद नुसता उतू जात होता. जलमय कुरणाचा एक एक भाग आम्ही तपासला. काही ठिकाणी आम्ही दोन-दोन किंवा तीन-तीन जणांचे गट केले. जंगलाच्या दाट झाडीतल्या मोकळया जागी चार दिवसांत आम्हाला अकरा वासरांचा शोध लागला. मुसळधार पावसात खळखळून वहाणाऱ्या नाल्यांत सापडून बाकीची वासरे बहुदा मेली असावीत. तपासाचे ते चार दिवस मुलांच्या स्मृतिकोशातून कधीच नाहीसे झाले नाहीत; आणि काळोखाला, बेडकाना व सापाना घाबरणाऱ्या गाल्या, ल्यूस्या व सान्या या छोट्या मुलींच्या तर ते विशेषच स्मरणात राहिले. कारण त्या काळात त्याना कोल्ह्यांचे व घुबडांचेही दर्शन झाले होते.

चवथ्या इयत्तेनंतरच्या ग्रीष्मात आम्ही अल्पाईन गिर्यारोहकांचा खेळ

खेळलो. कड्यावरून घळीमध्ये आम्ही दोरीची एक शिडी सोडली होती. आमची पहाडी छावणी खालच्या बाजूला होती आणि आम्ही आता गिर्यारोहक बनणार होतो. त्या शिडीच्या साहाय्याने डोंगराची ती जवळ जवळ उभी भिंत चढून जावयाचे, रांगत रांगत सुळक्यावर चढावयाचे आणि पुन्हा उतरून घळीत यावयाचे अशी ही कामगिरी होती. तेथे असे अनेक मुलगे होते की ज्याना आता उंचीची भीती वाटत नव्हती; पण तेही मनातून थोडे हादरलेच. वर जाऊन पुन्हा खाली उतरणारा पहिला मुलगा होता वित्या. त्यानंतर शूरा व सिऱ्योझानेही ती कामगिरी पार पाडली. युरा अर्ध्या वाटेवर जाऊनच परत खाली आला. इतरांसाठी इतका सरळ व उंच नसलेला सुळका आम्हाला शोधून काढावा लागला. कित्येक दिवस आम्ही हा खेळ खेळत होतो. मुलींची मुलांबरोबर स्पर्धा लागली. सर्वात शूर व न डगमगणारी अशी मुले होती तीना, लारिसा व कोस्त्या. वलोद्या व स्लावाला त्यानी पुष्कळच खिजविले. तीन मीटर चढताच त्याना भोवळ यायची. अखेरीस सर्व मुलांमुलींनी तो सुळका सर केला.

आपल्या धाडसाचे व निर्भयतेचे दर्शन घडविताना मुले एका सखोल आनंदाचा अनुभव घेत होती. शौर्य आणि धाडस ही केवळ अपवादात्मक परिस्थितीत नव्हे तर दैनंदिन जीवनात व श्रमकार्यात प्रत्येक माणसाला आवश्यक असलेली नैतिक गुणवैशिष्टचे आहेत.

प्राथमिक शाळेचा काळ जसजसा संपुष्टात येत होता तसतशी माझ्या मनाची चिंता अधिकाधिक वाढत होती. मुले लवकरच किशोर वयात पदार्पण करणार होती. स्वतःविषयीच्या प्रश्नानी त्यांचे मन सचिंत होत होते. मुलेमुली स्वतःलाच प्रश्न करीत होती: "मी कोणत्या प्रकारचा माणूस आहे? माझ्यामध्ये काय चांगले आहे आणि काय वाईट आहे? माझ्या कॉम्रेड्स्चे माझ्याविषयी काय मत आहे?"

पौगंडावस्था जसजशी जवळ येते तसतशी स्वयंशिक्षणाची वेळही जवळ येते. भावीकाळात मुलांचा मनोनिग्रह आणि चिकाटी ही सर्वात महत्त्वाची शैक्षणिक शक्ती असते. त्या काळाचा विचार करताना बालपणाच्या काळातच मुलांचे स्वयंशिक्षणातील स्वारस्य जागृत करण्याचा मी प्रयत्न केला. प्रत्येक मुलाचे कामाचे, अभ्यासाचे व खेळाचे वेळापत्रक होते. रोज सकाळी मुले सहा वाजता उठत, सकाळचा व्यायाम करीत, थंड पाण्याने स्नान करीत, न्याहारी घेत आणि गृहपाठ करीत. शाळेला निघण्यापूर्वी निदान एक तास

तरी मुले धड्यांचे वाचन करीत. वेळापत्रकाचे सातत्यशील पालन हे स्वयं-शिक्षणाचे साधन बनावे असा मी प्रयत्न केला. वलोद्या व स्लावाला सकाळी उठणे जरा जड जात होते; कारण त्यांच्या पालकाना त्याना लवकर उठवावेसे वाटत नसे आणि रात्रीही त्याना लवकर निजायला लावणे त्याना जमत नसे. मी केवळ त्या मुलांशीच नव्हे तर त्यांच्या पालकांशीही बोललो. स्लावा स्वयंशिक्षणाकडे आकर्षित झाला आणि आत्म-संयमाचे पाठही तो शिकला. पण वलोद्याला अजून तेही शिकता आले नव्हते. कुटुंबाने त्याला आरामशीर जीवनाची शिकवण दिली होती.

## ग्रीष्माला आम्ही निरोप देतो

चवथ्या इयत्तेच्या अखेरीनंतर माझ्या सर्व मुलानी – सोळा मुलगे व पंधरा मुली – पाचव्या इयत्तेत प्रवेश केला. त्यांपैकी बारा विद्यार्थ्याना सर्व विषयांत उत्कृष्ट गुण मिळाले आणि शाळेतर्फे त्याना सन्मान्य प्रशस्ती-पत्रके देण्यात आली. तेरा विद्यार्थ्याना काही विषयांत चांगले व काही विषयांत उत्कृष्ट गुण पडले तर सहा मुलाना काही विषयांत समाधानकारक, काही विषयांत चांगले व काही विषयांत उत्कृष्ट गुण मिळाले.

मुले मानवतेच्या पाठशाळेतून गेली होती, इतरांची सुखदुःखे ही आपलीच सुखदुःखे आहेत असे मानायला ती शिकली होती, मायभूमीवर प्रेम करायला शिकली होती आणि मायभूमीच्या शत्रूबद्दलच्या द्वेषाने पेटून उठायला शिकली होती. आणि माझ्या शैक्षणिक कार्याचे हेच मुख्य यश होते असे मी मानतो. स्थित्यंतर घडवून आणणारी एक ताकद म्हणून श्रमाची भूमिका मुलाना उमजली होती, अत्यंत सुरेखपणे त्यानी मायभाषेवर प्रभुत्व मिळविले होते आणि निरीक्षण करणे, विचार करणे, वाचन करणे, लेखन करणे व आपले विचार शब्दांत व्यक्त करणे या पाच गोष्टी ती शिकली होती. वयाच्या सातव्या वर्षापूर्वी म्हणजे मुलाने पहिल्या इयत्तेत प्रवेश करण्यापूर्वी मुलाना वाचायला व लिहायला शिकविता येणे शक्य आहे याबद्दल माझी खात्री पटली. ते उद्दिष्ट एकदा साध्य झाल्यानंतर विचारक्रियेसाठी आणि निर्मितीसाठी मुलाच्या बौद्धिक शक्ती मोकळ्या करणे शक्य होते.

या अत्यंत बिकट वयात म्हणजेच पौगंडावस्थेच्या काळात प्रवेश करण्यासाठी मुलांची नैतिकदृष्टचा तयारी झाली पाहिजे ही गोष्टही मी तेवढीच महत्त्वाची मानली. मुले ज्या काळात बालपण व पौगंडावस्था याना विभागणाऱ्या त्या अदृश्य रेषेच्या निकट येऊ लागतात त्या काळाचा प्राथमिक शाळेतच मी विचार केला. काहीनी तर यापूर्वीच ती रेषा ओलांडली होती. पौगंडावस्थेतील अडचणी चवथ्या इयत्तेतच दृष्टोत्पत्तीस येऊ लागल्या होत्या.

...ऑगस्टमधील एका शांत संध्याकाळी ग्रीष्माला निरोप देण्यासाठी आम्ही आमच्या सौंदर्याच्या सांदीकोपऱ्यात गेलो.

सूर्याचे शेवटचे किरण झाडांच्या शेंडयांवर खेळत होते. चार वर्षांपूर्वी आम्ही लावलेल्या सफरचंदांच्या झाडांवर सफरचंदे तयार होऊ लागली होती. द्राक्षवेलींवरील द्राक्षांच्या घडावर एक भ्रमर रुंजी घालीत होता. शेतावरून ट्रॅक्टरचा घरघर आवाज ऐकू येत होता. मुलीनी गव्हाची पेंढी आणली आणि स्नो-बॉल बेरींबरोबर त्यांची गुंफण केली. ग्रीष्मातल्या त्या शांत संध्येचे आम्ही एक गाणे म्हटले. हळू हळू गाण्याचे सूर विरले आणि मुलांची नजर त्या सायंकालीन आकाशाकडे गेली. निसर्गाचे संगीत, ज्याला आम्ही निरोप देत होतो त्या ग्रीष्माची स्मृती—या साऱ्या साऱ्या गोष्टींचे मुलांच्या हृदयात पडसाद उठले. सभोवतालचे ते सारे जग—सायंसमयीचे ते आकाश, किरमिजी सूर्यास्त, पोवळयाच्या रंगाची ती सफरचंदे, द्राक्षांचे घड, हॉपवेलींची ती हिरवी भिंत, क्रिसॅन्थेममची ती धवल फुले, आणि भ्रमरांचे गुंजन—ते सारे सारे काही एखाद्या अद्‌भुत वीणेसारखे आमच्यासमोर पसरले आणि मुलानी तिच्या ताराना स्पर्श करताच त्यातून एक जादूचे संगीत, शब्दांचे संगीत निनादू लागले. आनंदांचे व दु:खांचे ते स्वरझंकार होते. माझे मन जसे आनंदाने भरून आले होते तसेच दु:खाने विकलही झाले होते: तुम्ही आता किशोरवयात पदार्पण केले आहे माझ्या बाळानो! भविष्यकाल तुमची वाट पहात आहे. तो कसा असेल? अहर्निश मी तुमच्याच बरोबर असेन. तुमच्या तारुण्यकालापर्यंत व प्रौढत्वपर्यंत मी तुमचे सारथ्य करीन. पाच वर्षे मी तुमचा मार्गदर्शक होतो आणि माझे संपूर्ण अंत:करण मी तुम्हाला अर्पण केले आहे. असेही क्षण येत की जेव्हा माझे अंत:करण थकून गेलेले असे. आणि ते असे थकून गेले की मी तुमच्याकडेच भरारी घेत असे आणि तुमची ती आनंदी किलबिल माझ्या अंत:करणात नवे सामर्थ्य ओतीत असे; तुमचे हास्य माझ्या मनात नवा

जोम, नवी चेतना निर्माण करीत असे; तुमच्या चौकस नजरा माझ्या विचाराना नवी जागृती देत असत ... तुमची प्रौढ मूर्ती मी माझ्या स्वप्नात पहात असतो, माझ्या प्रिय बाळानो! आणि तुमच्यापैकी प्रत्येकामध्ये मला दिसत असतो तो एक धैर्यशाली सोविएत देशभक्त; प्रामाणिक व ज्वलंत हृदयाचा, स्वच्छ व स्पष्ट मनाचा आणि ज्या हातांच्या निव्वळ स्पर्शाने सुवर्णाचे ओघ वाहू लागतात असे हात लाभलेला एक माणूस.

## वाचकाना विनंती

या पुस्तकाबाबत, त्याच्या अनुवादाबाबत, रचनेबाबत आपले मत समजावून घेण्यास व भावी प्रकाशनांसंबंधी आपल्या सूचना जाणून घेण्यास 'प्रगती प्रकाशना'ला आनंद वाटेल. आपली मते पुढील पत्त्यावर कृपया कळवावी:

१७, झुबोवस्की बुलेवार्द,
मॉस्को, सोविएत संघ.

...वर्गामध्ये मुलाचे संगोपन व विकास ज्या पद्धतीने घडविला जातो ती पद्धत म्हणजे शैक्षणिक प्रक्रियेच्या एकूण यशाची एक सर्वात महत्त्वाची अट आहे.

वासिली सुखोम्लिन्स्की

या पुस्तकाचे लेखक वासिली अलेक्सांद्रोविच सुखोम्लिन्स्की (१९१८-१९७०) हे एक असामान्य सोविएत शिक्षक व शिक्षणतज्ज्ञ असून सोविएत शिक्षणशास्त्र प्रबोधिनीचे ते समकक्ष सभासद होते. त्याना समाजसत्तावादी श्रमवीर हा किताब मिळाला होता.

शैक्षणिक क्षेत्रात ३० वर्षांहून अधिक काळ सुखोम्लिन्स्की यानी व्यतीत केला. खेड्यातल्या एका शाळेचे संचालक म्हणून काम करीत असताना शालेय विद्यार्थ्यांचे संगोपन व शिक्षण यांसंबंधीचे प्रश्न हे त्यानी आपले कार्यक्षेत्र बनविले.

प्राथमिक शाळेच्या प्रांगणातच शिक्षकांचे सृजनशील श्रम व कार्य अत्यंत ठळकपणे प्रकट होते. हे शैक्षणिक कार्य हाच या पुस्तकाचा केंद्रबिंदू आहे.

शिक्षणशास्त्रातील अनेक शास्त्रीय-सैद्धांतिक प्रश्न लेखकाने या पुस्तकात उपस्थित केले आहेत आणि आपल्या स्वतःच्या अनुभवावर आधारलेले त्यांवरील व्यावहारिक तोडगे सुचविले आहेत. मुलांमध्ये निसर्गप्रेमाची जोपासना कशी करण्यात आली पाहिजे, त्यांच्यामध्ये अभ्यासाची आवड, आपल्या श्रमाविषयी, आपल्या लोकांविषयी, आपल्या मातृभूमीविषयी प्रेम निर्माण करून प्रत्येक मुलाला वास्तवाविषयीच्या ज्ञानग्रहणास कसे उद्युक्त केले पाहिजे याविषयी सांगत असताना प्रत्येक विद्यार्थ्याच्या व्यक्तिमत्वाची घडण आपण कशा पद्धतीने केली याचे लेखकाने तपशीलवार विवरण केले आहे. सहृदयता, सहानुभाव, बंधुभावना, नागरी प्रतिष्ठा, देशाभिमान यांची माणसामध्ये जोपासना करण्यावर सुखोम्लिन्स्की यानी खास लक्ष केंद्रित केले आहे. हे पुस्तक अतिशय सुबोध शैलीत लिहिण्यात आले असून ते लिहिताना शिक्षक, पालक आणि अत्यंत विशाल असा वाचकवर्ग लेखकाने आपल्यासमोर ठेवला आहे.